# महान भारतीय क्रांतीकारक

## प्रथम पर्व १७७० ते १९००

श्री. स. ध. झांबरे




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

# महान भारतीय क्रांतिकारक

## प्रथम पर्व

(१७७० ते १९००)

[ क्रांतिकारकांचा कालक्रमानुसार परिचय ]

स. ध. झांबरे

कोपरगाव



महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

प्रथमावृत्ती : २००७

■ प्रकाशन :
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय इमारत,
तिसरा मजला, १७२ ग्रंथसंग्रहालय मार्ग,
दादर (पूर्व), मुंबई - ४०० ०१४.

■ मुद्रक :
व्यवस्थापक,
शासकीय फोटोझिंको मुद्रणालय,
पुणे - ४११ ००१

किंमत : रु. १२५/-





# अनुक्रमणिका

| अ. क्र. | लेखाचे नाव | पृष्ठ क्रमांक |
|---|---|---|
| २३. | राणी जिन्दन कौर .. .. | ८६ |
| २४. | मूलराज .. .. | ९१ |
| २५. | सिदो कान्हू .. .. | ९४ |
| २६. | मंगल पांडे .. .. | ९७ |
| २७. | ईश्वरी पांडे .. .. | ९९ |
| २८. | बादशहा बहादुर शाह जफर .. .. | १०१ |
| २९. | नानासाहेब पेशवे .. .. | १११ |
| ३०. | कुमारी मैना .. .. | ११९ |
| ३१. | तात्या टोपे .. .. | १२२ |
| ३२. | अजीमुल्ला खाँ .. .. | १२८ |
| ३३. | मुहंमद अली .. .. | १३४ |
| ३४. | नर्तकी अजीजन .. .. | १३८ |
| ३५. | राणी लक्ष्मीबाई .. .. | १४१ |
| ३६. | वीरांगना झलकारी .. .. | १४८ |
| ३७. | भीमाबाई .. .. | १५१ |
| ३८. | राणा बेनी माधोसिंह .. .. | १५५ |
| ३९. | रंगो बापूजी .. .. | १५८ |
| ४०. | फिरोजशहा .. .. | १६४ |
| ४१. | वाजिद अली शहा .. .. | १६६ |
| ४२. | बेगम हजरत महल .. .. | १७० |
| ४३. | मौलवी अहमदुल्ला शाह .. .. | १७५ |
| ४४. | कुँवरसिंह .. .. | १८० |
| ४५. | अमरसिंह .. .. | १८५ |

# भूमिका

आपल्या देशाला स्वातंत्र्य कोणत्या व कशा प्रयत्नांनी मिळाले, या वादावर आता पडदा पडला आहे. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर पहिल्या दोन-तीन दशकात 'आम्ही रक्ताचा थेंबही न सांडता स्वातंत्र्य मिळविले,' असा भोंगळ प्रचार जोरात चालू होता. पण ते खरे नव्हते. म. गांधींनी अहिंसक लढा व्यापक प्रमाणावर सन १९२० नंतर, लोक. टिळकांच्या निधनानंतर सुरु केला. स्वातंत्र्याचा लढा केवळ देशातील सुशिक्षित सवर्णांचा मक्ता नसून देशातील सर्व धर्मांची, जाती जमातींची, सवर्णांनी दुर्लक्षित केलेल्या दलितवर्गांचीही स्वातंत्र्य लढ्यासाठी आवश्यकता आहे, हे गांधीजींनी हेरले व साऱ्या भारतीय जनतेला स्वातंत्र्य प्राप्तीसाठी उद्युक्त केले, हे तर उघड सत्य आहे. पण केवळ अहिंसक लढ्यामुळेच आपल्या देशाला स्वातंत्र्य मिळाले, हे तितकेसे खरे नाही. सशस्त्र उठाव करुन स्वातंत्र्य मिळविणे तर इंग्रजांनी निःशस्त्र केलेल्या जनतेला शक्यच नव्हते. तरीही वैयक्तिक स्वरुपात, गुप्त संघटनांद्वारे इंग्रज सरकारला नामोहरम करण्याचे प्रयत्न आपल्या देशतील सर्व भागांतून होतच राहिले. या सशस्त्र क्रांतिकारकांनी आपल्या देशातील इंग्रजांच्या सत्तेलाच नव्हे, तर प्रसंगी ब्रिटीश पार्लमेंटलाही हादरे दिले, हे सूर्यप्रकाशा इतकेच सत्य आहे. ते मुळीच नाकारता येत नाही. काही सशस्त्र क्रांतिकारकांना तर आपल्या देशातून परागंदा व्हावे लागले होते व त्यांनी विदेशातून आपल्या देशाच्या स्वातंत्र्यासाठी नेटाने प्रयत्न केले होते. त्यासाठी हालअपेष्टा सोसल्या होत्या. हे लोक टिळक जाणून होते. त्यांचा अशा सर्व प्रकारच्या क्रांतिकारकांना मनातून पाठिंबा असला, तरी ते अशा क्रांतिकारकांना सबूरीचा सल्ला देत असत.

इंग्रजांची आपल्या देशातील सत्ता अत्यंत मजबूत होती. आपल्या देशातील संपत्तीवरच त्यांनी आपले सैन्यबळ, शस्त्रबळ, व पोलिस - यंत्रणा वाढविली होती. त्यांची ही शक्ती प्रचंड होती. अशा शक्तिशाली शासन - यंत्रणेशी सशस्त्र क्रांतिकारकांचे लढे हे शक्ति गमावलेल्या लोकांचे लढे होते. साधन संपन्न सत्तेविरुद्ध मूठभर साधनहिन क्रांतिकारकांची दुबळी लढत होती. असे जरी असले तरी आपल्या देशातील क्रांतिकारकांनी सन १७७० पासून या सत्तेशी आपल्या तुटपुंज्या, परंपरागत शस्त्रांनी प्राणपणाने शेकडो लढती देऊन आपले पौरुष इंग्रज सत्ताधाऱ्यांना सिद्ध करुन दाखविले होते, असा इतिहास आहे. सातत्याने पावणेदोनशे वर्षे सशस्त्र क्रांतिकारक इंग्रज सत्तेशी झुंजत होते. त्यात हजारो क्रांतिकारकांनी आपल्या प्राणांच्या आहुत्या स्वातंत्र्याच्या बलिवेदीवर अर्पण केल्या होत्या. हजारो क्रांतिकारकांनी तुरुंगात भयानक हालअपेष्टा सहन केल्या होत्या त्या हालअपेष्टांनी जेरीस येऊन कित्येक क्रांतिकारक तुरुंगातच

मरण पावले. कित्येकांना वेड लागले. हे समजत असूनही आपल्या क्रांतिकारकांची स्वातंत्र्यप्राप्तीची जिद्द वाढतच होती, हे विशेषच होय. त्याची परिणती सन १९४२ च्या गांधीजींच्या 'चलेजाव' चळवळीत, नेताजी सुभाषचंद्र बोसांच्या आझाद हिंद सेनेच्या अभूतपूर्व लढ्यात व इंग्रजांच्या ताब्यातील नाविकदलाच्या व विमानदलाच्या उठावात झाली आणि इंग्रज सरकार आपल्या देशावर सत्ता गाजविण्यात हतबल ठरले. तेंव्हा रक्ताचा थेंबही न सांडता आम्ही स्वातंत्र्य मिळविले, या प्रचाराला काय अर्थ उरतो? एवढे मात्र खरे की, ज्या संघटनांनी स्वातंत्र्याच्या लढ्यात मुळीच भाग घेतला नाही, त्यां संघटनांच्या अनुयायांना म. गांधीवर जहरी टीका करण्यास हाच प्रचार कारणीभूत ठरला, हे निर्विवाद होय.

इंग्रजांच्या सत्तेविरुद्ध सशस्त्र उठावांची मालिका केव्हापासून झाली, हे सुद्धा समजून घेणे अत्यावश्यक आहे. सन १७६४ च्या उत्तरार्धात बक्सर (बिहार) येथे दिल्लीचा बादशहा शाहआलम, लखनौचा नबाब शुजाउद्दौला व बंगालचा इंग्रजांनी पदच्युत केलेला नबाब मीर कासीम यांनी एकत्र येऊन इंग्रजांशी मोठा लढा दिला. त्यात इंग्रजांनी त्यांचा पराभव केला. त्यामुळे बादशहा शाहआलम याला राबर्ट क्लाईव्ह याच्याशी तह करणे भाग पडले. त्या तहान्वये कंपनी सरकारला बादशहा शाहआलमने बंगाल, बिहार, व ओरिसा प्रांतांची दिवाणीची सनद द्यावी लागली त्या काळात आसाम प्रांतही बंगालचा एक भाग होता. म्हणजे हिंदुस्तानच्या संपूर्ण पूर्व भागावर त्या तहान्वये कंपनी सरकारचे अधिपत्य प्रस्थापित झाले व कंपनी सरकारकडे भूमिकर - वसुलीचा अधिकार आला आणि त्या प्रदेशाचा राज्यकारभार नबाबांच्याकडे राहिला. अशी दुहेरी राज्यव्यवस्था क्लाईव्हने निर्माण केली. तिचे फार वाईट परिणाम त्या प्रदेशातील जनतेला भोगावे लागले. इंग्रजांनी व त्यांच्या एतद्देशीय दलालांनी जनतेचे भयंकर आर्थिक शोषण सुरु केले. त्यामुळे जनता उत्तरोत्तर दारिद्र्याच्या खाईल लोटली गेली. या तहामुळे ईस्ट इंडिया कंपनी केवळ व्यापारी संस्था न राहता, ती हिंदुस्थानातील एक प्रबळ राजकीय शक्ती बनली. 'भारतात ब्रिटीश सत्तेचा प्रारंभ बक्सरच्या युद्धानेच झाला.' असे सरजेम्स स्टीफन याने लिहिले आहे.

कंपनी सरकारला या प्रदेशाचे दीवाणी अधिकार प्राप्त झाले खरे. पण भूमिकर वसुलीचे काम करणे कंपनी सरकारला पुरेशा कर्मचाऱ्यांअभावी करणे शक्य नव्हते. म्हणून कंपनी सरकारने भूमिकर - वसुलीचे काम बंगालमध्ये मुर्शिदाबाद येथील रजाखाँ व बिहार - ओरिसामध्ये पाटणा येथील सिताबराय या दोन दिवाणांकडे सोपविले. त्या दोन्ही दिवाणांनी या वसुलीच्या कामासाठी ठेकेदार नेमले. हे ठेकेदार आपल्याकडे

सोपविलेल्या भागातील शेतकऱ्यांकडून प्रमाणापेक्षा जास्त भूमिकर वसूल करु लागले. कंपनी सरकारने त्यांना धान्याऐवजी रक्कमेत भूमिकर वसुलीचे आदेश दिले होते. बहुसंख्य शेतकऱ्यांना आपल्या जमिनीचा भूमिकर देणे अशक्य झाले. कारण मोगलांच्या काळातील भूमिकरांपेक्षा कंपनी सरकारने दिढी दुपटीने भूमिकर वाढविले होते. जे शेतकरी भूमिकर देण्यास असमर्थ होते, त्यांच्या जमिनी हे ठेकेदार जप्त करुन त्या जमिनी लिलावात विकू लागले. जे जास्त भूमिकर देतील अशा बाहेरच्या धनिकांनी त्या जमिनी घेतल्या त्यातून नवा जमीनदार वर्ग त्या भागात निर्माण झाला. त्या जमीनदाराने जर ठरविलेला भूमिकर दिला नाही, तर त्याच्याकडील जमिनी जप्त करुन लिलावात काढल्या जात व जो जमीनदार जास्तीत जास्त वसुली करुन देईल, त्याच्याकडे त्या जमिनी सोपविल्या जात असत. हे जमिनदार शेतकऱ्यांचे कर्दनकाळ ठरले. शेतकरी आपल्या जमिनीपासून वंचित झाले व त्या जमीनदारांच्या जमिनीवर शेतमजुरी करु लागले. काही शेतकरी आपल्या जमिनी वाचविण्यासाठी गावच्या पाटलाकडून, जमीनदारांकडून, मारवाड्यांकडून, व्यापाऱ्यांकडून व ब्राह्मणांकडून कर्ज काढून भूमिकर भरीत असत. त्या कर्जाचे व्याज एवढे जबरदस्त असे की, शेतकऱ्यांना ते पिढ्या न् पिढ्या फेडता येत नसे. त्याच्या बदल्यात त्या शेतकऱ्यांना त्या सावकारांच्या शेतावर आयुष्यभर राबावे लागायचे. ह्या जमीनदारांना व सावकारांना कंपनी सरकारचे संरक्षण असायचे. ते कंपनी सरकारचे दलाल होते. या दलालाकडून व कंपनी सरकारकडून शेतकऱ्यांची अमानुष पिळवणूक सातत्याने होत होती. त्यामुळे शेतकऱ्यांत कंपनी सरकार विरुद्ध व तिच्या दलालांविरुद्ध असंतोष खदखदत होता.

जास्तीत जास्त जमिनींचा भूमिकर वसूल करण्यासाठी कंपनीच्या ठेकेदारांची नजर त्या भागातील डोंगर - दऱ्यांमधील आदिवासींच्या जमिनीकडे वळली. या आधीच्या हिंदू व मुसलमान राज्यकर्त्यांनी आदिवासी जनतेकडून कधीही भूमिकर वसूल केला नव्हता. भूमिकराची सक्ती होऊ लागल्याने बिहार, बंगाल, आसाम, प्रांतातील हे कडवे, काटक, शूर व धाडसी आदिवासी कंपनी सरकारच्या या दलालांविरुद्ध व कंपनी सरकार विरुद्ध दंड ठोकून उभे राहिले. या डोंगराळ प्रदेशात खिस्ती मिशनऱ्यांचा धर्मप्रचारही जोरात सुरु होता. शेकडो आदिवासींचे त्यांनी खिस्ती धर्मात धर्मांतर केले होते, करीत होते. त्यांच्याबद्दलही आदिवासींच्या मनात रोष होताच. मुंडा, संथाल, कोल, हो, लरका-हो, नागा इ. जातींच्या आदिवासींनीच पहिल्या प्रथम कंपनी सरकारविरुद्ध रणशिंग फुंकले व कंपनी सरकारच्या सैन्याशी सातत्याने लढे दिले. त्या लढ्यात हजारो आदिवासी मारले गेले. आपल्या प्रदेशाच्या स्वातंत्र्यासाठी सन १७७० पासून हे आदिवासी लढत होते. बिहारमधील पलामू भागातील चेरो आदिवासींच्या चित्रजीत राय या राजाच्या

जयनाथसिंह ह्या दिवाणाने सन १७७०-७१मध्ये कंपनी सरकारच्या सैन्याशी सातत्याने दोन वर्षे अनेक लढे दिले. त्याचे पुढे काय झाले, हे अज्ञात आहे. जयनाथसिंह हाच भारतातला आद्य क्रांतिकारक त्यामुळे ठरतो. त्याच्यानंतर अनेक आदिवासी क्रांतिकारकांनी इंग्रज सत्तेशी अनेक झुंजी दिल्या. त्यात काहींना प्राणांस मुकावे लागले, तर काहींना वर्षानुवर्षे तुरुंगात हालअपेष्टा सहन कराव्या लागल्या. थोर आदिवासी क्रांतिकारक बिरसा मुंडा याला तर इंग्रज सरकारने तुरुंगात विष देऊन मारुन टाकले. आदिवासींच्या इतिहासाकडे प्रस्थापित इतिहासकारांनी पूर्णपणे दुर्लक्ष केले. त्यांची उपेक्षा केली. त्यांचा इतिहास इंग्रज कालीन दप्तरांत कुजत पडला आहे. त्यावर मोठ्या प्रमाणात संशोधन होणे अत्यावश्यक आहे. हिंदी प्रदेशात शिवतोषदास, महाराष्ट्रात सदाशिव आठवले, खोबरेकर, बाबा भांड, गोंविद गारे यांनी थोडेफार संशोधन या आदिवासींबद्दल केलेले आहे. पण तेही फार महत्त्वाचे आहे.

बंगाल, बिहार, आसाम, ओरिसा, या प्रांतात आदिवासी जनता कंपनी सरकारशी झुंजी देत होती, त्या काळात हिदुस्थानातील बाकीच्या प्रदेशावर मराठे, मुसलमान, राजपूत, शीख इत्यादिकांची राज्ये होती. त्या राज्यांवरही इंग्रजांचा डोळा होताच व अवघ्या पन्नास - पाऊनशे वर्षांत इंग्रजांनी ती राज्येही आपल्या कपटनीतीने, दंडेलशाहीने आपल्या आधिपत्याखाली आणली व शेकडो राजे - रजवाड्यांना आपले मांडलिक बनवून संपूर्ण हिंदुस्थानावर आपले वर्चस्व स्थापन केले.

इंग्रजानी सन १८१८ मध्ये पेशवाई बुडविली. ग्वाल्हेरचे शिंदे, इंदूरचे होळकर, नागपूरकर भोसले यांच्याशी स्वतंत्र्य तह केले. त्यांच्या फौजा घरी बसविल्या. कित्येक हजार सैनिक बेकार झाले. त्यातले काही साधु - संन्याशी - फकीर बनले, तर बहुसंख्य सैनिकांनी आपल्या टोळ्या बनवून देशात दरोडेखोरी, लूटमारी, वाटमारी, अशी गुन्हेगारी सुरु केली. त्यांनी रयतेला जगणं मुश्कील करुन टाकलं - देशात अराजकता माजली. याच त्या पेंढाऱ्यांच्या व ठगांच्या टोळ्या. त्यांची लपण्याची स्थाने जंगले हीच होती. कंपनी सरकारने त्या जंगलात वृक्षतोड करुन या गुन्हेगार टोळ्यांची आश्रय स्थाने नष्ट केली. आपल्या फौजांनी या टोळ्यांचा बीमोड केला.

कंपनी सरकारने शेकडो राजे रजवाड्यांना अपमानास्पद करारांनी बांधून घेतले होते. प्रत्येक राजाच्या दरबारी आपले प्रतिनिधी (रेसिडेंट) ठेवले. त्यांच्याच मनाप्रमाणे ह्या मांडलिक राजांना वागावे लागे, राज्य कारभार करावा लागे. त्यांचे स्वातंत्र्य कंपनी सरकारने हिरावून घेतल्याने ते राजे-रजवाडेही कंपनी सरकार विषयी मनातून असंतुष्ट होते. पण त्यांच्याजवळ आता पूर्वीसारख्या फौजा नव्हत्या. शस्त्रास्त्र खरेदीला व ती

बनविण्याला आळा बसला होता. त्यामुळे हे राजे किंकर्तव्यमूढ होऊन बसले होते. तरीही त्यांच्या मनात कंपनी सहकर विषयी असंतोष धुमसतच होता.

दिल्लीचा बादशहा तर कंपनी सरकारचा पेन्शनर होता. अवधचा नबाब वाजिद अली शाह याला कंपनी सरकारने कलकत्त्याला नजरकैदेत ठेवून दिले होते. राज्यात अव्यवस्था आहे, राजाला औरस मुलगा नसल्याने वारस नाही अशी काहीही कारणे दाखवून लॉर्ड डलहौसीने अनेक राज्ये खालसा केली. त्यामुळे त्या राज्यात कंपनी सरकार विरुध्द भयंकर असंतोष माजला. ही राज्ये कंपनी सरकारने आपल्या ताब्यातील हिंदी शिपायांच्याच बळावर बळकावली होती हे विशेषच म्हणावे लागेल.

मध्य भारतातील व महाराष्ट्रातील भिल्ल, कोळी, महादेव कोळी, रामोशी या आदिवासी जमाती छत्रपती शिवाजी महाराजांच्या काळापासून गड-किल्ल्यांची रखवाली या शूर व पराक्रमी जमातीकडेच महाराजांनी सोपविली होती. त्यासाठी त्यांना वतने दिली होती. हे लोक आपल्या वतनांच्या जमिनी कसत. त्यावरच त्यांचे संसार अवलंबून होते. ती वतने कंपनी सरकारने काढून घेतली. ते आदिवासी उघड्यावर पडले. पोटाची खळखी भरण्यासाठी दरोडे घालू लागले. त्यांच्यामधूनच उमाजी नाईक, भागोजी नाईक, भिमाजी नाईक, राघोजी नाईक असे अनेक वीर कंपनी सरकारशी दोन हात करायला उभे राहिले. कंपनी सरकारच्या दलालांविरुध्द मध्यप्रदेशात तंट्या भिल्लाने कंपनी सरकारच्या अधिकाऱ्यांना सळो की पळो करुन सोडले. सन १७५७ ते १८५७ या शंभर वर्षांच्या काळात हिंदुस्थानातील इंग्रजांकडून त्रस्त झालेल्या सर्व थरांतील जनतेने सुमारे ३०० लढे दिले. त्यातले ४० लढे मोटे होते. सर्वात मोठा लढा १८५७ सालचा तेच हिंदुस्थानचे पहिले स्वातंत्र्य युध्द होय. या युध्दाने कंपनी सरकारच्याच नव्हे, तर ब्रिटिश पार्लमेंटच्याही पोटात भीतीचा गोळा उठला होता. पण कंपनी सरकारने आपल्या अमानुष, पाशविक व क्रूर सत्तेने या स्वातंत्र्य लढ्यात विद्रोही क्रांतिकारकांचा पराभव केला. त्यात सुमारे दीड लाखाच्यावर हिंदी लोकांचे शिरकाण इंग्रजी सेनाधिकाऱ्यांनी केले. त्या युध्दात लाखो हिंदी शिपाई मारले गेले. त्यानंतर इंग्लंडच्या राणीने हिंदुस्थानचा कारभार स्वतःच्या ताब्यात घेतला. सर्वांना माफी जाहीर केली. पण नंतर साऱ्या देशातील जनतेकडून त्यांची शस्त्रे काढून घेऊन हिंदी जनतेला निःशस्त्र केले. तरीही वासुदेव बळवंत फडके, तंट्या भिल्ल, चाफेकर बंधु, बिरसा मुंडा आदि क्रांतिकारकांनी इंग्रजांच्या सत्तेशी लढा देण्याचे अभूतपूर्व साहस केलेच. सन १९०० मध्ये बिरसा मुंडाला इंग्रजांनी मारले व येथेच सशस्त्र भारतीय क्रांतिकारकांच्या लढ्याचे पहिले पर्व संपले.

**स. ध. झांबरे**

# निवेदन

भारतीय स्वातंत्र्य प्राप्तीला अनेक क्रांतीकारकांचे प्रयत्न कारणीभूत झाले. अक्षरक्षः असंख्य स्वातंत्र्यसैनिकांनी त्यासाठी देहदंड सोसला, संघर्ष केला. त्यातील अनेक जण हुतात्मा झाले. तसेच अनेक जण अज्ञात व अनामिक राहिले. परंतु सुदैवाने या स्वातंत्र्यसैनिकांपैकी अनेकांची माहिती उपलब्ध आहे. त्या आधारावर ज्ञात असलेल्या स्वातंत्र्यवीरांच्या कार्याची माहिती त्यांच्या चरित्र रुपाने प्रकाशित व्हावी असा प्रस्ताव श्री. सर्वोत्तम धनाजी झांबरे यांनी दिला. या प्रस्तावाचे महत्त्व जाणून भावी पिढ्यांसाठी भारताच्या स्वातंत्र्यवीरांची संक्षिप्त चरित्रे ग्रंथरुपाने प्रकाशित करावी असा निर्णय मंडळाने घेतला व आज 'महान भारतीय क्रांतिकारक' या ग्रंथाचा पहिला खंड प्रकाशित होत आहे.

श्री. सर्वोत्तम धनाजी झांबरे यांनी आयुष्याच्या उत्तर काळात अतिशय परिश्रम घेऊन स्वातंत्र्यवीरांची माहिती संकलित केली. त्यासाठी त्यांना धन्यवाद द्यावे तेवढे थोडेच होतील. या चरित्रग्रंथाच्या पहिल्या खंडामध्ये ९८ क्रांतिकारकांची अल्पचरित्रे समाविष्ट केलेली आहेत. त्यातील माहिती जास्तीत जास्त निर्दोष व परिपूर्ण व्हावी असा लेखकाचा प्रयत्न असला तरी त्यामध्ये काही त्रुटी असण्याची शक्यता मंडळ नाकारत नाही. तसेच क्वचित ठिकाणी एखादे वादग्रस्त विधान केले असण्याची शक्यता नाकारता येत नाही. परंतु इतिहास घडविणाऱ्या व्यक्तिंची चरित्रे लिहिताना कितीही वस्तुनिष्ठ दृष्टीकोन स्वीकारला तरीही काही गफलती होऊ शकतात. या ग्रंथामध्ये अशा काही किरकोळ त्रुटी राहिल्या असल्यास, त्याकडे दुर्लक्ष करताना या क्रांतिकारकांची चरित्रे, त्यांचे कार्य व त्याचे ऐतिहासिक महत्त्व याचा प्रकर्षाने विचार व्हावा, असे मंडळाला वाटते. असे साक्षेपी प्रयास कुणी केले नाहीत तर क्रांतिवीरांची चरित्रे कधीही प्रकाशात येऊ शकली नसती व देशाच्या भावी पिढ्यांचे एका तऱ्हेने मोठे नुकसान झाले असते. त्यामुळे या चरित्रग्रंथाकडे एक महत्त्वपूर्ण संकलन एवढ्याच मर्यादित दृष्टीने पहावे व पूर्वकाळात भारताच्या स्वातंत्र्यासाठी ज्यांनी आपले आयुष्य अर्पण केले त्यांची चरित्रे त्यानिमित्ताने उपलब्ध झाली आहेत, यामध्ये समाधान मानावे असे वाटते. हा उपयुक्त ग्रंथ वाचकांसाठी व संदर्भ शोधकांसाठी संग्राह्य ठरेल अशी उमेद आहे. हा महत्त्वाचा ग्रंथ प्रकाशित करण्याची संधी महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाला मिळाली याचा आनंद वाटतो.

(मधु मंगेश कर्णिक)

मुंबई
अध्यक्ष,

दिनांक : ८ ऑगस्ट, २००६.
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

# १. जयनाथसिंह

रॉबर्ट क्लाईव्ह मे १७६५ मध्ये ईस्ट इंडिया कंपनीच्या गव्हर्नर म्हणून कलकत्त्याला आला. २३ ऑक्टोबर १७६४ रोजी ईस्ट इंडिया कंपनी व अवधचा नबाब शुजाउद्दौला, बादशहा शांहआलम आणि मीरकासीम यांच्यात बक्सरचे प्रसिद्ध युद्ध झाले. पुन्हा ३ मे १७६५ रोजी कडा येथे निर्णायक युद्ध होऊन बिहार, बंगाल व ओरिसा प्रांतावर कंपनीची अधिसत्ता झाली. १२ ऑगस्ट १७६५ रोजी क्लाईव्ह आणि नबाब यांच्यात तह झाला. त्यानुसार या तिनही प्रांतांच्या महसूल वसुलीचे काम कंपनी सरकारकडे आणि न्याय व्यवस्था व कायद्याची अंमलबजावणी नबबाकडे अशी दुहेरी राज्यव्यवस्था भारताच्या या संपूर्ण पूर्व भागात सुरु झाली. कंपनी सरकारने महसूल वसुलीसाठी ठेकेदार नेमले. जो ठेकेदार कंपनीला जादा महसूल देईल, त्याच्याकडे त्या त्या भागातील वसुलीचा ठेका कंपनी सरकारकडे देऊ लागले.

प्राचीन काळापासून डोंगर दऱ्यांमध्ये व जंगलामध्ये राहणारे कोट्यावधी आदिवासी कोणत्याही राजाचे प्रजाजन नव्हते. त्यांची त्या भागात स्वतंत्र सत्ता होती. त्यांना कोणत्याही राजाला महसूल द्यावा लागत नव्हता. बंगाल, बिहार आणि ओरिसा या प्रांतांच्या संधि प्रदेशात डोंगरदऱ्या व मोठीमोठी जंगले होती. त्या जंगलात चेरो, हो, लखत्र हो, कोल, मुंडा आदि जातींचे आदिवासी मुक्तपणे राहत असत. जास्तीत जास्त महसूल वसुलीसाठी कंपनी सरकार हळुहळू हा डोंगराळ व जंगलाचा प्रदेश आपल्या ताब्यात घेऊ लागले. त्यामुळे या आदिवासी जातींचे स्वातंत्र्य नष्ट झाले या भागातील जमिनी कंपनी सरकारने मैदानी प्रदेशातील धनिक हिंदू व मुसलमानांना ठेक्याने दिल्या. त्यातूनच नवा जमिनदार वर्ग उदयाला आला - या जमिनदारांनी त्या भागातील आदिवासी कडून जास्तीत जास्त महसूल वसुली सुरु केली. कंपनी सरकारने जंगल - कायदा केल्याने जंगलांवर निर्भर राहणाऱ्या आदिवासी जनांत असंतोष धुमसू लागला. त्यांची लहान लहान राज्ये कंपनी सरकार बळकावू लागले. त्यामुळे आदिवसी राजे व आदिवासींचे नेते संघटित होऊन या नव्या जमीनदारा विरुद्ध व कंपनी सरकारच्या अंमलदाराविरुद्ध लढण्यास उभे ठाकले.

बिहारच्या दक्षिण भागात चेरो जमातीचे लहानसे राज्य होते. त्यांचा राजा पलामू किल्ल्यात राहत असे. इंग्रज या भागात शिरण्यापूर्वी पलामूच्या राज्यधिकाराबाबत अस्थिरता निर्माण झालेली होती. पलामूचा राजा जयकृष्ण राय याची हत्त्या जयनाथ

सिंहाने आधीच्या राजाचा नातू चित्रजित राय याच्या साह्याने केली व पलामूच्या गादीवर चित्रजित राय याला बसविले. चित्रजित रायने जयनाथ सिंहाला आपला दीवाण नेमले.

जयकृष्ण राय चा नातू गोपाल राय याने पलामूचे राज्य मिळविण्यासाठी पाटणा येथे जाऊन इंग्रजांचे साह्य मागितले. कंपनी सरकारला त्या भागात हस्तक्षेप करण्याची संधी मिळाली व पाटण्याच्या इंग्रज कमिशरने दीवाण जयनाथ सिंहाला ९ जानेवारी १७७१ रोजी पत्राने कळविले की, पलामूचा किल्ला ताबडबोब कंपनी सरकारच्या ताब्यात द्यावा जर पलामूचा किल्ला कंपनी सरकारकडे सोपविला, तर कंपनी सरकार चित्रजित रायला राजा म्हणून मान्यता देईल? ते पत्र वाचून जयनाथ सिंहांनी दहा दिवसांची मुदत मागून घेतली त्या आधीच २२ डिसेंबर १७७० पासूनच पलामू किल्ल्यावर हल्ला करण्याची तयारी सुरु केली होती.

जयनाथ सिंहांनी मागितलेल्या दहा दिवसांच्या मुदती आधीच पाटण्याच्या कमिशनरने कॅप्टन कॅमकला आदेश दिला. "गोपाल रायला घेऊन शक्य तितक्या लवकर पलामूचा किल्ला हस्तगत करावा." कॅ. कॅमक शिपायांच्या दहा तुकड्या घेऊन पलामूकडे निघाला. त्याच्या मदतीला ले. डंकन शिपायांच्या दोन तुकड्या घेऊन आला. हे सैन्य शेरघाटीला आले, तेंव्हा ते कीटिंग आपल्या पलटणीसह गोपाल रायला घेऊन त्यांना येऊन मिळाला. पाटण्याहून त्यांनी गोपाळ राय साठी शाही पोशाख मागवून घेतला व पलामूच्या रस्त्यावरील कुंडा येथे गोपल रायचा पलामूचा राजा म्हणून राज्यभिषेकही केला.

२८ जानेवारी १७७१ रोजी त्यांनी पलामूच्या किल्ल्याला वेढा दिला. २९ जानेवारी रोजी त्यांनी दीवाण जयनाथ सिंहाला आत्मसमर्पण करण्याचा संदेश पाठविला. किल्ल्यातून त्यांना उत्तर मिळाले, "चेरो सैनिक आपला राजा चित्रजित रायच्या आदेशाशिवाय अन्य कोणाचाही आदेश मानीत नाहीत."

पलामूचा हा किल्ला नवा होता व त्यात पिण्याचे पाणी पुरेसे नव्हते. म्हणून जयनाथ सिंह आपल्या चेरो सैनिकांसह जवळच्याच जुन्या किल्ल्यात गुप्त मार्गाने निघून गेला. इंग्रजांनी पलामूचा किल्ला हस्तगत केला. तेव्हा त्यांना दिसून आले की, जुना किल्ला नव्या किल्ल्यापेक्षा कमी उंचीवर आहे. नव्या किल्ल्यातून जुन्या किल्ल्यातील सर्व काही स्पष्टपणे दिसत होते. कॅमकला कळून चुकले की, जुना किल्ला मजबूत आहे, पण त्यात सैन्य आपल्या सैन्यापेक्षा फारच कमी आहे. म्हणून त्याने पाटण्याहून मोठी तोफ व दारुगोळा मागवून घेतला. ती तोफ ६ पौंडी होती. ती येईपर्यंत युद्ध सुरु होऊन इंग्रजांचे शंभरावर सैनिक युद्धात मारले गेले होते.

इंग्रज सैन्यासाठी पाटण्याहून रसद येत आहे, हे पाहून चेरो सैनिकांनी रसदी बरोबर येत असलेल्या इंग्रज सैन्याच्या तुकडीवर अचानक हल्ला केला. तेव्हा कॅमकने शिपायाच्या तुकड्या रसदीच्या संरक्षणार्थ पाठविल्या. चेरो सैनिकांनी त्यांतील कित्येक शिपाई ठार केले. अटीतटीचे युद्ध चालूच होते. इंग्रजांची रसद संपत आली होती. म्हणून कॅ. कॅमकने पाटण्याला दूत पाठवून भरपूर रसद व चांगले प्रशिक्षित सैनिक मागविले.

३ फेब्रुवारीच्या रात्री चेरो सैनिकांच्या एका तुकडीला जयनाथ सिंहांनी दोन वेळा हल्ला करायला पाठविले. ४ फेब्रुवारीला इंग्रजांनची रसद येत आहे, हे जयनाथसिंहांनी किल्ल्यावरुन पाहिले व आपल्या सैनिकांची एक तुकडी ती रसद लुटून आणण्यासाठी पाठविली. चेरो सैनिकांनी इंग्रजांच्या अनेक प्रशिक्षित सैनिकांना मारुन टाकून ती रसद लुटून आणली.

आपली रसद संपत आल्याचे पाहून कॅ. कॅमकने ७ फेब्रवारी च्या रात्री जुन्या किल्ल्याच्या तटाला शिड्या लावून आपले सैन्य किल्ल्यात उतरविण्याचा प्रयत्न केला. पण चेरो सैनिकांच्या सावधगिरीमुळे कॅमकचा तो प्रयत्न फसला. त्याला मागे सरावे लागले. पुन्हा इंग्रज सैन्याच्यासाठी एक बारा पौंडी तोफ, इतर शस्त्रास्त्रे व दीडशे बैलांवर रसद येत आहे, असे पाहिल्यावर जयनाथ सिंहांनी आपल्या सैन्याची एक तुकडी ती रसद लुटून आणण्याकरिता पाठविली. त्या सैनिकांनी अचानक छापा मारुन त्या रसदीबरोबर येणाऱ्या १९ शिपायांना ठार केले.

९ मार्च रोजी इंग्रज सैन्याने त्या मोठ्या तोफेने अनेक वेळा किल्ल्या तटबंदीवर गोळाबारी केली. तेव्हा कोठे २१ मार्च रोजी तो किल्ला इंग्रजांच्या ताब्यात आला. पण जयनाथ सिंह व चित्रजितराय यांनी आत्मसमर्पण न करता रामगड किल्ल्याचा आश्रय घेतला. कॅमकने गोपाल राय याला पलामूच्या तख्तावर बसविले.

आपला पराभव झाला, तरी जयनाथ सिंह निराश झाले नाहीत. १७७१ मध्ये पुन्हा रामगडहून येऊन पलामूचा किल्ला जिंकण्याचा प्रयत्न केला. पण त्यात त्यांना यश मिळाले नाही. तरीही चेरो सैनिक इंग्रज सैन्यावर गनिमी काव्याने हल्ले करीतच राहिले.

एप्रिल १७७२ मध्ये पुन्हा जयनाथ सिंहांनी पलामूवर चढाई केली. तेव्हा ले.टॉमस स्कॉट आपले सैन्य घेऊन उदयपूरला आला. आपल्या ४०० चेरो सैनिकांसह जयनाथ सिंह उदयपूरला पोचले. ले. स्कॉटने त्यांच्यावर हल्ला केला. पण तो पराभूत झाला. त्या हल्ल्यात स्कॉटच्या पायात गोळी शिरली व तो जयनगरला पळून गेला. पेलविन त्या हल्ल्यात ठार झाला. पराभवाची सूचना पाटण्याला गेली. तेव्हा ले. जॉन बॅटमन

एक पलटन घेऊन येऊन स्कॉटला येऊन मिळाला. उदयपूरच्या लढाईत इंग्रज सैनिकांनी चेरो सैनिकांचा धसका घेतला होता. त्यामुळे ते सैनिक जयनाथ सिहांच्या सैनिकापुढे आताही टिकू शकले नाहीत व ले. स्कॉट उरल्या सुरल्या सैन्यासह मतातूला पळून गेला. तेवढ्या वेळात जयनाथ सिंहांनी रांका किल्ला जिंकून घेतला.

इंग्रजांनी काही जमीनदारांचे साह्य घेऊन कॅमकला मोठे सैन्य देऊन १७७२ साली जयनाथ सिंहांचा पाडाव करण्यासाठी पाठविले. त्या सैन्याजवळ तोफा व आधुनिक शस्त्रास्त्रे होती. जयनाथ सिंहांनी जाणले की एवढ्या मोठ्या सैन्यापुढे आपल्या चार- पाचशे सैनिकांचा टिकाव लागणे शक्य नाही व आपल्याजवळ तर आपली परंपरागत हत्यारे आहेत. म्हणून सप्टेंबर १७७२ मध्ये त्यांनी विचारपूर्वक माघार घेतली व सरगुजा येथे निघून गेले. त्यानंतर त्यांचे काय झाले, याबद्दल इतिहास मौन आहे. तरीही पलामूच्या प्रदेशात चेरो सैनिकांनी गनिमी काव्याने आपले छापामार युद्ध चालूच ठेवले. जयनाथ सिंहांनी त्यांच्या मनात जी स्वातंत्र्याची धग निर्माण केली होती, ती पुढे कित्येक वर्षे विझू शकली नाही. धन्य ते चेरो वीर व धन्य त्या जयनाथ सिंहांची. या प्रथम भारतीय क्रांतिकारकाला शतशः प्रणाम!



# २. राजा नंदकुमार

राजा नंदकुमार चा जन्म सन १७०५ मध्ये भद्रपूर या गावी झाला होता. त्याचे वडील पद्मनाथ प्रतिष्ठित ब्राम्हण होते. नंदकुमार बालपणापासूनच अत्यंत बुद्धिमान, तेजस्वी व साहसी होते. त्यांनी बंगाली व फारसी भाषांवर प्रभुत्व मिळविले. त्यांचे वडील बंगालच्या नबाबाच्या पदरी मोठ्या जागेवर काम करीत असत. सन १७५६ मध्ये ते सिराज उद्दौलाच्या पदरी हुगलीचे फौजदार म्हणून काम करीत होते. त्यांनी एका युद्धात इंग्रजांचा पराभव केला. प्लासीच्या युद्धानंतर बंगालमध्ये इंग्रजांचा प्रभाव वाढला. त्यानंतर इंग्रजांनी मीरजाफरला गादीवर बसविले. नंतर त्याला पदच्युत करुन मीर कासीमला बंगालचा नबाब बनविला. त्यालाही पदच्युत करुन इंग्रजांनी मीर जाफरला पुन्हा बंगालच्या गादीवर बसविले. तेव्हा मीरजाफरने नंदकुमारला आपला मंत्री म्हणून नेमले. नंदकुमार कर वसुली करुन हिशेब चोख ठेवत होता. नबाबाकडून जास्तीत जास्त पैसा हडपण्यासाठीच इंग्रजांनी बंगालच्या नबाबांना वेळोवेळी बदलले होते. नंदकुमार करवसुलीच्या पदावर असतांना आपल्याला नबाबाकडून जास्त रक्कम उकळता येणार नाही, म्हणून वॉरन हेस्टिंग्ज त्यांच्यावर असंतुष्ट झाला होता. त्याला मीरजाफरच्या मंत्रीपदावरुन काढून टाकण्यासाठी वॉरन हेस्टिंगने त्याच्यावर खोटे आरोप करीत राहण्याचे सत्र सुरु केले. म्हणून नंदकुमार चिडले.

वॉरन हेस्टिंग्ज आपल्याला बदनाम करीत आहे, असे पाहून नंदकुमार फार मोठे धाडस करायचे ठरविले. त्यांनी गव्ह. जनरलच्या कौन्सिलचे सदस्य सर फिलिप फ्रांसिस यांच्या मार्फत एक पत्र कौन्सिलला सादर केले. त्यात त्यांनी म्हटले होते की, ''हेस्टिंग्ज साहेबासारख्या शत्रूबद्दल तक्रार दाखल करतांना मी माझ्या संरक्षणासाठी ईश्वराच्या कृपेवरच विसंबून आहे. मी आत्माभिमानाला प्राणांपेक्षाही जास्त मानतो. मी जर असली रहस्य उघड केले नाही, आणि मौन राहिलो, तर माझ्यावर आणखीही अनेक संकटे येतील. म्हणून नाइलाजाने हे रहस्य आपणांसमोर उघड करीत आहे. हेस्टिंग्ज साहेबांनी मीरजाफरच्या म्हाताऱ्या विधवा आईकडून तीन लक्ष चौपन्न हजार एकशे पाच रुपयांची लाच घेऊन तिला मीरजाफरची संरक्षिका बनविले आहे. आणि ते माझ्या सर्वनाशासाठी षड्यंत्र रचित आहेत. त्यात माझे शत्रू जगतचंद्र, मोहनप्रसाद व कमालुद्दीन आदी सारे सामील आहेत.''

नंदकुमारांचे हे पत्र जेव्हा कॉन्सिलच्या सदस्यांसमोर वाचून दाखविण्यात आले, तेव्हा वॉरन हेस्टिंग्जचा चेहरा पांढराफटक पडला दोन दिवसांनंतर कौन्सिलच्या

बैठकीत नंदकुमारांचे आणखी एक पत्र वाचून दाखविण्यात आले, त्यात लिहिले होते की, ''कौन्सिलची परवानगी असेल, तर मी स्वतः कौन्सिलच्या बैठकीस येऊन असली बाबींचा पुरावा सादर करु इच्छितो. त्यांनी लाच घेतलेल्या रक्कमेची पावती दाखल करु इच्छितो.'' तेव्हा कर्नल मॉन्सल म्हणाला की, महाराज नंदकुमारांना कौंन्सिल बैठकीत येऊन त्यांना या संबंधीचा पुरावा प्रत्यक्ष सादर करण्याची आज्ञा देण्यात यावी.'' हे ऐकताच वॉरन हेस्टिंग्ज रागाने लाल बुंद झाला. आणि म्हणाला, ''जर नंदकुमार माझा दावेदार बनून कौन्सिलच्या बैठकीत हजर झाला, तर मी माझा अपमान माझा प्राण गेला, तरी सहन करणार नाही. आमचे कौन्सिलचे सदस्य माझ्या कार्यांचा विचार करुन जर एखाद्या सामान्य अपराध्यासारखा माझा विचार करतील, तर मी कौन्सिलच्या बैठकीत उपस्थित राहणार नाही'' बार्बल साहेबाने असा सल्ला दिला की, ''या प्रकरणाची चौकशी सुप्रीम कोर्टाद्वारे केली जावी'' पुष्कळशा वादविवादानंतर असे निश्चित ठरले की, महाराज नंदकुमार यांना कौन्सिलच्या बैठकीत बोलवाले.

एका सत्ताधारी इंग्रज गव्हर्नर जनरलवर एका हिंदी व्यक्तीने मोठे दोषारोषण करावे, ही अत्यंत धाडसाची अभूतपूर्व बाब होती. त्यामुळे साऱ्या बंगालच्या जनतेचे लक्ष या प्रकरणाने वेधून घेतले होते. कौन्सिलची बैठक घेतली गेली. महाराज नंदकुमार उपस्थित झाले. लगेच वॉरन हेस्टिंग्ज बैठकीतून निघून गेला. कौन्सिलचे एक सदस्य क्लेवरींग यांच्या अध्यक्षतेखाली बैठक सुरु झाली. महाराज नंदकुमार यांनी त्या बैठकीत गव्ह-जनरल वॉरन हेस्टिंग्ज वर केलेल्या आरोपांचे पुरावे दाखल केले. ते पाहून कौन्सिलने वॉरन हेस्टिंग्जला अपराधी ठरविले. त्याबरोबर असाही ठराव करण्यात आला की, वॉरन हेस्टिंग्जने लाच म्हणून घेतलेली रक्कम कंपनी सरकारच्या खजिन्यात लगेच जमा करावी. वॉरन हेस्टिंग्जने हा ठराव फेटाळून लावल्यावर कौन्सिलने ठरविले की, कंपनीच्या वतीने सुप्रीम कोर्टात दावा दाखल करावा. त्याकरिता या प्रकरणाचे सगळे कागदपत्र कंपनीच्या सॉलिसिटर जनरलकडे सुपूर्द करण्यात आले. सॉलिसिटर जनरलने ते कागदपत्र वाचल्यावर आपले पत यासंबंधात नोंदविले ते असे.

''माझ्या विचारानुसार कंपनीच्या वतीने हेस्टिंग्ज साहेबावर सुप्रीम कोर्टात फिर्याद दाखल करावी. असे केल्यास हेस्टिंग्ज साहेबांना या प्रकरणी आपला जबाब द्यावाच लागेल. फिर्याद दाखल झाल्यानंतर बंगालमधील सारे झगडे निकालात निघतील व त्यामुळे कंपनीला अधिक लाभ होईल.''

वॉरन हेस्टिंग्जने परिस्थितीचे रंग-ढंग पाहून सुप्रीम कोर्टात मुख्य न्यायाध्यीश इम्पेसाहबांच्या बंगल्यावर जाऊन गुप्तपणे खलबत केले. परिणामतः दुसऱ्याच दिवशी

अचानक मोहनप्रसाद याने महाराज नंदकुमारांवर फसवेगिरीची एक निंदाव्यंजक फिर्याद सुप्रीम कोर्टात दाखल केली. तीत म्हटले होते की, ''महाराज नंदकुमारांनी एक बनावट दस्तऐवज बनवून बुलाकीदासांच्या रियासतीतून बरीच रक्कम वसूल केली आहे.'' हा दावा दाखल झाल्यानंतर लगेच नंदकुमारांच्या अटकेचे वारण्टजारी करण्यात आले व त्यांना तात्काळ अटक करुन तुरुंगात डाबण्यात आले. ते ब्राम्हण असल्याने तुरुंगाच्या आवारात राहुटी उभारुन तीमध्ये नंदकुमारांना अन्य कैद्यापासून अलग ठेवण्यात आले.

३ जून १७७५ रोजी कोर्टाचे कामकाज सुरु झाले. जज्ज इम्पे आसनाधीन झाला. त्याचे व वॉरन हेस्टिंग्जचे गुप्त खलबत आधीच झालेले होते. नंदकुमार कठड्यात उभे राहिले. अब्दुल कमालुद्दीन, शिलावतसिंह व माधवराव यांच्या त्या बनावट दस्त ऐवजावर सह्या होत्या कमलुद्दीनची साक्ष झाली. बाकी दोघे मरण पावले हाते. शिलावतसिंह यांची सही ओळखण्यासाठी राजा नवकृष्ण आले होते. त्यांनी दस्तऐवज पाहून म्हटले, ''ही तर शिलावतसिंहांची सही मुळीच नाही.''

कृष्णजीवनने सांगितले की, ''करारनामा स्वतः बुलाकीदास यांनी लिहिला होता. त्यात बुलाकीदास यांनी सन १७६५ मध्ये नंदकुमार महाराजांच्या ४८०२१ रुपयांच्या दस्तऐवजाबाबत स्पष्टपणे लिहिले होते.'' या दोन्ही साक्षीदारांच्या उपयुक्त साक्षीमुळे कोर्टातील जज्ज आणि वॉरन हेस्टिंग्ज यांचे चेहरे पांढरे फटक पडले. पण मुख्य न्यायाधीश सावरले व म्हणाले, ''यांचे म्हणणे मिथ्या आहे.''

वॉरन हेस्टिंग्जने पैसे देऊन नवे खोटे साक्षीदार कोर्टात हजर केले. त्यांनी खोट्या साक्षी देऊन नंदकुमारने बुलाकीदासांच्या रियासतीतून रु. ४८०२१/- हडप केलेले आहेत असे कोर्टात सांगितले. ते मात्र इम्पे याने खरे मानले व तशी नोंदही केली. त्याने नंदकुमारचे बॅरिस्टर फरार यांना सफाईसाठी साक्षीदार उभे करण्यास सांगितले. फरार म्हणाले, ''अद्याप गुन्हा जर शाबितच झाला नाही, तर सफाई कशी द्यायची. आतापर्यंतच्या कामकाजावरुन स्पष्ट दिसते की, महाराज नंदकुमार निर्दोष आहेत. त्यांची सुटका झाली पाहिजे.'' त्यावर इम्पेने सांगितले.

''त्यांच्यावरील अपराध सिध्द झाला आहे. तुम्ही सफाई दिली नाही, तर आम्हांला सर्व पुराव्यांचा विचार करायला सांगावे लागेल.''

ज्या जाली दस्तऐवजावरुन नंदकुमार यांना कैद करुन तुरुंगात डांबले होते, त्या प्रकरणाची हकीकत वेगळीच आहे. मुर्शिदाबादेत एक राजनैतिक विद्वान पं. बापूदेव शास्त्री राहत असत. नबाब अलीवर्दी खाँ यांना त्यांच्याविषयी फार आदर वाटायचा.

राजकारणात नबाब त्यांचा सल्ला नेहमी घेत असे. याच विद्वान शास्त्र्यांकडून महाराज नंदकुमार यांनी वयाच्या १२ व्या वर्षापासून २० व्या वर्षापर्यंत ८ वर्षे संस्कृतमधून धर्मशास्त्रांचे शिक्षण घेतले होते. अलीवर्दीखाँने पंडितजींच्या शिफारशीवरुन महाराज नंदकुमार यांची नेमणूक त्यांच्या वयाच्या २२ व्या वर्षी मेहिषदल परगण्यात करवसुली अधिकारी म्हणून केली होती. हळूहळू त्यांची कामकाजाची पात्रता वाढली. तेव्हा नबाबाने त्यांना हुगळी परगण्याचे फौजदार म्हणून नेमले. या पदावर राहून त्यांनी भरपूर पैसा कमावला. त्यानंतर आपल्या गुरुजींचे पंडित बापूदेव शास्त्रींचे दर्शन घेण्यासाठी ते मुर्शिदाबादेस गेले. शास्त्रीजींच्या प्रमदादेवी या मुलीला नंदकुमार आपली धर्मभगिनी मानत असत. म्हणून तिच्यासाठी त्यांनी अनेक दागिने त्यावेळी आणले हाते. मुर्शिदाबाद येथे आल्यावर त्यांना समजले की, आपल्या गुरुपत्नीचा मृत्यु झालेला असून आपली धर्मभगिनी ही विधवा झालेली आहे. अशा स्थितीत ते दागिने गुरुजींना देणे त्यांना योग्य वाटले नाही. म्हणून त्यांनी ते दागिने आपला चांगला परिचय असलेले बुलाकीदास महाराज यांच्या दुकानात अमानत म्हणून ठेवून दिले आणि ठरविले की, नंतर वेळ मिळाल्यावर ते दागिने विकून जी रक्कम येईल, ती धर्मभगिनी प्रमदादेवी हिला देऊन टाकू. नंतर दैवगती फिरली. मीरकासीम आणि इंग्रजांत युध्द जुंपले. त्यात मीर कासीमचा पराभव झाल्यावर इंग्रजांनी मुर्शिदाबाद शहर लुटले. त्यात बुलाकीदासांचे सर्वस्व लुटले गेले. बुलाकीदास प्रामाणिक व धर्मात्मा होते. त्यांनी महाराज नंदकुमार यांच्या दागिन्यांची किंमत ४८०२१ रुपये ठरवून तेवढ्या रकमेचा दस्तऐवज लिहून दिला. त्यानंतर काही दिवसांनी बुलाकीदासांचे निधन झाले. तोच दस्तऐवज महाराज नंदकुमार यांच्यावरील या मुकादम्याला कारणीभूत ठरला.

महाराज नंदकुमार यांचे बॅरिस्टर फरार यांनी सफाईचे साक्षीदार कोर्टात उभे केले. मोठ मोठ्या इज्जतदार लोकांनी नंदकुमारांच्या बाजुने साक्षी दिल्या. साक्षी संपल्यानंतर इम्पेने ज्युरींना खटल्याची सर्व हकीकत समजावून सांगितली. ज्युरींनी अर्धा घंटा विचार. विनिमय करुन सांगितले की, ''महाराज नंदकुमार अपराधी आहेत.'' कारण वॉरन हेस्टिंग्जने सर्व ज्युरींना पैसा चारुन आपल्या बाजूला वळवून घेतले होते. त्यांचा निर्णय ऐकल्यानंतर न्यायाधीश इम्पे याने महाराज नंदकुमार यांना फांशी देण्याची शिक्षा सुनावली. नंतर त्याने महाराज नंदकुमारला तुरुंगात पाठवून दिले.

५ ऑगस्ट १७७५ रोजी राजा नंदकुमार यांना फांशी देण्यात आले. सत्यानंद शास्त्रींनी या प्रसंगाबद्दल लिहिले आहे, ''ज्या वेळी महाराजांच्या गळ्यात फास अडवला आणि त्यांच्या पायाखालचा तख्ता काढून घेतला. त्यांचे निर्जीव शरीर लोबकळू लागले.

त्यावेळी लोक किंकाळ्या मारीत पळत गेले. पळता पळता ते ओरडत गेले, ''ब्रम्ह हत्या झाली. कलकत्ता अपवित्र झाले. देश पापांनी भरला. फिरंग्यांना धर्मज्ञान नाही.''

प्रसिध्द बॅरिस्टर पी. मित्रांनी लिहिले आहे, ''ज्या साक्षींच्या आधारे महाराज नंदकुमारांना फांशी देण्यात आले, त्या साक्षी विचारात घेता, कोणता ही विचारवंत किंवा साधारण मनुष्य एका माशीलाही प्राणदंड देणे न्यायोचित म्हणणार नाही.''

प्रसिध्द इतिहासतज्ञ मार्शमनने लिहिले आहे, ''महाराज नंदकुमार यांना देण्यात आलेली फांशीची शिक्षा इंग्लंडच्या त्या काळातल्या नीचतम कायद्यानुसार असली, तरी ती न्यायाच्या विरुध्द होती.''

लॉर्ड मेकॉलेने म्हटले आहे, ''कोणताही विचारी मनुष्य याबाबत संशय घेऊ शकत नाही की, इम्पेसाहबाने हे नीच कर्म गव्हर्नर जनरल वॉरेन हेस्टिंग्ज याला खुश करण्यासाठीच केले होते. वॉरेन हेस्टिंग्जनेच एका पत्रात लिहिले आहे की, ''इम्पे साहेबांच्या साहाय्यामुळेच माझ्या धनाचे, मानाचे आणि प्रतिष्ठेचे रक्षण झाले.'' याच्या बदल्यात हेस्टिंग्जने इम्पेसाहेबाला बर्दमान जिल्ह्यातील एका मोठ्या पुलाचा ठेका दिला होता व त्यातून इम्पे साहेबाला लाखो रुपयांचा लाभ झाला होता. इम्पे साहेबाने इंग्रज न्यायासनाला या प्रकरणाने कलंकित केले आहे.''

इंग्लंडला गेल्यावर इम्पे साहेबावरही या प्रकरणी दावा दाखल करण्यात आला होता. राजा नंदकुमार यांनी इंग्रजांशी हाती शस्त्र घेऊन लढाई केलेली नसली, तरी इंग्रजांच्या भारतातील सर्वोच्च अधिकाऱ्यावर लेखी आरोप ठेवून इंग्रजांची नीचता उघडकीस आणली, ही गोष्ट क्रांतिकारीच म्हणावी लागेल.



# ३. राजा चेतसिंह

बनारसचा पहिला राजा बलवंतसिंह हा शूर व पराक्रमी होता. त्याचे राज्य अवधच्या नबाबाच्या अधिपत्याखाली होते. त्यामुळे तो नबाबाला दरवर्षी खंडणी देत असे. सन १७७० मध्ये बलवंतसिंहांचे निधन झाले. त्यानंतर त्याचा पुत्र चेतसिंह हा बनारसचा राजा बनला. अवधच्या नबाबाचे आणि राजा चेतसिंहाचे संबंध चांगले नव्हते. नबाबाने अनेक वेळा वॉरन हेस्टिंग्जला चेतसिंहा विरुद्ध कारवाई करण्यास सांगितले. हेस्टिंग्जने तशी पावले उचलली. तेव्हा त्याच्या कौन्सिलचे सदस्य फ्रान्सिस, क्लेवारिंग आणि मॉन्सन हे चेतसिंहाच्या रक्षणासाठी उभे ठाकले. हेस्टिंग्जने १७७५ च्या करारानुसार राजा चेतसिंहाने कंपनीचे अधीनत्व नाइलाजाने स्विकारले. त्याने कंपनी सरकारला दरवर्षी २२ लाख ५० हजार रुपये खंडणी देण्याचे मान्य करावे लागले. चेतसिंहाला या रक्कमेपेक्ष ा जादा रक्कम कंपनी सरकारला यापुढे द्यावी लागणार नाही, असेही कलम त्या तहात होते. त्यानुसार राजा चेतसिंह दरवर्षी कंपनी सरकारला २२ लाख ५० हजार रुपये खंडणी देऊ लागला.

मराठ्यांशी व म्हैसूरच्या नबाबाशी वॉरन हेस्टिंग्जने युद्धे सुरु केली. त्यामुळे कपंनीची आर्थिक स्थिती खालावली. वॉरन हेस्टिंग्जचे लक्ष धनप्राप्ती साठी बनारसच्या राज्याकडे गेले. ते राज्य अतिशय समृद्ध होते. म्हणून हेस्टिंग्जने चेतसिंहाकडे खंडणी व्यतिरिक्त आणखी ५ लाख रुपये युद्धखर्च म्हणून मागितले. हे १७७५ च्या तहात नव्हते. राजा चेतसिंहाने ५ लाख जादा देण्याची टाळाटाळ करुन पाहिली. पण हेस्टिंग्जच्या दबाबामुळे चेतसिंहाला ते ५ लाख रुपये द्यावेच लागले.

सन १७७८ मध्ये इंग्रज - फ्रेंच युद्ध सुरु झाले. तेव्हाही कंपनी सरकार आर्थिक अडचणीत आले. हेस्टिंग्जने राजा चेतसिंहाकडे पुन्हा जादा ५ लाख रुपयांची मागणी केली. चेतसिंहावर दबाब आणला की, तो जादा रक्कम देतो, हे हेस्टिंग्जला कळून चुकले होते. म्हणून त्याने चेतसिंहाकडून त्यावर्षीही ५ लाख रुपये जादा उकळले. चेतसिंहाने रक्कम देतांना तहाची आठवण हेस्टिंग्जला करुन दिली व यापुढे जादा रक्कम माझ्याकडे मागू नये, असेही हेस्टिंग्जला लिहिले.

हेस्टिंग्जचा द्रव्यलोभ वाढतच चालला. पुन्हा १७७९ सालीही त्याने चेतसिंहाकडे ५ लाख रुपयांची मागणी केली. राजाने हेस्टिंग्जला पत्र देऊन कळविले की, ठरलेल्या खंडणीच्या रक्कमेपेक्षा जादा रक्कम सन १७७५ च्या तहानुसार मागण्याचा मुळीच अधिकार नाही. ते पत्र वाचून हेस्टिंग्ज संतापला व त्याने आपल्या सैन्याची एक तुकडी

ती रक्कम वसूल करण्यासाठी बनारसला पाठवून दिली. तेव्हा हतबल होऊन चेतसिंहाला ५ लाख रुपये तर द्यावेल लागले शिवाय दंड म्हणून २ लाख रुपये सुद्धा देणे भाग पडले.

सन १७८० मध्येही हेस्टिंग्जने खंडणीच्या रक्कमेशिवाय आणखी ५ लाख रुपयांची मागणी चेतसिंहकडे केली. जादा रक्कम चेतसिंहाला मागणे सर्वथा अनुचित होते. पण हेस्टिंगच्या दबाबामुळे त्यानें हेस्टिंग्जला २ लाख रुपये वैयक्तिक रुपाने भेट म्हणून देण्यासाठी व दरवर्षी ५ लाख रुपयांची मागणी न करण्यासाठी आपल्या एका विश्वासपात्र प्रतिनिधीजवळ देऊन कलकत्त्याला हेस्टिंग्ज कडे त्याला पाठविले. हेस्टिंग्ज ने ती रक्कम ठेवून घेतली व त्या प्रतिनिधिला सांगितले की, जादा ५ लाख रुपये द्यावेच लागतील. ते ५ लाख रुपयेही चेतसिंहाला द्यावेच लागले.

आता हेस्टिंग्ज हात धुवून चेतसिंहाच्या पाठीमागे लागला. त्याने लगेच चेतसिंहाने २००० घोडेस्वार कलकत्त्याला पाठवून द्यावे, असा हुकूम चेतसिंहाला दिला. त्या घोड्यांचा व घोडेस्वारांचा खर्चही चेतसिंहाने द्यावा, असेही त्या हुकुमात हेस्टिंग्ने लिहिले होते. हे आता चेतसिंहाला असह्य झाले. पण बळी तो कान पिळी या न्यायाने घाबरुन जाऊन चेतसिंहाने ४०० घोडेस्वार व ४०० पायदळ सैन्य कलकत्त्याला पाठविण्याचे ठरवून तसे हेस्टिंग्जला एका पत्राने कळविले. हेस्टिंग्जने त्या पत्राचे उत्तर न देता, ४० लाख रुपये दंड म्हणून चेतसिंहाकडून वसूल करायचे ठरविले. आणि मोठे सैन्य घेऊन तो स्वतः बनारसकडे निघाला. ते समजताच चेतसिंहाची पाचावर धारण बसली. कारण त्याचे सैन्य कंपनी सरकारच्या सैन्यापेक्षा फारच कमी होते. तरीही त्याने आल्या प्रसंगाला तोंड द्यायचे ठरविले व आपल्या सैन्याला प्रतिकारासाठी सावध केले. चेतसिंह स्वतः आपल्या राज्याची परिस्थिती हेस्टिंग्जला सांगण्यासाठी त्याच्या बक्सर येथल्या सैन्याच्या तळावर गेला. हेस्टिंग्जने त्याची भेट घेण्याचे नाकराले आणि चेतसिंहाला अटक केली.

आपल्या राजाला आपल्याच राज्यात अटक केल्याचे ऐकताच चेतसिंहाच्या सैन्याने इंग्रजी विरुद्ध विद्रोह सुरु केला. आधी बनारसमधल्या सर्व इंग्रजांना त्या सैन्याने कापून काढले. ह्या गोंधळातच चेतसिंह निसटला व बनारसला आला. चेतसिंहाच्या सैन्याने हेस्टिंग्जच्या सैन्यावर जबरदस्त हल्ला केला. आत हेस्टिंग्जला आपले प्राण वाचविण्यासाठी काळजी लागली व तो चुनार येथे पळून गेला. तेथून सर्व सूत्रे हलवून हेस्टिंग्जने चेतसिंहाच्या सैन्याचा पराभव केला. चेतसिंहाला पुन्हा कैद केले व त्याला ग्वाल्हेरच्या किल्ल्यातील तुरुंगात डांबले त्या किल्ल्यातच तो मरेपर्यंत खितपत पडला होता.

चेतसिंहाच्या थोड्या सैन्याने इंग्रज सैन्याला मोठ्या धैर्याने तोंड दिले.कंपनी सरकारने आपल्या घोषित ध्येय-धोरणाला, दिलेल्या वचनांना धाब्यावर बसवून चेतसिंहासारख्या निरपराधराजाचे आर्थिक शोषण करणे व त्याच्याकडून भरमसाठ रक्कमा उकळणे, ही कंपनी सरकारच्या नैतिक दिवाळखोरीची व बेकायदेशीर व्यवहाराची पराकाष्ठाच म्हणावी लागेल. त्यात हेस्टिंग्जने धन-लोभापायी बनारस राज्याचा व राजा चेतसिंहाचा नाहक बळी घेतला, हे निःसंशय होय. आपल्या पाशवी बळावर कंपनी सरकारने हिंदुस्थानातील कित्येक राज्ये कपटनीतीने व गुंडागिरीने बळकावली. त्यात लाखो सैनिकांना व अनेक राजांना बळी जावे लागले. हा इतिहास विसरता येणार नाही. कंपनी सरकारच्या मोठ्या सत्तेशी झुंज देण्यामुळेच राजा चेतसिंहाचा आपले स्वातंत्र्य-रक्षणासाठी बळी घेता गेला.



# ४. तिलका मांझी

ईस्ट इंडिया कंपनीने बादशहा शाहआलमकडून बंगाल, बिहार व ओरिसा या प्रांतांची दिवाणीची सनद मिळविली. तो १८ व्या शतकाचा उत्तरार्ध होता. सध्याचा आसाम त्या काळात बंगाल प्रांतातच समाविष्ट होता. म्हणजे इंग्रजांनी भारताच्या या संपूर्ण पूर्वभागावर आपली अधिसत्ता मिळविली होती. जास्तीत जास्त जमीन-महसूल वसूल करण्यासाठी त्यांनी डोंगराळ व जंगल प्रदेशही एकापाठोपाठ एक असे हस्तगत केले व त्या भागातील जमीनीचे महसूल ठेकेदारी पद्धतीने कंपनी सरकार वसूल करु लागली. कंपनी सरकारने मोगल बादशहांच्या महसूलाच्या दुप्पट महसूल त्या सर्व प्रदेशावर लादला. त्यामुळे मैदानी भागातील शेतकरी व डोंगराळ जंगल भागातील आदिवासींची पिळवणूक सुरु झाली.

त्या काळापर्यंत आदिवासी जनजातीकडून भारतीय राजे महसूल वसूल करीत नसत. इंग्रजांनी जनतेचे शोषण अधिकाधिक करण्यासाठीच जबरदस्त महसूल भारतीय जनतेवर लादला. त्यामुळे त्या भागातील सर्व जमातीच्या लोकांनी इंग्रजी सत्तेविरुद्ध लढे दिले. इंग्रजांनी सर्व प्रथम भारताच्या या पूर्व भागातील व दक्षिण भागातील प्रदेश गिळंकृत केल्याने त्यांना याच भागांमधून सर्वप्रथम विरोध भारतीय जनतेकडून केला गेला म्हणूनच या भागात इंग्रजांशी लढणारे स्वातंत्र्यवीर हे भारतातील आद्यक्रांतिकारक ठरतात.

अशा आद्य क्रांतिकारकांपैकी बिहारच्या बंगालला लागून असलेल्या राजमहल व भागलपूर मधल्या पहाडातील संथाल जमातीचा तिलका मांझी हा एक बहाद्दूर वीर व कुशल संघटक होता. त्याने या प्रदेशातील हिंदू - मुस्लिमांसह अन्य जातीमधील लढवय्यांचे उत्तम संघटन करुन इंग्रजी सत्तेशी प्राणपणाने टक्कर देऊन आपल्या प्रदेशाच्या स्वातंत्र्यासाठी आपल्या प्राणांची आहुती दिली.

तिलका मांझीचा जन्म दि. ११ फेब्रवारी १७५० रोजी सुलतानजंग ठाण्याअंतर्गत तिलकपूर या गावी संथाल जमातीत झाला. डोंगरदऱ्यांतील निवास, मुक्तजीवन, वंशपरंपरागत शिकारीचा व्यवसाय यामुळे तो शरीराने बळकट, धाडसी, नेमबाजीत तरबेज व स्वतंत्र जीवनाचा चाहता बनला. जवानीत तो चांगलाच ताकदवान बनला. तसाच दृढनिश्चयी, शब्दांना जागणारा व दूरदर्शी झाला. त्याच्या अंगी आध्यात्मिक शक्तीही चांगली होती. ती त्याला कशी प्राप्त झाली हे मात्र सांगता येत नाही. एवढे मात्र खरे की, तो जे म्हणेल, तसेच घडून येई. तारुण्यातही तो सात्विक जीवन जगत

होता. त्यामुळे त्याच्याकडे तरुणांचा ओढा सतत असायचा त्याच्या आध्यात्मिक शक्तीमुळे लोकांची त्याच्यावर श्रद्धा वादू लागली. तो विचारी होता. त्याने आपल्या समाजाची व अन्य हिंदू - मुसलमानांची परिस्थिती कशी आहे हे जाणून घेतले. सगळ्या धर्माच्या आणि जाती - जमातींच्या लोकांना तो समान समजत असे. त्याच्या मनात भेदभाव यात्किंचितही नसायचा. ब्रिटिशांनी साऱ्या लोकांचे जिणे कसे दुष्कर करुन टाकले आहे, हे त्याने प्रत्यक्ष पाहिले आणि ब्रिटिशांना आपल्या प्रदेशामधून हाकलून द्यायचा त्याने दृढसंकल्प केला. त्याचा बहुतेक काळ सुलतानगंजच्या डोंगराळ भागातच व्यतीत व्हायचा. भागलपूरमध्ये तो तरुणांच्या गुप्त सभा आपल्या संकल्पपूर्तीसाठी घेत असे. आदिवासी, हिंदू व मुसलमानांचे त्याने चांगले संगठन केले. ते सारे लहानपणापासूनच निशाणबाजीत तरबेज होते.

इंग्रज जोपर्यंत आपल्या भूमीवर राहतील, तोपर्यंत ते साऱ्या जनतेचे शोषण अनेक मार्गांनी करीतच राहतील, हे त्याने आपल्या साथीदारांना पटवून दिले. इंग्रजांचे दलाल जमीनदार व सावकार आणि इंग्रज यांना आपल्या प्रदेशातून आपण हाकलून लावलेच पाहिजे असा त्यांनी दृढनिश्चय केला. आणि तिलका मांझीने स्वातंत्र्यप्राप्तीसाठी वरील शोषणकर्त्यां विरुद्ध वयाच्या एकतीसाव्या वर्षी म्हणजे १७८१ साली युद्ध सुरु केले. त्याने गंगेच्या काठच्या प्रदेशातून मार्गो व तोलियागदी या दऱ्यांमधून येणारा व जाणारा इंग्रजांचा खजिना लुटणे सुरु केले. लुटीचा पैसा तो आपल्या साथीदारांना व गोरगरीब जनतेत वाटून देई. तो अत्यंत निःस्वार्थी होता.

गंगा व ब्राम्ही नद्यांच्या दुआबातील जंगल तराईच्या प्रदेशात तसेच मुंगेर, भागलपूर व संथाल परगण्यात त्याच्या इंग्रजांशी अनेक लढाया झाल्या. बिहारच्या त्या भागात पहाडिया जमातही राहायची. पहाडिया जमातीत व संथाल जमातीत सतत लढाया चालू असत. पहाडिया लोकही आधी इंग्रजांविरुद्ध मारगो व तेलियागढी दऱ्यांमधून जाणारा-येणारा इंग्रजांचा खजिना ते सुद्धा लुटत असत. संथाल लोक वीरभूम, राजशाही व सुलतानगंज या भागात लूटमार करुन इंग्रजांना व त्याच्या एतद्देशीय दलालांना जिणे नकोसे करायचे.

सन १७७४ मध्ये कॅप्टन जेम्स ब्राऊन जंगलतराईचा सैनिक गव्हर्नर झाला. त्याने पहाडिया जमातीच्या नेत्यांना आपलेसे करायचे प्रयत्न सुरु केले. सन १७७६ मध्ये ऑगस्टस क्लीवलँड राजमहलचा मॅजिस्ट्रेट म्हणून आला त्यानंतर तो भागलपूरचा मॅजिस्ट्रेट झाला. त्याने दूरदर्शीपणाने आणि चलाखीने पहाडिया जमातीच्या नेत्यांना आपलेसे करुन घेतले. मुसलमान जमीनदार सतत पहाडिया व संथाल लोकांची

पिळवणूक करीत असत. त्या जमीनदारांना आकळविण्यासाठी क्लीवलँडने पहाडिया नेत्यांचा उपयोग करुन घेऊन त्या जमीनदारांच्या जाचातून त्यांची सुटका केली. पहाडिया सरदारांना आपलेसे करुन घेतल्यानंतर संथालांचा उठाव पहाडिया सरदारांच्या साह्याने दडपून टाकायचे क्लीवलॅडने ठरविले.

क्लीवलँड, सर आयरकूट हे इंग्रज सैन्यासह व पहाडिया सरदार आपल्या पहाडिया साथीदारांसह एकत्र मिळून तिलका मांझीचा पाडाव करण्यासाठी निघाले. जंगल तराईत तिलका मांझीच्या सैन्याशी त्यांच्या अनेक लढाया झाल्या. त्यात तिलका मांझी त्यांना पुरुन उरला. १३ जानेवारी १७८४ रोजी तिलका मांझीने भागलपूरवर चढाई केली. एका ताडाच्या झाडावर चढून तिलका मांझीने घोड्यावरुन जात असलेल्या क्लीवलँडच्या छातीवर बाण मारला. क्लीवलँड तात्काळ घोड्यावरुन खाली कोसळला व लगेच मरण पावला. क्लीवलँडच्या निधनाने इंग्रज सैन्य हबकून गेले व मार्ग सापडेल तिकडे पळून गेले.

तिलका मांझीचा विजय झाला. त्याचे सैन्य विजयाचा आनंद साजरा करीत असताना रात्रीच्या अंधारात सर आयर कूट व पहाडिया सरदार यांनी मिळून तिलका मांझीच्या बेसावध सैन्यावर अचानक हल्ला केला. त्या लढाईत तिलका मांझीचे बरेच सैनिक मारले गेले आणि पुष्कळसे गिरफ्तार करण्यात आले. तिलका मांझी आपल्या उरलेल्या सैनिकांसह सुलतानगंजच्या डोंगरात आश्रयाला निघून गेला आणि पुढची योजना ठरवू लागला. नंतर काही महिने त्याचे सैन्य इंग्रज सैन्याला आणि पहाडिया सैनिकांना गनिमीकाव्याने बेजार करीत होते.

तिलका मांझीचा पाडाव कसा करावा, या विचाराने सर आयर कूट संत्रस्त झाला. त्याने आता तिलका मांझीचे आश्रयस्थान असलेल्या डोंगरांना वेढे दिले. त्यांना बाहेरची रसद मिळू दिली नाही. अन्नपाण्यावाचून तिलका मांझीच्या सैनिकांचे हाल होऊ लागले. तेव्हा गनिमीकाव्याने लढणे सोडून देऊन तिलका मांझीने इंग्रजांशी आमनेसामने लढायचे ठरविले. आपल्या सैन्यासह तो डोंगर सोडून खाली उतरला व निकराने लढू लागला. त्या लढाईत धोक्याने तिलका मांझी इंग्रजांच्या हातात सापडला तेव्हा त्याला जेरबंद करण्यात आले. सर आयर कूट त्यामुळे आनंदाने बेहोश झाला. त्याने तिलका मांझीला दोरखंडाने बांधून चार घोड्यांकरवी भागलपूर पर्यंत रस्त्यावरुन फरफटत नेले. त्याचे अंग अंग सोलून निघाले तरी तो जिंवत राहिला. सर आयर कूटने त्याला भागलपूरच्या एका चौकातील झाडावर फाशी दिली. नंतर त्याचे प्रेत त्या वडाच्या बुंध्याशी

बांधून त्याच्या छातीत मोठे मोठे खिळे ठोकण्यात आले. अशारीतीने या महान आदिवासी नेत्याने स्वातंत्र्याच्या बलिवेदीवर आपल्या प्राणांची आहुती दिली.

स्वातंत्र्यप्राप्ती नंतर भागलपूरमधील त्या चौकाला 'तिलका मांझी चौक' असे नाव देण्यात आले आणि त्या चौकात एक चबूतरा उभारुन त्यावर तिलका मांझीच्या पुतळ्याची प्रतिष्ठापना करण्यात आली. त्याचे नाव स्वातंत्र्याच्या इतिहासात अमर झाले.



# ५. पझसीराजा - केरल वर्मा

सन १७६३ पर्यंत बंगालवर आणि कर्नाटकच्या तिसऱ्या युध्दानंतर मद्रास प्रांतावर इंग्रजांचे वर्चस्व निर्माण झाले होते. महाराष्ट्र आणि म्हैसूरचे राज्य सोडून सारा दख्खन भारत त्यांनी बळकावला होता. हैद्राबादचा निजाम तर त्यांच्या हातातले बाहुले बनला होता. त्या काळात पश्चिमेकडील उत्तर मलबारवर कोट्टायम वंशाचे लहानसे राज्य होते. त्या राज्यात इरिबानाड, वायनाड व कुरुम्बरानाड या तत्कालिन तीन जिल्ह्यांचा समावेश होता. कोट्टायम राजे पझसी महालात राहायचे. शेवटचा कोट्टायम राजा ही त्याच महालात राहत असे म्हणून त्याला 'पझसी राजा' असे त्याची जनता म्हणायची.

पझसी राजा केरल वर्मा जसा महापराक्रमी होता, तसाच तो रसिक, विद्वान, कवी व कलाकारही होता. कथकली कथा त्याने रचल्या होत्या व कथकली नृत्यातही तो प्रवीण होता. ज्या काळात तो वनवासात होता, त्या काळात कथकली कलाकार म्हणून मैदानी प्रदेशात येऊन शत्रुची हालहवाल हेरायचा. आपल्या प्रजेत त्याने स्वातंत्र्याची आग व देशभक्तीची भावना जिद्दीने चेतविली होती.

इंग्रजांनी सन १७९३ मध्ये पझसी राजाच्या राज्यात सारा-वसुली सुरू केली. तेव्हा राजाने त्यांना विरोध केला व जनतेचा कैवार घेतला. त्यामुळे इंग्रजांच्या सारा-वसुलीस आळा बसला. इंग्रजांना कोणीही माल सुद्धा विकेनासा झाला. एवढेच नव्हे तर शेतकऱ्यांनी आपली शेतही पेरली नाहीत. इंग्रज खवळले व त्यांनी राजाचा महाल लुटला. याची बातमी राजाला आधीच माहित झाल्यामुळे राजा आधीच आपल्या कुटुंबासह अज्ञात स्थळी निघून गेला होता.

इंग्रजांच्या प्रशिक्षित व सुसंगठित मोठ्या सैन्यापुढे मैदानात आपला निभाव लागणे शक्य नाही, असे पाहून राजाने इंग्रजांशी गनिमी काव्याने टक्कर द्यायचे ठरविले. वायनाडला जाऊन त्याने आपले सैन्य संगठित केले. त्याच्या राज्यात कुरुचिया व कुरुमर या दोन्ही जातीचे लोक चांगले लढाऊ योध्दे होते. त्यांचे हत्यार केवळ धनुष्य बाण भाले व ढाल तलवार हेच होते व ते नेमबाजीत अत्यंत तरबेज होते. तलस्कर चंदू व नीली हे राजाचे प्रमुख साथीदार होते. नीली ही पराक्रमी स्त्री होती व तिने महिलांचे सैन्य शिकवून तयार केले होते. राजाने आपल्या सैन्याच्या लहान लहान तुकड्या तयार करून राज्यात ठिकठिकाणी नियुक्त केल्या. त्या सैन्याला राजाने स्पष्टपणे सांगितले की, "मला राजपदाची मुळीच इच्छा नाही. माझे लक्ष केवळ इंग्रजांना आपल्या राज्यामधून हाकून लावणे हेच आहे. आपल्या मंदिरांचे आणि आपल्या परंपरांचे

संरक्षण आपल्याला करायचे आहे'' या विचाराने राजाने मरेपर्यंत पालन करुन इंग्रजांशी झुंज दिली.

लार्ड मेनिंगटनने मद्रास सरकारला सुचविले की, राजा जर शांतपणे जीवनयापन करीत असेल, तर त्याला कोट्टायमचा राजा म्हणून मान्यता देऊन पेन्शन व इतर सवलती द्याव्या. परंतू हा स्वाभिमानी व पराक्रमी राजा ते कसे मान्य करील? त्याने आपल्या राज्याच्या स्वातंत्र्यासाठी इंग्रजांशी झुंज द्यायचेच ठरविले. १८ मार्च १७९७ रोजी मेजर कॅमरॉन आपल्या १००० सैनिकांसह पेरियार दरीतून जात असता राजाने आपल्या निवडक सैनिकांसह त्याच्यावर हल्ला केला व त्याच्यासह त्या सगळ्या सैन्याला ठार केले. ही खबर मिळताच ले.कर्नल पेट्रिकने आपल्या मद्रासच्या मुख्यालयास कळविले की,

''जोपर्यंत हा राजा जिवंत आहे, तोपर्यंत आपल्यापैकी कोणाचे ही जीवन सुरक्षित राहणार नाही''.

राजा या घटनेनंतर सावध झाला व त्याने आपले सैन्य वाढविले. त्या सैनिकांना युद्धकलेत चांगले प्रशिक्षित केले. त्यानंतर इंग्रजांनी पझसी राजावर मोठ्या तयारीनिशी सन १८०० मध्ये चढाई केली. त्याचे सेनापती कण्णवत शंकरन नंबियार, कूगन नायर व तलक्कर यांनी पराकाष्टा करून इंग्रजांचा पराभव केला.

कंपनी सरकारने त्यानंतर कर्नल वेलस्ली याला मलबारचा सैनिक कमाण्डर म्हणून नियुक्त केले. कर्नल वेलस्लीने पझसी राजाशी अनेक जबरदस्त झुंजी दिल्या. पण प्रत्येक युद्धात त्याला पराभव पत्करावा लागला. त्या युद्धामध्ये इंग्रजांचे कॅप्टन बोमन, मेजर कॅन्वन, कॅप्टन डिकिन्सन व ले. मिलिन चॅम्प हे सेनाधिकारी मारले गेले. पझसी राजाची पत्नीही त्याच्या खांद्याशी खांदा भिडवून या युद्धांमध्ये लढली. परंतु जंगलातील वातावरणाने ती आजारी पडली. त्याचा बारा वर्षाचा मुलगाही जंगलात राजाबरोबर राहात होता. राजाची स्थिती बिकट झाली होती. त्याला राजसुख तर मिळतच नव्हते. त्याच्याजवळ मोठा खजिनाही नव्हता व आधुनिक शस्त्रास्त्रेही नव्हती. जंगलात कसले चांगले अन्न त्यांना मिळणार? तरीही त्याने आपल्या सैनिकांना ठामपणे सांगितले की, ''मी इंग्रजांशी संघर्ष चालूच ठेवीन.'' राजाचे वय तेव्हा बत्तीस वर्षाचे होत गेली ६ / ७ वर्षे तो इंग्रजांशी अविरतपणे झुंजी देत होता. राजसुखाला पारखा होऊन धनदाट जंगलात राहत होता. जे मिळेल ते अन्न खात होता. आपल्या कोट्टायम राज्याच्या स्वातंत्र्यासाठी तो एवढे कष्ट झेलीत होता.

इंग्रजांचे सैन्य तर त्याच्या राज्यात शिरुन त्याचा शोध घेतच होते. चट्टपन नाम्बियार, कन्नमचेटी नम्बियार, चंदू रहमान, कुल्लुचमा, कुण्हप्पन इ. त्याचे प्रमुख सहयोगी इंग्रजांच्या हाती सापडले व इंग्रजांनी त्यांना फासावर चढविले.

सन १८०१ मध्ये कलेक्टर मेजर मॅक्लोडने प्रत्येक गांव शस्त्ररहित करण्याचा व जमिनी संबंधीचा असे दोन कायदे लागू केल्याने जनतेत भयंकर असंतोष माजला व जनतेतून पझसी राज्याला मोठ्या प्रमाणात समर्थन मिळू लागले. ऑक्टोबर १८०१ मध्ये एलच्चना कुंजन नायर व थलक्कन चन्द राजाच्या या दोन सेनाधिकाऱ्यांनी पणमारन हा पहाडी किल्ला जिंकून घेतला व सत्तर इंग्रज सैनिकांना ठार केले. राजाच्या साथीदारांचा उत्साह त्यामुळे वाढला. परंतु राजाचा एक प्रमुख सेनाधिकारी कण्णवत नाम्बियार व त्याचा मुलगा कट्टीडी या गावाजवळ इंग्रजांच्या हाती लागला. इंग्रजांनी त्या दोघांना कण्णटम या गावात आम जनतेसमोर त्यांची शिरे उडवून ठार केले आणि त्यांची प्रेते लोकांना दहशत बसाबी म्हणून तशीच काही दिवस तेथे पडू दिली. या घटनेने राजाला व त्याच्या साथीदारांना मोठा धक्का बसला.

पझसी राजाच्या सैनिक तुकड्यांनी इंग्रजांना व्यापारासाठी आवश्य असलेल्या मसाल्यांची पिके कांची भागातून नष्ट करून टाकली. इंग्रज सैनिक पावसाळी वातावरणाने मलेरिया होऊन धडाधड मरण पावले. कंपनी सरकारने १२०० सैनिकांची नव्या दमाची पलटन राजाच्या पाडावासाठी नियुक्त केली. या तुकडीशी राजाच्या सैनिकांनी दीर्घकाळ टक्कर दिली. या युद्धात इंग्रजांची फार मोठ्या प्रमाणात हानी झाली. ती टीपू सुलतानाशी झालेल्या तिसऱ्या युद्धात झालेल्या हानीपेक्षाही जास्त होती. त्या युद्धात इंग्रजांनी अधिकाधिक सैनिक पाठविले. शेकडो सैनिक त्यात मारले गेले. राजाला हिंदू - मुस्लिम व अन्य धर्माच्या लोकांनी चांगली साथ दिली. राजा सर्व धर्मांच्या व सर्व जातींच्या लोकांचे हित समानतेने जपायचा. सारी जनता त्याला आपला दाता मानायची. म्हणूनच साऱ्या जनतेने तन-मन-धनाने राजाला साह्य दिले. तीच त्याची मोठी शक्ती होती. राजाने हे युद्ध धर्मयुद्ध म्हणून घोषित केले होते. राजा घनदाट अरण्यात राहूनही आपल्या सैन्याचे भरण पोषन कसे करतो, हेच इंग्रजांना कोडे पडले होते. टीपू सुलतानाने फ्रेंच जनरल मनगलोनला या संबंधात पत्राने कळविले होते की, "पझसी राजाच्या छोट्याशा राज्यातील एवढ्याशा सैन्याने एक हजार इंग्रज सैनिक व तेवढेच इंग्रजांचे भारतीय सैनिक ठार केले आहेत. हा राजा डोंगरातच नव्हे, तर मैदानातही इंग्रजांचा सामना करतो आहे."

सन १८०५ मध्ये मलबारला थॉमस हर्न वेबर हा नवा कलेक्टर नियुक्त केला. त्याने दोन जाहीरनामे जारी केले. एक पझसी राजाला जो कोणत्याही प्रकारचे साह्य करील, त्याला 'राजद्रोही' म्हणून समजले जाईल. दुसरा - पझसी राजाचे शिर आणून देणारास तीन हजार नाणी बक्षीस दिली जातील. त्याच्या काळातही राजाने इंग्रजांशी अनेक ठिकाणी झुंजी दिल्या. त्यांमध्ये राजाचा उजवा हात असलेला सेनापती तलक्कर चंदू याला इंग्रजांनी अचानक पकडले व त्याला फासावर चढविले.

३० नोंव्हेबर १८०५ रोजी म्हैसूर सीमेजवळून वाहणाऱ्या कॉंकेर नदी काठी हा अद्‌भूत महत्त्वाकांक्षी व पाणीदार राजा विश्रांती घेत असतांना कंपनीच्या सैन्याने त्याला चहुबांजुनी घेरले. तेव्हा अस्वस्थ कुटी नम्बियार या राजाच्या सेनापतीने घनघोर युद्ध केले व तो या युद्धात धारातीर्थी पडला आपला पराजय निश्चि:त आहे असे पाहून व इंग्रजांच्या हाती जिवंतपणी सापडू नये म्हणून पझसी राजाने आपल्या अंगठीतला हिरा काढून गिळून घेतला व तो गतप्राण झाला. त्याची आजारी पत्नी मात्र इंग्रजांच्या हाती सापडली.

आपल्या धनुष्यबाण, भाले व तलवारी या परंपरागत शस्त्रांनी लढणाऱ्या मोजक्या सैन्यासह सलगपणे ९ / १० वर्षे आधुनिक शस्त्रास्त्रांनी सज्ज असले मोठया इंग्रज सैन्याशी प्राणपणाने लढा देणाऱ्या पझसी राजाचे उदाहरण जगाच्या इतिहासात एकमेवच म्हटले पाहिजे. कलेक्टर थॉमस हर्न वेबरने पझसी राजाचे शव आपल्या घोडागाडीत घालून ते मानाटीडी या गावी नेले व त्याचा अंतिम संस्कार परंपरागत विधिनुसार सन्मानाने करवून घेतला. त्याने लिहून ठेवले आहे, ''पझसी राजाकडे मी आपोआप आकर्षित होत गेलो. त्याच्या प्रजेची आपल्या राजावरची श्रद्धा व आदर एवढा दृढ होता की, त्याच्या निधनानंतरही तो कायम राहिला.''

नेपोलियनला पराभूत करणाऱ्या ड्यूक ऑफ वेलिंग्टनने म्हटले आहे. ''पझसी राजा गनिमी काव्याच्या युद्धात अद्वितीय पारंगत होता.''

मानाटोडीच्या कुरुचिया वीरांनी पझसी राजाचा अंतिम संस्कार ज्या जागेवर झाला, त्या जागेवर वडाचे एक झाड लावले. ते झाड गेल्या १८० वर्षांपासून या महान क्रांतिवीराचे स्मरण देत अजूनही उभे आहे.



# ६. वेलुत्तम्पी दलवा

इंग्रजांनी बंगाल, बिहार, ओरिसा, आसाम हे प्रांत म्हणजे सारा पूर्व भारत काबीज करुन त्यांनी दक्षिण भारतातही मद्रास, केरळ मध्ये पाय रोवले होते. त्या काळात भारतात शेकडो लहान मोठी राज्ये होती. ती राज्य गिळंकृत करण्यासाठी ग. ज. लॉर्ड वेलस्ली टपलेलाच होता. तैनाती फौजेच्या योजनेने त्याने अनेक राज्ये अंकित केली होती. वास्तविक पाहता या लुटारु इंग्रजांना कोणत्याही भारतीय राज्याच्या कारभारात नाक खुपसण्याचा कसलाही अधिकार नव्हता. परंतु त्यांनी साम, दाम, दंड, भेद व कपटनीचा तसे अनेक प्रसंगी गुंडगिरीचा अवलंब करुन अनेक भारतीय राजांना आपल्या अधीन करुन ठेवले होते. भारताच्या दक्षिण किनारी असेच एक राज्य होते - तिरुवितांकुर, धर्मराज नावाचा राजा त्या राज्यावर राज्य करीत होता. या राज्याची राजधानी आधी पद्मनाथपुरम ही होती. नंतर धर्मराजाने तिरुअनंतपुरम् ही आपली राजधानी केली. तरीही राजाचे बहुतेक सैन्य पद्मनाथपुरम येथेच असायचे या राज्यातही वेलस्लीने कर्नल मेकॉले हा आपला धूर्त एजंट ठेवला होता. धर्मराजाला दरवर्षी चार लाख रुपये खंडणी इंग्रज सरकारला द्यावी लागत असे.

पद्मनाथपुरम जवळच थोड्या अंतरावर तलक्कुलम् नावाचे एक गाव होते त्या गावात अनेक प्रभूंचे अर्थात सरदारांचे, अधिकाऱ्यांचे व धनिकांचे मोठमोठे वाडे होते. हे लोक राजाला युद्धात साह्य करीत. जो राजाला मोठ्या प्रमाणात साह्य करी, त्याला राजा 'त्तम्पी' ही बहुमानाची पदवी देत असे. या गावातच एका सामान्य कुटुंबात ६ मे १७६५ रोजी एका मुलाचा जन्म झाला. त्याचे नाव वेलायुधन असे ठेवण्यात आले. त्या बालकाचे दुर्भाग्य असे की, त्याचे आईवडील त्याच्या बालपणीच मरण पावले. तेव्हा त्याचे पालनपोषन त्याच्या मामांनी केले. या पोरक्या मुलाची बुद्धी कुशाग्र होती. त्याच्या मामांनी त्याला शाळेत दाखल केले. शिक्षण सुरु झाल्यानंतर थोड्या वर्षातच त्याने मल्यालम, तामिळ व संस्कृत या तिन्ही भाषांचे ज्ञान आत्मसात केले. लहानपणापासूनच त्याला व्यायामाची आवड होती. दररोज तो नियमितपणे व्यायाम करीत असे. त्यामुळे त्याचे शरीर बळकट व सुडौल बनले. मजबूत खांदे, भरदार छाती व उंचीपुरी शरीरयष्टी यामुळे त्याचे व्यक्तित्व कोणावरही छाप पडेल असेच होते. त्याच्या बद्दल गावांतील लोकांना आदर वाटत असे. त्या काळात गावागावांत नेहमीच चोऱ्या व्हायच्या. त्याच्या तलक्कुलम गावात चोर शिरल्याचे ऐकताच तो धावून जायचा. त्याला पाहून चोर पसार व्हायचे. त्यामुळे तो अधिकच लोकप्रिय झाला. स्वभावाने तो नम्र, सुशील व प्रामाणिक होता.

एके दिवशी धर्मराज राजाच्या महालातून काही मौल्यवान हिरे चोरीस गेले. राजाच्या सेनाधिकाऱ्यांनी काही सैनिक घेऊन खूप शोधाशोध केली; परंतु हिऱ्यांचा तपास लागला नाही. तेव्हा राजा चांगलाच संतापला राजाने वेलायुधनच्या बुद्धिमत्तेसंबंधी व शक्तीविषयी अनेक गोष्टी ऐकल्या होत्या. राजाने वेलायुधनला बोलावून घेऊन त्याला हिऱ्यांचा शोध लावण्यास सांगितले. वेलायुधनने अवघ्या तीन दिवसात चोरीस गेलेले हिरे चोरांसह राजापुढे हजर केले. राजाला ते पाहून अत्यानंद झाला. दरबार भरवून वेलायुधनचा राजाने सन्मान केला व त्याला 'त्तम्पी' ही सन्मान दर्शक पदवीही प्रदान केली. त्याला तालुकादारही बनविले व एका तालुक्याचा कारभार त्याच्याकडे सुर्पूद केला. तेव्हापासून वेलायुधन 'वेलुत्तम्पी' या नावाने ओळखला जाऊ लागला. त्याच्या गावकऱ्यांना त्याचा अभिमान वाटू लागला. त्याचे कुशल प्रशासन, सच्छीलता व न्यायप्रियता पाहून जनतेत त्याला लोकप्रियता लाभली. त्याच्याविषयीचा आदर वृद्धिंगत झाला. राज्यातील तो एक प्रतिष्ठित व्यक्ती म्हणून नावाजला.

तिरुवितांकुर राज्याचे दीवाण केशवदास हे होते. ते सौजन्यमूर्ती व प्रतिभाशाली होते. तसेच ते कुशल प्रशासकही होते. त्यांच्या कारभारावर राजासह जनताही खुश होती. राजाच्या दरबारात जयंतन शंकरन नम्पूतिरी हा एक चापलूस, दीर्घद्वेषी व विघ्नसंतोषी सेवक होता. येनकेनप्रकारेण षड्यंत्र रचून दीवाण केशवदासांना दीवाणपदावरुन हटवायचे व आपण स्वतः दीवाण व्हायचे त्याचे स्वप्न होते. केशवदासांनी त्याच्या कारवाया अनेकवेळा विफल केल्या होत्या. तरीही तो राजाचे मन केशवदासांविषयी कलुषित करण्याचा प्रयत्न सोडीत नव्हता. केशवदासांबद्दल राजाच्या मनात संशय निर्माण करण्याची संधी वाया जाऊ देत नव्हता. त्याने राजाच्या मनात पक्के ठसविले की, केशवदासाने स्वतःराजा होण्याचे प्रयत्न चालविले आहेत. अनेक वेळा जयंतनच्या तोंडून ही गोष्ट ऐकल्याने राजाचाही त्यावर विश्वास बसला व राजाने केशवदासांना दीवाणपदावरुन हटवून जयंतनची नेमणूक दीवाणपदी केली. विनाशकाले विपरित बुद्धी, दुसरे काय?

दीवान झाल्यावर जयंतनचा मनमानी कारभार सुरु झाला. त्यामुळे जनता संत्रस्त झाली. त्याने राजाला कळू न देता गुप्तरीत्या केशवदासांना तुरुंगात डांबले व बेमालूमपणे केशवदासांची त्या तुरुंगवासात हत्त्या करविली व आपल्या मार्गातील काटा नाहीसा केला.

जयंतन हा अत्यंत लोभी, लंपट व दृष्ट प्रवृत्तीचा होता. त्याचे साथीदारही तसेच होते. त्यामुळे राज्यात चोऱ्या मारामाऱ्या व दरोडे वाढले. राज्यात अराजकता माजली.

कंपनी सरकारही आपला एजंट कर्नल मेकॉले याच्या मार्फत राजाकडून निरनिराळी कारणे दाखवून खूप पैसा हडपू लागले. जयंतनच्या मनमानी कारभारामुळे राज्याची आय कमी झाली व खर्चही खूप वाढला. राज्याचा खजिना रिकामा झाला. म्हणून जयंतनने प्रजाजनांवर अनेक भरमसाठ कर लादले जो या करांना विरोध करायचा, त्याच्याकडून जयंतन जबरदस्त दंड आपल्या साथीदारांकरवी वसूल करायचा. याचा परिणाम व्हायचा तोच झाला. जनतेत असंतोष धुमसू लागला. राज्यात क्रांती होण्याची लक्षणे दिसू लागली. परंतु राज्यातील जनतेतून तसा एकही नेता पुढे आला नाही.

यदाकदाचित जनता वेलुत्तम्पीला आपला नेता बनवून उलथापालथ घडवून आणील-म्हणून त्याने वेलुत्तम्पीला जाळ्यात पकडायचे ठरविले. त्याला दरबारात बोलावून घेऊन तीन दिवसात तीन हजार रुपये खजिन्यात भरण्याचा हुकुम त्याला दिला. तो हुकूम वाचताच वेलुत्तम्पी अत्यंत संतापला. तीन हजार रुपये खजिन्यात भरेपर्यंत तालुकदार म्हणून काम करायचे नाही असेही जयंतनने त्याला बजावले- पण वेलुत्तम्पीने संयम राखला. व तो आपल्या तालुक्यात परतला. त्याने आपला जिवलग मित्र अय्यपन चंपकरमन व जनतेतील प्रतिष्ठित पंच-प्रमुखांना बोलावून घेऊन त्यांच्याशी विचारविनिमय केला. सर्वांच्याच सहनशीलतेने परिसीमा गाठली होती. म्हणून त्यांनी एकमताने ठरविले की, 'दिवाण जयन्तम विरुद्ध जनतेत रान उठवायचे. विद्रोह करायचा.' जयन्तनला हे समजलेच नाही. तो आपल्याच गुर्मीत होता. परंतु कर्नल मेकॉलेने आपले गुप्त हेर राज्यात सर्वत्र पेरले होते. त्या हेरांकरवी मेकॉलेला ही विद्रोहाची बातमी समजली. त्याने तात्काळ धनराजाची भेट घेऊन त्याला विद्रोहाची माहिती दिली. राजाने कसलाही विचार न करता हा विद्रोह दडपून टाकण्याचा आदेश दिला. परंतु त्या हुकुमाकडे कोणीही लक्ष दिले नाही. कारण साऱ्या जनतेला दीवाण जयन्तनबद्दल तिरस्कार वाटत होता. सारी जनता वेलुत्तम्वीच्या पाठीशी उभी राहिली. त्याच्या साथीदारांनी जनतेला जागृत केले होते.

वेलुत्तम्पी अपार जनसमूहासह राजधानीत आला. तेव्हा जयन्तनचा कुठेच पत्ता लागत नव्हता. तो कोठे आहे, हे राजालाही माहित नव्हते. जनसमूहाच्या उद्रेकाला घाबरुन तो कोठेतरी दडून बसला होता. त्याने राजाला जनतेतील असंतोषाची कल्पनाच येऊ दिली नव्हती. तो जनसमुह पाहून राजा एकदम चकित झाला. राजाने वेलुत्तम्पीचे व जनतेच्या प्रतिनिधींचे म्हणणे ऐकले. तेव्हा कोठे त्याला आपल्या या दिवाणाच्या करतूतींची कल्पना आली. राजाने जयन्तनला व त्याच्या साथीदारांना हुडकून काढून

त्यांना त्या जनसमुहाकडे सोपवून दिले. जनतेने त्या सर्वांना त्यांच्या दृष्ट करणीची योग्य ती शिक्षा दिली.

राजाने वेलुत्तम्पीचा मित्र अय्यपन चंपकरमन याची नेमणूक दीवाण पदी व वेलुत्तम्पीची नियुक्ती वाणिज्यमंत्री पदी केली. ते पाहून नंतरच्या काळात जयन्तनच्या दडून बसलेल्या दृष्ट साथीदारांनी काही राजभक्त अधिकाऱ्यांच्या हत्त्या केल्या. दुर्दैवाने चम्पकरमनही मरण पावला. तो पर्यंत वेलुत्तम्पीने राज्याची घडी नीट बसवून भ्रष्टाचाराचे निर्मूलन केले होते. राज्याचे उत्पादन वाढवून राज्याला आबादी आबाद करुन सोडले होते. राजा त्याच्या कारभारावर खुश झाला होता. चम्पकरमन च्या निधनानंतर राजाने दीवाणपदी वेलुत्तम्पीची नेमणूक केली. दीवाण म्हणजे प्रधान मल्याळम भाषेत प्रधानाला 'दलवा' म्हणतात तेव्हापासून त्याचे नाव राज्यात 'वेलुत्तम्पी दलवा' असे रुढ झाले.

वेलुत्तम्पी दलवा जेवढे दयाळू व न्यायनिष्ठ होते, तेवढेच ते राज्यकारभारात कठोरही होते. कोणावरही अन्याय होऊ नये याची ते दक्षता घेत असत. हिंदूना हिंदूच्या धर्मशास्त्राप्रमाणे व मुसलमानांना कुराणाच्या आज्ञांनुसार ते न्याय देत असत. दोषी व्यक्तींना त्यानुसारच शिक्षा देत असत. त्यांनी राज्यातील कर्मचाऱ्यांचे अधिकार व त्यांची कर्तव्ये कोणती हे ठरवून दिले आणि राज्यकारभाराची घडी चांगल्या रीतीने बसवून दिली. त्यामुळे जनता सुखासमाधानाने आपले जीवन कंटूलागली. वाणिज्य क्षेत्रात सुविधा वाढविल्या. करपद्धती जनतेला सुसह्य अशी केली. राज्यात सर्वत्र चांगले रस्ते तयार केले. उत्पादनाची नवनवी क्षेत्रे जनतेला उपलब्ध करुन दिली. व राज्याचे उत्पन्न वाढविले. राज्याची भरभराट होऊ लागली. राज्याला ऋणमुक्त केले.

राज्याची भरभराट झालेली पाहताच कर्नल मेकॉलेच्या तोंडाला पाणी सुटले व त्याने या राज्याच्या प्रगतीचा रिपोर्ट ग. ज. वेलस्लीला केला. त्यात वेलुत्तम्पीची प्रशंसाही केली. तो वेलुत्तम्पीशी फार चांगल्या रीतीने वागू लागला. वेलुत्तम्पी त्याच्यावर विश्वास ठेवून त्याच्याशी राज्यकारभाराविषयी मोकळ्या मनाने गप्पा मारीत असे. वेलुत्तम्पीचे येथेच चुकले.

राज्य जरी ऋणमुक्त झाले, तरी कंपनी सरकारची खंडणी चार लाख रुपये देणे बाकी होते. तेवढी रक्कम तर राज्याच्या खजिन्यात नव्हती. म्हणून वेलुत्तम्पीने सैनिकांच्या वेतनात थोडीकपात करण्याचे ठरविले. हे समजताच सैन्याने विद्रोह सुरु केला. तेव्हा आपला मित्र म्हणून मेकॉलेचे साह्य विद्रोह दडपण्यासाठी मागितले. मेकॉले चाणाक्ष होता. त्याच्या आदेशानुसार इंग्रज सैन्याचे विद्रोह दडपून टाकला. वेलुत्तम्पीला हायसे वाटले.

सन १८०८ मध्ये कर्नल मेकॉलेने विद्रोहासंबंधी सारे काही वेलस्लीला कळविले. विद्रोह दडपण्यास साह्य देण्याच्या मोबदल्यात राजाशी नवा तह करण्याचे वेलस्लीने मेकालेला सांगितले. या तहानुसार राजाने कंपनी सरकारला दरवर्षी आठ लाख रुपये खंडणी द्यावी. कंपनी सरकारच्या परवानगीशिवाय अन्य कोणत्याही राजाशी पत्रव्यवहार करु नये. एवढी खंडणी न दिली तर राज्य ताब्यात घेतले जाईल, अशी धमकीही त्या तहात होती. राजाने आपले सैन्य विसर्जित करावे व इंग्रज सैन्य आपल्या पदरी ठेवून त्या सैन्याचा सर्व खर्च राजाने करावा. राजाने आपल्या राज्याच्या उत्पानाच्या फक्त पाचवा हिस्सा घ्यावा व चार हिस्से कंपनी सरकारला द्यावे. वेलुत्तम्पीने कंपनी सरकारकडून दरमहा पाचशे रुपये घ्यावे व राज्याबाहेर मलबार मध्ये राहावे. राज्याचा कारभार कर्नल मेकॉले पाहतील.

अशा अन्यायकारक व जाचक अटी वेलुत्तम्पीला मान्य होणे शक्यच नव्हते. कर्नल मेकॉलेचे खरे रुप आता त्याला समजून चुकले होते. त्याने आपल्या राज्यातून इंग्रजांना घालवून देण्याचा चंग बांधला. राजा सुद्धा त्याच्या पाठीशी उभा राहिला. वेलुत्तम्पीने आपल्या साथीदरांसह राज्यात दौरा करुन साऱ्या जनतेला इंग्रजांन विरुद्ध लढा देण्यास उद्युक्त केले. वेलुत्तम्पीने फ्रेंचाना व कालिकतचा राजा सामुविरी याला इंग्रजांविरुद्ध लढा देण्यासाठी विनंती केली. पण त्याचा काही उपयोग झाला नाही. तेव्हा वेलुत्तम्पीने आपल्या जनतेच्या बळावरच इंग्रजांशी लढा देण्याचे ठरविले. राजाला व वेलुत्तम्पीला कळून चुकले की, कंपनी सरकारने आपले राज्य बळकावण्याचा चंग बांधला आहे. मेकॉलेने खंडणीतील दोन लाख मी कमी करीन. तुम्ही हा तह मान्य करुन त्यावर सही करा. इंग्रज सरकारने आपल्या कपटनीतीने उत्तरेकडील राज्ये बळकावण्याचा सपाटा लावला होता. त्या बातम्या इकडे येतच होत्या. शेवटी मेकॉलेच्या दबावाला बळी पडून राजाने त्या तहावर सही केली. दोन लाख रुपये कमी करुन द्या असे राजाने म्हणताच मेकॉलेने ग.ज.ची मान्यता घ्यावी. असे सांगून कानावर हात ठेवले. राजाला त्याचे कपट कळून चुकले व त्याने वेलुत्तम्पीला लढा देण्यास प्रोत्साहन दिले.

वेलुत्तम्पीने कोच्चीचा बळकट किल्ला आपल्या ताब्यात घेतला. सेनापतीला मेकॉलेच्या बंगल्यावर हल्ला करण्यास पाठविले. मेकॉले बंगल्यात नव्हताच. आपल्या हेरांकरवी वेलुत्तम्पीचे बेत त्याला आधीच माहीत झाले होते व तो गुपचूप समुद्रात उभ्या असलेल्या जहाजावर निघून गेला होता. सेनापतीने त्याचा बंगला उध्वस्त करुन टाकला मेकॉलेने मद्रासच्या गव्हर्नरला पत्र पाठवून तिरुवितांकुर राज्य ताब्यात घेण्यासाठी मोठे सैन्य मागवून घेतले. कोल्लमच्या युद्धात दोन्ही सैन्यांची गाठ झाली. अटीतटीचे युद्ध

होऊन दोन्ही बाजूचे बरेच सैनिक मारले गेले. या युद्धात राजाच्या सैन्याचा पराभव झाला. राजाच्या सैन्याकडे धनुष्यबाण, भाले, बरच्या, तलवारी ही परंपरागत हत्यारे होती. इंग्रज सैन्याच्या तोफा - बंदुकांच्या माऱ्यापुढे त्यांचा निभाव लागणे शक्यच नव्हते.

आता १८०९ साल होते. एक वर्षापासून हा लढा चालू होता. वेलुत्तम्पीने कुंडरा या किल्ल्यात आपले सगळे सैन्य एकत्रित केले. त्याच्या तरक्कन व उम्मिणितम्पी या दोन प्रमुख विरोधकांनी ही बातमी कर्नल मेकॉलेला दिली. आपण आपल्या सैन्याच्या बळावर विजयी होऊ असा वेलुत्तम्पीचा विश्वास होता. पण मद्रासहून इंग्रजांना मोठी कुमक मिळाली. कर्नल कूपेज पाच पलटणीसह येऊन धडकला. लंकेतून इंग्रजांचा मोठा तोफखाना आला. त्यांचा सेनापती सेंट लीगर याला वेलुत्तम्पीच्या विरोधकांनी साह्य केले. लीगरने कांच्ची किल्ल्यावर जबरदस्त हल्ला करुन तो किल्ला ताब्यात घेतला. राजाच्या सैन्याने कोल्लम किल्ल्यावर हल्ला केला. त्या युद्धात वेलुत्तम्पीचा विश्वासू व पराक्रमी साथीदार अच्चन कामाला आला. त्याच्या सैन्याला हार पत्कारावी लागली.

वेलुत्तम्पीचा विरोधक तरक्कन आपल्या साथीदारांसह वेलुत्तम्पी विरुद्ध प्रचार करु लागला. वेलुत्तम्पीने राजाला पदच्युत करुन स्वतः राजा होण्यासाठी राजा विरुद्ध विद्रोह सुरु केला आहे. त्याला मुळीच थारा देऊ नका; या प्रचाराने जनतेत गोंधळ उडाला. उम्मिणितम्पीने वेलुत्तम्पीचा महाल जमीनदोस्त करुन त्याच्या नातेवाईकांना व साथीदारांना तुरुंगात डांबले. हे दोघे मेकॉलेचे हस्तक होते. मेकॉले राजाकडे येऊन म्हणाला, "वेलुत्तम्पीला विद्रोही म्हणून जाहीर करावे व त्याला पकडून देणाऱ्यास पाच हजार रुपयांचे बक्षीस देण्याची घोषणा करावी." स्वामीभक्त वेलुत्तम्पीला विद्रोही म्हणणे व त्याला पकडून देणे या गोष्टी राजाला मुळीच पटल्या नाहीत. परंतु मेकॉलेने राजावर दबाव आणून या घोषणा राजाकडून करवून घेतल्या. राजा असहाय होऊन दुःख करीत बसला.

इंग्रजांनी पद्मनामपुरम्, कोल्लम, उदयगिरी व नागरकोविल ही महत्त्वाची ठाणी जिंकून घेतल्याने वेलुत्तम्पी निराश होऊन आपला भाऊ पद्मनाथन याच्यासह डोंगरदऱ्यांतील जंगलात निघून गेला. कर्नल मेकॉले उम्मिणितम्पी व तरक्कन यांच्यासह राजमहालात आला. त्याने त्या असहाय राजावर दडपण आणून उम्मिणितम्पीची नेमणूक दीवाण म्हणून व तरक्कनला मंत्री म्हणून राजाकडून करवून घेतली. वेलुत्तम्पी आपल्या भावासह जंगलातील भद्रकाली देवीच्या पडक्या मंदिरात विश्रांती घेत पडला होता. भयंकर निराशेने त्याला ग्रासले होते. जिवंतपणी इंग्रजांच्या हाती सापडणार नाही, अशी त्याने प्रतिज्ञा केली होती. काही लोक ह्या मंदिराकडे येत आहेत याची चाहूल

पद्यनाथनला लागली व तो त्या मंदिराबाहेर आला. तेवढ्या वेळात वेलुत्तम्पीने आपल्या तलवारीने आपले शिर छाटून टाकून त्या काली मातेच्या चरणी अर्पण केले. पद्यनाभन आत आल्यावर ते दृश्य पाहताच धाय मोकलून रडू लागला. इंगज सैनिक तेथे आले व त्यांनी पद्यनाभनला ताब्यात घेतले. वेलुत्तम्पीचा निष्प्राण देह त्याच्या शिरासह आपल्या सेनापतीकडे घेऊन गेले. सेनापतीला आनंद झाला व त्वेषाने तो म्हणाला, ''हे शव त्रिवेंद्रमपर्यंत फरफटत न्यावे आणि कण्णनमूलाच्या मोठ्या बाजारात ह्या शवाला फासावर लटकवावे. पद्यनाभनला आणि त्याच्या नातेवाईकांनाही फाशी देण्यात यावी''

वेलुत्तम्पी दलवा १८०९ साली वयाच्या ४४ व्या वर्षी निजधामास निघून गेला. १८०८ते १८०९ मधील सुमारे दीड वर्षाच्या काळात त्याने आपल्या राज्याच्या स्वातंत्र्यासाठी इंग्रजांशी कडवी झुंज दिली. इंग्रजांकडील आधुनिक शस्त्रास्त्रांनीच त्याला हार पत्कारावी लागली. तरी त्याचे नाव केरळच्या इतिहासात अमर झाले.



# ७. चतुरसिंग भोसले

छत्र. शाहू महाराजांच्या निधनानंतर सातार्‍याच्या गादीचे महत्त्व पेशव्यांची नष्टप्राय करुन टाकले आणि सगळी सत्ता आपल्या ताब्यात घेतली. राज्याचा महसूल पेशव्यांच्या खजिन्यात पुण्याला जमा होऊ लागला. त्यातून छत्रपतींना दरवर्षी ६ लाख रुपये खर्चासाठी दिले जात होते. नंतर नाना फडणीसाने ती रक्कम कमी करुन एक लाखावर आणली. नाना फडणीसाच्या मरणानंतर दुसर्‍या बाजीराव पेशव्याने इंग्रजांशी तह केला. इंग्रजांच्या तालावर त्याला कारभार करावा लागला. सातार्‍यालाही इंग्रज रेसिडेंट आला. छत्र शाहू नंतर रामराजा गादीवर आला. तो तर पेशव्यांच्या हातातले बाहुलेच होता. त्याला पुत्रसंतान नसल्याने त्याने छत्र. शिवाजी महाराजांचे चुलते विठोजी भोसले याचा वंशज विठोजी याला दत्तक घेऊन त्याचे नाव शाहू (दूसरे) असे ठेवले. या शाहू बरोबर त्याचा धाकटा भाऊ चतुरसिंग हा सुद्धा सातार्‍याला राहू लागला. शाहू शरीराने धडधाकट होता. पण त्याच्या भोवती एका बाजूने पेशव्याचा, तर दुसर्‍या बाजूने इंग्रज रेसिडेंटचा काच होता. त्यामुळे तो काहीच करु शकत नव्हता. त्याचे जिणेच मुळी परावलंबी होते. राजा असला तरी हातात कसलेही अधिकार नव्हते. शाहूच्या या अगतिकतेची चीड चतुरसिंगाला येई. काहीतरी करुन स्वतंत्रपणे राज्यकारभार करावा, असा सल्ला तो शाहूला वरचेवर देत असे पण पेशव्यांकडे खजिना, गडावरील घोडदळ व हत्ती वगैरे पेशव्यांनी काढून घेतलेले. हाती पैसा नाही की सैन्य नाही, तेव्हा शाहू तरी काय करणार? चतुरसिंगाला मात्र वाटायचे की, आपण पेशवा व इंग्रज यांच्याविरुद्ध बंड करावे आणि आपले राज्य स्वतंत्र करावे ही तर फार मोठ्या धाडसाची गोष्ट होती. कारण पेशव्यांनी छत्रपतींच्या राजमहालावर चौक्या-पहारे बसविले होते. मराठा राज्याच्या सरदार-दरकदारांना छत्रपतींची भेट घेण्यासाठी बंदी होती पुण्याहून आदेश आल्याशिवाय छत्रपतींना साध्या साध्या गोष्टीही करता येत नव्हत्या. नाना फडणीशी कारभाराने स्वतःचे व आपल्या परिवाराचे जिणे गुलामीपेक्षाही बेहतर झाल्याचे पाहून शाहूचे मन अस्वस्थ झाले. आपल्या राज्याचे पुढे काय होणार, या विचाराने तो चिंताग्रस्त झाला. ते स्वाभाविकच होते.

दुसर्‍या बाजीरावाच्या अमदानीत पुण्यामध्ये माजलेली अंधाधुंदी व बेबंदशाही हीच इंग्रजांचा गुलाम झालेल्या पेशव्याविरुद्ध व इंग्रजांविरुद्ध उठाव करण्याची चांगली संधी आहे, हे चतुरसिंगाने हेरले. त्याने छत्रपतीनिष्ठ तरुणांची संघटना गुप्तपणे बांधली व मराठा सरदारांच्या भेटीगाठी घेण्याचे त्याने सुरु केले. या कामी शाहू महाराजांचा त्याला आशीर्वाद होता. चतुरसिंग धडाडीने कामाला लागल्याचे पाहून शाहू - छत्रपतींनाही धीर

आला. चतुरसिंग जात्याच हुशार, चाणाक्ष, धाडसी, कल्पक व अत्यंत स्वाभिमानी असल्याने थोड्याच काळात अनेक मराठा तरुण, कायस्थ प्रभू, देशस्थ ब्राम्हण आणि अन्य जातीचे तरुण वीर चतुरसिंगाभोवती जमा झाले. छोट्या-मोठ्या वतनदारांचा व जहागीरदारांचा पाठिंबा मिळवून हजार - बाराशे सैन्य जमवून चतुरसिंग हिंडतो आहे, ही बातमी सर्जेराव घाटग्याने दुसऱ्या बाजीरावाला दिली, तेव्हा तो हडबडूनच गेला. बाजीराव आधीच इंग्रजांच्या पंजात सापडलेला होता. त्यातच हे नवे संकट उभे राहिले. बाजीरावाने सर्जेरावामार्फत चतुरसिंगाला चुचकारुन पाहिले. तेव्हा चतुरसिंगाने त्याला बाणेदारपणे उत्तर दिले, ''धनी आम्ही! तो पेशवा भट आमचा नोकर! तो आम्हांला सरदारी देणार म्हणे. धन्याला नागवून भिकारी करणारा हा कोण रे चोर?'' असे म्हणून चतुरसिंगाने धाटग्याला उडवूनच लावले. नंतर तो पुण्याला जाऊन दुसऱ्या बाजीरावचे लंपट चाळे फक्त बघून आला सर्जेरावाला चतुरसिंगाने असेही सुनावले की, ''हा पाजी पेशवा स्वतः तर बुडतोच आहे, आणि आपल्याबरोबर सगळ्या राज्याची हा वाट लावतो आहे. तशात हे गोरे मूठभर असूनही धडाधड सगळ्या सरदारांना चारी मुंड्या चीत करत आहेत.'' सर्जेराव गप्पच झाला.

निराश न होता, नव्या दमाने चतुरसिंग नागपूरच्या भोसल्याकडे गेला. रघुजी भोसले यांनी त्याचे यथायोग्य स्वागत करुन त्याला दोन हजार फौज व दरमहा पंधरा हजार रुपयांची नेमणूक दिली. दौलतराव शिंद्यांच्या निमंत्रणावरुन तो सागर येथे गेला. त्याच्याशी व यशवंतराव होळकराशी मसलत केली. पेंढाऱ्यांचे पुढारी अमीरखान व करीमखान हे सुद्धा त्याला चंबळा नदीच्या काठी येऊन मिळाले. सर्वांनी संघटितपणे इंग्रजांच्या व दुसऱ्या बाजीरावच्या परिपत्यासाठी आणाभाका घेतल्या. सर्जेराव घाटग्याला मात्र त्याने खडसावले. तो खजील होऊन गेला व त्याने चतुरसिंगाची माफी मागितली. सर्वजण नंतर अजमेर येथे गेले. भरतपूरच्या जाट राजाला भेटून त्याला चतुरसिंगाने आपल्या संघटनेत सामील करुन घेतले.

इंग्रज सेनापती लेक व माल्कम यांची चतुरसिंगाने आधी वकील पाठवून गाठ घेतली. दोघांनीही मानभावीपणे चतुरसिंगाचा सत्कार केला. तेव्हा तो त्यांना म्हणाला, ''पेशवे हे छत्रपतींचे नोकर आहेत. स्वराज्याचे मालक छत्रपती. आम्ही आमच्या छत्रपतीसाठी स्वराज्य मिळविण्याकरिता झगडत आहोत. पेशव्याने आमच्या स्वराज्याविषयी तुम्हाला काहीही लिहून दिले असले, तरी आम्ही मराठे ते बिलकूल जुमानणार नाही. याद राखून ठेवा!'' त्या दोघांनी चतुरसिंगाला सरदारी जहागीर देण्याचे मधाचे बोट लावून पाहिले. तेव्हा तो उसळून त्यांना म्हणाला, ''आम्ही स्वार्थासाठी वनवास

पत्कारलेला नाही. मराठा राज्य तमाम मराठ्यांचे आहे. आमचे धनी छत्रपती. आमच्यां राज्याला धक्का लागला, तर आम्ही प्राण खर्ची घालू. आडवे येतील त्यांना कापून काढू. तेव्हा आपला - परका पाहणार नाही. लक्षात ठेवा.''

जुलै १८०६ मध्ये पुष्कर येथे चुतरसिंगाची आणि यशवंतराव होळकराची भेट झाली. जोधपूरचा राजा मानसिंग हा सुद्धा तेथेच चतुरसिंगाला भेटला. मनसुभा ठरला जयपूरचा राजा जगतसिंह सुद्धा त्यांना सामील झाला. उदेपूरच्या राजानेही तशी ईच्छा व्यक्त केली. बद्योद्याचा कान्होजीही त्यांना मिळाला. चतुरसिंग उज्जैनला आला. तेथे बातमी आली की, छत्र शाहू महाराजांचे निधन झाले. चतुरसिंग अतिशय निराश झाला. इंग्रजांनी प्रतापसिंहाला गादीवर बसवून ग्रँट डफ हा सातारा राज्याचा कारभार पाहू लागला आहे, असे ही त्याला समजले. आता सातान्यास जाण्यात काय अर्थ ? तो अत्यंत खिन्न झाला. तेव्हा बापू कान्हो, व्यासराव डबीर व मल्हारराव चिटणीस यांनी सल्ला दिला की, आजवर खूप भटकलो. पण काही उपाय सापडत नाही. तरी स्वदेशी जाऊनच काय साधेल, ते करावे. सन १८०९ मध्ये चतुरासिंग महाराष्ट्राकडे निघाला. धारला त्याचा दोन वर्षे मुक्काम पडला.

सातान्याचा बंदोबस्त दुसन्या बाजीरावाने त्याचा मित्र त्र्यंबकजी डेंगळे याचेकडे सोपविला होता. त्र्यंबकजी दूत पाठवून चतुरसिंगाला स्वदेशी येण्याचे आमंत्रण दिले. चतुरसिंगाने आधी बडोद्यास जाऊन तेथून काही मदत मिळेल काय, हे पाहिले. तेव्हा बडोद्याचा ब्राम्हण कारभारी गंगाधर शास्त्री याने त्याला स्पष्टपणे सांगितले की, 'बडोद्यास इंग्रजांच्या सूचनेशिवाय झाडाचे पानही हलत नाही. तेव्हा तेथे तुमची काय डाळ शिजणार?'' निराश होऊन चतुरसिंग खानदेशात आला. त्र्यंबकजीला तेच हवे होते. त्याने चतुरसिंगाला वकिलासमोर बेलभंडार उचलून शपथ घेतली की, 'इकडे चतुरसिंगाच्या केसालाही धक्का लागणार नाही.' १० फेब्रुवारी १८११ रोजी भेटीचा दिवस ठरविण्यात आला. गिरणा नदीच्या काठी चतुरसिंगाच्या छावणीतच मेजवानीचा थाट करायचा, त्र्यंबकजीने ठरविले. सहा घटका रात्रीला विचारविनिमय करायचे ठरले. रघुनाथराव गुजर, बापू फडणीस, अप्पाजीराव इंगळे, गोपाळराव न्यायाधीश, अप्पा पुणतांबेकर, त्याचे दोन भाऊ, बाबाजी केशव पाडळीकर, लाडेखान जामदार, हवालदार, खिजमतगार वगैरे मंडळी सह चतुरसिंग त्र्यंबकजीची प्रतीक्षा करीत बसला. सारे जण गप्पांत रंगले होते. पण हाय! त्यांच्या तंबुवर एकदम चहूबाजूंनी हल्ला झाला. हल्लेखोरांनी तंबूचे सगळे दोर एकदम कापून टाकले व तंबूच्या कनातीखाली आत बसलेल्या सर्वांना दाबूत धरले. नंतर सर्वांना कैद केले. त्र्यंबकजी तिकडे फिरकलाच

नाही. चतुरसिंगाची सगळी छावणी लुटण्यात आली. दुसऱ्या बाजीरावाने अशा रीतीने छत्रपतींचा पराक्रमी भाऊ परस्पर जेरबंद करून टाकला व आपल्या मार्गातला काटा दूर केला. चतुरसिंग बाजीरावाला शत्रू वाटत असेल, पण तो खरा महाराष्ट्राचा शूर, स्वाभिमानी व जातिवंत पुत्र होता. याची जाणीव त्या लंपट, विलासी व इंग्रजांच्या हातातले बाहूले बनलेल्या दिवट्या बाजीरावाला कशी असणार?

त्र्यंबकजी सर्वांना घेऊन नासिकला आला. त्यावेळी बाजीरावाचा मुक्काम नासिकला होता. बाजीरावाने चतुरसिंगाला रायगड किल्लाजवळच्या कांगोरीच्या किल्ल्यात आणि चतुरसिंगाच्या साथीदारांना वेगवेगळ्या किल्ल्यांत तुरूंगात डांबण्याचा हुकुम सोडला. मराठा राज्याला दुसऱ्या नादान बाजीरावाच्या व पर्यायाने इंग्रज धूर्तांच्या पंजातून सोडविण्यासाठी अविरतपणे जिवाची बाजी लावून साह्यासाठी हिंदूस्थानभर पायपीट करणारा, स्वराज्यासाठी तळमळणारा व आटोकाट प्रयत्न करणारा स्वातंत्र्यवीर चतुरसिंग अखेर पेशवाईच्या तुरूंगात बुधवार दिनांक १५ एप्रिल १८१८ रोजी अमानुष हालअपेष्टा भोगीत अखेर कालकवलित झाला.



# ८. मुधोजी राजे ऊर्फ अप्पासाहेब भोसले.

नागपूरचे रघूजी राजे (दुसरे) १२ मार्च १८१६ रोजी निधन पावले. तेव्हा त्याची आवडती राणी बांकाबाई हिने ठरविले की, रघूजीचा दासीपुत्र धर्माजी याला गादीवर बसवावे. कारण रघुजीचा मुलगा परसोजी (दुसरा) हा शरीराने अपंग होता. धर्माजी हा अनौरस असल्याने परसोजीचा चुलत भाऊ (बांकाबाईचा पुतण्या) मुधोजी याचा धर्माजीला विरोध होता. बांकाबाईचा हेका पाहून मुधोजीने तिला व धर्माजीला कैदेत टाकले. मुधोजी हा शुर, पराक्रमी व बाणेदार होता. त्याने परसोजीस राज्याभिषेक करवून त्याला नागपूरच्या गादीवर बसविले. स्वतः त्याचा कारभारी झाला. त्याने राज्यकारभाराची सर्व सूत्रे आपल्या हातात घेतली व राज्यकारभार पाहू लागला.

मध्यंतरी ५ मे १८१६ रोजी धर्माजीचा अज्ञातात खून झाला. खुनी सापडला नाही. नंतर मुधोजी चांद्याला (चंद्रपूरला) गेला असता १ फेब्रुवारी १८१७ रोजी रात्री परसोजी अंथरूणातच निधन पावला. परसोजीच्या खुनाचा आरोप मुधोजीवर त्याच्या विरोधकांनी ठेवला. नागपूरच्या कंपनीसरकारच्या रेसिडेंटने नागपूर दरबारातील नारायण पंडित व नागो त्र्यंबक या दोघा मारेकऱ्यांच्या साह्याने मुधोजीवरचा तो आरोप खोटा ठरविला. त्यात इंग्रज रेसिडेंटचा स्वार्थी हेतू होता. त्याच्या बदल्यात नारायण पंडित आणि नारो त्र्यंबक यांच्या मध्यस्थीने इंग्रजांची तैनाती फौज नागपूरला ठेवण्यात मुधोजीला भाग पाडले.

मुधोजी २१ फेब्रुवारी १८१७ रोजी रीतसर नागपूरच्या गादीवर बसला. परंपरागत पद्धतीप्रमाणे पुण्याच्या पेशव्याकडून (दुसऱ्या बाजीरावाकडून) मुधोजीला 'सेनासाहेब सुभा' ही पदवी मानाच्या वस्त्रांसह आली. ती मुधोजीने स्वीकारू नये, असे रेसिडेंटने मुधोजीला कळविले. ''पेशव्यांचा व आमचा बिघाड झाला आहे. तुम्ही ही वस्त्रे स्वीकारू नयेत'' असे रेसिडेंट म्हणाला. पण मुधोजीने रेसिडेंटला न जुमानता ती पदवी आणि मानाची वस्त्रे स्वीकारली, कारण नागपूरच्या भोसल्यांचा तो परंपरागत हक्क होता.

कंपनी सरकारने नागपूर राज्यातील होशंगाबाद येथे वखार घालण्याची परवानगी मुधोजीराजांना मागितली. ती मुधोजीराजांनी फेटाळून लावली. या दोन घटनांमुळे कंपनी सरकार मुधोजीराजावर नाराज झाले. फितूर नारायण पंडित व नारो त्र्यंबक यांच्यामुळेच रेसिडेंट मुधोजीशी तैनाती फोजच तह करू शकले. त्यामुळे कंपनी सरकार या दोघांवर खुश झाले आणि या दोघा ब्राम्हणांना कंपनी सरकारने प्रत्येकी १५ हजार रुपयांची नेमणूक तह हयात दिली.

मुधोजी दुसऱ्या बाजीराव पेशव्याचे अनुकरण करून लढाई करू नये, म्हणून जेन्किसने बैतूल, होशंगाबादहून इंग्रजी सैन्य नागपूरला आणून घेतले. इंग्रज फौजेचा मुख्य अधिकारी लेफ्ट-कर्नल स्कॉट हा सुद्धा तेलखेडीहून सैन्यासह नागपूरला येऊन ठेपला. २५ नोव्हेंबर १८१७ रोजी रात्रीच्या कडाक्याच्या थंडीत नारायण पंडित हा वेषांतर करून रेसिडेन्सीत आला व त्याने जेन्किसला सांगितले, "अप्पासाहेबाने तुमच्यावर हल्ला करण्याचा निर्णय घेतला आहे, तेव्हा सावध राहा." बातमीमुळे सावध होऊन जेन्किसने लढाईची पूर्व तयारी केली.

अप्पासाहेबांच्या १० हजार घोडेस्वारांनी व ६ हजार पायदळाने सीताबर्डीच्या परिसरात इंग्रज सैन्याला चहुबाजूंनी घेरले. त्या सैन्याजवळ २५ तोफाही होत्या या सैन्याचा प्रमुख अप्पासाहेबांचा एकनिष्ठ सरदार मनभट्ट उपाध्ये हा होता.- अप्पासाहेब मात्र रणांगणावर नव्हते. सीताबर्डीच्या या लढाईत इंग्रजांच्या विजय झाला. लढाई संपल्यानंतर अप्पासाहेबांनी नारायण पंडितामार्फत जेन्किसला निरोप पाठविला की, "मनभट आणि त्याच्या अरब सैन्याने माझ्या हुकुमाशिवाय ही लढाई केली." बांकाबाई ही इंग्रजांस अनुकूल होती. लढाई संपल्यावर तिने जेन्किसला निरोप पाठविला, तो असा "झालेल्या घटनेशी आपला मुळीच संबंध नाही. इंग्रजांनी भोसले घराण्याशी आपला संबंध पूर्ववत कायम ठेवावा." लढाईनंतर जेन्किस याने अप्पासाहेबास इंग्रज-भोसले संबंध पूर्ववतच आहेत, असे भासविण्याचा प्रयत्न सुरू ठेवला. कारण जेन्किसला इंग्रज सैन्याची मोठी कुमक येण्यास अजून अवकाश होता.

१२ डिसेंबर १८१७ रोजी कॅ. डव्हटन एक डिव्हिजन इंग्रज सेनेसह नागपूरात येऊन धडकला. त्यांनतर जेन्किसला जोर चढला. त्याने नारायण पंडितामार्फत अप्पासाहेबाला कळविले की, "अप्पासाहेबाने आपले सारे राज्य इंग्रजांच्या ताब्यात द्यावे. आपला तोफखानाही आमच्या ताब्यात द्यावा. अरब सैन्यास नोकरीतून मुक्त करावे व त्या सैन्याने आम्ही सांगू तेथे निघून जावे. या सर्व अटी पूर्ण होईपर्यंत अप्पासाहेबाने आमच्या रेसिडेन्सीत आमच्या देखरेखीखाली राहावे त्यानंतरच भोसले-इंग्रज संबंध सलोख्याचे राहतील. तेव्हा यापुढे अप्पासोहबाने लढाईच्या फंदात मुळीच पडू नये. यापुढे राज्याच्या अंतर्गत कारभारावर इंग्रजांचे योग्य ते नियंत्रण राहील." या अटी अत्यंत अपमानास्पद होत्या व अप्पासाहेबासारख्या स्वाभिमानी व शूर व्यक्तीस त्या मान्य होणे शक्यच नव्हते.

१६ डिसेंबर रोजी जन. डव्हटन आपल्या सैन्यासह सक्करदऱ्याकडे निघाला. अटीतटीची लढाई होऊन मराठ्यांचा पराभव झाला. या लढाईत इंग्रजांना अप्पासाहेबाच्या

७५ तोफा, ४० हत्ती, राजाचा शाही तंबू व इतर बहुमोल वस्तू मिळाला. लढाई संपल्यावर मनभट व त्याच्या अरब सैन्याने नागपूर शहर ताब्यात घेतले. नारायण पंडिताने फितुरी केली, म्हणून मनभट उपाध्ये याने त्याच्या घरावर हल्ला केला व त्याची संपूर्ण संपत्ती लूटून नेली. मनभटाने नारायण पंडितास त्याच्या फितुरीबद्दल चांगलेच शासन केले.

शहर मुकाट्याने आमच्या ताब्यात द्या, असे जेन्किन्सने मनभटास कळविले. मनभटाने ते मानले नाही. शुक्रवार दरवाजाजवळ तुंबळ युद्ध झाले. त्यात इंग्रजांनी अप्पासाहेबाच्या सैन्याकडून हस्तगत केलेल्या ७५ तोफांचा उपयोग केला. २४ डिसेंबर रोजी इंग्रजांनी नागपूर शहरावर निकराचा हल्ला केला. ६ जानेवारी १८१८ पर्यंत नागपूर शहर इंग्रजांनी ताब्यात घेतले. इंग्रजांनी अप्पासाहेबाशी नवा तह केला. त्यानुसार नागपूर राज्याच्या उत्तरेकडील सर्व प्रदेश, सिरगुजा व जसपूर ही संस्थाने, गाविलगड व नरनाळा हे किल्ले त्यांच्या सभोवतालच्या प्रदेशासह एकंदर साडेबावीस लाख उत्पन्नाचा प्रदेश इंग्रजांना मिळाला अप्पासाहेबाला नामधारी राजा बनवून राज्याचा सगळा कारभार इंग्रजांनी आपल्या ताब्यात घेतला. त्यानंतर बांकाबाई हिच्या सल्ल्याने जेन्किन्सने १५ मार्च १८१८ रोजी अप्पासाहेबाला अटक करून कैदेत टाकले. ग. ज. हेस्टिंग्जच्या आदेशानुसार अप्पासाहेब व त्यांचे दोन सहकरी रामचंद्र वाघ आणि नागो यांना अलाहाबादला पाठवून तेथे कैदेत टाकण्याचे ठरविले. कॅप्टन ब्राऊन त्यांना घेऊन पुरेशा सैन्यासह वाटखर्चाची रक्कम घेऊन ३ मे १८१८ रोजी अलाहाबादकडे निघाला. त्यांचा मुक्काम जबलपूरच्या अलीकडे रायचूर येथे असताना अप्पासाहेब बेमालूमपणे तेथून निसटला आणि हरईचा गोंड राजा चैनशहा याच्या आश्रयाला गेला-हरईचा प्रदेश डोंगराळ व घनदाट अरण्यांनी व्यापलेला असल्याने तेच स्थान अप्पासाहेबाला सुरक्षित वाटले.

कॅ. ब्राऊनने चारही दिशांना आपले घोडेस्वार अप्पासाहेबाचा शोध लावण्यासाठी पाठविले. परंतु त्यांना रिकाम्या हातांनी परत यावे लागले. अप्पासाहेब हरईला गेला असावा, म्हणून जबलपूरचा इंग्रज अधिकारी ओब्रेन याने व ब्रिगेडिअर जनरल वॉटसन याने हरईकडे घोडेस्वार पाठविले. पण त्यांच्याही हाती अप्पासाहेब लागला नाही. नंतर जोन्किसने अप्पासाहेबाला पकडून देणाऱ्यास एक लाख रुपयांचे बक्षीस जाहीर केले. जबलपूरच्या कमिशनरने सुद्धा त्यासाठी आधी २५ हजार नंतर एक लाख रुपये बक्षीस देण्याची घोषणा केली. पण बक्षीसाच्या लोभाने कोणीही ते काम करण्यास तयार झाला नाही. म्हणून जोन्किसने दोन लाख रुपये व एक हजार रुपये उत्पन्नाची जहागीर देण्याचे घोषित केले. परंतु या बक्षीसांचा कोणावरही थोडा सुद्धा परिणाम झाला नाही. अप्पासाहेब त्यानंतर कधीही इंग्रजांच्या हाती लागला नाही.

अप्पासाहेबाने आता नागपूरचे राज्य इंग्रजांच्या हातून मुक्त करण्यासाठी लढा सुरु केला. दिवसेंदिवस त्याच्या अनुयायांची संख्या वाढू लागली. याकामी त्याची पत्नी उमाबाई व अन्य नातेवाईक त्याला गुप्तपणे आर्थिक साहाय्य देऊ लागले. दुसऱ्या बाजीरावाने जन. माल्कमपुढे शरणागती पत्करल्यानंतर त्याचे सैन्यही अप्पासाहेबास येऊन मिळाले. हरईचा गोंडराजा चैनशहा व पंचमढीचा ठाकूर मोहनसिंग हे तर आधीपासूनच त्याच्या पाठीशी उभे होते. तन...मन... धनाने साह्य करीत होते. अप्पासाहेबाने आपल्या सैन्यासह बैतूल येथील छावणीवर २० जुलै १८१८ रोजी अचानक हल्ला करुन कॅप्टन स्पार्क याला त्याच्या १०० शिपायांसह कापून काढले. मेळघाट, भैंसदही, सातनेर, अतनेर व आमला वगैरे भागावर अप्पासाहेबाने आपला अंमल बसविला. साऱ्या नागपूर राज्यात अप्पासाहेबाच्या सैनिकांनी धुमाकूळ माजविला. बालाघाट जिल्ह्यातील कामथ्याचा जमीनदार चिमणा पटेल यानेही इंग्रजांविरुद्ध युद्ध पुकारले. अप्पासाहेबाने आरंभिलेला स्वातंत्र्य-लढा हळूहळू साऱ्या नागपूर राज्यात पसरला.

नागपूरलाही इंग्रजांविरुद्ध कट शिजू लागला. त्यात अप्पासाहेबाचे ५ नातेवाईकही होते. तो कट इंग्रजांना समजला व अप्पासाहेबाच्या त्या ५ नातेवाईकांना जोन्किसने अलाहाबादला पाठवून दिले. दिवसेंदिवस अप्पासाहेबाला वाढतापाठिंबा मिळत होता. ब्रिगेडिअर जनरल जॉन माल्कम याने लाला शिवप्रसाद मार्फत अप्पासाहेबांना कळविले की, तो जर शरण आला, तर त्याला कैद केले जाणार नाही. पेन्शन देण्यात येईल. ग. ज. सांगेल त्या स्थानी सन्मानाने राहता येईल. ''पण अप्पासाहेब इंग्रजी कावा ओळखून होता. त्याने माल्कमचे म्हणणे धुडकावून लावले.

लवकरच अप्पासाहेबाला चितू पेंढारी आपल्या अनुयायांसह येऊन मिळाला. इंग्रज अप्पासाहेबाचा शोध घेतच होते. चितू पेंढाऱ्यासह अप्पासाहेब अशीरगडाकडे गेला. अशीरगडाचा किल्लेदार यशवंतराव लाड याचेकडे किल्ल्यावर अप्पासाहेब सैन्यासह आश्रयास राहिला. कॅ. डव्हटन हा मोठी इंग्रज सेना तोफखान्यासह घेऊन अशीरगडाजवळ आला. कर्नल स्मिथ पुण्याहून मोठे सैन्य व प्रचंड तोफखाना घेऊन आला. अशीरगड त्यावेळी ग्वाल्हेरचे दौलतराव शिंदे यांच्या ताब्यात होता. इंग्रजांनी दौलतरावातर्फे यशवंतराव लाड याला अशीरगड इंग्रजाच्या ताब्यात देण्याचा हुकूम आणला. तेव्हा यशवंतराव म्हणाला 'आमच्या किल्ल्यात अप्पासाहेब नाही.' तोपर्यंत जॉन माल्कम हा महू येथून सैन्य घेऊन अशीरगडाजवळ येऊन पोहचला.

इंग्रजांनी अशीरगडावर हल्ला केला. यशवंतरावांनेही जिद्दीने किल्ला लढविला. शेवटी यशवंतरावांने काही अटीवर अशीरगड इंग्रजांच्या ताब्यात दिला. किल्ल्यात

अप्पासाहेब नव्हताच. तो अशीरगडापासून फार लांब निघून गेला होता. अप्पासाहेबाने रणजितसिंहाच्या राज्यात आश्रय मागितला. पण रणजितसिंहाने आश्रय देण्याचे नाकारले. शिखांच्या राज्यातून टेहरी गढवाल मंडी इ. भागात अप्पासाहेब ससैन्य हिंडत होता. नंतर तो बिकानेर येथे व त्यानंतर जोधपूरच्या राजाकडे गेला. जोधपूरच्या राजाने त्याला आपल्याकडे मोठ्या इतमामाने ठेवले.

नोव्हेंबर १८१७ पासून अप्पासाहेब इंग्रजांशी झुंज देत होता. १८२९ साली त्याने जोधपूरच्या राजाकडे आश्रय घेतला. त्यानंतर १८४० सालपर्यंत तो जोधपूर येथेच राहिला असावा. तो १५ जुलै १८४० मध्ये जोधपूर येथे मरण पावला, असा आतापर्यंतचा समज होता. परंतु नवीन संशोधनानुसार अप्पासाहेब जोधपूरहून दक्षिणेकडे गेला व हैद्राबाद येथे पोचला. १८५१ मध्ये त्याने हैद्राबादच्या कारागृहात देह ठेवला. नागपूरचे राज्य इंग्रजांकडून परत मिळविण्याचा त्याचा अखेरपर्यंत निर्धार होता. परंतु मनुष्यबळ व साधनसामुग्री अभावी त्याची ती महत्त्वाकांक्षा पुरी होऊ शकली नाही व हा झुंजार स्वातंत्र्यसेनानी अपयश पदरी घेऊन या जगातून कायमचा निघून गेला. 'घरकी फूट जगतमें बुरी' हेच खरे. त्या महान क्रांतिकारकाचे स्मरण नव्या पिढीला सतत स्फूर्तिदायी ठरावे.



# ९. घासीसिंह

इंग्रजांच्या साह्याने मीर कासीम बंगालचा नवाब झाला. त्याच्या बदल्यात त्याने छोटा नागपूर जवळचा मेदिनीपूर जिल्हा इंग्रजांना १७६० मध्ये दिला. आता इंग्रज छोटा नागपूरकडे वळले व त्यांनी सिंहभूम जिल्हा वगळता सगळा छोटा नागपूरचा भाग आपल्या ताब्यात घेतला. संबलपूर पासून कलकत्त्यापर्यंत सडक तयार करणे व ओरिसातील कटकपासून वाराणसीपर्यंत रस्ता तयार करण्यासाठी सिंहभूम जिल्हा इंग्रजांना आपल्या ताब्यात घेणे अत्यावश्यक वाटले. म्हणून त्यांनी सन १८१८ मध्ये सिंहभूमच्या राजाशी तह केला. त्यात राजाचा वैयक्तिक स्वार्थ साधला; पण खरसवानचे ठाकूर चेतनसिंह आणि सेराईकेलाचे कुंवर विक्रमसिंह इंग्रजांशी समझोता करण्यास मुळीच तयार नव्हते. या प्रदेशात 'हो' या आदिवासी जातीचे लोक राहात असत. ते अत्यंत स्वातंत्र्यप्रिय होते. त्यांनी आपला नेता घासीसिंह याच्या नेतृत्वाखाली इंग्रजांशी लढा द्यायचे ठरविले. त्यांची परंपरागत हत्यारे होती धनुष्यबाण व परशु. परशु म्हणजे अत्यंत धारदार कुन्हाड.

'हो' हे आदिवासी जातीवर लूटमार करणे व हत्या करणे हा आरोप ठेवून त्यांचा बंदोबस्त करण्याच्या बहाण्याने सिंहभूम वर हल्ला करुन या आदिवासींना कप्त्यात घेणे, हा उद्देशाने त्यांनी पोरहाटच्या राजाला आपल्याकडे वळवून घेतले. हा प्रदेश आपल्या ताब्यात घेण्याचा इंग्रजांना आणखी एक उद्देश होता. मद्रास ते कलकत्ता हा मोठा मार्ग तयार करणे. म्हणजे आपल्या ताब्यातील प्रदेश परस्परांसाठी जोडण्याकरीता सिंहभूम जिल्ह्यावर ताबा मिळवणे, हाच अंतःस्थ हेतू त्यांचा होता.

मेजर रफरेज आपल्या सैन्यासह चाईबासा येथे येऊन ठाकला. त्याच्या आदेशानुसार पोरहाटचा राजा व अन्य राजेही त्याला साथ देण्यासाठी आहे. ते पाहून घासीसिंह खवळला. त्याच्या 'हो' वीरांनी तेथला बांध फोडून टाकला. सारे पाणी वाहून गेले. सैन्याला पिण्यासाठीही पाणी उरले नाही. नंतर 'हो' वीरांनी मेजर रफरेजच्या सैन्याला चहुबाजूंनी घेरले. त्यांनी सिंहभूमच्या राजालाही हाकलून दिले. मेजर रफरेजच्या साह्याला लेफ्टनंट मेलर्ड आपल्या सैन्यानिशी येत असताना 'हो' वीरांनी त्याला मध्येच अडवून ठेवले. त्यांच्यात तुंबळ युद्ध झाले. दोन्ही बाजूचे अनेक सैनिक मारले गेले. त्यानंतर सारे 'हो' वीर डोंगरांच्या आश्रयाला निघून गेले. मेलर्डला समजले की, 'हो' लोक कुटियालोर येथे एकत्र होऊन आक्रमणाची तयारी करीत आहेत. तेव्हा त्याने कुटियालोरकडे कूच केले व त्यांच्यावर हल्ला केला. अनेक गावे जाळून बेचिराख केली. 'हो' वीरांनी आपल्या बाणांच्या माऱ्याने इंग्रजांशी जबरदस्त सामना दिला. पण

बंदुकांसारख्या आधुनिक शस्त्रांमुळे 'हो' वीरांना पराक्रमी असूनही माघार घ्यावी लागली. गुमला, अदेजानदिया, वंशवीर, जयंतगड ही स्थाने ताब्यात घेताना इंग्रजांची फार मोठी हानी झाली.

६ एप्रिल १८२० रोजी गमदिया जवळ 'हो' वीरांनी मे रफरेजच्या सैन्यावर मोठे आक्रमण केले. तेव्हा त्याला आपले प्राण वाचविणेही अशक्य झाले. तेव्हा बाबू अजेबरसिंहाच्या साह्याने तो सिंहभूम जिल्ह्याबाहेर पळून गेला.

इंग्रजांचा प्रतिनिधी बरकानदीपचा सुभेदार याने दगाबाजीने घासीसिंहाला कैद केले. त्याच्या साथीदारांनी गुलमापीर भागाचा मुखिया 'हो' आदिवासी कोडो पेंटरच्या तरुण मुलीवर बलात्कार केला. त्यामुळे 'हो' वीर संतापले. ते पुरुलिया येथे संगठित झाले व त्यांनी त्या सुभेदारावर संगठितपणे हल्ला केला. ३१ जानेवारी १८२१ रोजी त्या वीरांना त्या सुभेदाराला त्याच्या पंधरा साथीदारांसह ठार केले. तसेच पोरहाटच्या राजाच्या दोन मंत्र्यांनाही ठार केले. त्यात त्यांचे २० घोडे मारले गेले.

'हो' वीरांनी चंग बांधला की, कोणत्याही परिस्थितीत इंग्रजांना आपल्या सिंहभूम जिल्ह्यातून हाकूनच द्यायचे. घासीसिंहाचे गुमलापीरचे नातेवाईक आता 'हो' वीरांचे नेतृत्व करु लागले. त्यांनी ६ फेब्रवारी १८२१ रोजी सिनेपूरच्या किल्ल्यावर हल्ला केला. मेजर रफरेजला कोठूनही मदत मिळू नये, म्हणून त्यांनी त्या भागातील सर्व रस्त्यांची व घाटांची नोकेबंदी केली. इंग्रज सरकारच्या रतनसिंह जमादाराला इंग्रजांकडून निपूरचा किल्ला मिळाला होता. 'हो' वीरांना घाबरुन त्याने तो किल्ला त्यांच्या ताब्यात घेऊन टाकला 'हो' आदिवासींचा हा फार मोठा विजय आहे, असे रफरेज ही म्हणाला. त्यानंतर इंग्रजांनी 'हो' वीरांशी समझोता केला. नंतर आठ नऊ वर्षे शांततेत गेली.

फेब्रुवारी १८३० मध्ये १२०० 'हो' वीरांनी इंग्रजांनी समझोता तोडला म्हणून जयंतगडावर हल्ला केला. इंग्रज सरकारने त्या गडावर नियुक्त केलेला रघुनाथ बन्सी त्या गडातून जीव घेऊन पळून गेला. 'हो' वीरांनी तो गड नष्टभ्रष्ट करुन टाकला. जयंतगडावरील पराभवाने इंग्रजांचा जळजळाट झाला. परंतु आपल्या पराभवाचा बदला घेण्यास ते असमर्थ होते.

१ डिसेंबर १८३१ पासून पुन्हा 'हो' वीरांचा विद्रोह सुरु झाला. छोटा नागपूरपासून अवधच्या सीमेपर्यंत भडकत राहिला. या विद्रोहाचे नेतृत्व 'हो' 'लरका हो' आणि 'कोल' या आदिवासी जातींच्या नेत्यांनी केले. त्याची आग १८३७ पर्यंत या प्रदेशात धुमसत होती. आपल्या परंपरागत साध्यासुध्या हत्यारांनी 'हो' आणि 'कोल' वीरांना आधुनिक

शस्त्रास्त्रांनी आपल्या स्वातंत्र्यासाठी इंग्रजांशी जी दीर्घकाळ झुंज दिली, ती अद्वियच म्हटली पाहिजे. घासीसिंहाने आपल्या या जमतींच्या अंतःकरणात पेटविलेल्या स्वातंत्र्याच्या ज्योतीने भारताच्या स्वातंत्र्य लढ्यात आपले सोनेरी पान जोडले आहे, हे निर्विवाद होय. या संग्रामालाच 'कोल विद्रोह' अथवा 'कोल संग्राम' म्हणतात.

❖❖❖

# १०. युवराज चैनसिंह

माळव्यातील नरसिंहगडच्या रियासतीचा प्रदेश दीड-दोनशे वर्षांपूर्वी माळव्याचे काश्मीर म्हणून प्रसिद्ध होता. त्या रियासतीच्या डोंगरदऱ्या, जंगले, तलाव यांमुळे तेथले निसर्गवैभव अतुलनीय बनले होते. वर्षभर हिरवागार असलेला हा प्रदेश कोणालाही मोहून टाकेल असाच होता. मग इंग्रज त्याला अपवाद कसे ठरतीय? त्या रियासतीचे राजे होते राजपूत सौभाग्यसिंह. त्यांच्या मोठ्या मुलाचे नाव चैनसिंह - त्याला सौभाग्यसिंहांनी युवराज पद दिले होते. चैनसिंह बालपणापासूनच अति स्वाभिमानी होता. त्याचे शिक्षण होता होता, तो युद्ध कलेतही निपुण बनला होता. अंगात तारुण्य सळसळत होते. स्वातंत्र्याचा तो उपासक होता.

इंग्रजांनी भोपाळच्या नबाबाला आपल्या अंकित केले आणि सन १८१८ मध्ये सिहोर येथे आपली छावणी स्थापित केली. मि. मैडाक याला त्या छावणीचा अधिकार सोपविला. त्याला भोपाळ, राजगड, खिलचीपूर व नरसिंहगड या रियासतींचा राजनैतिक प्रतिनिधी म्हणून नेमले. इंग्रजांची ही ताबेदारी व दादागिरी युवराज चैनसिंहाच्या मनात डाचत होती. सौभाग्यसिंहाचे महामंत्री आनंदराव बक्शी यांना मैडाकने आपल्या बाजूला वळवून घेतले होते. तो नरसिंहगडच्या दरबारातील हालचालींच्या बातम्या मैडाकला सतत पुरवीत असे. चैनसिंहाला आपला हा महामंत्री आपल्या राज्याशी विश्वासघात करीत आहे याची खात्री झाली. आपल्या पित्याचा विरोध असूनही चैनसिंहाने त्या विश्वास घातकी महामंत्र्याला ठार केले. त्यामुळे मैडाक संतापला.

इंदूरच्या होळकरांनाही इंग्रज सरकारचे आपल्यावरील वर्चस्व मुळीच पसंत नव्हते. त्यांनी आपणांस इंग्रजांच्या पाशातून कसे मुक्त होता येईल, याचा विचार करण्यासाठी मध्यभारतातील सर्व राजेराजवाड्यांची एक बैठक इंदूरला घेतली. त्या बैठकीत नरसिंहगड राज्याच्या वतीने युवराज चैनसिंह हे सुद्धा उपस्थित होते. याची बातमी नरसिंहगडचे एकमंत्री रुपरामबोहरा यांनी गुप्तपणे मि. मैडाक याला दिली. ते चैनसिंहाला समजले. त्याला ही चैनसिंहाने संधीसाधून ठार केले. रुपराम बोहराच्या भावाने कलकत्त्याच्या गव्हर्नर जनरलकडे त्याबाबत तक्रार एका पत्राने केली. मि. मैडाककडेही तक्रार नोंदविली गव्ह. जनरलने यासंबंधी मि. मैडाककडे चौकशी केली.

चौकशीसाठी मैडाकने चैनसिंहाला आपल्या भेटीस बोलावले. चैनसिंहाने त्याकडे दुर्लक्ष केले व तो मैडाकला भेटायला गेलाच नाही. हा कोण माझी चौकशी करणारा? अशा विचारानेच चैनसिंहाने बेफिकिरी दाखविली. मैडाक बेरसियाला आला व त्याने तेथे

आपला तळ देऊन पुन्हा चैनसिंहाला आपली भेट घेण्यासंबंधी पत्र दिले. बेरसिया येथे चैनसिंह आपल्या मोजक्या सैन्यासह आला. त्याची व मैडाकची भेट झाली. तेव्हा मैडाकने चैनसिंहासमोर तीन अटी ठेवल्या. १. चैनसिंहाने नरसिंहगड सोडून काशीला कायमचे राहावे. २. तीन वर्षांपर्यंत नरसिंहगडचे राज्य इंग्रजांच्या आधिपत्याखाली कारभार करील. ३. नरसिंहगड राज्यात उत्पादित होणारी अफू फक्त इंग्रजच खरेदी करतील.

चैनसिंहाचे स्वाभिमानी व स्वातंत्र्य-प्रिय मन या अपमानास्पद व गुलामीत गोवणाऱ्या अटी मान्य करण्यास तयार होणे शक्यच नव्हते. त्याने मैडाकच्या अटी धुडकावून लावल्या. दोघांमध्ये बरीच बोलाचाली झाली. तेव्हा मैडाकने मुद्दामच पडते घेऊन चैनसिंहाला २४ जून १८२४ रोजी सिहोर येथे येण्यास सांगितले. कारण सिहोरच्या छावणीत मैडाकच्या हाताखाली १००० सशस्त्र सैनिक होते. चैनसिंहाने ते मात्र मान्य केले. सिहोरला काय होणार, याची कल्पना चाणाक्ष चैनसिंहाला होतीच.

२४ जून रोजी चैनसिंहाने सिहोरला जाण्याची तयारी केली. बेरसियाला काय घडले, ते त्याने आपल्या वडिलांना सर्व कुटुंबियांसमक्ष आधीच सांगितले होते. इंग्रजांपेक्षा आपले बळ फार कमी आहे, म्हणून सौभाग्यसिंहानी आपल्या या वीर पुत्राला सांगितले की, 'तू सिहोरला जाणे, योग्य नाही.'' सौभाग्यसिंहाप्रमाणेच चैनसिंहाच्या आईने, भावाने व पत्नीनेही त्याला विरोध केला. पण या मुजोर इंग्रजांची धमेंड जिरवायचीच या विचाराने आपले दोन - अडीचशे शूर सैनिक घेऊन त्या दिवशी सिहोरला गेलाच. मि. मैडाकच्या निवासस्थानी त्याने मैडाकची भेट घेतली. मैडाकने त्याची एक तलवार बघण्यासाठी मागितली. नंतर त्याने चैनसिंहाची दुसरी तलवार ही मागितली. आपणांस निःशस्त्र करण्याचा मैडाकचा विचार आहे, हे चैनसिंहाने तात्काळ हेरले व तो म्हणाला,

''राजपूताची कमर शस्त्रांविना राहूच शकत नाही,'' तो दुसरी तलवार देत नाही, हे पाहून मैडाकचे व त्याचे भांडण सुरु झाले. मैडाकने आपल्या सैनिकांना हुकूम केला की, ''चैनसिंहाला गिरफ्तार करा.'' तोच चैनसिंहाने आपल्या तलवारीने मैडाकवर वार केला व आपली तलवारही त्याच्याकडून हिसकावून घेतली. मैडाक जीव घेऊन पळून गेला. चैनसिंह बाहेर येऊन आपल्या घोड्यावर स्वार झाला. आणि त्याने त्या पळपुट्या मैडाकचा पाठलाग सुरु केला. त्यामुळे मैडाकचे सैन्य आणि चैनसिंहाचे सैन्य एकमेकांस भिडले. तेथे भयंकर युद्ध झाले. एका बाजूला चैनसिंहाचे थोडेसे तलवारींनी लढणारे सैन्य व दुसऱ्या बाजूला बंदुकधारी इंग्रजांचे मोठे सैन्य. त्या सैन्यासमोर चैनसिंहाच्या सैन्याचा निभाव लागणे, शक्यच नव्हते. चैनसिंहाचे अनेक सैनिक मारले गेले. तरीही

चैनसिंह आणि त्याचे हिमंतखाँ व बहादुरखाँ हे दोघे अंगरक्षक व चैनसिंहाचा शेरु नावाचा कुत्रा इंग्रज सैन्याशी लढतच राहिले. चैनसिंहाच्या मानेवर मोठा घाव झाला, तो मृतवत झाला, तरीही दोही हातात तलवारी घेऊन त्याने अनेक इंग्रज सैनिकांना यमलोकात पाठविले व त्या आणि त्याच्या दोन्ही अंगरक्षकांना वीरगती प्राप्त झाली. शेरुही ठार झाला. त्या स्थानी चैनसिंहाची व शेरुची समाधी व त्याच्या अंगरक्षकांच्या कबरी आहेत. श्रद्धेने त्यांची पूजा केली जाते. लोक गीतात चैनसिंह अमर झाला. "चैनसिंह राजाकी क्या बढाई। फिरांगीयोंको भुला ती लढाई।।

◈ ◈ ◈

# ११. राणी चेन्नम्मा

कित्तूरची राणी चेन्नम्मा ही दक्षिण भारतातील झांशीची राणी लक्ष्मीबाईच समजली जाते. राणी लक्ष्मीबाई इतकाच तिचा देशाभिमान जाज्वल्य होता. या अत्यंत सुदंरीचा जन्म काकतीय वंशातील देसाई घराण्यात झाला होता. तिच्या वडिलांचे नाव धुलाप्पा देसाई व आईचे नाव पद्मावती होते. ती अपरूप सुंदरी असल्यानेच त्या अर्थाचे तिचे नाव चेन्नम्मा असे ठेवण्यात आले. बालपणापासूनच ती अत्यंत स्वाभिमानी बाणेदार होती. शिक्षणातही तिला अत्यंत रस होता. कन्नड, मराठी, उर्दू व संस्कृत या चार भाषांचे ज्ञान तिने किशोर वयात येण्या आधीच प्राप्त करून घेतले होते. त्याचप्रमाणे घोडेस्वारी व शस्त्रविद्येतही ती प्रवीण झाली होती.

कित्तूरचा राजा मल्लसर्ज एकदा शिकारीला गेला असताना त्याने चेन्नम्माला वाघाची शिकार करतांना पाहिले. तिचा पराक्रम व रूपलावण्य पाहून त्याने धुलाप्पा देसाई यांच्याकडे चेन्नम्माशी विवाह करण्याची मागणी घातली. मल्लसर्ज राजाचा विवाह आधी रुद्रव्वा हिच्याशी झालेला होता. धुल्लाप्पा देसाईंना हे स्थळ आवडले व त्यांनी चेन्नम्माचा विवाह मल्लसर्ज राजाशी करून दिला. विवाहानंतर चेन्नम्मा ही बुद्धिमान, विद्वान, चतुर व धोरणी असल्याचे राजा मल्लसर्जाच्या लक्षात आले. तो राज्यकारभाराविषयी चेन्नम्माशी विचार-विनिमय करू लागला.

पुणे-बंगलोर मार्गावर बेळगावपासून पाच मैल अंतरावर कित्तूरनगर व कित्तूरचा किल्ला आहे. राजा मल्लसर्जच्या कारकीर्दीत कित्तूर राज्य वैभवसंपन्न होते. राज्यात ७२ किल्ले व ३५८ गावे होती. कित्तूर नगरी व्यापाराचे मोठे केंद्र होती. सोने, चांदी, जड-जवाहीरांचा व्यापार तेथे चालायचा. दूर-दूरचे व्यापारी कित्तूरला यायचे-राज्यातील जमीनही अत्यंत सुपीक असल्याने शेतीचे उत्पन्नही फार मोठे होते.

राजा मलसर्ज मोठा वीर, पराक्रमी व मानी होता. प्रजेवर त्याचे अत्यंत प्रेम होते. त्याच्या राज्यात प्रजा सुखासमाधाने व आनंदाने जगत होती. तो विद्याप्रेमी व कलासक्त होता. त्याच्या दरबारी नेहमी मोठमोठे पंडित व कलावंत येत असत. त्यांचा मान तो ठेवीत असे व त्यांना भरघोस बिदागीही देत असे.

राजा मल्लसर्जचे आपल्या दोन्ही राण्यांवर प्रेम होते. तो त्यांचा मान ठेवूनच त्यांच्याशी वागायचा. रूद्रव्वा ही धार्मिक वृत्तीची, शांत स्वभावाची व समंजस होती. राणी चेन्नम्मा तिला आपली मोठी बहीणच मानायची. दोन्ही राण्यांनी एक एक पुत्राला जन्म

दिला होता. पण चेन्नम्माचा पुत्र बालपणीच वारला. रुद्रव्वाच्या पुत्राचे नाव शिवलिंग रुद्रसर्ज होते. राणी चेन्नम्माचे त्याच्यावर पुत्रवत प्रेम होते.

राजा मल्लसर्जचा प्रधान गुरुसिद्दप्पा हा मोठा विचारी, धोरणी व राजव्यवहारकुशल होता. आपल्या राज्याच्या हिताचा विचार करूनच तो राजाला सल्ला द्यायचा. त्याची सत्तरी उलटून गेली होती. तरीही तो आपल्या राज्याचा कारभार चोखपणे बजवायचा पण मल्लप्पाशेट्टी व वेंकटराय हे दोन्ही मंत्री कारस्थानी होते. मल्लप्पाशेट्टीचा डोळा राज्याच्या प्रधानपदावर होता. गुरुसिद्दप्पा प्रधानपदावरून निवृत्त कधी होतो व त्याचे प्रधानपद आपल्याला केव्हा मिळते, असा विचार त्याच्या मनात सतत घोळत असायचा पण गुरूसिद्दप्पावर कित्तूरच्या प्रजेची श्रद्धा होती. त्यामुळे हे दोघे मंत्री काहीही करु शकत नव्हते.

दुसरा बाजीराव पेशवा याने १८०२ साली वसईला इंग्रजांशी तह करून मराठा राज्य इंग्रजांकडे गहाण टाकले व तो इंग्रजांच्या अधीन होऊन कारभार करु लागला. तो अतिशय कामुक व लोभी होता. त्याने जनतेवर अत्याचार करून सरदारांना त्रासवून सोडून संपत्ती गोळा करण्याचे सत्रच सुरु केले होते. आता त्याची नजर कित्तूरच्या संपन्न राज्याकडे वळली. तो आपले सैन्य घेऊन कृष्णा नदीकाठी यडूर येथे आपली छावणी देऊन राहिला होता. त्याने राजा मल्लसर्ज याला आपल्या भेटीसाठी निरोप पाठविला. त्याप्रमाणे राजा मल्लसर्ज गुरूसिद्दप्पाच्या सल्ल्याने त्याच्या भेटीस गेला. बाजीराव त्याच्यासह पुण्यास गेला व त्याने राजा मल्लसर्ज यालाही पुण्यास नेऊन कैदेत ठेवले.

एक आठवडा होऊन गेला तरीही राजा मल्लसर्ज कित्तूरला परत आला नाही. म्हणून राणी चेन्नम्माने गुरुसिद्दप्पाला येडूरला पाठविले. गुरुसिद्दप्पा येडूरला पोचला, तेव्हा तेथे पेशव्यांची छावणी नव्हती. त्याला समजले की, बाजीराव मल्लसर्जला घेऊन पुण्यास निघून गेला आहे. गुरुसिद्दप्पा पुण्याला गेला. त्याने बाजीरावाशी बोलणी केली. पेशव्यांना दरवर्षी १ लाख ७५ हजार रूपये खंडणी देण्याच्या अटीवर बाजीरावने राजा मल्लसर्ज याला कैदेतून सोडून गुरुसिद्दप्पा याच्या हवाली केले. त्यावेळी राजा मल्लसर्ज याची प्रकृती अतिशय खंगलेली होती. तो कैदेत असताना बाजीरावाने त्याचे खूप हाल केले होते व त्याला अन्नातून विषही चारले होते. त्यामुळे राजा मल्लसर्ज अतिशय दुर्बल झाला होता. वास्तविक पाहता मल्लसर्जाने पेशव्यांविरूद्ध काहीही केलेले नव्हते. पण धनलोभापायी बाजीरावाने हे नीचकर्म केले होते.

कित्तूरला आल्यावर मल्लसर्जाची तब्येत अधिकच खालावली. त्याचे वय त्यावेळी अवघे ३४ वर्षांचे होते. आता त्याला जगण्याची आशा वाटत नव्हती. त्याने गुरुसिद्दप्पाला

बोलावून तसे सांगितले व राज्याचा भार त्याच्यावर व राणी चेन्नम्मावर सोपवून त्याने डोळे मिटले. राज्यातील प्रजा दु:खाने 'हाय हाय' करू लागली. दोन्ही राण्यांवर दु:खाचा डोंगर कोसळला. गुरुसिद्दप्पाने दोन्ही राण्यांचे सांत्वन केले. राणी चेन्नम्मा हिने रुद्रव्वाचा पुत्र शिवलिंग रूद्रसर्ज याला युवराजपदी बसवून राज्याचा कारभार आपल्या हाती घेतला. गुरुसिद्दप्पाने कठीण प्रसंग ओळखून राणी चेन्नम्माला चांगली साथ दिली. परंतु ११ सप्टेंबर १८२४ साली शिवलिंग रुद्रसर्ज याचे दुर्देवाने निधन झाले. राजवाड्यावर शोककळा पसरली.

राणी चेन्नम्माने राजाच्या संबंधातील मास्त मरडीगोंडा याच्या मुलाला दत्तक घेऊन त्याचे नाव 'गुरूलिंग मल्लसर्ज' असे ठेवले. मल्लप्पाशेट्टी याच्या दृष्ट बुद्धीला हे मानवले नाही त्याने धारवाड येथे जाऊन तेथला इंग्रज कलेक्टर थॅकरे याची भेट घेतली. व राणी चेन्नम्माने दत्तक घेणे बेकायदेशीर आहे, असे त्याला सांगितले. कारण आता त्याचा हेतू कित्तूरचे राज्य बळकावण्याचा होता. वास्तविक पाहता दत्तक समारंभाच्या वेळी कित्तूर येथील इंग्रज प्रतिनिधींनाही राणी चेन्नम्मा व गुरुसिद्दप्पा यांनी उपस्थित ठेवले नव्हते. तेव्हा त्यांनी दत्तक घेण्याबद्दल कसलाही आक्षेप घेतला नव्हता.

आता थॅकरेच्या मनात कित्तूरचे राज्य बळकावण्याचा विचार घर करून बसला. त्याला माहित होते की, कित्तूरला अलोट संपत्ती आहे. मल्लप्पा शेट्टी व वेंकटराय हे कित्तूरचे मंत्री त्याला साथ देऊ लागले. या दोघांनी थॅकरे याला सर्व प्रकारे साह्य करण्याचे वचन दिले आणि त्यांनी थॅकरे याला असेही सांगितले की, "जोपर्यंत राणी चेन्नम्मा जिवंत आहे, तो पर्यंत चित्तूरवर कब्जा करणे शक्य नाही." म्हणजे हे दोघे देशद्रोही राणी चेन्नम्माच्या जिवावरच उठले होते. हे यावरून स्पष्टपणे दिसून येते.

थॅकरे याने एका पत्रान्वये राणीला कळविले की, "तुम्ही आमच्या परवानगीशिवाय दत्तक का घेतला?, आम्ही तुमच्या या दत्तकाला परवारनगी देणार नाही. असे तुमचा मंत्री मल्लप्पाशेट्टी याने तुम्हाला सांगितले असतांनाही तुम्ही दत्तक घेतला. तो आम्हास मंजूर नाही. तुम्ही राज्याचा कारभार मल्लप्पाशेट्टीकडे सोपवावा."

राणीने थॅकरेच्या या पत्राला कवडीइतकीही किंमत दिली नाही, आता युद्ध अटळ आहे, हे तिला व गुरुसिद्दप्पाला कळून चुकले. त्यांनी युद्धाची तयारी सुरु केली. आपल्या राज्यातील जनतेला युद्धासाठी सज्ज राहण्याचे व सैन्यात तरुण वीरांनी सामील होण्याचे आवाहन केले. शेकडो तरूण वीर युद्धासाठी तयार झाले. राणीच्या पाठीशी प्रधान गुरूसिद्दप्पा तसेच रायण्णा, बालण्णा, गजवीर आणि चेन्नबसप्पा असे अनेक वीर उभे राहिले राणीने गुरूसिद्दप्पाशी विचार-विनिमय करून थॅकरेला एक पत्र देऊन कळविले

की, "कित्तूर एक स्वतंत्र्य राज्य आहे व ते स्वतंत्रच राहील. याची जाणीव ठेवावी. जर तुम्हाला युद्धच करायचे असेल, तर आम्हीही युद्धासाठी तयार आहोत. आम्ही तुमच्यासारख्यांचे गुलाम होण्यापेक्षा मरण पत्करु, पण शरण जाणार नाही."

राणीचे हे बाणेदार उत्तर वाचताच थॅकरेच्या तळपायाची आग मस्तकात शिरली आणि त्याने युद्धाची तयारी सुरू केली. आपले सैन्य घेऊन तो कित्तूरच्या किल्ल्याबाहेर येऊन ठाकला. २१ ऑक्टोबर १८२४ रोजी त्याने राणीला निरोप पाठविला की, "तुम्ही तुमच्या प्रधानांसह आम्हांस येऊन भेटावे." राणीने भेटण्यास नकार दिला व किल्ल्याचे सर्व दरवाजे बंद करुन प्रत्येक दरवाजावर कडक पहारे बसविले. प्रत्येक बुरूंजांवर तोफांची मोर्चेबांधणी केली. राणीची सगळी युद्धाची तयारी व किल्ल्याची सर्व माहिती मल्लप्पाशेट्टी व वेंकटराय यांनी थॅकरेला सांगितली. मल्लप्पा शेट्टीने राणीच्या पाकशाळेच्या प्रमुख बाईला पैशांची लालूच दाखवून आपल्याकडे वळवून घेतले आणि राणीला खिरीतून विष देण्यास सांगितले. राणीला हे आपल्या गुप्तहेरांकरवी आदल्या दिवशीच कळले होते. दुसऱ्या दिवशी राणी जेवायला बसली, तेव्हा तिने त्या बाईचे पानही आपल्यासमोर वाढायला सांगितले व माझ्याबरोबर तू ही जेव, अशी आज्ञा तिला केली. ती बाई लटलटा कापू लागली. तिचा चेहरा पांढराफटक पडला व ती जेवायला नकार देऊ लागली. तेव्हा राणीने आपल्या स्त्री सैनिकांकरवी ती खीर तिला खायला लावली. थोड्याच वेळात तिचे शरीर काळे निळे पडले. तेव्हा तिने स्पष्टपणे सांगितले की, 'मल्लप्पाशेट्टीने मला हे कृत्य करायला लावले.'

युद्ध सुरू झाले. दोन्ही बाजूंनी तोफांचा मारा सुरु झाला. बंदुकींच्या गोळीबारांनी आकाश दुमदुमुन गेले. कित्तूरचा प्रत्येक सैनिक प्राणपणाने लढत होता. पहिल्या दिवशी इंग्रजांना माघार घ्यावी लागली. इंग्रजाकडचे अनेक युद्धकैदी पकडले गेले. त्यात मल्लप्पा शेट्टी व वेंकटराय हे सुद्धा होते. त्यांना तुरूंगात डांबण्यात येऊन तुरूंगावर विश्वासू सैनिकांचा कडक पहारा बसविला. दुसऱ्या दिवशी पुन्हा युद्ध अधिक जोमाने सुरू झाले. थॅकरेला आपल्या पराभवाची कल्पना येऊ लागली. राणी स्वतः लढत होती. ती जोपर्यंत जिवंत आहे, तोपर्यंत आपला विजय होण अशक्य आहे, हे त्याने हेरले व अचूक नेम धरून राणीवर बंदुकीने गोळी झाडली. तिच्या अंगरक्षकाने ती गोळी आपल्या छातीवर घेतली व तो धाडकन खाली पडला. हे पाहताच राणीने एकाच गोळीत थॅकरेला त्याच्या घोड्यावरून उडवून लावले. थॅकरे ठार झाल्यावर इंग्रजांच्या सैन्याची दाणादाण उडाली. अनेक इंग्रज सैनिक कित्तूरच्या वीरांनी कापून काढले. अनेक वाट फुटेल तिकडे पळून गेले.

देशद्रोही मल्लप्पाशेट्टी व वेंकटराय यांना बेड्या घालून राणीने दरबारात आणविले. मंत्री मंडळाच्या सल्ल्यावरुन त्यांना हत्तींच्या पायी तुडविण्यात आले. त्यांच्याबरोबरच स्टिव्हन्सन व इलियट हे दोन इंग्रज अधिकारी पकडले होते. "युद्ध पूर्णपणे बंद कराल, तर या दोन्ही अधिकाऱ्यांन सोडून देण्यात येईल." असा निरोप राणीने इंग्रजांकडे पाठविला. या दोघांना सोडून दिले, तर युद्ध करणार नाही, असे प्रत्युत्तर छावणीतील इंग्रज अधिकाऱ्यांनी राणीकडे पाठविले. त्यावर विश्वास ठेवून राणीने त्या दोन्ही इंग्रज कैद्यांना सोडून दिले. इंग्रज ही विश्वासघातकी व शब्दाला न जागणारी जमात आहे, हे राणीला माहित नव्हते.

कित्तूरच्या पराभवाचे वृत्त समजताच दक्षिण हिंदुस्थानचा कमिशनर चॅपलिन, कॅ.जेम्सन व कॅ. स्पिलर घोडेस्वारांची मोठी सेना घेऊन ३० नोव्हेंबर १८२४ रोजी कित्तूरच्या किल्ल्यावर चालून आले. त्यांनी किल्ल्याला वेढा दिला. त्याच रात्री कित्तूरचा किल्लेदार शिवबसप्पा कमिशनरला भेटला व त्याने या युद्धात मदत करण्याचे आश्वासन चॅपलिनला दिले. तेव्हा "याच्या मोबदल्यात तुला काय हवे आहे?" असा प्रश्न चॅपलीनने त्याला केला. शिवबसप्पाने उत्त दिले, "कित्तूरचे राज्य" 'ठिक आहे', असे म्हणून चॅपलीनने त्याला निरोप दिला. शिवबसप्पाने लगेच कित्तूरच्या किल्ल्याचा नकाशा व किल्ल्याची सर्व माहिती चॅपलिनला दिली. व तो परत किल्ल्यात आला.

स्टिव्हनसन व इलियट इंग्रज छावणीत परतले. लगेच २ डिसेंबर १८२४ रोजी चॅपलीनने युद्धाची घोषणा केली. कर्नल वॉकर व कर्नल डिकन्स हे आपल्या फौजा घेऊन कित्तूरच्या राज्यात शिरले.आणि कित्तूरच्या आसपासचा प्रदेश त्यांनी आपल्या ताब्यात घेतला. कित्तूरवर इंग्रजांनी चहुबांजूनी हल्ला केला. पाहिल्या दिवशी इंग्रजांना माघार घ्यावी लागली. ४ डिसेंबरला इंग्रजांनी कित्तूरच्या तटावर तोफगोळ्यांचा मारा सातत्याने केला. तटाला भगदाड पडले. राणीकडे १८ पौंडी व ६ पौंडी गोळे फेकणाऱ्या उत्तम तोफा होत्या. पण त्या तोफांतून दारुगोळाच उडेना. गुरुसिद्दप्पांनी तपास केला. किल्लेदार शिवबसप्पाने दारुच्या कोठारातील दारुत बाजरी व शेण मिसळून ठेवले होते. तो दारुगोळा त्यामुळे निकामा झाला होता.

गुरुसिद्दप्पाने राणीला सल्ला दिला की, 'आता किल्ला सोडून जाणेच श्रेयस्कर आहे." पण राणी माघार घ्यायला तयार नव्हती. तरीही स्वामिभक्त गुरुसिद्दपाने तिला किल्ल्याबाहेर पडण्यास राजी केले. तिलाही ते पटले. त्याच रात्री गुप्तमार्गाने राणी चेनम्मा, राणी रुद्रवा, छोटा राजा, वीरव्वा आणि शिवलिंगव्वा किल्ल्याबाहेर पडले. त्यांना तात्काळ इंग्रज सैन्याने गिरप्तार केले. युद्ध बंद झाले. कित्तूरच्या किल्ल्यावर इंग्रजांचे

युनियन जॅक फडकू लागले. गुरुसिद्दप्पा, सैदनसाहेब पकडले गेले. इंग्रजांनी त्यांना कित्तूरच्या चौकात फाशी दिली.

राणी चेन्नम्माला व तिच्या राज परिवाराला बैलहोंगलच्या किल्ल्यातील तुरुंगात ठेवण्यात आले. त्या तुरुंगातून कित्तूरवर फडकणारे इंग्रजांचे युनियन जॅक पाहून तिच्या अत:करणात भयंकर वेदना उठत असत. कित्तूर परतंत्र झाल्याचे भयानक दु:ख सहन करीत ती जगायचे म्हणून जगत होती. राज परिवाराचे लोक तिच्या सोबतीला होते. हाच फक्त तिला दिलासा होता. इंग्रजांनी तोही हिरावून घेतला. राणी रुद्रव्वासह सगळ्या राज परिवाराला कुसुगलच्या तुरुंगात इंग्रजांनी पाठवून दिले. राणी आता बैलहोंगलच्या किल्ल्यात एकटीच कडक पहाऱ्यात होती. एकांतातले जिणे तिला असह्य झाले. तेव्हा तिचा वेळ शिवलिंगाची पूजा करण्यातच व्यतीत होऊ लागला. तिने आपला आहारही कमी करुन टाकला.

शेवटच्या युद्धात कित्तूरचे स्वामिभक्त वीर रायण्णा व बालण्णा हे निसटून जंगलात निघून गेले होते. त्यांनी कित्तूर जिकण्याचा चंग बांधला कित्तूर राज्यातील गावागावातून तरुण वीर गोळा करुन आपले सैन्य उभारले. सुरपूरच्या व शिवगुत्तीच्या राजांनाही रायण्णाने पटवून दिले की, "कित्तूर इंग्रजांच्या ताब्यात राहिले, तर तुमचे राज्यही इंग्रज बळकावतील. म्हणून तुम्ही आपल्या सैन्यासह या व कित्तूर स्वतंत्र करण्यास मदत करा" त्या राजांनाही ते पटले. आपल्या सैन्यासह ते रायण्णाला येऊन मिळाले. ते सैन्य चार मैलीपर्यंत पसरले पाहून इंग्रजांच्या पोटात भीतीचा गोळा उठला. त्यांनी काही फितूर मिळविले. त्या फितुरांनी रायण्णा नदीत आंघोळ करीत असतांना त्याला पकडले व इंग्रजांच्या हवाली केले. रायण्णाला धारवाड येथे नेऊन् फांशी देण्यात आले. कित्तूरवर चालून आलेल्या सैन्यातही इंग्रजांनी फूट पाडली व तिचा पराभव केला.

कित्तूरचा किल्लेदार इंग्रज कमिशनरला मोठया आशेने भेटला व त्याने ठरल्याप्रमाणे कित्तूरच्या राज्याची मागणी चॅपलीनकडे केली. तेव्हा चॅपलीन त्याला म्हणाला, "ठीक आहे. इग्लंडमध्ये देशद्रोह करणाऱ्यांना जे बक्षीस देण्यात येते, तेच तुम्हांला देऊ" लगेच शिवबसप्पाच्या हातात बेड्या ठोकण्यात आल्या. कित्तूरमध्ये गाढवावरुन त्याची धिंड इंग्रजांनी काढली व नंतर त्याला तोफेच्या तोंडी देण्यात आले.

रायण्णाला फाशी दिल्याची बातमी राणी चेन्नमाला समजली. ती ऐकताच ती मूर्छित झाली. डॉक्टरला बोलावण्यात आले. आधीच तिने अन्नत्याग केला होता. डॉक्टर म्हणाला, "आता हिच्या जगण्याची आशा नाही." थोड्याच वेळात स्वातंत्र्यासाठी तडफणारा राणीचा आत्मा अनंतात निघून गेला. कित्तूरचा प्राणच नाहीसा झाला. ही

बातमी राणी रुद्रव्वा, वीरव्वा आणि नवा दत्तकराजा गुरुलिंग मल्लसर्ज यांना कळली. तेव्हा त्यांचा आकांत काय वर्णावा? त्या तिघांनी आपल्या छातीत खंजीर खुपसून घेऊन तुरुंगात प्राणत्याग केला. संपली! राणी चेत्रम्माच्या स्वातंत्र्य लढण्याचा कहाणीची इतिश्री झाली! त्या थोर क्रांतिकारक राणीला कर्नाटकच काय पण सारा भारत कधीही विसरणार नाही.



# १२. तीरथसिंह

खासी पर्वत भारताच्या पूर्व सीमेवर दक्षिणेकडील सिल्हेट जिल्ह्यापासून थेट उत्तरेकडे शेकडो कि.मीटर पसरलेला आहे. या पर्वताच्या डोंगरदऱ्यांतून खासी या जातीच्या लोकांचा निवास आहे. खासी लोक सभ्य आणि लढाऊ वृत्तीचे आदिवासी आहेत. इंग्रजांच्या राज्याआधी या प्रदेशात एकूण तीस राज्ये खासी लोकांची होती. त्या प्रत्येक राज्याचा एक मुखिया असायचा व त्याचे एक मंत्री-मंडळ असायचे. गणराज्येच होती ती. त्या सर्व गणराज्यांमध्ये नेहमीच मैत्रीपूर्ण संबंध होते. एखाद्या महत्वाच्या विषयात परस्परांत विचार-विनिमय होई व त्यानंतरच अंतिम निर्णय घेतला जात असे. त्यामुळे सर्व खासी लोक शांततेने व सुखासमाधानाने जीवनयापन करीत असत. या प्रदेशात तोपर्यंत कोणाही विदेशी व्यक्तीचा शिरकाव झालेला नव्हता.

इंग्रज सरकारच्या ताब्यात अठराव्या शतकाच्या अखेरच्या काळात आसाम प्रांत आला. आसामच्या ईशान्य प्रदेशाचा इंग्रज सरकारचा एजंट डेव्हिड स्कॉट याने गव्हर्नर जनरलला असे सुचविले की, आसामच्या ईशान्य भागापासून खासी पर्वताच्या डोंगरदऱ्यांतून दक्षिणेकडील सिल्हेटपर्यंत एक राजमार्ग तयार केला, तर आपल्या सैन्याच्या वाहतुकीस असा मार्ग फारच उपयुक्त होईल. तसेच या खासी गणराज्यांच्या मुखियांवर नियंत्रणही ठेवणे सुकर होईल. त्यामुळे आसामच्या पूर्वसीमेवर आपले प्रभूत्व स्थापन करणे सोपे होईल. गव्हर्नर जनरलला ही योजना पसंत पडली व त्यासाठी कारवाई करण्यास डेव्हिड स्कॉटला सांगण्यात आले. तो लगेच या कामाला लागला. हा प्रस्तावित राजमार्ग चेर्रा, नुंगक्ला आणि भिल्लम या तीन गणराज्यांमधून सिल्हेटकडे जाणारा होता. स्कॉटच्या या योजनेला चेर्राचा मुखिया दीवानसिंह आणि नुंगक्लाचा मुखिया छत्रसिंह यांनी नाइलाजास्तव संमती दिली; पण भिल्लमच्या मुखियाने स्कॉटच्या प्रस्तावाला जोरदार विरोध केला.

सन १८२६ मध्ये नुंगक्लाचा मुखिया छत्रसिंह याचे निधन झाले. त्याच्या जागी तीरथसिंह हा नुंगक्लाचा मुखिया झाला. त्यानंतर दीड वर्षातच तीरथसिंहाच्या लक्षात इंग्रज सरकारचे अन्यायकारक वर्तन आले. पण टानीचा मुखिया बलरामसिंह याच्याशी त्याचा संघर्ष सुरू झाला. म्हणून तीरथसिंहाने बलरामसिंहाशी लढण्याकरिता स्कॉटकडे मदत मागितली. स्कॉटने तीरथसिंहाला मदत न देता बलरामसिंहाला दिली. आधीच इंग्रज सरकारला खंडणी द्यावी लागत असल्याने तो इंग्रज सरकारबद्दल जळत होता.

त्यात स्कॉटने मदत त्याच्या विरोधकांना दिली. त्यामुळे तो खवळला आणि त्याने इंग्रजांना खासी पर्वतातून हाकून लावण्याचा निर्धार केला.

भिल्लमचा मुखिया इंग्रजांविरूद्ध होता. तीरथसिंहाने त्याच्याशी संधान बांधले व ४ एप्रिल १८२९ रोजी भिल्लमच्या मुखियाच्या साह्याने इंग्रजांवर सर्वप्रथम आक्रमण केले. त्यांनी तहसीलदार महीधर बरुआ व अनेक कर्मचाऱ्यांना अटक केली. कॅप्टन बोडिंगफील्ड व कॅप्टन बर्लटन यांना ठार केले. इंग्रजांच्या खाजगी व सरकारी बंगल्यांना आगी लावून दिल्या. तुरूंग फोडून साऱ्या कैद्यांना मुक्त केले. या लढ्याची बातमी खासीच्या डोंगरदऱ्यांत पोचली; तेव्हा डोंगरदऱ्यांमधून प्रत्येक मार्गाने शेकडो खासी वीर तीरथसिंहाला येऊन मिळाले. तीरथसिंहाने आपल्या परिचयाच्या बऱ्याच योद्ध्यांना या लढ्यात सामील होण्यासाठी पत्रे पाठविली. पण ती इंग्रज सरकारच्या हेरांनी मधेच लांबविली. परंतू तीरथसिंहाने सुरू केलेल्या लढ्याची बातमी मैदानी प्रदेशात पोचली, त्यानंतर त्या प्रदेशातील लोकांनी इंग्रज सरकारला महसूल देणे बंद केले आणि तीरथसिंहाला येऊन मिळाले. तशात त्या प्रदेशात अशी अफवा पसरली की, गारो लोक इंग्रजांना गोहाटीतून हाकून देण्यासाठी हजारोंच्या संख्येन गारो पर्वताच्या डोंगरदऱ्यांमधून गोहाटीकडे निघाले आहेत. त्यामुळे सरकारी कर्मचारी घाबरून गेले. इंग्रज अधिकारीही चिंताग्रस्त झाले.

इंग्रज सरकारने तीरथसिंहाला नष्ट करण्यासाठी कॅप्टन लिस्टरला पाठविले. तो आपली पलटन घेऊन सिल्हेटला आला. पण तीरथसिंह त्याच्या हाती लागला नाही. तो आधीच आपल्या सैनिंकासह पसार झाला होता. तेव्हा तीरथसिंहाला पकडण्यासाठी इंग्रज सरकारने एक हजार रुपयांचे बक्षीस देण्याचे जाहीर केले. पण त्याचा काहीही उपयोग झाला नाही.

मानसिंह आणि वनमोर हे तीरथसिंहाचे महापराक्रमी साथीदार होते. त्यांच्यासह तीरथसिंह डोंगर दऱ्यात गेला व अनेक खासीवीर त्यांनी आपल्या सैन्यात दाखल करून घेतले. इंग्रज सरकारला मदत करणाऱ्या खासी मुखियांना धमक्या देणे व सर्वच रस्त्यांवर अडथळे निर्माण करणे त्यांनी वेगाने सुरू केले. त्यामुळे खासी वीरांचा उत्साह मोठ्या प्रमाणात वाढला. त्या भागातील इंग्रज सरकारच एजंट ब्रेकरॉफ्ट याने या बाबतीत नरमाईमचे धोरण सरकारने ठेवावे, असे सुचविले; पण सरकारने ती सूचना फेटाळून लावली. व टी. सी. राबर्टसन याने दडपशाही केल्याशिवाय गत्यंतर नाही असे सुचविले. त्याची सूचना मान्य करून आणखी काही सेनाधिकारी जादा सैन्यासह नुंगक्लामध्ये येऊन ठाकले.

इंग्रज सेनाधिकाऱ्यांनी राजा सिंहमानिक याच्या मार्फत तीरथसिंहाला सुचविले की, त्याने आत्मसमर्पण करावे. आत्मसमर्पण केले, तर त्याचे राज्य त्याच्याकडे सोपविले जाईलं आणि तो स्वतंत्रपणे राहू शकेल. तीरथसिंह मानसिकदृष्ट्या व शारीरिक कष्टांनी आता खचत चालला होता. ९ जून १८३२ रोजी त्याने त्याचा मित्र जीतराय याच्यामार्फत इंग्रज सेनाधिकाऱ्यांकडे निरोप पाठविला की, 'तुम्ही सुचविलेला मार्ग मला मान्य आहे' लेफ्टनंट ईगिल्स याने शपथ घेऊन तीरथसिंहाला अशी हमी दिली की, आमच्याकडून त्याच्या जीवाला धोका होणार नाही. तेव्हा तीरथसिंहाने आत्मसमर्पण केले.

२६ जानेवारी १८३३ रोजी त्याला गोहाटीला पाठविण्यात आले. इंग्रजांनी त्याचा विश्वासघात केला व त्याच्यावर गोहाटीच्या न्यायालयात फौजदारी न्यायालयात खटला दाखल केला. निकाल आधीच ठरला होता. न्यायालयाने त्याला 'विद्रोही' ठरवून तुरूंगवासाची सजा दिली. कलकत्त्याच्या कौन्सिलच्या आदेशाने तीरथसिंहाला ढाक्याला तुरूंगात डांबण्यात आले. त्या तुरूंगात एकाकी जीवन कंठीत असतांना सन १८४१ मध्ये तो स्वाभिमानी, स्वातंत्र्यप्रिय वीर निधन पावला. त्याला गोहाटीला पाठविल्यानंतर खासी पर्वताच्या डोंगरदऱ्यांत इंग्रजांचे दमन चक्र व मुक्त संचार सुरू झाला.



# १३. आत्माराम चौकेकर

इंग्रजांनी मुंबई, मद्रास व कलकत्ता येथे वखारी स्थापन करून व्यापार सुरू केला. येथल्या राजांचे आपआपसातील वैमनस्य व त्यांच्यात चालू असलेल्या लढाया, त्यातल्या त्या या राजांचा कमकुवतपणा ओळखून या परकी व्यापारी फिरंग्यांनी संधी सापडेल तेव्हा अशा राजांच्या कारभारात आपली उंटाची मान घातली व हळूहळू भारतातला बराच प्रदेश आपल्या कबजात आणला. त्यांची हाव इतकी जबरदस्त की, या देशातला कोपरान् कोपरा आपल्या ताब्यात आलाच पाहिजे. कारण या देशात असणारी मुबलक साधन संपत्ती.

मोगलांच्या नादान उत्तराधिकाऱ्यांच्या अदूरदर्शीपणामुळे, दरबारातील हेव्यादाव्यांमुळे त्यांना आपल्या कह्यात आणणे इंग्रजांना सोपे गेले. त्यानंतर पेशवाईच्या उत्तरकाळात राघोबा व त्याचा नादान पुत्र बाजीराव यांच्या परधार्जिणपणामुळे, तसेच हावरटपणामुळे पेशवाईही रसातळास चालली होती. ती संधी इंग्रजांनी साधून महाराष्ट्रही गिळंकृत करण्यास सुरूवात केली. व १८१८ साली ती बुडवून आपले राज्य या प्रदेशात सुरू केले. त्यांनी कोकणातही प्रवेश केला व १८१३ साली. मालवण येथे आपली वकिलात सुरू केली. आणि तेथून सलग सहा वर्षे सावंतवाडीच्या संस्थानिकाला आपल्या नीच कारवायांनी बेजार केले. शेवटी हतबल होऊन सावंतवाडीकरांनी इंग्रजांचे मांडलिकत्व १७ फेब्रुवारी १८१९ रोजी त्यांच्याशी एक तह करून पत्करले. इंग्रजांचा पोलिटिकल एजंट सावंतवाडी दरबारात हक्काने लक्ष घालू लागला. जेव्हां इंग्रज सैन्याची एक तुकडी शिस्तबद्ध पावले टाकीत सावंतवाडीत शिरली, तेव्हाच तेथल्या लोकांना कळून चुकले की, आपले स्वातंत्र्य आता हरपले आहे.

सन १८२३ मध्ये खेमसावंत ऊर्फ बापूसाहेब सावंतवाडीच्या गादीवर बसला. त्याच्या कारकीर्दीत तीन वेळा चांगलीच बंडाळी माजली. तेव्हा प्रत्येक वेळी त्याने आपल्या दरबारातील पोलिटिकल एजंटाकडे सैनिक साह्य मागून ती बंडाळी शमविली. इंग्रजांनाही तेच हवे होते. त्यांनी त्याचा फायदा उठविला सन १८२८ मध्ये महादेवगडचा त्याआधीचा किल्लेदार फोंडसावंत याने तो गड ताब्यात घेऊन खेम सावंता विरूद्ध बंड सुरू केले. तेव्हा राजाने इंग्रजांकडे मदत मागितली. मुंबईच्या गव्हर्नरने एक पलटण पाठविली तेव्हा फोंडसावंत आणि त्याचे सहकारी इचलकरंजी संस्थानात १८३० मध्ये पळून गेले.

राजा खेमसावंतांची पत्नी दादीबाई हिला राजाचे धोरण पसंत न पडल्याने तिनेच राजाविरूद्ध बंड पुकारले. काही लोकांना हाताशी धरून १९३२ साली राजाच्या सैन्यावर हल्ला केला. इंग्रज सैन्याचा मदतीने खेमसावंतांची आपल्या पत्नीचा तो पुंडावा मोडून काढला. आतापर्यंत दोन वेळा खेमसावंताला इंग्रज सैन्याचे साह्य घ्यावे लागले. इंग्रज पोलिटिकल एजंटाने खेमसावंताशी करारनामा केला. सावंतवाडीच्या दरबारातील दीवाण विठ्ठल सबनीस हा इंग्रजांना सामील होता. त्याची नेमणूक खेमसावंताच्या मर्जीविरूद्ध इंग्रज एजंटाने करायला लावली होती. त्या करारनाम्यात असे नमुद करण्यात आले होते की, विठ्ठल सबनीसाला दीवाणपदावरून कधीही काढले जाऊ नये. तो कायम त्या पदावर राहावा. राजाला हे मान्य नसले तरी असहायतेने ते मान्य करावे लागले. हा दीवाण गावागावातला वसूल चिठ्ठ्या न देता गोळा करू लागला. त्या एजंटाने संस्थानचे जकातीचे उत्पन्नही आपल्या इंग्रज फौजेच्या खर्चासाठी १८३८ साली आपल्याकडे घेतले. अखेरीस खेमसावंत हा राज्य करण्यास लायक नाही, त्याला आपल्या राज्यात शांतता राखता येत नाही. ही कारणे दाखवून त्या एजंटाने राजाला पदच्युत केले व सावंतवाडी सरकारचा कारभार स्वतःकडे घेतला यामुळे सावंतवाडी संस्थानातील जनतेत इंग्रजांविषयी भयंकर तिरस्कार उत्पन्न झाला. जनतेत सर्वत्र सूडाची भावना निर्माण झाली.

सावंतवाडी दरबारातील सरदार इंग्रजांचा बदला घेण्यास एकत्र आले. त्यांचा पुढारी आत्माराम चौकेकर हा होता. त्याने जनतेतून चांगले १०० लढवय्ये मिळविले व आपल्या साथीदार सरदारांसह हे सैन्य घेऊन सावंतवाडीच्या किल्ल्यावर अचानक हल्ला करून तो ताब्यात घेतला. एका कोठडीत दीवाण विठ्ठल सबनीस यास कोंडून ठेवले. आत्माराम चौकरला व त्याचे साथीदार खेमसावंतास भेटले ते पोलिटिकल एजंट स्पूनर यास समजताच त्याने आपल्या इंग्रज सैन्यासह मुशीचा दरवाजा ताब्यात घेतला. ते पाहताच आत्माराम चौकेकर आपल्या साथीदार सरदारांसह व त्या थोड्याश्या सैन्यासह आर्काच्या दिंडीमधून पळून जाऊ लागले. स्पूनरने त्या सरदारांपैकी रामसावंत तिखडेकर व काही सैनिकांना ताब्यात घेतले. बाकीचे तटावरून उड्या टाकून पळून गेले. रामसावंताला व त्याच्या १४ सैनिकांना जन्मठेपेच्या शिक्षा देऊन त्यांना अहमदाबादच्या तुरूंगात पाठवून दिले.

पोलिटिकल एजंटाच्या या कृत्याने आत्माराम चौकेकर व त्याचे साथीदार सरदार भयंकर चवताळले. चौकेकराने भोज सावंत माणगावकर यास आपल्या मदतीस घेतले व गोव्याच्या हद्दीतूनही काही योद्धे मिळविले. सावंतवाडीतून काही लोक आपल्याकडे

वळवून घेतले. आणि १९ डिसेंबर १८३८ रोजी हणमंतगडावर हल्ला करून तो गड ताब्यात घेतला. सावंतवाडीचा किल्ला ताब्यात घेण्यासाठी त्याच्या सभोवतालच्या मोक्याच्या जागा ताब्यात घेतल्या. इंग्रज एजंट स्पूनरने आपले सैन्य या बंडखोरांचा पाडाव करण्यासाठी पाठविले. चांगलीच झोंबाझोंबी झाली. तीत आत्माराम चौकेकर व त्याचे साथीदार सरदार इंग्रज सैन्याच्या हाती लागले. भोजसावंत गोळीबारात ठार झाला. आत्माराम चौकेकर व त्याच्या साथीदार सरदारांना जन्मठेपेच्या व अन्य सैनिकांना लहान मोठ्या कैदेच्या शिक्षा देऊन त्यांना तुरूंगात डांबले. सावंतवाडीकरांचा हा पहिला स्वातंत्र्याचा प्रयत्न अशा रीतीने असफल झाला. तरी त्यांचा पुढारी आत्माराम चौकेकर याचे नाव सावंतवाडीत अमर झाले.



# १४. फोंड सावंत

सावंतवाडी करांना सन १८१९ मध्ये इंग्रजांचे मांडलिकत्व एका तहाअन्वये मान्य केले होते. तेव्हापासून सावंतवाडी संस्थानच्या दरबारात इंग्रज पोलिटिकल एजंटाच्या नजरेसमोर कामकाज चालू आहे. सन १८२३ मध्ये खेमसावंत सावंतवाडीच्या गादीवर आला. त्याला इंग्रज एजंटाच्या मर्जीनुसारच राज्यकारभार करणे भाग होते. त्याच्या काळात जी बंडे झाली ती मोडण्यासाठी त्याला इंग्रज सैन्याचे साह्य घ्यावे लागले. पहिले बंड १८२८ सालातले होते महादेवगडचा पूर्वीचा किल्लेदार फोंड सावंत ताबुकवाडीवर याने तो किल्ला काही सैन्य गोळा करुन ताब्यात घेतला. राजाने मुंबई येथील गव्हर्नरलकडे सैनिक साह्याची मागणी केली. मुंबईहून एक इंग्रज पलटण सावंत वाडीला आली. ते पाहून फोंड सावंत आपल्या साक्षीदारांसह शेजारच्या इचलकरंजी संस्थानात पळून गेला. ते साल १८३० चे होते.

फोंडसावंताला सात मुलगे होते व ते सारे तरुण होते. आपल्या मुलांसह व साथीदारांसह तो सन १८३८ पासून सावंतवाडीत धुडगूस घालू लागला. कारण इंग्रज पोलिटिकल एजंटाने खेम सावंतला राज्यकारभार करण्यास अपात्र ठरवून सावंतवाडी संस्थानचा कारभार आपल्याकडे घेतला होता. राजा खेम सावंत याला पदच्युत करुन याची चीड सावंतवाडीतील सगळ्या जनतेत पसरली होती. फोंडसावंत तर सावंतवाडी संस्थानचा जुना सरदार होता. त्याला इंग्रजांचे राज्य कारभारातले वर्चस्व कसे सहन होणार?

कोल्हापूर संस्थानातील इंग्रज रेसिडेंटने त्या संस्थानातील सगळ्या किल्ल्यातल्या गडकऱ्यांचे हक्क काढून घेतले. त्यांचे किल्लेही गेले व त्या किल्लेदारी निमित्त त्यांना संस्थानकडून परंपरागत मिळालेल्या जमिनीही गेल्या. त्यांनी इंग्रजांविरुद्ध बंड केले ते इंग्रज सैन्याने मोडून काढले. त्यांच्याशी फोंडसावंताने संपर्क साधला व ते सारे बेळगावच्या नैर्ऋत्येस ३५ मैलावर असलेल्या मनोहर गडावर गेले. तो किल्ला त्यांचा तळच झाला. ते हेरांकरवी इंग्रज एजंटाला समजले. त्याने मेजर बेन बो याला आपले सैन्य घेऊन हनुमंत घाटाच्या पायथ्याशी नेरुर येथे छावणी टाकून मनोहर गडावरील हालचालींवर नजर ठेवण्यासाठी पाठविले. १० ऑक्टोबर १८४४ रोजी फोंडसावंत व त्याचे साक्षीदार आपल्या सैन्यासह किल्ल्याखाली उतरले. गोठोस गावातील इंग्रजांचे दलाल कुलकर्णी व गडावरील सबनीस यांच्या घरांवर धाड घालून त्यांनी त्याच्याजवळील सगळी कागदपत्रे जाळून टाकली तसेच सावरकारांची व जमीनदारांची घरे लुटली. नंतर

ते नेरुर गावात शिरले. त्या गावातील इंग्रजांच्या दलालांना म्हणजे सावकार व धनिकांना लुटले. दुकानेही लुटली. गावात लुटालूट व जाळपोळ केली. सर्वत्र अराजकता माजली या बंडखोरांना आळा घालण्यासाठी बेनबोच्या सैन्याला फार प्रयास पडले. बंडखोरांचा आत्मविश्वास वाढला. सावंतवाडीच्या गादीचे वारस अण्णासाहेब सावंत यांना आपल्याकडे वळवून घेतले. ते फक्त १६ वर्षे वयाचे होते. तेही मनाहेरगडावर येऊन फोंडसावंताला मिळाले. १६ नोव्हेंबर १८४४ रोजी बंड वाल्यांनी त्यांच्या सन्मानार्थ तोफांची सलामी दिली. त्यांना आपला राजा मानले. आता बंडवाले शिरजोर बनले. त्यांनी सावंतवाडी संस्थानातील काही गावांचा वसूलही गोळा केला. गावागावातून अराजक माजले. सभोवतालच्या इंग्रजांच्या ताब्यातील गावांतही त्यांनी धुमाकूळ घातला. सावंतवाडी संस्थानात बळी तो कानपिळी अशी अवस्था निर्माण झाली. डोंगराळ व जंगलांनी व्यापलेला तो भाग असल्याने तो बंडवाल्यांना हल्ले करुन लपण्यास सहज जागा मिळत होत्या. त्यांच्यापैकी सुभाना निकमने मालवण व सभोवतालचा मुलुख आपल्या ताब्यात घेतला. बंडवाल्यांनी इंग्रज सैन्याच्या प्रतिकाराची भक्कम तयारी केली.

इंग्रज सरकारने या प्रदेशात लष्करी कायदा १४ जानेवारी १८४५ रोजी लागू केला. बंडाचा जास्त प्रसार होऊ नये म्हणून वेगवेगळे कडक हुकूम सोडले. प्रत्येक गावातील पाटील, कुलकर्णी यांनी गावातील सर्व लोकांची हत्यारे जमा करावी. आवश्यक तेवढे आसपासचे जंगल तोडावे. आपल्या गावातील जी व्यक्ती गावात नसेल, तिचा तपास ठेवावा. असे ते हुकूम होते. मद्रास, बेळगाव, वेंगुर्ला येथून सैन्य मागविले. सावंतवाडी संस्थानचे तीन विभाग करुन प्रत्येक विभागात सैनिकी तुकड्या मोक्याच्या ठिकाणी ठेवल्या.

इंग्रज सैन्याच्या एका पलटणीने रांगडा किल्ल्यावर चढाई करुन बंडवाल्यांना तेथेच गुंतवून ठेवले. त्या काळात कॅप्टन ऑट्रमने मनोहर गडावर ताबा मिळविला. बंडखोरांना पिटाळून लावले. त्यातले काही गोवा हद्दीत निघून गेले.

इंग्रज सरकारने फोंडसावंत व त्याच्या मुलांना पकडून देणाऱ्यास अनुक्रमे १० हजार व ३ हजार रुपयांची बक्षिसे जाहीर केली. पण त्यांना कोणीही पकडून देऊ शकले नाही. तसेच सर्वसाधारण जनतेकरिता माफीचा जाहीरनामा काढला. बंडवाल्यांना सामील झालेल्या लोकांपैकी जे पूर्ववत आपापले धंदे सुरु करतील, त्यांना इंग्रज सरकारने माफी जाहीर केली. सावंतवाडी संस्थानचे वारसदार अण्णासाहेब सावंत यांचा संस्थानावरील हक्क काढून घेतला. मात्र त्यांना सावंतवाडीत येऊन राहण्याची परवानगी दिली. त्यांना दरमहे १०० रु. ची नेमणूक दिली. दि. २१ ऑगस्ट १८४५ रोजी ते

सावंतवाडीस येऊन राहिले. तसेच फोंड सावंतच्या धाकट्या मुलांनाही माफी दिली. जर का कठोर उपाय योजले असते, तर जनतेतील असंतोषाचा भडका उडाला असता व परिस्थिती काबूत राहिली नसती व जनतेत इंग्रज सरकारबद्दल विश्वास राहिला नसता. हे सीमित प्रदेशातले बंड ब्रिटिश हद्दीतही वेगाने पसरले असते. हे धूर्त इंग्रज जाणून होते. म्हणूनच त्यांनी वरीलप्रमाणे माफीचा जाहीरनामा काढला. फोंडसावंतानी मात्र आपल्या संस्थानच्या स्वातंत्र्यासाठी इंग्रजांच्या तोंडचे पाणी पळविले होते. हे निर्विवाद होय.

# १५. उमाजी नाईक

महाराष्ट्रात रामोशी ही जमात पूर्वापारपासून कायमची रहिवासी होती. सह्याद्रीची डोंगरदऱ्यांत एकोणवीसाव्या शतकात त्यांची लोकसंख्या १७ ते १८ हजार होती. रामोशी लोक स्वतःला 'रामवंशी' म्हणायचे. लोक त्यांना 'रानवसी' म्हणजे रानावनात राहणारे असेही म्हणत असत. ही जमात अतिशय बलदंड, धाडसी, शूर, विश्वासू, प्रसंगी प्राणांची पर्वा न करता लढवणारी म्हणून प्रसिद्ध होती. छत्र. शिवरायांनी या धाडसी व पराक्रमी लोकांची नेमणूक गडकिल्ल्यांचे व गडकिल्ल्यांच्या घेऱ्यांचे रखवालदार म्हणून केलेली होती. त्याबद्दल छत्रपतींनी त्यांना वतने (म्हणजे काही चाहूर जमीन - एक चाहूर म्हणजे १५ बिघे) त्यांच्या योग्यतेनुसार वंशपरंपरागत दिलेली होती. त्यांना 'नाईक' ही पदवी छत्रपतींनीच दिली होती. त्यांना त्या वतनांचे दस्तऐवज वा ताम्रपटही दिलेले होते. रखवालदाराबरोबर ते आपली शेती ही करायचे शेळ्यामेंढ्या पाळायचे. दुष्काळ पडला की त्यांचे खाण्यापिण्याचे हाल होत असत. म्हणून हे लोक दरोडेखोरीही करायचे, दरोडे घालण्यासाठी त्यांना जहागीरदार, वतनदार, जमीनदार आदि धनिकांच्या पाठिंबा असायचा. दरोडेखोरांना असा पाठिंबा स्वातंत्र्यपूर्व काळापर्यंत या धनाढ्य वर्गाकडून मिळत असे. दरोड्यात मिळालेल्या मालापैकी मोठा वाटा हे धनाढ्य लोक घेत असत व त्यातला थोडासा भाग दरोडेखोरांना देत असत. या दरोडेखोरीच्या उद्योगामुळे रामोशी म्हणजे दरोडे खोर असाच अर्थ जनता समजत असे. या रामोशांप्रमाणे कोळी लोकही गड किल्ल्यांची राखणदारी व दरोडेखोरी करीत असत.

पेशवाईच्या अखेरच्या काळात मोठमोठे सरदार, जहागीरदारही लुटालूट करायचे. पण या बड्या लोकांना दरोडेखोर म्हणायची हिंमत कोण करणार? त्या काळात सर्वत्र अंधाधुंदी माजली होती.

उमाजी हा रामोशी होता. त्याचा जन्म पुण्यापासून सुमारे २५ कि.मी. वर आणि पुरंदर गडापासून ईशान्येस सुमारे तीनसाडेतीन कि.मी. अंतरावरील भिवडी या गावी इ.स. १७९१ मध्ये झाला. त्याच्या वडिलांचे नाव दादजी खोमणे. दादजी महापराक्रमी होता. पुरंदर किल्ल्याच्या रखवालदारीचे त्याचे वतन पुरंदर किल्ल्याच्या परिसरातच होते. त्याने आपल्या आयुष्यात ११० दरोडे घातले होते. वार्धक्याने तो इ.स. १८०२ मध्ये वारला त्यावेळी उमाजीचे वय अवघे ११ वर्षांचे होते. तो वर्णाने गोरा-लालसर, मध्यम उंचीचा होता. अंगाने सुदृढ, मोठे डोळे व चेहरा नेहमी प्रसन्न व सौम्य असा तो होता. दादजीची वतनदारी वंशपरंपरेने त्याच्याकडे आली होती.

सन १८०२ मध्ये वसईचा तह इंग्रजांशी करुन दुसरा बाजीराव त्यांच्या हातातले बाहुले बनला व त्याने इंग्रजांच्या सल्ल्यावरुन रामोशांची वतने काढून घेतली. उमाजी नाईकादि काही रामोशांनी बाजीरावाला विरोध केल्यामुळे त्यांना महाराष्ट्रात राहणे असुरक्षित वाटू लागले व उमाजीसह ते सन १८१४ मध्ये निजाम हद्दीत परांड्याला गेले. परांड्याच्या मुसलमान किल्लेदाराला दोन बायका होत्या. धाकट्या बायकोने आपल्या सवतीच्या (मोठीचा) खून करण्यास उमाजीला व त्याच्या साथीदारांना सांगितले. तेव्हा त्यांनी तिला स्पष्टपणे सांगितले की, "खून करण्याची कामे आम्ही करीत नाही." तेव्हा तिने संतापून आपल्या शिपायांकरवी सर्व रामोशांना तुरुंगात टाकले. निजामहद्दीत ही राहणे धोक्याचे आहे, असा विचार करुन त्यांनी तुरुंगातून आपली सुटका करुन घेतली व रातोरात निजामाची हद्द ओलांडून ते सारे पुण्याकडे आपपल्या मूळ गावी आले. ते साल १८१६ होते.

वतनदारी गेली. शेतीही गेली. केवळ शेळ्या मेंढ्या पाळून जगणे अशक्य होते. म्हणून पुन्हा एकदा बाजीरावाकडे वतने मागण्यासाठी उमाजीसह सगळे रामोशी गेले. त्याच्या खूप विनवण्या केल्या. पण बाजीरावाने वतने परत दिली नाहीत. उमाजी अत्यंत निराश झाला. दारुच्या आहारी गेला. एकदा तो व त्याचा पुतण्या दारुच्या नशेत एकमेकांशी खूप भांडले. पुतण्याने उमाजीच्या डोक्यात धोंडा घातला. उमाजीला मोठी जखम झाली व भळभळा रक्त वाहू लागले. तेव्हा दारुमुळे आपल्या हातून चुका होतात, हे जाणून उमाजीने दारु कायमची सोडून दिली. यावरुन हे दिसून येते की, उमाजी पक्क्या निर्धाराचा होता.

सन १८१८ मध्ये इंग्रजांनी पेशवाई बुडविली. दुसऱ्या बाजीरावाला दरसाल ८ लाख रुपये पेन्शन देऊन उत्तरेत गंगाकिनारी ब्रह्मवर्तास नेऊन ठेवले व सगळा कारभार इंग्रजांनी आपल्या हातात घेतला. त्यावेळी इंग्रजांनी एक जाहीरनामा काढला. त्यात त्यांनी नमूद केले होते की, "ज्याच्या त्याच्या जहागिऱ्या, वतने ज्याला त्याला मिळतील. लहान मोठ्या वतनदारांना व जहागीरदारांना त्यांच्या जहागिऱ्या व वतने मिळाली; पण या गरीब रामोशांना त्याची वतने परत दिली नाहीत. तेव्हा पुन्हा उमाजीसह सर्व रामोशांनी इंग्रज सरकारने आपल्या वतनांची मागणी केली. पण इंग्रज सरकारनेही त्यांना दाद दिली नाही. हे लक्षात घेऊन उमाजीने इंग्रज सरकार विरुद्ध उठाव करायचे ठरविले.

उमाजी उत्तम संघटक होता. बरेचसे रामोशी त्याला आपला नेते मानू लागले. उमाजी आता भर जवानीत होता. शरीराने अतिशय बळकट, भरदार छाती, पिळदार दंड, अंगात अमाप ताकद, गोरा लालसर वर्ण, सदा प्रसन्न मुख, अत्यंत धाडसी व शूर

असा हा उमाजी सगळ्या रामोशांना हवाहवासा वाटू लागला. ते त्याच्या पाठीशी एकदिलाने उभे राहिले. त्याने गोर गरीबांना लुटणारे सावकार, वतनदार व जमीनदार यांना त्याने आपले लक्ष बनविले. हे सारे इंग्रजांच्या कृपाछत्राखाली ऐषारामात जगत होते. उमाजी एक पत्नीव्रती होता. त्याने आपल्या साथीदारांना बजावले, दरोडा घालतांना कोणाही बाईच्या वा मुलाच्या अंगाला हात लावायचा नाही. सगळ्या स्त्रिया आपल्या आयाबहिणी समान आहेत. आणि त्याने आपल्या साथीदारांसह मोठमोठे दरोडे घालण्यास सुरुवात केली. एक वर्षी तर त्याने कहरच केला. त्याने वीस बावीस मोठमोठे दरोडे घातले. सातआठ वेळा रस्ते लुटले. दरोड्यात व लुटीत मिळालेली रक्कम त्याने आपल्या साथीदारांना वाटून टाकली. काही रक्कम गोरगरीबांना दान दिली. जेजुरीचा खंडोबा व कऱ्हेपठार हे तर त्यांचे कुलदैवतच होते. त्या देवस्थानांना व त्यांच्या पुजाऱ्यांना दाने दिली. त्यामुळे जनतेत त्याची लोकप्रियता वाढली. उमाजीचा पाठलाग इंग्रज सरकारचे सेनाधिकारी करु लागले. त्याच्यावर हेर सोडले पण कोठेच त्याचा पत्ता लागत नव्हता. लोक माहीत असूनही त्याचा ठावठिकाणा सांगत नव्हते.

मुंबईच्या चानजी मातिया या पेढीवाल्याचा माल उमाजीने पनवेल गावाजवळील खालापूर जवळ धाड घालून पळविला. तेव्हा उमाजी इंग्रजांच्या हाती लागला. त्याला फटक्यांची व एक वर्ष सक्तमजुरीची शिक्षा झाली. तुरुंगातून सुटल्यावर एका दरोड्यात तो पुन्हा पकडला गेला. त्याला तुरुंगवासाची शिक्षा झाली. तुरुंगातील रिकामा वेळ चांगल्या कामासाठी घालविण्यासाठी त्याने तुरुंगाधिकाऱ्याजवळ लिहायला - वाचायला शिकण्याची इच्छा व्यक्त केली. एक खालच्या जातीतला दरोडेखोर लिहिणे - वाचणे शिकू पाहतो, हे ऐकून इंग्रज अधिकारी मार्किंटाश तर चकितच झाला. त्याने उमाजीच्या शिकण्याची व्यवस्था केली. तो काही महिन्यातच लिहायला वाचायला शिकला.

सासवडचा सत्तू रामोशी आपल्या टोळीसह पुण्याच्या आसपास दरोडे घालीत असे. तुरुंगातून उमाजी आपल्या टोळीसह त्याला जाऊन मिळाला. आता सत्तूच्या नेतृत्वाखाली दरोडे घालण्याचे काम सुरु झाले.

सन १८२१ साली एका दरोड्यात सत्तकडून चुकून एका महाराणीचा खून झाला. इंग्रज शिपायांनी त्याला पकडून पुण्याकडे चालविले. हे समजताच उमाजीने आपल्या टोळीसह दिवे घाटात त्या शिपायांकडून सत्तूला सोडवून आणले. सन १८२३ मध्ये जेजुरीच्या यात्रेत उमाजीच्या अमृता या भावाला चोरी करतांना तेथल्या पोलिस पाटलाने पकडले. अण्णाजी नाईक हा तो पाटील होता. अण्णांजी नाईक धिप्पाड व बलदंड होता. उमाजीने आपल्या भावास सोडून द्यावे, म्हणून अण्णाजीच्या खूप विनवण्या केल्या. पण

अण्णाजी अमृताला सोडतच नव्हता. तेव्हा उमाजीने आपली तलवार उपसून भर यात्रेत अण्णाजी पाटलाची खांडोळी केली व अमृतासह तो पसार झाला. तेव्हापासून लोक उमाजीला चळचळा कापू लागले.

उमाजीने इंग्रजांच्या पोलिस खात्यातील एक अधिकारी राजे महंमद सुभेदार याला गुपचूप आपल्याकडे वळवून घेतले होते. म्हणूनच उमाजीने पुण्यात व आसपासच्या गावात सात-आठ दरोडे घातले. पाच-सहा ठिकाणी रस्ते लुटले. पण तो इंग्रजांच्या हाती सापडू शकला नाही. आता सत्तू आणि उमाजी यांनी मोठे धाडस करायचे ठरविले. इंग्रज सरकारचा खजिना भांबुर्ड्याला (सध्याचे शिवाजीनगर) एका भक्कम वाड्यात होता. २४ फेब्रुवारी १८२४ च्या रात्री त्यांनी त्या वाड्यावर धाड घालून पहाऱ्यांच्या शिपायांना जायबंदी केले व तो खजिना लुटला. त्या लुटीत सहा हजार दोनशे रुपये मिळाले. ती रक्कम सर्वांनी आपसात वाटून घेतली. उमाजी व त्याचा भाऊ कृष्णाजी यांनी आपल्या वाट्यातील बरीच रक्कम जेजुरीच्या खंडोबा देवस्थानला दान म्हणून दिली. या दरोड्यामुळे इंग्रज सरकार चांगलेच हबकून गेले. त्या वाड्यापासून थोड्याच अंतरावर इंग्रज कमिशनरचा बंगला होता, हे विशेष.

दुर्दैव असे की, ऑगस्ट १८२४ मध्ये सत्तू कॉलऱ्याच्या साथीत मरण पावला. नंतर त्याच्या व उमाजीच्या टोळ्यांचे नेतृत्व उमाजीकडे आले. तेव्हापासून तो आत्मविश्वासाने वागू लागला. मिरज-पुणे रस्त्यावर त्याने सरदार पटवर्धनांचे लग्नाचे वऱ्हाड अडविले व त्यांचेकडून दोन हजार रुपये मिळविले. फलटणच्या निंबाळकरांचा खजिना पुण्याकडे जात असतांना उमाजीने तो लुटला. या लुटीत त्याला आठ हजार रुपये मिळाले. पटवर्धन-निंबाळकरांसारख्या सरदारांनीही उमाजी लुटायला कचरत नाही, हे पाहून इंग्रज सरकार हबकून गेले. तेव्हा इंग्रज सरकारने उमाजी व त्याच्या साथीदारांना पकडून देणारांस बक्षीसे देण्याचा जाहीरनामा काढला.

सन १८२७ च्या उत्तरार्धात उमाजीचा दृष्टिकोन बदलला. त्यानुसार त्याने जाहीरनामा काढला, तो असा- "राज्य आपले आहे. इंग्रज उपरे व लुटारू आहेत. म्हणून प्रत्येक गावच्या पाटील-कुलकर्ण्यांनी सारा वसुलीचा भरणा आमच्याकडेच करावा. त्यांनी भरणा न केल्यास त्याचे परिणाम वाईट होतील. अशा पाटील-कुलकर्ण्यांना शिक्षा दिली जाईल व त्यांचे वाडे जाळले जातील. आमची बातमी इंग्रजांना देणारास अशीच जबर शिक्षा देण्यात येईल."- उमाजी राजे-मुक्काम डोंगर.

इंग्रज सरकारला बातमी देणाऱ्या जागोजी पाटलांचा वाडा उमाजीने जाळून बेचिराख केल्याने गावोगावचे पाटील-कुलकर्णी चांगलेच हबकून गेले व उमाजीच्या

लोकांना सारावसुलीचा भरणा देऊ लागले.- इंग्रज सरकारसमोर उमाजीने चांगलेच आव्हान उभे केले होते. त्यामुळे सरकार चवताळले. उमाजीला पकडून देणारास १२०० रुपयांचे बक्षीस सरकारने जाहीर केले. पण उमाजीचा थांगपत्ता सरकारला लागत नव्हता. आता बहुतेक पाटील कुलकर्णी उमाजीला गुप्तपणे साह्य करू लागले, लोकही त्याच्याकडे आशेने बघू लागले. साऱ्या जनतेचा तो कौतुकाचा विषय बनला होता. तो गरीबांचा वाली होता.

आता काट्यानेच काटा काढला पाहिजे या विचाराने सरकारने एकापाठोपाठ शिवनाक महार, बळवंत कोळी व राणोजी रामोशी यांना उमाजीला पकडण्याचा मोहिमेवर लावले. पण उमाजी त्यांना पुरून उरला. त्याने त्यांना चांगलीच अद्दल घडविली.

सरकारने उमाजीचा भाऊ अमृता व विठोबा ब्राम्हण यांना पकडून कैदेत टाकले. तेव्हा उमाजीने रॉबर्टसन या इंग्रज अधिकाऱ्याला दि. ३०।११।१८२७ रोजी राजाच्या थाटात पत्र लिहिले, ते असे-

''अमृता रामोशी व विठोबा ब्राम्हण यांना सोडून द्यावे व व्यवहाराची बोलणी करून संघर्ष मिटवावा. हा व्यवहार म्हणजे सर्व रामोशांची वतने ज्याची त्याला परत द्यावी. त्या वतनांत रामोशांनी पूर्ण मुखत्यारीने कारभार पाहावा. त्या वतनांचे दस्तऐवज व ताम्रपट आमचेकडे आहेत. कोणालाही धक्का लागू नये. तुम्ही जर हे मानले नाही, तर सातपुड्यापासून दक्षिण कोकणापर्यंत अशी हजारो बंडे उभी राहतील.'' - उमाजी राजे मुक्काम डोंगर

उमाजीच्या या पत्राने चिडून जाऊन इंग्रज सरकारने नवा जाहीरनामा काढला.-

''उमाजी, भुजाजी, पांडूजी येसाजी या बंडाच्या नेत्यांना पकडून देणाऱ्यांस प्रत्येकी पाच पाच हजार रुपयांचे बक्षीस दिले जाईल.'' त्या बरोबरच कॅप्टन डेव्हिस या सेनाधिकाऱ्याची नेमणूक पुरेशा शिबंदीसह उमाजीला पकडण्याच्या मोहिमेवर सरकारने केली- इंग्रजांच्या पाच माणसांना ठार करून डिसेंबर १८२७ त्यांची मुंडकी एका खरमरीत पत्रांसह उमाजीने सासवडला सरकारी अधिकाऱ्यांकडे पाठविली.'' आमची वतने आम्हांस परत द्या. नाहीतर पुढच्या परिणामांना तयार राहा.'' असा दणकेबाज इशारा उमाजीने त्या पत्रात दिला होता.

सन १८२७-२८ मध्ये उमाजीने कोल्हापूरचे छत्रपती व कुलाब्याचे आंग्रे वगैरे संस्थानिकांशीही संधान बांधले होते. तो स्वत:ला राजा म्हणवीत होता. पांगरीजवळच्या डोंगराच्या गुहेत एका दगडावर राजासारखा बसायचा आपला दरबार थाटात भरवायचा.

लोक त्याच्या भेटीला यायचे. त्याला नजराणे, देणग्या द्यायचे. लोकांना तो दाने द्यायचा. दि. १५/१२/१८२७ च्या एक पत्रात एका इंग्रज अधिकाऱ्याने लिहिले आहे- ''उमाजी व त्याचे लोक आता दरोडेखोर राहिले नव्हते. आता ते क्रांतिकारक बनले होते.''

उमाजीजवळ आता एक हजार लढवय्ये होते. त्यांत रामोशी, कोळी, कुणबी, परदेशी, मुसलमान, कैकाडी, मांग, मराठे, हेटकरी असे अनेक जातीचे लोक होते. त्यांना आता तो दरमहा वेतन देऊ लागला. त्यांच्या लहान लहान टोळ्या बनवून त्यांना छापामारी करण्याचे कसब त्याने शिकविले होते. देशावर सातारा, वाई, भोर पासून कोल्हापूर पर्यंत व कोकणातही त्या टोळ्यांनी धुमश्चक्री उडवून दिली.

इंग्रज सरकारने आता कॅन्डेव्हीस व कॅ-स्पिलर यांची नेमणूक उमाजीला व त्याच्या साथीदारांना पकडण्यासाठी केली. त्यांच्यासोबत घोडदळही दिले. त्यांनी पुरंदरच्या पंचक्रोशीत १५२ चौक्या उभारल्या. पाटलांचे आतून साह्य असल्यामुळे उमाजीचे लोक त्या चौक्यांच्या जवळपासच्या गांवात धाडी घालून निर्धास्तपणे पसार होत होते. या दोन्ही अधिकाऱ्यांना उमाजीने जेरीस आणले. परंतु एवढ्या लोकांचे वेतन व खर्च सांभाळणे आता जड जाऊ लागले. पैसा कमी पडू लागला. तेव्हा त्याने नवाच डाव टाकला. भुजाजीमार्फत त्याने इंग्रज अधिकाऱ्यांशी संधान बांधले व समझोता केला. त्यात सर्व गुन्ह्यांची माफी त्याला देण्यात आली व त्यांना सरकारने जुलै १८२९ मध्ये नोकरीवर घेतले. आता उमाजीतर्फेच राज्यात शांतता प्रस्थापित करण्याचे सरकारने ठरविले. उमाजीला साकुर्डीजवळ १२० बिघे जमीन इनाम दिली. त्याचा तळ पुरंदरला ठेवला व त्याच्या हाताखाली ४० माणसे त्याचीच ठेवली. त्यांनाही पगार सुरू केले. इंग्रजांच्या नोकरीत राहून मनुष्यबळ वाढवायचे व दरोडेखोरी चालूच ठेवायची. बखळ पैसा साचवायचा-दरोड्यांबद्दल कलेक्टरने विचारले, 'तर तपास चालू आहे.' असे मोघम उत्तर देत राहायचे. असा उमाजीचा बेत होता. जुलै १८२८ पासून उलट दरोड्यांचे प्रमाण वाढू लागले. सरकार बुचकाळ्यात पडले.

कंपनी सरकारच्या महाराष्ट्रातील राज्याचा हा प्रारंभीचा काळ होता. या प्रारंभीच्या काळातच जनतेत असुरक्षिततेची भावना पसरली, तर राज्याचे स्थैर्य धोक्यात येणार होते. रामोशांचा पुंडावा फारच माजला, तर त्याला जनतेची उघडउघड साथ मिळून राज्य हातातून जाण्याची भीती इंग्रजांना वाटत होती.- उमाजीला ठार मारले तर राज्यात मोठे बंड उभे राहण्याचा धोका होता-कारण उमाजीच हा जनतेत आता लोकप्रिय झाला होता.

उमाजी जाणून होता की, सरकारची नोकरी हा तलवारीच्या धारेवरचा खेळ आहे. वर्षभर तो ती नोकरी सांभाळीत होता. पण सरकारला त्याच्या या नोकरीमुळ आपले

साध्य साधले जाईल असे आता वाटत नव्हते. म्हणून त्याचा पगार चालू ठेवून सरकारने त्याला पुण्यात नजरकैदेत ठेवले. पण रानच्या वाघाला हे मिळमिळीत जिणे कसे मानवणार दि. १६ डिसेंबर १८३० रोजी उमाजी पुण्यातून पसार झाला व त्याने आपल्या साथीदारांच्या गाठी घेऊन तो कऱ्हेपठारावर प्रकट झाला. पुन्हा साऱ्या मुलुखात त्याची पुंडाई सुरू झाली. आता सरकारने ॲलेक्झांडर मकिंटाश या शूर व मुत्सद्दी अधिकाऱ्याची नेमणूक ही पुंडाई मोडण्यासाठी केली. पण उमाजी मोठा चतुर. तो कसला त्याच्या हाती लागतो! कारण त्याचे हेरखाते जबरदस्त होते. सरकारच्या इत्थंभूत बातम्या त्याला आधीच समजायच्या. त्याचे व्यवहारिक शहाणपण, मुत्सदेगिरी, माणुसकी एखाद्या मुत्सदी सेना नायकाला साजेशीच होती.

कलेक्टर जिब्रान याने २६ जानेवारी १९३१ रोजी उमाजीसह सर्व रामोशांना शरण येण्याचा जाहीरनामा काढला. पण उमाजीने त्याला भीक घातली नाही व आपले उद्योग चालूच ठेवले. नंतर लगेच जिब्राननने दुसरा जाहीरनामा काढला. त्यात नमूद केले की, "उमाजी, भुजाजी, येसाजी कृष्णाजी यांना पकडून देणारांस प्रत्येकी ५००० रूपये व दोनशे बिघे जमीन इनाम दिली जाईल. त्यांची बातमी देणारांस याच्या निम्मे इनाम दिले जाईल." पण या जाहीरनाम्याचाही काहीच उपयोग झाला नाही. तेव्हा मकिंटाशही थक्क झाला. साऱ्या जनतेवर उमाजीची किती मोहिनी पडली होती, हे त्याला प्रत्यक्ष दिसून आले.

दि. १६ फेब्रुवारी १८३१ रोजी उमाजीने आपला निर्वाणीचा जाहीरनामा काढून तो सर्वत्र प्रसारित केला. तो असा-

"युरोपियन लोक कोठेही दिसले, तर त्यांना ठार करावे. अशी कामगिरी करणाऱ्यास नव्या सरकारकडून जहागिरी, इनाम व रोख रकम दिली जाईल.

ज्या ज्या लोकांच्या जहागिऱ्या, वतने, तनखे इंग्रज सरकारने जप्त केलेले असतील, ती ती त्यांना नव्या सरकारला पाठिंबा दिल्यास परत दिली जातील.

इंग्रज सरकारच्या घोडदलातील व पायदळातील शिपायांनी ती नोकरी झुगारून देऊन इंग्रज अधिकाऱ्यांना पकडावे व ठार करावे. ही सूचना मानली नाही, तर नव्या सरकारने दिलेली शिक्षा भोगण्यास तयार राहावे.

इंग्रजांच्या मालमत्ता लुटाव्या. त्यांची घरे जाळून टाकावी. इंग्रज सरकारचे सर्व खजिने ही लुटावे. त्याचा हिशेब नवे सरकार मागणार नाही.

कोणत्याही गावाने इंग्रज सरकारला महसूल देऊ नये. दिल्यास त्या गावाची राखरांगोळी केली जाईल. - उमाजी राजे-मुक्काम डोंगर

संपूर्ण हिंदुस्थानातील जनतेसाठी काढलेला हा पहिलाच जाहीरनामा होय. उमाजीचा दृष्टीकोन किती व्यापक होता, हे दिसून येते. हा देश आपला आहे. या देशात आपलेच राज्य हवे, असे तो जनतेला यामधून सांगतो. रावरंकापासून सर्व जनतेमध्ये इंग्रज़ सरकार विषयी असंतोष असूनही इंग्रज सरकारविरूद्ध उठाव करण्याची हिंमत मात्र कोणातही नव्हती. सर्व राजेरजवाडे व संस्थानिक आपले स्वत्व विसरून स्वार्थात ते विषयोगभोगात लोळत पडले असतांना उमाजीसारखा स्वातंत्र्याची जबरदस्त लालसा असणारा एक रामोशी इंग्रज सरकारविरूद्ध दंड थोपटून उभा राहतो, यातच उमाजीचे थोरपण दिसून येते.

उमाजीचा हा जाहीरनामा वाचताच साऱ्या इंग्रज अधिकाऱ्यांच्या अंगाचा तिळपापड झाला. मर्कियशच्या हाताखाली असणाऱ्या कॅ. लिव्हिंगस्टोन, कॅ. ल्यूकन, कॅ. बॉईड यासारख्या सेनाधिकाऱ्यांनी जंगजंग पछाडले, तरी उमाजी त्यांच्या हाती लागत नव्हता. म्हणून कलेक्टर जिब्रानने दि. ८ ऑगस्ट १८३१ रोजी आणखी एक नवा जाहीरनामा काढला. तो असा.-

''उमाजीस पकडून देणारास १०,००० रुपये रोख व ४०० बिघे जमीन, भुजाजीस पकडून देणारास ५००० रु. रोख व २०० बिघे जमीन व त्यांची बातमी देणारास त्याच्या निम्मे इनाम देण्यात येईल.''

पण एवढ्या मोठ्या बक्षीसाच्या लोभानेही कोणी सुद्धा उमाजी व भुजाजी यांना पकडून देणारा पुढे आला नाही. म्हणून मर्किंटाश सह सारेच इंग्रज अधिकारी चिंताग्रस्त झाले. शेवटी या कामासाठी फितुरीचाच उपयोग करण्याचे त्यांनी ठरविले. उमाजीचे एके काळचे सहकारी बापूसिंग परदेशी, नाना रामोशी व काळू रामोशी यांना हाताशी धरले. त्यांना मोठमोठी इनामे देण्याची लालूच दाखविली. त तेही त्या लालचीने या कामासाठी तयार झाले. त्यांनी उमाजीचा तपास काढून भोर जवळील उत्रोळीला उमाजीस पकडून दोरखंडाने जेरबंद करून पुण्यास आणले. भुजाजी केव्हांच फरार झाला होता. तो दिवस होता १५ डिसेंबर १८३१ चा भुजाजी धावपळीत भयंकर जखमी झाला व त्यामुळे तो मरण पावला. सुमारे दीड महिना उमाजी कैदेत होता. त्याच्यावर खटला चालवून त्याला फाशीची शिक्षा देण्यात आली व तीनुसार त्याला ३ फेब्रुवारी १८३२ रोजी पुण्याच्या शुक्रवार पेठेतील एका झाडावर फाशी देण्यात आले. सन १८१८ ते १८३१ पर्यंत तब्बल तेरा वर्षे इंग्रजांचे तोंडचे पाणी पळविणारा हा महान क्रांतिकारक अखेर दगाबाजीनेच पकडला गेला. त्या काळचे सुशिक्षित व पेशवाईचे गोडवे गाणारे मात्र इंग्रज सरकारची नोकरी मिळविण्यास लालचावले होते, हे विशेष होय.

नंतर उमाजीचा पहिला चरित्रकार व उमाजीस पकडण्याच्या मोहितेचा प्रमुख ॲलेक्झांडर मर्किंडाश म्हणतो-

''उमाजीच्या नजरेसमोर शिवाजीचे उदाहरण होते. स्वराज्यसंस्थापक शिवाजी हे त्याचे श्रद्धेचे व स्फूर्तीचे स्थान होते. शिवाजीच त्याचा आदर्श होता. मोठमोठ्या लोकांनी मला स्वतः सांगितले की, उमाजी हा काही असला तसला भटक्या दरोडेखोर नाही. त्याच्या नजरेसमोर नेहमी शिवाजीचे उदाहरण होते. शिवाजीप्रमाणे आपण मोठे राज्य कमवावे, अशी त्याची उमेद होती.''

पुण्याच्या तहसीलदार कचेरीत ज्या ठिकाणी उमाजीला फाशी देण्यात आले. त्या ठिकाणी आता पुतळा स्वातंत्र्याचा संदेश देत ठामपणे उभा आहे. आम्हांला मात्र त्याने स्वातंत्र्यप्राप्तीसाठी इंग्रज सरकारशी दिलेल्या दीर्घकालीन लढ्याची जाणीव नाही, हे आपल्या देशाचे दुर्दैव होय.



# १६. सुई मुण्डा

बादशहा शाहआलम कडून बक्सरच्या युद्धानंतर इंग्रजांना बिहार, बंगाल व ओरिसा प्रांतांचे दीवाणी हक्क मिळाले व त्यांनी या प्रांतांतून मोगलांच्या पेक्षा दुप्पट सारा वसुली सुरू केली. तेवढ्याने इंग्रजांचे समाधान होईना, म्हणून त्यांनी बिहारच्या दक्षिण भागातील डोंगराळ व घनदाट अरण्यांत राहणाऱ्या आदिवासींच्या जमिनी ताब्यात घेऊन जास्तीत जास्त सारावसुली करून देणाऱ्या या प्रदेशाबाहेरच्या मुसलमान ठेकेदारांकडे या जमिनी सोपविल्या व हे ठेकेदार त्या आदिवासींकडून इंग्रजांना अपेक्षित असणाऱ्या साऱ्यापेक्षांही जास्त सारावसुली जोरजबरदस्तीने सुरु केली. त्याबरोबरच ते या आदिवासी स्त्री, पुरुषांवर अत्याचारी करु लागले. त्यामुळे हे आदिवासी चिडले व त्यांनी संगठित होऊन या ठेकेदारांना आपलया प्रदेशातून घालवून देण्याचा निर्धार केला. 'हो', 'लरका हो', 'कोल', 'मुंडा' आदि या आदिवासी जमाती होत.

कुमांग गांवात मोहमद अली हा ठेकेदार राहात होता. तो भयंकर अत्याचारी होता. ११ डिसेंबर १८३१ रोजी 'लरका हो' जमातीच्या आदिवासींनी एकत्र येऊन मोहम्मद अलीची २०० गुरे पळवून नेली. म्हणून मोहमद अलीने इंग्रज सरकारकडे याविषयी तक्रार नोंदविली. नंतर १० दिवसांनीच ७०० आदिवासींनी २० डिसेंबर १८३१ रोजी दुसऱ्या चार गांवावर हल्ले करुन तेथल्या जमीनदार ठेकेदारांचे महाल लुटून जमीनदोस्त करुन टाकले. छोटा नागपूर व जंगल महालाचा हा प्रदेश होता. हे ठेकेदार सारावसुली शिवाय इत्रही जाचक कर आदिवासी लोकांकडून जबरदस्तीने वसूल करायचे. ते इंग्रज सरकारचे त्या प्रदेशातील आधारस्तंभ होते.

या आदिवासींचा नेता होता एक ग्राम प्रमुख सुई मुण्डा. त्यानेच सर्व आदिवासींना या ठेकेदारांविरुद्ध व इंग्रज सरकारविरुद्ध लढा देण्यास उद्युक्त केले होते. २५ डिसेंबर १८३१ रोजी ३०० आदिवासींनी गासू या गावचा जमीनदार काले खाँ आणि रांचीचा जमीनदार सैफुल्लाह यांच्या महालावर हल्ले करुन ते लुटल्यावर जाळून टाकले. या हल्ल्यात काले खाँ ठार झाला. पण सैफुल्लाह जीव घेऊन पळून गेला.

सन १८३३ च्या आरंभीच एक हजार आदिवासींनी संघठित होऊन कुमांग व कोरुबुरु गावांच्या जमीनदारांवर हल्ला करुन त्यांचे महाल जाळून टाकले. गांगिरा येथला जमीनदार याजर अली हा भयंकर अत्याचारी होता. त्याने कोल जमातीच्या एका महिलेला जबरदस्तीने आपली रखेल बनविली होते. आदिवासींच्या या जमावाने गांगिरा गांवावर हल्ला करुन जमीनदार याजर अलीला ठार केले. या क्रातिवीरांनी प्रतिज्ञाच

केली होती की, सोनपूर परगण्यातील सर्व जमीनदारांचा नाश करायचाच. १५ जानेवारी १८३२ च्या आसपास आदिवासींची शक्ती वाढली. चार हजार आदिवासींनी गोविंदपुरवर एकदम हल्ला केला. तेथला जमीनदार आपल्या परिवारासह निसटून पळून गेला. सगळा बेलकुदा परगणा आता आदिवासींच्या ताब्यात आला होता.

एक परगणा आदिवासींनी जिंकला. मूळात तो त्यांचाच होता. पण इंग्रज सरकार भयंकर खवळले. पाटण्याचा आयुक्त लॅम्बर्टच्या आदेशानुसार कॅ. कुथबर्ट आपल्या पलटणीसह रायगडला व हजारीबागला गेला. आदिवासींनी सोनपूर परगण्यातील बहुतेक ठाणी जाळून खाक केली होती. २६ जानेवारी १८३२ पर्यंत आदिवासींनी छोटा नागपूरमधील पालकोटच्या दक्षिणेकडचा थोडा भाग सोडून सगळा छोटा नागपूर परगणा आपल्या ताब्यात घेतला होता. या 'हो' आदिवासींच्या अंतः करणात स्वातंत्र्याची ज्योत प्रखर झाली होती आणि इंग्रज सरकारचे सैन्य ती ज्योत विझवून टाकण्यात असफल झाले होते.

सेनापती कॅ. विलकिन्सनच्या मागणीप्रमाणे इंग्रज सरकारने कलकत्त्याहून व पाटण्याहून अधिक सैन्य छोटा नागपूर परगण्यात तात्काळ पाठविले. एवढी फौज जवळ आल्यावरही आदिवासींचे हल्ले चालूच होते. कर्जन बोवेनच्या सैनिक आदिवासींचीं गावेच्या गावे जाळीत व हातात सापडलेल्या आदिवासींना ठार करीत पुढे सरकत होते. आदिवासींची गुरे कापून खात होते. तरीही या बहाद्दुर आदिवासी क्रांतिकारकांनी आत्मसमर्पण न करता डोंगरांचा व जंगलांचा आश्रय घेतला.

कॅ. माल्टवी ने २० मार्च १८३२ रोजी राणा दिसगावावर हल्ला करुन त्या गावातील सारे धान्य नष्ट करुन टाकले. त्याने डोंगरात व जंगलात गेलेल्या आदिवासींना रसद पुरविण्याचे सर्व मार्ग रोखून धरले. त्यामुळे अन्नावाचून त्या आदिवासींचे हाल होऊ लागले. त्यांच्या बायकांना व मुलींना पकडून नेऊन त्यांच्यावर अत्याचार चालू ठेवले.

इंग्रज सरकारच्या सैन्याजवळ तोफा-बंदुकीसारखी आधुनिक हत्यारे होती; तर आदिवासींच्या जवळ परशु (कुऱ्हाडी) व धनुष्यबाण यांसारखी परंपरागत हत्यारे होती. त्यांची बरोबरी कशी होणार? तरीही या संघटीत आदिवासींनी प्रशिक्षित सैन्याला लोखंडाचे चणे खायला भाग पाडले होते. पार जेरीस आणले होते. या क्रांतिकारी आदिवासी जमेची व महत्त्वाची बाजू एवढीच होती की, ते आपल्याच धरतीवर लढत होते व त्या धरतीची त्यांना खडा न खडा माहिती होती. त्युमळेच ते अखेरपर्यंत लढत होते. शेवटी इंग्रज सरकारला त्यांच्या पुढे झुकावेच लागले व आदिवासी - विरोधी नीती बदलावी लागली. हा सुई मुण्डाचा व त्याच्या जातीच्या क्रांतिवीरांचा बहुमोल विजय होता.

❖ ❖ ❖

# १७. फूकन आणि बरुआ

सन १७६४ च्या युद्धामुळे संपूर्ण पूर्व भारत इंग्रजांच्या ताब्यात आला. बंगाल, बिहार, आसाम व ओरिसा प्रांताच्या दीवाणीची सनद बादशहा शाहआलम याच्याकडून इंग्रजांना मिळाली. भूमीकर वसुलीचा अधिकार त्या सनदे द्वारा इंग्रजांना मिळाला. तेव्हा कंपनी सरकारने मोगलांकडून वसूल केल्या जाणाऱ्या भूमिकराच्या दिढी-दुपटीने भूमीकर वाढविला. तो वसूल करण्यासाठी दोन दीवाण नेमले. त्यांनी वसुलीसाठी ठेकेदार नेमले. दीवाणांनी कंपनी सरकारला जेवढा वसूल द्यायचा, त्याच्यापेक्षा जास्त वसूल ते ठेकेदारांकडून वसूल करु लागले. म्हणून ते ठेकेदारही शेतकऱ्याकडून प्रमाणापेक्षा जास्त भूमीकर वसूल करु लागले. धान्याऐवजी रोख रक्कमेत भूमीकर वसूल करायचा, अशा आदेश कंपनी सरकारने दीवाणांना व ठेकेदारांना दिला होता. जे शेतकरी एवढा जबरदस्त भूमीकर देऊन शकत नव्हते, त्यांच्या जमिनी जप्त करुन त्या बाहेरच्या श्रीमंत लोकांना विकण्यात येऊ लागल्या. त्यामुळे कंपनी सरकारच्या राजवटीत नवा जमीनदार वर्ग उदयाला आला. रोख रक्कमेत भूमीकर देण्यासाठी काही शेतकरी अशा जमीनदारांकडून, पाटलांकडून, मारवाड्यांकडून किंवा व्यापाऱ्याकडून कर्ज काढून भूमीकर भरु लागले. त्या कर्जाचा व्याजदर इतका जबरदस्त होता की, शेतकऱ्याला पिढ्या न् पिढ्या ते कर्ज व व्याज फेडता येईना. म्हणून कर्ज देणारे हे सावकार जबरदस्तीने शेतकऱ्यांना आपल्या जमिनीवर राबवून घेऊ लागले. अशा रीतीने नवा सावकार वर्ग निर्माण झाला. जमीनदार, पाटील, सावकार व इंग्रज अधिकारी यांचे अत्याचार शेतकऱ्यांवर वाढू लागले. आदिवासींच्या जमिनीवर पूर्वीच्या कोणत्याही राजवटीने भूमीकर लादला नव्हता. कंपनी सरकारच्या राजवटीत आदिवासी शेतकऱ्यांकडून ही भूमीकर वसूल करण्यात येऊ लागल्या. त्यांच्या वरही जमीनदारांचे, ठेकेदारांचे अत्याचार खूप वाढले. त्यामुळे आदिवासींसह सारी जनता इंग्रजांचे राज्य कधी नष्ट होते, याची वाट पाहू लागली. त्या जनतेतूनच इंग्रज सत्तेशी लढे देणारे वीर क्रांतिकारक पुढे आले.

आसाम राज्यात १८३० च्या आरंभीच्या काळात पियालियार बरगोहाई यांच्या नेतृत्त्वाखाली आसामी 'जनतेने इंग्रजांची आसामवरील सत्ता नष्ट करण्यासाठी कंबर कसली. पिआलिअर बरगोहाई यांनी सन १८२८ मध्येही स्वातंत्र्यासाठी इंग्रजांशी लढा दिला होता. १८३० साली पियालियर बरगोहाई, पियाली बरफूकन व जिऊराम दुलिया बरुआ यांनी आसाम मधील नागा, गारो, खाशी, खामती व माओमारिया या आदिवासी जातींच्या नेत्यांना पत्रे पाठवून इंग्रज सरकारविरुद्ध लढण्यासाठी एकत्र येण्याचे आवाहन

केले. सर्वांनी एकत्र येऊन देवपूजा केली व इंग्रजांशी लढण्याची प्रतिज्ञा घेतली. त्यांनी असे ठरविले होते की, इंग्रजांच्या शिपायांच्या वस्ती शेजारच्या शस्त्रागाराला आग लावून द्यायची व रंगपूर शहरावर हल्ला करायचा. रंगपूरच्या संरक्षणासाठी फक्त एक जमादार व ३० शिपाई होते. रंगपूर सहजपणे त्या क्रांतिकारकांच्या ताब्यात आले असते. कारण क्रांतिकारकांची संख्या ४०० होती. २५ मार्च १८३० ह्या दिवशी रंगपूरवर आक्रमण करायचे निश्चित झाले होते. परंतु मध्येच माशी शिंकली.

क्रांतिकारकांच्या नेत्यांनी खामती जातीचा नेता सादिया खोबा गोहाई याला दोन गुप्त पत्रे हरनाथ याच्या हाती देऊन त्याच्याकडे पाठविले होते. ती पत्रे सादिया खोबा गोहाई याला मिळाली. त्याने धोका देऊन हरनाथला पकडले व इंग्रज एजंटाकडे त्याला २० फेब्रवारी १८३० रोजी सोपविले. तरीही क्रांतिकारकांनी हिंमत न हरता इंग्रजांच्या रंगपूरमधील शस्त्रागारावर आक्रमण केलेच.

इंग्रज राजनैतिक एजंट कॅप्टन न्यू विले याने आसाम लाईट इन्फंट्रीची एक पलटण रंगपूरला क्रांतिकारांचा प्रतिकार करण्यासाठी पाठवून दिली. इंग्रज सैन्याचे अचानक आक्रमण झाल्याने सारे आदिवासी क्रांतिकारक घाबरुन गेले ते पळून जाऊ लागले. कारण त्यांच्याजवळ त्यांची जुनी परंपरागत हत्यारे होती. बंदुकी व तोफा नव्हत्या. इंग्रजांनी पळून जाणाऱ्या आदिवासी क्रांतिकारकांचा पाठलाग केला. त्यांच्या बायका मुलांना पकडले. अनेक आदिवासीही पकडले गेले. त्यांना निःशस्त्र करण्यात आले. पिआलिअर बरगोहाई आपल्या मोठ्या मुलासह जंगलात पळून गेले.

कैद केलेल्या आदिवासी क्रांतिकारकांवर शिवसागर येथील न्यायालयात दावा दाखल केला गेला. कंपनी सरकार विरुद्ध विद्रोह आणि राजद्रोह केल्याचा आरोप त्यांच्यावर ठेवण्यात आला. इंग्रजांच्या न्यायाचे नाटक तडकाफडकी उरकण्यात आले आणि विद्रोह व राजद्रोह केल्याचा आरोप या आदिवासी क्रांतिकारकांवर सिद्ध झाला. पियाली बरफूकन व जिऊराम दुलिया बरुआ यांना त्या न्यायालयाने फांशीची शिक्षा दिली. सन १८३० च्या ऑगस्ट महिन्यातील शेवटच्या आठवड्यात फूकन व बरुआ यांना फांशी देण्यात आले. अन्य क्रांतिकारकर हरनाथ, कुँवर, रुपचंद, बोम सिंगपो, देओराम आदि क्रांतिकारकांना ढाका येथील तुरुंगात दीर्घकाळ डांबण्यात आले. सर्व क्रांतिकारकांची संपत्ती कंपनी सरकारने जप्त केली. अशा रीतीने फितुरीमुळे आसाम मधील क्रांतिकारकांचा हा उठाव दडपून टाकण्यात आला.



# १८. गंगानारायण

कंपनी सरकारने बादशहा शाहआलमकडून बंगाल, बिहार व ओरिसा प्रांताचे दीवाणी हक्क प्राप्त केल्यानंतर या राज्यामधून सारावसुली मोठ्या प्रमाणात सुरु केली. या राज्यांत ज्या जमिनींची सारा पूर्वीच्या सत्ताधीरांनी माफ केला होता, त्या जमिनी जप्त करण्याची मोहीम कंपनी सरकारने उघडली. बिहारच्या दक्षिण भागातील अशा कर विहीन जमिनी मानभूम व बराभूम भागात होत्या. त्या भागातील जमीनदारांची जमीनी जे शेतकरी कसत होते, त्या शेतकऱ्यांना सर्व कर माफ होते. अशा शेतकऱ्यांना भूमिज म्हणत असत. भूमिज म्हणजे वंशपरंपरेने आपल्या ताब्यातील जमीन कसणारे. करमाफीच्या बदल्यात ते जमीनदारांच्या आवश्यकतेनुसार त्यांच्याकडे सैनिक म्हणून काम करायचे. त्यांना 'पाईक' असे म्हणत असत व त्यांची जमीन 'पाईकान जमीन' म्हणून ओळखली जायची. या पाईकान जमिनीही कंपनी सरकारने जप्त केल्यामुळे हजारो भूमिज शेतकऱ्यांत कंपनी सरकार विरुद्ध असंतोष माजला होता. त्यामुळे सन १७६९ पासून हे भूमिज शेतकरी सरकार विरुद्ध लहान मोठे उठाव करीत होते. त्या उठावांचा बंदोबस्त १८१६ साल पर्यंत कंपनी सरकारने करुन टाकला होता. तरी भूमिज शेतकऱ्यांच्या मनात असंतोषाचा अग्नी धुमसतच होता. हे सारे आदिवासी लोक होते.

बराभूमचा राजा रघुनाथ नारायण १७९८ साली मरण पावला. त्याच्या दोन राण्या होत्या. मोठ्या राणीचा पुत्र माधवसिंह आणि धाकट्या राणीचा पुत्र गंगागोविंद यांच्यात उत्तराधिकावरुन वाद सुरु झाला. तेव्हा कंपनी सरकारने गंगागोविंदची बाजू घेऊन त्याच्याकडे राजपद सोपविले. माधवसिंहाने त्याच्या विरुद्ध उठाव सुर केला. तेव्हा कंपनी सरकारने माधव सिंहाला कैद करण्याची धमकी दिली. त्यानंतर समझोता होऊन माधवसिंहाला बराभूमचे दीवाणपद देण्यात आले.

दीवाणपदी आल्यानंतर माधवसिंहाची मनमानी सुरु झाली. गंगागोविंदला साथ देणाऱ्या त्याच्या चुलत भावाची - गंगानारायणची सरदारी त्याने रद्द करुन टाकली. इतर सरदारांवरही जबरदस्त कर लादले. प्रजेवरही गृहकर लागू केला. तो राज्याचा पैसा हडप करुन सावकारीही करायचा व कर्जदारांकडून जबरदस्त व्याज घ्यायचा. कर्जदाराने व्याज न दिले, तर त्याची मालमत्ता जप्त करायचा. त्यामुळे सारे सरदार व भूमिज शेतकरी एकत्र झाले. गंगानारायणने त्यांची एक सेना संगठित केली व अन्य सरदारांना हाताशी धरुन माधवसिंहाला ठार केले.

१ मे १८३२ रोजी गंगानारायणने कंपनी सरकारच्या अधिकाऱ्यांकडे आपला मोर्चा वळवला आणि आपल्या सैन्यासह बडाबाजारमधील इंग्रजांच्या मुन्सफाची कचेरी नष्ट करुन तेथला बाजारही लुटला. तेथले ठाणे ही जाळून टाकले. तेव्हा कंपनी सरकार चिडले. बांकुडाचा कलेक्टर रसेल आपल्या सैन्यासह गंगानारायणला दडपून टाकण्यासाठी धावून आला. गंगानारायणने आपल्या तीन हजार भूमिज सैनिकांसह रसेलला चहुबाजूंनी घेरले तेव्हा घाबरुन जाऊन तो बांकुडा येथे पळून गेला. बराभूमच्या पूर्वेकडील भागातील अनेक मोठमोठ्या गांवावर गंगानारायणने आपल्या भूमिज सैन्यासह हल्ले केले व तेथल्या इंग्रज कर्मचाऱ्यांना हाकून लावले. त्या भागातले व मेदिनीपूर जिल्ह्यातले भूमिज सैनिकही गंगानारायणला येऊन मिळाले. आता गंगानारायणजवळ मोठे सैन्य जमले. बराभूमचा बहुतेक भाग इंग्रजांच्या नियंत्रणातून मुक्त झाला. गंगानारायणच्या पाठीशी बराभूमचे सरदार, जमीनदार व भूमिज शेतकरी खंबीरपणे उभे होते.

अखेर कंपनी सरकारने कलकत्त्याजवळील बराकपूर छावणीतील सैन्य बराभूममध्ये पाठविले. ले. ज. कूपरने गंगानारायणच्या सैन्यावर अनेक हल्ले केले. पण तो अयशस्वी झाला. तेव्हा बर्दवानचा कमिशनर ब्रॅडन आणि छोटा नागपूरचा कमिशनर डेंट यांना त्यांच्याकडील सैन्यासह या मोहिमेवर कंपनी सरकारने पाठविले. ऑगस्ट १८३२ पासून फेब्रुवारी १८३३ पर्यंत इंग्रजांच्या सर्व सैनिकांनी बराभूम भागांतील आदिवासीवर खूप अत्याचार केले. त्यांची गावे जाळण्यात आली. त्यांच्या जमिनीतली पीके नष्ट केली गेली. त्यांच्या खळ्यांतले धान्य जाळले गेले. पेरणीसाठी बी सुद्धा राहू दिले नाही. प्रत्येक गावातील गुरेढेरे पकडून त्यांचे लिलाव करण्यात आले. हाती लागलेली संपत्ती सैनिकांना वाटून दिली. तरीही इंग्रज सैन्याला गंगानारायणचे हे आंदोलन दडपून टाकता आले नाही.

सन १८३३ मध्ये गंगानारायण आपल्या सैन्यासह जवळच्या सिंहभूम जिल्ह्यात गेले. तेथल्या आदिवासी लढवय्यांसह त्यांनी खरसवानचे ठाकूर चेतनसिंहांच्या हिंदू शहर ठाण्यावर त्यांनी हल्ला केला. त्या हल्ल्या ठाकूरांच्या शिपायांनी त्यांना ठार केले. इंग्रजांच्या नव्हे, तर भारतीय ठाकूरांच्या शिपायांकडून त्यांना मरण आले. आपल्याच देशबांधवांच्या परस्पर वैमनस्यांतून व परधार्जिण्या वृत्तीतून तसेच फितुरीने असे कित्येक क्रांतिकारक मारले गेले आहेत, हे आपल्या देशाचे फार मोठे दुर्दैव होय.



# १९. शम्भूदान

सध्याच्या नागालँड राज्याचा सारा प्रदेश डोंगरांनी व्यापलेला आहे. या प्रदेशात नागा जातीच्या काही उपजातींचे वास्तव्य आहे. डोंगराळ भागातच या जाती राहात असल्याने या सर्व जाती अतिशय काटक, धाडसी, निर्भय व शूर आहेत. त्यांची एक उपजाती कच्छ नागा ही असून या जातीला कछारी नागा असेही म्हणतात. सध्याच्या कछार जिल्ह्यात या जातीचे बहुसंख्य लोक राहतात. कछार नागा वीरांच्या कथा आजही या प्रदेशात मोठ्या अभिमानाने सांगितल्या जातात.

आसाम प्रांतात पूर्वी अहोम वंशाचे राज्य होते. त्या काळात कछारी नागा जातीचे लोक अहोम राजांच्या राज्यातून वेगळे झाले व त्यांनी नागा प्रदेशात वास्तव्य केले. इंग्रजांची दृष्टी या प्रदेशावर पडल्यानंतर कछारी नागांचे स्वातंत्र्य थोड्या काळातच नष्ट झाले. त्यांना गुलामगिरीत जीवन कंठावे लागले. इंग्रजांची गुलामगिरी व अत्याचार या स्वतंत्र वृत्तीच्या कछारी नागांना सहन होणे शक्यच नव्हते. इंग्रजांच्या सत्तेविरुद्ध त्यांच्या मनात असंतोष खदखदू लागला. या कछारी नागामधूनच शम्भूदान नामक वीर उदयाला आला. त्याने आपल्या जातीच्या तरुणांची संघटना तयार केली. मेवांग हे गाव त्या संघटनेचे प्रमुख केंद्र होते. संघटनेसाठी तो पैसा कोठून आणणार? संघटनेतील तरुणांनी व त्यांच्या नातेवाईकांनी त्यासाठी बराच पैसा जमविला तो स्वतःच्या खिशातूनच.

कछारी नागा शम्भूदान याने संघटना उभारुन इंग्रजांशी लढण्याची तयारी चालविली आहे, याची बातमी त्या भागातील इंग्रज अधिकाऱ्यांना लागली. तेव्हा मेजर बॉएडने या संघटनेचा नेता शम्भूदान याला पकडण्यासाठी व त्याने सुरु केलेला विद्रोह दडपून टाकण्यासाठी पोलिसांचे मोठे दल कछारी नागांच्या प्रदेशात रवाना केले. हे पोलिस दल जेव्हा शम्भूदान व त्याचे साथीदार यांना जिवंत अथवा मृतावस्थेत पकडण्यासाठी असमर्थ ठरले, तेव्हा मेजर बॉएडने संतापून स्वतःच ते कार्य करण्याचे ठरविले. त्याने आपल्या सेनेसह मेवांग गावाकडे कूच केले. ते समजताच शम्भूदान व त्याचे सहकारी आपल्या अनुयायी वीरांसह मोजांग येथे निघून गेला. तेथल्या पोलिसाला व त्याच्या साथीदारांना त्यांनी ठार केले.

शम्भूदान पुन्हा आपल्या कछारी नागा वीरांसह मेवांग या आपल्या गावाकडे आला. तेथे त्यांचा सामना मेजर बॉएडच्या सैनिकांशी झाला. तेथे तुंबळ युद्ध झाले. कछारी नागांच्या बाणांनी, भाले-बरच्यांनी इंग्रजांच्या सैन्यावर जणू वज्रघातच केला. त्या सैन्याला पळताभुई थोडी झाली. अनेक इंग्रज सैनिक व मेजर बॉएड या युद्धात मारला गेला.

शम्भूदानला कसेही करुन पकडलेच पाहिजे, असे इंग्रजांनी ठरविले. कछार जिल्ह्यात व आसपासच्या भागात त्यांनी हेरांचे जाळे पसरविले. तेव्हा शम्भूदान एका अज्ञात स्थळी निघून गेला. भूमिगत झाला. इंग्रज हेरांना शम्भूदानच्या लपण्याचे स्थान माहित झाले. लगेच इंग्रज सैन्याने त्या स्थानाला वेढा घातला. आता कसेही करुन त्या स्थानातून निसटलेच पाहिजे, असे शम्भूदानने ठरविले. तो लपत-छपत त्या स्थानातून निघाला. पण दुर्दैव आड आले. पोलिसांनी त्याच्यावर गोळीबार सुरु केला. पायात एक गोळी घुसली. तरीही तो निसटून गेला. उपचाराअभावी गोळीची जखम वाढत गेली. त्यामुळे हा नागावीर हे जग सोडून गेला. एक जबरदस्त वादळ शमले. नागा प्रदेश शोकविव्हल झाला.



# २०. वीराप्पा व पट्‌टुबसप्पा

कर्नाटक राज्यात पूर्वी कूर्ग हे संस्थान होते. योग्य प्रशासन नसल्याचे कारण दाखवून कंपनी सरकारने ते संस्थान सन १८३४ मध्ये खालसा केले. या संस्थानचा बराच भाग डोंगराळ होता. त्या डोंगराळ भागात काही आदिवासींचा निवास होता. त्या भागात जणू त्यांचेच राज्य होते. आपापल्या रीतिरिवाजाप्रमाणे व परंपरांनुसार त्या जाती जीवनयापन करीत असत. परंतु हे संस्थान इंग्रजांनी ताब्यात घेतल्यावर या आदिवासींना इंग्रज अधिकाऱ्यांचे अत्याचार सहन करावे लागले. त्यांच्यावर इंग्रज सरकारने अनेक बंधने लादली. स्वछंदपणे जगणाऱ्या या आदिवासी जमातींना पारतंत्र्याचे जीवन कंठावे लागले. त्यांचा इंग्रजांकडून पदोपदी अपमान होऊ लागला. अत्याचार सहन करणे व अपमानास्पद जीवन जगणे त्यांना असह्य वाटू लागले. त्यामुळे इंग्रजांविषयी या आदिवासींच्या मनात असंतोष धुमसू लागला. त्यांचा असंतोष दडपून टाकण्यासाठी इंग्रजांनी अनेक उपाय योजले. परंतु त्यांचा असंतोष वाढतच गेला.

कुर्गी आदिवासी तरुण वीरप्पा याने इंग्रज अधिकाऱ्यांना सांगितले की, "मी कुर्गी राजवंशाचा वारस आहे. म्हणून मला योग्य ते अधिकार मिळाले पाहिजेत." परंतु इंग्रज अधिकाऱ्यांनी त्याची मागणी फेटाळून लावली - त्याला धुडकावून लावले. या अपमानाने तो पेटून उठला. त्याने अनेक आदिवासी तरुणांचे संघटन केले. अनेक वेळा इंग्रज अधिकाऱ्यांशी टक्कर दिली. अनेक वेळा इंग्रजांच्या ठाण्यांवर हल्ले केले. तेव्हा इंग्रज अधिकाऱ्यांनी वीरप्पाला पकडण्यासाठी मोहीम सुरु केली. वीरप्पाने वेषांतर करुन 'अपरम्पार स्वामी' हे नाव धारण केले. आदिवासींना इंग्रज सरकारविरुद्ध भडकावण्याचे प्रयत्न सुरु केले. इंग्रज अधिकाऱ्यांनी वीरप्पाला पकडण्याची मोहीम जोरात सुरु केली. त्यांनी कूर्गी आदिवासीमध्ये फूट पाडली. काहींना प्रलोभने दाखवून आपलेसे केले. त्यांनीही फितुरी करुन वीरप्पाला पकडण्यासाठी इंग्रजांना मदत केली. वीरप्पास पकडून बंगलोरच्या तुरुंगात डांबले. तेथे त्याचा अनन्वित छळ करण्यात आल्याने तुरुंगातच वीरप्पाचे निधन झाले.

कुर्गी आदिवासींची गोदास ही एक उपजाती आहे. या जातीत जन्माला आलेला तरुण पट्‌टुबसप्पा वीरप्पाच्या तुरुंगातील मृत्युने अत्यंत संतापला. इंग्रजांना कूर्गमधून हाकून लावण्याची त्याने प्रतिज्ञा घेतली. सर्व आदिवासींवरील इंग्रजांनी लादलेली बंधने दूर करण्याचा निश्चय केला. इंग्रजांविरुद्ध लढाई सुरु केली. आपल्या सैन्याला उत्तेजित करुन पट्‌टुर, वतवालपासून मंगलोर पर्यंतचा प्रदेश त्याने इंग्रजांच्या कब्जातून मुक्त

केला. या प्रदेशाच्या प्रशासनाची व्यवस्था लावली. स्व जातीचे रक्षण केले. न्यायाचे व्यवस्थापन सुरु केले. इंग्रजांच्या ताब्यातून एवढा प्रदेश पट्टुबसप्पाने स्वतंत्र केल्याने त्याच्या आदिवासी सैन्याचा उत्साह वाढला. सैन्याने सगळा कूर्ग प्रदेश स्वतंत्र करण्यासाठी पुढे चाल केली. परंतु काही कुर्गी आदिवासी इंग्रजांना फितुर झाले. त्यांनी पैशाच्या लोभाने पट्टुबसप्पाला पकडून दिले. इंग्रजांनी त्याला मंगलोर मध्येच फाशी दिले. आपल्या प्रदेशाच्या स्वातंत्र्यासाठी जिद्दीने लढणारे हे दोन्ही वीर आपल्या बलिदानाने अमर झाले.



# २१. चक्र बिशोई

ओरिसा प्रातं - उत्कल राज्य जरी सन १७६५ च्या बक्सर युद्धानंतर इंग्रजांच्या अधीन झाले होते, तरी त्यातील फूलबनी जिल्हा इंग्रजांच्या स्पर्शापासून अलिप्त राहिला होता. या भागातील पहाडी क्षेत्रात 'कन्ध' या आदिवासींचा निवास होता. हा भाग डोंगरदऱ्या, नद्या व घनदाट अरण्यांची व्याप्त होता. त्यांचे वन सौंदर्य नंदनवनाचा आभास निर्माण करीत होते. या पहाडी क्षेत्राला 'बोधमंडल' किंवा 'वनवासी - कुई' सुद्धा म्हणत असत. या भागात आधी भंज वंशाचे राज्य होते. नंतर ते कुंजहार घराण्याकडे आले. या घराण्याच्या अनंग देव नामकराजाने शासन सुविधेसाठी या भागाचे २४ विभाग केले होते. या विभागांना उडिया भाषेत 'मुठ्ठे' म्हटले जाई. प्रत्येक मुठ्ठयाचे शासन एकेका मुखियाकडे असे. या मुखियांना 'बिशोई' असे म्हटले जाई. या बिशोई पैकी चक्र बिशोई आणि त्याचे काका धौरा बिशोई एकोणवीसाव्या शतकाच्या आरंभीच्या काळात धुमसरचा राजा धनंजय भंजदेवाच्या सैन्यात सेनापती होते. धुमसर राज्याच्या सैन्यात सगळे सैनिक कन्ध या आदिवासी जमातीचेच होते.

सन १८३५ पर्यंत कंपनी सरकारच्या सैन्याने फूलबनी जवळच्या सर्व प्रदेशात आपले प्रभुत्व प्रस्थापित केले होते. आता कंपनी सरकारने फूलबनी क्षेत्र आपल्या ताब्यात घ्यायचे ठरवून त्यानुसार कारवाई सुरु केली. परंतु कंध वीरांनी त्याला जबरदस्त विरोध केला. धुमसरच्या आदिवासी सैन्याने चक्र बिशोई व धौरा बिशोई यांच्या नेतृत्त्वाखाली इंग्रजांना पुढे पाऊल टाकू दिलेच नाही. इंग्रज सेनापती सेल याने यासंबंधात म्हटले आहे. 'ओरिसातली ही अत्यंत भीषण लढाई होती.' हे युद्ध बरीच वर्षे चालले होते. आदिवासी कन्धवीर कोणत्याही परिस्थितीत इंग्रजांचे अधिपत्य स्वीकारण्यात तयार नव्हते.

कर्नल सेल ने राजा धनंजय भंजदेवाला असा संदेश पाठविला की, 'राजाने गंजमच्या इंग्रज कलेक्टरला नाम मात्र जरी सलामी दिली, तरी चालेल. त्याच्या राज्याचे स्वातंत्र्य अबधित राहील व कंपनी सरकार कसलाही कर त्याच्याकडून मागणार नाही.' राजाने या संदेशातला कावा ओळखला व कर्नल सेलचा तो प्रस्ताव फेटाळून लावला. आणि सेलला उलट संदेश पाठविला की, ''यापुढे आपली भेट युद्धभूमीवरच होईल? त्यानंतर राजा उदयगिरीला गेला. आपल्या सर्व मुठ्ठा प्रधानांना (बिशोईंना) व आदिवासी योद्धयांना एकत्र जमवून प्राण असे पर्यंत इंग्रजांशी लढा देण्यास त्यांना प्रवृत्त केले. जमलेल्या सर्व वीरांनी आपल्या कट्यारीने आपल्या अंगट्याचे रक्त काढून त्या

रक्ताने आपल्या कपाळावर टिका लावला. आणि इंग्रजांना आपल्या प्रदेशात पाऊलही ठेवू देणार नाही, अशी त्या सगळ्या वीरांनी शपथ घेतली. य़ा घटनेनंतर त्या ठिकाणाचे नाव 'टीकाबाली' असे प्रचारात आले.

सन १८३६ च्या शेवट च्या काळात राजा धनंजय भंजदेव मरण पावला. तरी युद्धाचा भार चक्रबिशोई व धौरा बिशोई यांनी आपल्या शिरावर घेतला. आणि इंग्रजांविरुद्ध गनिमी काव्याने युद्ध सुरुच ठेवले. आता कॅ. रसेलशी त्यांना लढायचे होते. रसेलची छावणी गंजम 'जिल्ह्यातील रसेलकुंड या स्थानी सन १८६९ पर्यंत होती. तरी त्याला फूलबनी क्षेत्रात पाऊल सुद्धा टाकता आले नाही.

चक्रबिशोईने आपल्या काकांशी विचारविनिमय करुन आपले मुख्य ठाणे टीकावाली येथून बिशीपाद येथे आणले. हे ठाणे चांगले सुरक्षित होते. चक्रबिशोई या ठाण्यावरुन आपल्या निवडक सैनिकांसह एखाद्या ससाण्यासारखी झडप अचानक इंग्रज सैन्यावर घालीत असल्याने बरीच वर्षे या मोहिमेत इंग्रजांना थोडेसुद्धा यश मिळाले नाही. चक्रबिशोईची शक्ती व सेनासंचालनाचे कौशल्य अप्रतीम होते. त्यामुळे त्याची कीर्ती चहुंदिशांना फैलावली. आसपासचे राजेसुद्धा त्याच्याकडे साहाय्यार्थ धाव घेत असत. १८४५ मध्ये त्याने अनुगुलचा राजा सोमनाथसिंहाला साह्य दिले होते.

चक्रबिशोईने सर्वसामान्य आदिवासी जनतेला सुद्धा इंग्रजाविरुद्ध लढण्याची प्रेरणा दिली व आपले सैन्य वाढविले. धुमसर, बोध आणि दासपल्ला येथील लढायांत सर्वसामान्य आदिवासी जनतेने चांगलाच पराक्रम गाजविला.

सन १८४७ मध्ये मेजर बॅंकफर्सन याने बोधच्या राजाला दगाबाजी करुन पकडल्याचे समजताच चक्रबिशोईने आपल्या साथीदारांसह त्याच्या छावणीवर अचानक हल्ला करुन सर्वांच्या देखत बोधच्या राजाला त्या छावणीतून सोडवून आणले. इंग्रजांचे सैन्य त्यामुळे दिङ्मूढ होऊन गेले. बॅंकफर्सनला चक्रबिशोई आपल्या छावणीवर हल्ला करील, असे वाटत नव्हते. तो सुद्धा या घटनेने चकित होऊन गेला.

सन १८५४ मध्ये कंपनी सरकारने कॅ. मॅक्लिन याला त्याच्या पलटणीसह फूलबनीमधला हा लढा दडपून टाकण्यासाठी खास करुन पाठविले. तो आपल्या सैन्यासह अनुगुल येथे जाण्यासाठी कुरुमाणिया दरीतून निघाला. त्या दरीतल्या घाटाची वाट इतकी चिंचोली होती. की, घोडा मागे वळविणे अवघडच होते. एका बिकट ठिकाणी चक्राबिशोईने त्या सैन्यावर अचानक हल्ला केला व त्या सैन्याच्या रक्ताने तो घाटमार्ग लालेलाल करुन टाकला. मॅक्लिनला मागे फिरावे लागले. घोडे मागे वळविणे कठीण असल्याने त्याच्या उरलेल्या सैनिकांनी घोड्याचे लगाम काढून त्या मार्गावरच टाकून

दिले. त्या पहाडावर लगामांचा मोठा ढीग तयार झाला. आदिवासींच्या कुई भाषेत लगामाचा पिकुडी असे म्हणतात. तेव्हापासून त्या पहडाचे नाव पिकुडी-पहाडी असे रुढ झाले. तेथून अत्यंत बिकट परिस्थितीत इंग्रज सैन्य चक्कापाद येथे आले. तेथल्या मुठ्ठा प्रधानाने मॅक्लिनला साह्य दिल्याने फूलबनी क्षेत्रात इंग्रजांचा प्रवेश झाला व सन १८८० पर्यंत ते सारे क्षेत्र कंपनी सरकारच्या ताब्यात आले. तरीही अधूनमधून इंग्रज सैन्यावर कन्धवीर हल्ले करीतच होते.

चक्रबिशोई कोणत्याही परिस्थितीत इंग्रजांच्या हाती जिवंतपणी पडले नाही. कन्धवीरांना गुप्तपणे मार्गदर्शन करीत अनेक वर्षे ते गनिमी काव्याने इंग्रजांशी लढत राहिले. त्यानंतर चक्रबिशोई कोठे व कसा लुप्त झाला, हे कोणीही सांगू शकले नाही. चक्राबिशोई केवळ वीर योद्धाच नव्हता, तर तो समाज - सुधारकही होता. कन्ध जातीत पूर्वापारपासून चालत आलेली नरबलीची प्रथा त्याने बंद करुन टाकली. ओरिसामधील हा महान क्रांतिकारक अदिवासींच्या स्वातंत्र्य - युद्धात ताऱ्याप्रमाणे चमकत राहिला. प्रस्थापितांनी मात्र त्याची दखल घेतली नाही. हे भारताचे दुर्दैव होय.



# २२. चिमासाहेब भोसले

कोल्हापूरचे राजे बुवासाहेब २९ नाव्हेंबर १८३८ रोजी वारले. त्यांना बाबासाहेब उर्फ तिसरे शिवाजी आणि चिमासाहेब हे दोन अल्पवयीन पुत्र त्यावेळी होते. त्याने आपल्या तंत्राने वागणारा रामराव देसाई याला कोल्हापूरचा मुख्य कारभारी नेमले. त्याने त्या इंग्रज एजंटाच्या सल्ल्याप्रमाणे कोल्हापूर राज्य कारभार सुरु केला. तोपर्यंत कोल्हापूर संस्थानातील सर्व किल्ल्यांवर शिबंदी असे. एक प्रमुख गडकरी असे. त्या इंग्रज एजंटाने १८४४ साली सर्व गडांवरील शिबंदी काढून टाकली. संस्थानचे दरबारी त्यामुळे नाराज झाले. लोकांच्या मनात कटुता निर्माण झाली. शिवकालापासून या गडकऱ्यांना किल्ल्यांच्या रखवालीच्या मोबदल्यात किल्ल्यांच्या परिसरातील जमिनी वहिवाटीस मिळाल्या होत्या. किल्ल्यांवरील शिबंदी काढून टाकल्याने गडकऱ्यांच्या जमिनी त्यांच्याकडून काढून घेण्यात आल्या. त्यामुळे सारे गडकरी संतप्त झाले व त्यांनी १८४४-४५ या काळात इंग्रज सरकारविरुद्ध बंड पुकारले. इंग्रज सरकारने या बंडाचा पूर्णपणे मोड केला. कोल्हापूरला इंग्रज पोलिटिकल सुपरिटेंडेंटची नेमणूक केली. त्याचा असा समज झाला की, विधवा राणीनेच हे बंडवाल्यांना फूस दिली होती. म्हणून तिला नेमणूक देऊन पुण्यास कायमच्या रहिवासास पाठविले. कंपनी सरकारची सत्ता झुगारुन देण्याचा आरोपही त्या राणीवर ठेवला. ती पुण्याला नजर कैदेतच होती. तिचा दरबारी सहायक दिनकरराव गायकवाड होता. असेही इंग्रजांना समजले व त्यालाही अशीर गडावर नजरकैदेत ठेवले. तेथेच तो निधन पावला.

बुवा साहेबांचे ज्येष्ठ पुत्र तिसरे शिवाजी उर्फ बाबासाहेब यांचा जन्म १६ डिसेंबर १८३० रोजी झाला होता व कनिष्ठ पुत्र शाहू उर्फ चिमासाहेब यांचा जन्म ८ जानेवारी १८३१ रोजी झाला होता. म्हणजे बुवासाहेबांच्या निधन समयी त्या दोन्ही पुत्रांचे वय सुमारे ८/९ वर्षांचे होते. २८ फेब्रुवारी १८३९ रोजी इंग्रज सरकारकडून बाबासाहेबांचे राज्यारोहण इंग्रज सरकारने जरी मान्य केले, तरी कोल्हापूर संस्थानचा कारभार प्रत्यक्ष अप्रत्यक्षरीत्या इंग्रज पोलिटिकल एजंटच्याकडेच ठेवला गेला. जनतेला हे पसंत पडले नाही. तिच्या मनात इंग्रजांविषयी कटुता घर करुन बसली. इंग्रज सरकारच्या तंत्राने कारभार चालविणे, म्हणजे त्याचे आधिपत्य मानणेच होय. त्यामुळेच कोल्हापूर संस्थानातील गडकऱ्यांचा उठाव झाला. तो इंग्रज सरकारने सैनिक कारवाई करुन दडपून टाकला. तरी अंतर्गत आग धुमसतच होती. अशीच बारा वर्षे उलटून गेली. बाबासाहेब वयात आले. तरीही इंग्रज सरकारने त्यांच्या हाती त्यांच्या संस्थानाचा

कारभार सोपविला नाही. बाबासाहेब स्वभावाने नेमस्त वृत्तीचे होते. पण चिमासाहेब मात्र जहाल होते.

सन १८५७ साली उत्तरेत इंग्रजांविरुद्ध एतद्देशीय राजे-रजवाडे व संस्थानिक तसेच सर्व सामान्य जनता आणि इंग्रजांच्या पलटणीतील भारतीय सैनिक यांनी मिळून व्यापक उठाव केला. त्याचे सूत्रधार विठूरचे नानासाहेब पेशवे होते. त्यांनी भारतातील सर्व राजेरजवाड्यांना उठाव करण्याविषयी पत्रे दिली. तसेच एक पत्र कोल्हापूरच्या राजालाही आले. पण त्याच्या हातात सत्ताच नव्हती व त्याचा स्वभाव नरम होता. परंतु चिमासाहेबाने ते पत्र वाचून काय करायचे ते मनोमन ठरविले. ते पत्र असे होते.

"कोल्हापूरच्या छावणीतील शिपायांनी बंड केले. त्यावेळी तुम्ही काहीही केले नाही. पण आता दुसरा उठाव होण्यासाठी तुम्ही काहीतरी केले पाहिजे. तुम्ही थोर आहांत याची जाणीव ठेवावी. इकडे आम्ही तळहातावर शिर घेऊन सज्ज आहोत. शिंदे सरकारची काही फौज आम्हाला सामील झाली आहे. परमेश्वर आम्हाला साह्य करील. आपण ही जास्तीत जास्त प्रयत्न करावेत. इंग्रजांच्या बाजूला असत्य आहे. त्यांचा हेतु चांगला नाही. हे पत्र महाराजांच्या हाती द्यावे. तसे जे करणार नाहीत व पत्र लपवून ठेवतील, त्यांना गाई ब्राम्हणांची शपथ आहे." तसेच ग्वाल्हेरहून ज्योतिराव उर्फ भाऊसाहेब घाटगे याला कोल्हापूरच्या राजाला उठावासाठी तयार करण्यासाठी पाठविण्यात आले. त्याने धाकटे राजे चिमासाहेब यांना ग्वाल्हेरहून आणलेली चांदीची मूठ आणि मौल्यवान पाते असलेली एक तलवार भेट दिली. तीवर नक्षीदार अक्षरात लेख कोरलेला होता. या घाटग्यानेच वरील पत्र आणणाऱ्या इसमाची भेट चिमासाहेबाशी घालून दिली होती. हे दोन्ही इसम पुण्याहून कोल्हापूरला आले होते. घाटगे याने तेथे नजरकैदेत असलेल्या सईबाई साहेबांची भेट घेतली व नंतरच तो आला होता.

बळवंतराव नाईक निंबाळकर हा सरदार सत्तावीसाव्या पलटणीत सारखी ये-जा करीत होता. त्याने पलटणीस उठाव करण्यास तयार केले. तो उठावाच्या आधीच ग्वाल्हेरला निघून गेला होता. त्याचे हे कृत्य उठावानंतर कॅ-ग्रँट ॲबटला समजले व त्याने बळवंतरावाची नेज व बुडावर ही दोन इनामी गावे जप्त केली. धाकटे राजे चिमासाहेब यांच्याकडूनही मोजक्या माणसांची ये-जा या पलटणीकडे गुप्तपणे सुरू झाली. मुंबईहून प्रसिद्ध होणारी 'वर्तमान दीपिका' व 'वृत्तसार' ही दोन मराठी वर्तमानपत्रे उत्तरेकडील उठवाच्या बातम्या आपल्या पत्रांतून देऊ लागली. त्याचा परिणामही या सैनिकांना उठावास उद्युक्त करण्यासाठी झाला.

३१ जुलै १८५७ च्या रात्री 'मारो फिरंगी को' अशा आरोळ्या ठोकीत सत्तावीसाव्या पलटणीतील २०० शिपायांनी इंग्रज सेनाधिकाऱ्यांच्या बंगल्यावर हल्ला केला. असे होईल, याची कुणकुण इंग्रजांना आधीच लागली होती. म्हणून ते आधीच रेसिडन्सीत निघून गेले होते. तेव्हा त्या सैनिकांचा नेता रामजी शिरसाट याने इंग्रजांचा खजिना लुटण्यास सैनिकांना सांगितले. सैनिकांनी खजिना लुटला. दारूगोळा हस्तगत केला. आणि छावणीचा बाजारही लुटला. ते क्रांतीवीर नंतर कोल्हापूर शहराकडे गेले. तेव्हा त्यांना शहराचे दरवाजे बंद असल्याचे दिसून आले. त्यांनी नंतर 'पागा' या स्थानी आपला तळ दिला. सकाळी ते सारे राजाच्या भेटीसाठी दरवाजाजवळ आले. पण राजाने दरवाजा उघडण्यास मनाई केली. सकाळी कर्नल मोघॅम याने सैनिकांनिशी त्यांच्यावर हल्ला केला. त्यात त्याला माघार घ्यावी लागली. रामजी शिरसाट सर्व सैनिकांसह सावंतवाडीकडे निघून गेला. सत्तावीसाव्या पलटणीतील काही सैनिकांना क.मोघॅमने पकडले. त्यापैकी आठ जणांना तोफेच्या तोंडी देण्यात आले. दोघांना फासावर चढविले. ५१ सैनिकांना गोळ्या घालून ठार केले. रामजी शिरसाट हा पावशी गावात आहे, असे समजताच इंग्रज सैनिक त्या गावी आले. त्यांची चाहूल लागताच शिरसाट जंगलात पळाला. सैनिकही त्याच्यामागे धावले. त्यांच्या गोळीबारात रामजी ठार झाला.

या उठावाचा सुत्रधार कोण याचा छडा क. ग्रँट अॅबटने लावला. तेव्हा २८ व्या तुकडीतील गोविंद दळवी या सैनिकाने घाबरून जाऊन खरे काय ते अॅबटला सांगितले. 'रामजी शिरसाट, इमामखान आदि सत्तावीसाव्या पलटणीतील नेते सुभेदार दाऊद बेग याच्या घरी जमत होते. त्यावेळी एक मराठा गडी पांढऱ्या घोड्यावर बसून शहरातून त्यांच्याकडे आणि त्यांच्याकडून शहराचे वारंवार जात-येत होता. त्याने धाकट्या राजाची संमती व मदत आपल्या कार्यासाठी मिळेल, असे आश्वासन त्या बंडखोरांना दिले होते' त्यानंतर इंग्रज सरकारने कर्नल ग्रँट जेकब याची नेमणूक कोल्हापूरला स्पेशल कमिशनर म्हणून केली. गोविंद दळवीकडून जे समजले, त्यावरून ग्रँट अॅबटच्या मनात या उठावामागे धाकटे राजे चिमासाहेब यांचा हात असावा, अशा दाट संशय निर्माण झाला. पण ठोस पुराव्या अभावी तो काहीच करू शकत नव्हता. कारण चिमासाहेब हा कोल्हापूरच्या जनतेत अत्यंत लोकप्रिय होता. त्याच्यावर नुसत्या संशयावरून कारवाई केली, तर जनतेच्या असंतोषाचा भडका उडेल व त्याला तोंड देणे आपणांस अशक्य होईल हे अॅबट जाणून होता. अॅबटनेच चिमासाहेबाबद्दल लिहिले आहे- ''धाकटा राजा चिमासाहेब मोठा धीराचा माणूस. धिप्पाड शरीरयष्टीचा व उत्साही जनतेचा लाडका असून शिवाजीचा खरा वंशज शोभतो.''

चिमासाहेबाने क्रांतिवीरांना आपल्या दूताकरवी आश्वासन दिले होते. पण इंग्रजांना साह्य करणाऱ्या आपल्या थोरल्या भावाविरूद्ध बंड करण्यास तो धजत नव्हता. त्यामुळेच चिमासाहेब उघडपणे बंडखोरांना साह्य देऊ शकत नव्हता. पण गुप्तपणे त्याने आपला पाठिंबा व मदत त्यांना दिली. क्रांतिकारकांनी राजाचा कारभारी, अप्पा फडणीस, तात्या मोहिते हा राजाचा खाजगी सेवक यांना आपल्याकडे वळवून घेतले. पन्हाळ्याचे गडकरीही त्यांना येऊन मिळाले ४ ऑक्टोबर १८५७ रोजी या ५०० क्रांतिकारकांनी रात्रीच्या वेळी कोल्हापूर शहरावर हल्ला केला. किल्ला व त्याचे दरवाजे भक्कम होते. कॅ. ग्रँड ॲबट त्याचे रक्षण करीत होता. क्रांतिकारकांनी किल्ल्याच्या तीन बाजूंनी लुटूपुटूची लढाई चालू ठेवून ॲबटला व त्याच्या सैन्याला गुंतवून ठेवले. काही क्रांतिकारकांनी किल्ल्याच्या चौथ्या बाजूच्या तटाला शिड्या लावून किल्ल्यात उड्या टाकल्या-राजवाडा ताब्यात घेतला. सर्व दरवाजांवर चौक्या बसविल्या. किल्ला क्रांतिकारकांच्या हाती गेल्याचे समजताच ले-होल बर्टनच्या तुकडीने एका दरवाजावर हल्ला चढविला. तोफ गोळ्यांनी तो उडविला. इंग्रज सैन्य आत शिरू लागताच क्रांतिकारकांनी तुफान गोळीबार सुरु केला. कॅ. थाम्पसन घोड्यासह खंदकात पडला. अनेक इंग्रज सैनिक या धामधुमीत कामाला आले. परंतु आणखी कुमक आल्याने क्रांतिकारक सैरावैरा पळू लागले. इंग्रजांनी आपल्या तोफा आत आणून किल्ला आपल्या ताब्यात घेतला.

कॅ. शेनिडरने राजांची भेट घेतली व राजाने क्रांतिकारकांना आपापली शस्त्रे खाली ठेवण्याचा हुकूम सोडला. ५ डिसेंबर १८५७ रोजी ते राजाला शरण आले. या उठावामागे धाकटे राजे चिमासाहेब यांची फूस होती, हे ॲबट जाणून होता. पण नुसत्या संशयावरुन चिमासाहेबाला पकडले, तर राजा नाराज होईल व कोल्हापूरची जनताही बंड करुन उठेल, हे तो जाणून होता. म्हणून ॲबटने वेगळाच मार्ग पत्करला. चिमासाहेबाला गुप्तपणे ताब्यात घेऊन राजाला न समजू देता, दूरच्या ठिकाणी नजरकैदेत ठेवावे, असे त्याने मुंबईच्या गर्व्हनरला कळविले. गव्हर्नरने संमती दिली.

ॲबटने चिमासाहेबाला भेटीस आपल्या रेसिडेन्सीत बोलावले. तेव्हा तो चिमासाहेबाला म्हणाला, "तुम्हाला या बंडाचे गुप्त नेते काही लोक समजतात. यावर तुमचे काय मत आहे?" त्यावर चिमासाहेब ताडकन म्हणाले, "मला यातले काहीच माहीत नाही व यात माझा काहीही संबंध नाही" ही बातमी कोल्हापूरात वाऱ्या सारखी पसरली व सारे लोक रस्त्यावर आले. चिमासाहेब राजवाड्याकडे निघाले, तेव्हा रस्त्यात दुतर्फी जमलेल्या जनसमुदायाने त्यांचा जयजयकार केला. काही ठिकाणी सुवासिनींनी

त्यांना ओवाळले. यावरुन ॲबटची खात्री झाली की, चिमासाहेब जनतेचा लाडका व बंडखोरांचा पाठिराखा होता. त्याने चिमासाहेबांना कोल्हापूरमधून दूरवर नेऊन ठेवण्याची योजना आखली.

मे १८५८ च्या सुरवातीस वाघोटणे बंदरात अरबी समुद्रात एक जहाज ॲबटने नांगरुन ठेवले. कोल्हापूरच्या जनतेचा ते कळूच दिले नाही. सरकारी परवान्याशिवाय कोणालाही शहराबाहेर जाऊ द्यायचे नाही, असा कडेकोट बंदोबस्त केला. राजालाही त्याची कुणकुण लागू दिली नाही. नंतर रात्री चिमासाहेबांना पोलिटिकल सुपरिटेंडेंटने रेसिडेन्सीत बोलावून घेतले. त्यांना गव्हर्नरचा आदेश वाचून दाखविला आणि लगेच त्यांना अटकेत ठेवले. नंतर त्याचे १६ नोकर रेसिडेन्सीत आणले गेले. चिमासाहेबांसह त्या सर्वांची रवानगी रातोरात वाघोटणे बंदरी करण्यात आली. बोट मुंबईकडे निघाली व तेथून कराचीला गेली. सिंध प्रांताच्या कमिशनरला यासंबंधी आधीच कळविले होते. त्याने चिमासाहेबांना त्यांच्या नोकरांसह ताब्यात घेतले आणि कराची येथे नजरकैदेत ठेवले. त्यांचा खर्च कोल्हापूरच्या तिजोरीतून होत होता. अशा रीतीने कपटी इंग्रजांनी या अत्यंत स्वाभिमानी व स्वातंत्र्यप्रिय राजपुत्राला कुजत ठेवले. अखेरीस अकरा वर्षांनंतर दि. १५ मे १८६९ रोजी या राजपुत्राने कराची येथे निधन झाले. त्याचा कारभारी अण्णा चिटणीस आणि खाजगी सेवक तात्या मोहितेलाही जन्मठेपेची शिक्षा देण्यात आली होती.



# २३. राणी जिन्दन कौर

महाराजा रणजितसिंह यांचे निधन २६ जून १८३९ रोजी झाले. त्यांच्यानंतर त्यांचा मोठा मुलगा खरकसिंह गादीवर आला. परंतु तो नोव्हेंबर १८४० साली मरण पावला. नंतर त्यांचा दुसरा पुत्र नौनिहालसिंह याने राज्याची धुरा सांभाळली. त्याचेही अपघाती निधन झाले. खरकसिंहानंतर त्यांचा तिसरा मुलगा शेरसिंह गादीवर बसला. परंतु पंजाबमधील शिख सरदार त्याच्याबद्दल असंतुष्ट होते. तेव्हा त्याने शिख सेनेचा पाठिंबा मिळविला. आपले आसन स्थिर करण्यासाठी त्याने इंग्रजांची मदत घेतली. हे शिख सरदारांना आवडले नाही. सप्टेंबर १८४३ मध्ये त्याची कोणीतरी हत्या केली. त्यानंतर पंजाबमध्ये शिख सैन्याचे प्राबल्य वाढले. ते सैन्य आपल्याला जनतेचे प्रतिनिधी मानू लागले व त्या सैन्याने रणजिसिंहाचा सर्वात छोटा पुत्र दलीपसिंह याला गादीवर बसविले. त्यावेळी त्याचे वय अवघे पाच वर्षांचे होते. म्हणून शिख सेनाधिकाऱ्यांनी त्याची आई जिन्दन कौर (जिन्दाँ कौर) हिला त्याची संरक्षिका बनविले. हळूहळू राज्याची सूत्रे जिन्दन कौरचा भाऊ जवाहरसिंह याच्या हाती आली व तो पंजाब राज्याचा वजीर बनला. जिन्दन कौरचा विश्वासू सरदार मंत्री बनला. जवाहरसिंहाने आपल्या राज्याची स्थिती सुदृढ बनविण्यासाठी इंग्रजांशी मैत्रीचे संबंध जुळविले त्यामुळे शिख सैन्यात असंतोष माजला व जवाहर सिंहाचा खून केला गेला. त्यानंतर लालसिंह हा मंत्री व तेजसिंह शिख सैन्याचा सेनापती बनला. शिख सैन्याचे वर्चस्व राज्यात वाढल्यामुळे जिन्दन कौर आणि लालसिंह काळजीत पडले. त्यांनी इंग्रजांना मिळून सैन्याचे वर्चस्व कमी करण्याचा प्रयत्न केला. त्या काळापर्यंत इंग्रजांचे राज्य सतलज नदीपर्यंत वाढले. होते. तो प्रदेश पंजाबचा होता. शिख सैन्य तो प्रदेश आपल्या ताब्यात घेण्यासाठी सतलज नदी उतरुन सरकले. तेव्हा ग.ज. लॉर्ड हार्डिंजने पंजाब राज्याविरूद्ध युद्धाची घोषणा केली. शिख सैन्याने इंग्रजांशी प्राणपणाने झुंज दिली. त्या युद्धात १०,००० शिख सैनिक ठार झाले. शिखांचा पराभव झाला. १ मार्च १८४६ रोजी लाहोर येथे तह झाला. त्यात सतलजच्या दक्षिणेकडील प्रदेश व बियास व सतलज या नद्यांमधील प्रदेश इंग्रजांना द्यावा लागला. शिख सैन्य कमी करण्यात आले. आणि हेन्री लारेन्स लाहोर येथे पंजाब राज्याचा रेसिडेंट बनला. त्यानंतर इंग्रजांनी संपूर्ण पंजाबचा सुपीक प्रदेश हस्तगत करण्यासाठी कारवाया सुरु केल्या. त्या काळात पंजाबचे वार्षिक उत्पन्न ५ लाख पौंड होते. इंग्रजांची फौज आता लाहोरमध्ये तैनात करण्यात आली. तिच्या खर्चासाठी लाहोर दरबाराने दरवर्षी २२ लाख रुपये द्यावे, असे त्या तहान्वये ठरले. हा तह झाल्यानंतर लाहोर दरबारच्या

कारभारात इंग्रजांचा हस्तक्षेप सुरू झाला. हे सारे स्वाभिमानी राणी जिन्दन कौर हिला असह्य होते.

जिन्दन कौरचा विवाह महाराजा रणजित सिंह यांच्याशी सन १८३५ मध्ये झाला. ती रणजितसिंहाची सर्वात धाकटी व आवडती राणी होती. तिचे सौंदर्यच आकर्षक होते. नोव्हेंबर १८३८ मध्य तिच्या पोटी दलीपसिंहाचा जन्म झाला होता. रणजितसिंहाच्या निधनाच्या वेळी तो ७/८ महिन्यांचा होता. तो रणजिसिंहाचा सातया पुत्र होता. १८४३ पासून राणी जिन्दन कौर दलीपसिंहाची संरक्षिका म्हणून आपल्या राज्याचा कारभार पाहू लागली. राज्यकारभार करावयाचा तर दरबारातील अनेक लोकांशी संबंध येणारच. विचार-विनिमयासाठी आवश्यकच असते. इंग्रजांनी त्याला वेगळे रूप देऊन राणी जिन्दन कौरची बदनामी सुरू केली. तिच्यावर तिच्या विरोधकांकडून लांच्छनास्पद आरोप करविले. तिचे आचरण अनैतिक आहे, असा प्रचार करविला. हे सारे त्यांनी पडद्याआड राहूनच केले. तिचे काही लोकांशी अनैतिक संबंध आहेत, अशी अफवा पसरविली. या साऱ्या बनावट व कपटी वृत्तीने केलेल्या गोष्टी होत्या. कशासाठी? तर राणीला बदनाम करून, तिचा प्रभाव लोकमानसातून नष्ट करून राज्यात अराजक माजविण्यासाठी व ते कारण दाखवून पंजाब राज्य इंग्रज सरकारच्या राज्यात विलीन करुन घेण्यासाठी. ही इंग्रजांची नीती.

जे. डी. कनिंघम याने शिख-इंग्रज युद्धे स्वतः बघितली होती. तो प्रामाणिकपणे आपले विचार व्यक्त करीत असे.-खरे काय, ते स्पष्टपणे बोलत असे. म्हणून त्याला कंपनी सरकारने नोकरीतून बडतर्फ केले होते- त्याने 'शिखांचा इतिहास' हा ग्रंथ लिहिला. त्यात तो राणी जिन्दन कौर हिच्याविषयी लिहितो, "महाराणीने जनतेसमोर शालीनतेचे उल्लंघन कधीही केले नाही. दरबाराचे रीतिरिवाज तिने परक्यांच्या उपस्थितीत निष्ठेने पाळले. राणीच्या खाजगी जीवनाविषयी निंदनीय अफवा पसरविणारे आपल्या कमकुवत मनाचे प्रदर्शन करतात व त्यामुळेच ते बदनाम झालेले आहेत...... इंग्रजांचे अशिक्षित व अप्रतिष्ठित हिंदुस्थानी नोकर आपल्या मालकांना खुश करण्यासाठी त्यांच्या प्रतिस्पर्धांना बदनाम करण्यात पटाईत असतात. ते चापलुसी करतात. त्यांची अशी धारणा असते की, इंग्रज आपली प्रशंसा व इतरांची बदनामी ऐकून आनंदी होतात... लाहोरमधील अशाच अफवा उठविणाऱ्यांनी राणीच्या चैनविलासाच्या व अनैतिक संबंधांच्या खोट्या गोष्टी रचून त्या इंग्रजांना सांगून खुश करीत असतात. इंग्रज अधिकाऱ्यांनाही तेच हवे असते."

राणी जिंदा कौरने आपल्या लोकांना सांगितले की, "धोकेबाज इंग्रजांच्या शब्दांवर विश्वास ठेवणे योग्य नाही. आपले शब्द फिरविण्यात, दिलेली वचने विसरून जाण्यात ते पटाईत आहेत." तेव्हा रेसिडेंट आणि त्याच्या खुशमस्कऱ्यांनी राणीची बदनामी करण्याचे जणू सत्रच सुरु केले. तिच्याविषयी लांच्छनास्पद उठविण्यात कसूर केली नाही. राणीने आपल्या सैनिकांना व दरबारी लोकांना आवाहन केले," आपल्या पूर्वजांनी परकीय आक्रमकांना-सिकंदर, महंमद घोरी, बाबर, अब्दाली यांन-कसे अडविले होते, परतवून लावले होते, याची आठवण ठेवा. आणि आताच्या परिस्थिती भान ठेवून वागा." तिने त्यांना स्वातंत्र्यरक्षणासाठी उद्युक्त केले. ती सत्कार-समारंभ घडवून आणायची. धार्मिक सत्संग करायची, ब्राम्हणांना आदर करायची. गरीबांना व अडचणीत आलेल्यांना मदत करायची. पंजाब एक स्वतंत्र व बलवान राज्य होते, याचे सर्वांना स्मरण करून द्यायची. तिच्या अशा वर्तनाने सारा पंजाब तिच्या पाठीशी उभा राहिला.

रेसिडेंट हेन्री लारेन्सला हे सहन झाले नाही. त्याने राणीला एक मानहानिकारकपत्र दिले. "तुमचे १०/१०, १५/१५ सरदारांना एकत्र करून भेटणे, आपल्या महालात ब्राम्हणांचे पाय धुणे, हे सारे स्त्रियाच्या मर्यादांचे उल्लंघन करणारे आहे. शाही शिष्टाचाराविरूद्ध आहे. दाने द्यायची तर महिन्याच्या पहिल्या दिवशीच द्यावी. इतर राण्याप्रमाणे पडद्याच्या आड राहावे." राणीने त्याला सडेतोड उत्तर दिले, "महाराजा दलीपसिंह स्वतंत्र आहेत. तशीच मी सुद्धा स्वतंत्र आहे. मी आणि महाराजा ज्या दोस्तीची फळे आज प्राप्त करीत आहोत, ती दोस्ती महाराजा रणजितसिंह यांनी कंपनी सरकारशी केलेली होती. माझ्या वैयक्तिक बाबी संबंधी सल्ला देण्याची तुमची हिंमत कशी झाली?

हेन्री लारेन्सने नंतर एक डाव टाकला. ज्या दगाबाज तेजसिंहाने शिखांच्या पहिल्या युद्धात मदत केली होती, त्याला सन्मानित करण्याच्या समारंभाचे आयोजन केले. त्या समारंभात महाराजा दलीपसिंहाला त्या दगाबाज तेजसिंहाला कपाळावर कुंकुमतिलक लावण्यास सांगण्यात आले. कारण तेजसिंहाला सियालकोटच्या राजाचा किताब द्यायचा होता. तेजसिंह महाराजा समोर आला, तेव्हा दलीपसिंहाने त्याला कुंकुमतिलक लावला नाही व दोन्ही हात छातीवर बांधून संतप्त नजरेने हेन्री लारेन्सकडे पाहिले. त्यामुळे सगळे उपस्थित लोक आश्चर्यचकित झाले. स्वाभिमानी शिखांना आपल्या महाराजांचा अभिमान वाटला. अखेर शिखांचे पुजारी निधानसिंह यांनी तेजसिंहाच्या माथ्यावर तिलक लावला. हेन्री लारेन्स जाणून चुकला की, महाराजाला ही शिकवण त्याची आई जिन्दन कौर हिनेच दिलेली आहे.

१८४५-४६ मध्ये रेसिडेंटने शीख सरदारांमध्ये फूट पाडली. सतलजच्या दक्षिणेकडील प्रदेश शिखांचा होता. तो हस्तगत करण्यासाठी शिख सैन्य सतलज नदी पार करुन दक्षिणेला आले. तेव्हा इंग्रज सैन्य युद्धाच्या तयारीतच होते. दोन्ही सैन्यात घनघोर युद्ध झाले. त्यात शिखांचा पराभव झाला. त्यात महाराजा दलीपसिंहाने कंपनी सरकारला दीड कोटी रुपये द्यावे असे ठरले. तेवढा पैसा पंजाबच्या खजिन्यात त्यावेळी नव्हता. म्हणून इंग्रजांनी शिख राज्यातले काश्मीर गुलाबसिंह या राजपूत सरदाराला त्याच्याकडून एक कोटी रुपये घेऊन देऊन टाकले. उरलेले ५० लाख रुपये दलीपसिंहाने नंतर द्यावे, असे ठरले.

हा तह राणी जिन्दन कौर व दीवाण लाल सिंह यांना पसंत नव्हता. तेजसिंह व गुलाबसिंह यांनी इंग्रजांना मदत केली होती. त्याची चीड येऊन लालसिंहाने आपल्या सैन्यासह गुलाबसिंहावर चढाई केली. इंग्रज सैन्य गुलाबसिंहाच्या मदतीला धावून आले. लालसिंहाचा पराभव झाला व पंजाब दरबारावर इंग्रजांनी दुसरा तह लादला. त्यात दलीपसिंहाला इंग्रजांनी पदच्युत केले. राणीचे महाराजाची संरक्षिका हे पदही नष्ट झाले. दलीपसिंहाला ५० हजार रुपये पेन्शन देऊन इंग्लंडला शिकण्यासाठी (!) पाठवून दिले. दगाबाज शीख सरदारांकरवी राणी जिन्दन कौर हिला तिचे केस धरुन फरफटत राजवाड्याबाहेर काढण्यात आले. व तिला लाहोर पासून २५ मैलावरील शेखपुरा येथे नजर कैदेत ठेवण्यात आले. तिला दरवर्षी दीड लाख रुपये पंजाबच्या तिजोरीतून देण्याचे ठरले.

शेखपुऱ्याहूनही तिला फिरोजपूरला पाठविले. तिचा आपल्या प्रजेवरील प्रभाव पाहून तिला पंजाबात राहू देणे धोक्याचे आहे. या विचाराने कंपनी सरकारने तिची रवानगी उत्तरप्रदेशात बनारस येथे केली.

बनारसला पाठवितांना तिची तपासणी लज्जास्पद रीतीने इंग्रजांनी करविली. तिच्या अंगावरची वस्त्रेही तपासली. तिने कंपनी सरकारला तिचा मुलगा तिच्यापासून हिसकावून घेतल्याबद्दल दोस्ती दाखवून पंजाब राज्य हडप केल्याबद्दल ऑगस्ट १८४७ मध्ये तीन करुणाजनक पत्रे पाठविली. ती कोणाही विचारी माणसाच्या हृदयाला पाझर फोडणारी होती. पण निष्ठूर व दगाबाज कंपनी सरकारने त्यांची मुळीच दखल घेतली नाही. तिचे ९ लाख रुपयांचे दागिनेही इंग्रज सरकारने जप्त केले.

बनारसला ती होती तो पर्यंत तिला दरवर्षी १० हजार रुपये मिळत होते. ५० हजार पौंड उत्पन्नाच्या प्रदेशाबद्दल त्या प्रदेशाच्या मालकिणीला फक्त १० हजार रुपये? सुसंस्कृत म्हणविणाऱ्या इंग्रजांची ही नीती! राणी जिन्दन कौर अखेर निराश होऊन

मोलकरणीच्या वेषात नेपाळात काठमांडूला निघून गेली. साध्याशा घरात सामान्य स्त्रीप्रमाणे बैरागीण बनून राहू लागली. कंपनी सरकारने तिचे १० हजारांचे पेन्शनही बंद करुन टाकले. राणीने धर्म - कर्मात आपले मन रमविले. तेथे एक मंदिरही बांधले. सध्याही ते मंदिर तेथे आहे.

दलीपसिंहाचे इंग्लंडात शिक्षण चालू असतांना त्या बहकावून खिस्ती धर्माची दीक्षा देण्यात आली. राणी जिंदन कौर हिने आपल्या मुलाजवळ राहण्याची परवानगी राणी व्हिक्टोरियाकडे मागितली. तिला तिच्या मुलाकडे इंग्लंडमध्ये केनजिंग्टन येथे पाठविण्यात आले. तेथे तिने मुलासह भारतात राहण्याची परवानगी मागितली; पण तिला तशी परवानगी मिळाली नाही. नेपाळमध्ये असतांना तिने आपल्या देशाच्या स्वातंत्र्यासाठी प्रयत्न करण्याबद्दल नेपाळच्या हिंदू राजाला अनेकवेळा विनंती केली होती. हिंदुस्थानातील हिंदू राजांनाही तिने तशी अनेक पत्रे पाठविली. पण हिंदुस्थानातील सारे हिंदु-मुसलमान संस्थानिक राजे इंग्रज सरकारच्या ताटाखालची मांजरे बनली होती. ती इंग्रजांशी लढण्याइतके धैर्यवान थोडीच होती. राणी जिन्दन कौरचे ते अरण्यरुदनच ठरले.

इंग्लंडमध्येच केनजिंग्टन येथे या महान राणीचे १ ऑगस्ट १८६३ रोजी निधन झाले. दलीपसिंहाने इंग्रजांच्या देखरेखीखाली हिंदुस्थानात येऊन तिच्या अस्थि गोदावरी नदीत विसर्जित केल्या. त्याला पंजाब आणि उत्तरप्रदेशात प्रवेश करण्यास इंग्रज सरकारने बंदी घातली होती. खिश्चन झाल्याबद्दल तो वयात आल्यावर पस्तावला होता.

राणी जिंदा कौर ही आपल्या देशातली पहिली स्वतंत्रता - सेनानी होती. पंजाबची ती वाघीणच होती. इंग्रजांची कट्टर दुश्मन होती. श्रीमंत राज्याची राणी असूनही ती स्वाभिमानाने जगली. पण इंग्रजापुढे कधीही झुकली नाही. महाराजा रणजितसिंहाचा वंशच तिच्या नंतर नष्ट झाला. केवढा तिचा हा त्याग! धन्य ती राणी जिन्दन कौर! भारताच्या स्वातंत्र्य - लढ्यातील ती पहिली तेजस्वी शलाका होती.

❖ ❖ ❖

# २४. मूलराज

महाराजा रणजितसिंहाचे निधन २७ जून १८३९ रोजी झाले व पंजाबचे समृद्ध राज्य पोरके झाले. त्या काळात पंजाबच्या शिख राज्यातील मुलतानचा सुभेदार सावन्तमल हा होता. मुलतान सुभ्याचा कारभार त्याने उत्तम रीतीने चालविला होता. पण १८४४ साली त्याचेही निधन झाले व मुलतानची सुभेदारी त्याचा मुलगा मूलराज याच्याकडे आली.

रणजितसिंहाच्या निधनानंतर इंग्रजांनी पंजाबच्या राज्यकारभारात हस्तक्षेप सुरु केला. शिख राज्य तर नेताविहीन झाले होते. इंग्रजांनी कुरापत काढून शिखांशी युद्ध केले. त्यात शिखांचा पराभव झाला. त्यात सतलजच्या दक्षिणेकडील प्रदेश इंग्रजांच्या ताब्यात आला. लाहोरला शिख दरबारात हेन्री लोरन्स याची नेमणूक कंपनी सरकारने केली. त्याच्या देखरेखीखाली शिख राज्याचा कारभार सुरु झाला. मुलतानच्या सुभेदारीच्या उत्तराधिकाराबद्दल त्याने मूलराजकडे ३० लाख रुपयांची मागणी केली. मूलराज हा स्वाभिमानी व शूर होता. "मी सुभेदार झालो, तो माझ्या वंशपरंपरेने. तेव्हा इंग्रज रेसिडेंटला ३० लाख रुपये मी का म्हणून द्यावे?" असा विचार करुन त्याने ती मागणी फेटाळून लावली.

मुलतानच्या सुभ्यातून लाहोर दरबारला १९ लाख रुपये दरवर्षी दिले जात होते. ही प्रथा रणजितसिंहाच्या कारकिर्दीपासून सुरु होती. मूलराजने ३० लाखांची मागणी फेटाळल्यानंतर हेन्री लारेन्सने नवा प्रस्ताव मूलराजकडे पाठविला. त्यात म्हटले होते की, "मूलराजने चालू वर्षी १९ लाखांऐवजी २५ लाख रुपये द्यावे." पुढच्या वर्षापासून दरवर्षी २० लाख रुपये देत जावे," हा प्रस्ताव सुद्धा मूलराजने फेटाळून लावला व आपल्या सुभेदारीची त्यागपत्र लाहोर. दरबारकडे पाठवून दिले. हेन्री लारेन्सने ते त्यागपत्र मंजूर केले नाही. पण १८४८ मध्ये त्याच्या जागी क्युरी हा इंग्रज रेसिडेंट आला. त्याने मूलराजचे त्यागपत्र मंजूर केले.

क्युरीने इंग्रज - धार्जिणा सरदार खानसिंह मान याची नेमणूक मुलतानला सुभेदार पदी केली. आपले सहकारी वान्स एग्न्यू व अंडरसन यांच्यासह क्युरीने खानसिंह मान याला मुलतान येथे सुभेदारीची सूत्रे घेण्यासाठी पाठविले. मूलराजने शांत चित्ताने खानसिंह मान याच्याकडे सुभेदारीचा सर्व कारभार सोपविला. ती तारीख १९ एप्रिल १८४८ ही होती. त्याच दिवशी इंग्रज सरकारवर असंतुष्ट असलेल्या शिख सैनिकांनी

वान्स एग्न्यू व अंडरसन या दोघा अधिकाऱ्यांची हत्त्या केली. या हत्त्यांमागे मूलराजचा हात असला पाहिजे, असा संशय रेसिडेंट क्युरी याला आला. मुलतान मधील शिख सैनिकांनी मूलराजला इंग्रजांविरुद्ध उठाव करण्यासाठी प्रवृत्त केले. त्याने शिखांना आपल्या धर्मरक्षणासाठी आवाहन केले व सशस्त्र उठावास तो सिद्ध झाला. त्याच वेळी मुलतानमध्ये खरे तर स्थानिक उठावास सुरुवात झाली.

परंतु इंग्रजांनी त्या उठावाकडे जाणून - बुजून विशेष असे लक्ष दिले नाही. त्यांना वाटत होते की, "पंजाबमध्ये असेच अनेक उठाव व्हावे. म्हणजे पंजाबातील राज्यकारभारात अव्यवस्था माजली जाऊन हा संपूर्ण समृद्ध प्रांत आपल्याला हस्तगत करण्यास आयतेच कारण सापडेल व नंतर पंजाबचे राज्य आपल्या राज्यात सहज विलीन करता येईल." आणि तसेच झाले. पेशावर, बन्नू आणि पंजाबचा वायव्य भाग या प्रदेशात ही इंग्रजांविरुद्ध उठाव सुरु झाले. या उठावांमागे रणजिसिंहाची लहान राणी जिन्दन कौर हिचाच हात आहे, असा ग्रह इंग्रजांचा झाला. कारण सारी शिख प्रजा राणी जिन्दन कौर हिला मानीत होती.

रेसिंडेट क्युरीने एक पत्र पाठवून गव्हर्नर जनरलला कळविले की, "मूलराज, सगळे शिख सैन्य आणि पंजाबचा जनतेची अशी इच्छा दिसते की, राणी जिन्दन कौर हिने पंजाबातील उठावांची सूत्रे स्वतःहाती घ्यावी." राणी जिन्दान कौर पंजाबच्या उठावाच्या केंद्रस्थानी राहील. तेव्हा जाणून- बुजून राणीवर खोटेनाटे आरोप ठेवून तिला बदनाम करता येईल. त्यामुळे शिखांच्या भावना भडकतील व सारे पंजाब राज्य उठाव करुन उठेल. त्यानंतर पंजाबात अराजक माजले आहे, हे कारण दर्शवून पंजाबचे समृद्ध राज्य आपल्या राज्यात सामील करुन घेता येईल, असा कयास इंग्रज अधिकाऱ्यांचा होता. तर डलहौसीचे धोरणही तसेच होते.

रेसिडेंट क्युरीने दुसऱ्या एका पत्राने गव्हर्नर जनरलला कळविले की, "हे खरे आहे की, मूलराज, सारे शिख सैन्य आणि शिख जनता यांना वाटते की राणी जिन्दन कौर हिनेच उठावाच्या केंद्रस्थानी राहावे. पण याला कसलाही पुरावा नाही."

हिंदुस्थानातील इंग्रज सैन्याचा प्रमुख सेनापती ह्यू गफने मुलतानचा उठाव झाल्यानंतर काही दिवसांनी लेफ्ट. एडवर्ड याला सैन्याची एक तुकडी देऊन मुलतानवर आक्रमण करण्यास पाठविले. त्यामुळे संपूर्ण पंजाब राज्यात विद्रोहाच्या ज्वाला भडकल्या. त्या काळात हजाराचे शिख सुभेदार छत्तरसिंह यांचा पुत्र शेरसिंह हा लाहोर दरबारचा सेनापती होता. रेसिडेंट क्युरीने त्याला मूलराजचा बीमोड करण्यासाठी त्याचे

शिख सैन्य घेऊन मुलतानला पाठविले. शेरसिंह मुलतानला पोचला, तेव्हा त्याचे शिख सैन्य मूलराजच्या शिख सैन्याला जाऊन मिळाले व तो सुद्धा मूलराजला साह्य करु लागला. अशा प्रकारे मूलराजचा स्थानिक उठाव राष्ट्रीय आंदोलनात सामील झाला. त्याने स्वातंत्र्य युद्धाचे रुप धारण केले. ते कळताच ग. ज. डलहौसीने शिखांशी युद्ध करण्याची घोषणा केली.

सेनाप्रमुख ह्यु गफने रावी नदी पार करुन चिनाब नदीकाठी असलेल्या रामनगर जवळ शेरसिंहाच्या सैन्यावर हल्ला केला. पण त्या लढाईत कोणाचाही विजय झाला नाही. ते युद्ध अनिर्णयात्मक ठरले. जानेवारी १८४९ मध्ये ह्यू गफचे सैन्य आणि शिख सैन्य यांच्यात चिलियानवाला या गावाजवळ भीषण युद्ध झाले. ह्यू गफच्या सैन्यापेक्षा शिख सैन्य कमी असले, तरी त्या सैन्याने अदम्य उत्साहाने गफच्या सैन्याशी मोठ्या पराक्रमाने सामना दिला. त्यात २३ हजार इंग्रज सैनिक जखमी झाले. त्यातले काही हजार सैनिक रणांगणावरच मारले गेले. इंग्रज सैन्याचे भयंकर नुकसान झाले. तसेच २६ इंग्रज अधिकारी ठार झाले व ६६ अधिकारी जखमी झाले. २२ जानेवारी १८४९ मध्ये उरलेल्या इंग्रज सैन्याने मूलराजचा पराभव केला व त्याने मुलतानच्या किल्ल्यात आश्रय घेतला. तेव्हा गफने किल्ल्याला वेढा दिला. अखेर मूलराजला शरणाखती पत्करावी लागली आणि मूलराजला अटक करण्यात आली. शिखांचा पूर्णपणे पराभव झाला. १२ मार्च १८४९ रोजी शेरसिंह, छत्तरसिंह व अन्य शिख सरदारांनीही आत्मासमर्पण केले.

मूलराजवर विद्रोहाचा व राजद्रोहाचा आरोप ठेवून सैनिकी न्यायालयात खटला दाखल करण्यात आला. त्याचा निकाल लागून मूलराजला आजीवन कारावासाची शिक्षा देण्यात आली.

मूलराजवर आणि शिख राज्यावर आपण अन्याय केला आहे, असे काही प्रामाणिक इंग्रज इतिहासकारांचे मत होते. कारण त्या आधीही इंग्रजांना शिखांचे सहकार्य मिळत होतेच. २९ मार्च १८४९ रोजी ग. ज. डलहौसीने पंजाब आपल्या साम्राज्यात सामील करुन घेतला. त्याचे हे कृत्य अन्याय पूर्ण होते. ते राज्य सामील करुन घेण्याचा नैतिक अधिकार डलहौसीला नव्हता. असेही काही इंग्रज इतिहासकारांनी लिहून ठेवले आहे. एक इंग्रज अधिकारी बेल हा म्हणतो की, "पंजाब इंग्रज साम्राज्यात सामील करुन घेणे, हे विश्वासाविरुद्ध एक हिंसात्मक प्रतिज्ञा भंगाचेच उदाहरण आहे."



# २५. सिदो. कान्हू.

कंपनी सरकारला बंगाल, बिहार, ओरिसा प्रांतांचे दिवाणीचे हक्क बादशहा शाहआलमकडून मिळाल्यानंतर कंपनीच्या एजंटांनी या प्रांतातील शेतकऱ्यांकडून मोगलांनी ठरवून दिलेल्या साऱ्याच्या दुप्पट सारा वसूल करण्यास आरंभ केला. या जबरदस्त साऱ्यामुळे शेतकरी वर्ग त्यातल्या त्यात आदिवासी शेतकरी फार हवालदिल झाले. बिहार प्रांताच्या दक्षिण भागात संथाल या आदिवासी लोकांची दाट वस्ती होती. सारा वसुली करणारे ठेकेदार त्यांच्यावर अत्याचार करू लागले. या भागात काही इंग्रजांनी जमिनी ताब्यात घेऊन त्या जमिनीत ते संथाल शेतकऱ्यांमार्फत निळीचे पीक घेऊ लागले. पीक तयार झाल्यावर फारच कमी किंमत ते संथाल शेतकऱ्यांना देत असत व निळीशिवाय दुसरे पीक घेऊ नये अशी सख्त ताकीद त्यांनी या गरीब शेतकऱ्यांना दिली होती. त्यामुळे या शेतकऱ्यांना उदरनिर्वाह करणेही अशक्य होऊन बसले. त्या काळात या भागातून रेल्वेमार्ग तयार करण्याचे काम सुरू झाले. त्या कामावर जाणाऱ्या संथाल स्त्री-पुरुषांचे धर्मांतर ख्रिस्ती पादरी त्यांच्यावर दबाव आणून करीत असत. त्यामुळे संथाल जातीचे स्त्री-पुरुष धर्मभ्रष्ट होऊ लागले. या तिन्ही कारणांनी संथाल जमातीत इंग्रज सरकारविरूद्ध मोठ्या प्रमाणात असंतोष फैलावला होता. त्यातूनच जून १८५६ मध्ये संथाल लोक इंग्रज सरकारविरूद्ध लढा देण्यास उद्युक्त झाले.

बिहारमधील राजमहल जिल्ह्यातील भगनाडीह या गावी 'चुलू' नावाचा संथाल राहात होता. त्याचे चार पुत्र होते. १. सिदो. २. कान्हू ३. चांद ४. भैरो. या चौघांनी संथाल लोकांत असा प्रचार सुरु केला की, आपल्या कुलदेवतेने आम्हांला स्वातंत्र्य प्राप्तीसाठी साऱ्या संथाल जातीचे नेतृत्व करण्याचा आदेश दिला आहे व भगवान शंकरांनीही तसा साक्षात्कार आम्हाला घडविला आहे. इंग्रज सरकारशी लढा देऊन सर्व संथालांनी स्वातंत्र्यप्राप्ती करुन घ्यावी. त्यासाठी सर्व संथाल स्त्री पुरुषांची एकजूट होणे जरूरीचे आहे. संथाल जाती निरक्षर व देवभोळी. त्या जातीच्या लोकांचा या चारही भावांवर आदरपूर्ण विश्वास बसला व या चौघा भावांनी संथालांचे मोठे सैन्य उभारले. प्रत्येक संथालाजवळ धनुष्यबाण, तलवार, भाला व परशु (कुऱ्हाड) ही परंपरागत हत्यारे होती. ती हत्यारे चालविण्यात, नेमबाजी करण्यात ते तरबेज होते.

३० जून १८५६ रोजी दहा हजार संथाल वीर भगनाडीह या सिदोकान्हूच्या गावी एकत्र जमले. त्यांनी सिदोला आपला नेता, राजा म्हणून घोषित करून कान्हूला आपला सेनापती म्हणून निवडले. सिदोने जाहीर केले की, "आता आपले संथाल राज्य स्थापन

झाले आहे. दुसऱ्या कोणत्याही राजाचा वा सरकारचा आमच्यावर हक्क नाही. सर्व प्रजेकडून जास्तीत जास्त चार आणे कर दरवर्षी घेतला जाईल आणि व्याजाचा दर रुपयाला एक पैसा दरवर्षी द्यावा लागेल." या घोषणेने जमलेल्या संथाल लोकांत आनंदी आनंद पसरला. त्याच वेळी अशी एक घटना घडली की, तीमधून संथालांचा संघर्ष सुरू झाला.

दीघी येथील इंग्रज सरकारच्या फौजदाराने आणि आमडापाडा येथल्या मोठ्या महाजनांना दोन संथालांना पकडून भागलपूरला चालविले, अशी बातमी एका संथालाने धावत पळत येऊन सिदो कान्हू यांना सांगितली. तेथे जमलेला संथाल जन-समूह खवळला. सिदो व कान्हू लगेच आपल्या अनेक संथालांसह त्या दोन्ही संथालांना सोडवून आणण्यासाठी धावले. तेथे गेल्यावर सिदोने त्या फौजदाराला सांगितले की, 'आमच्या या दोन्ही संथाल बांधवांना सोडून द्या' तेव्हा फौजदाराने आपल्या कडक आवाजात उत्तर दिले, "तुम्ही सारे येथून निघून जा, 'सिदो व कान्हू यांना कैद करा." हे ऐकताच संथालांचा तो जमाव खवळला-लगेच तो जमाव त्या फौजदारावर, महाजनावार व त्यांच्या सोबत असलेल्या शिपायांवर तुटून पडला. त्यात तो फौजदार, महाजन व काही शिपाई ठार झाले. त्यांनी पकडलेल्या दोन्ही संथाल बांधवासह ते सारे परत फिरले.

संथाल सेनेने कंपनी सरकारला आपल्या देशातून हाकून लावण्याची प्रतिज्ञा घेतली. जेथे तेथे इंग्रजांनी वस्ती होती, तीवर संथालांनी हल्ले सुरू केले. इंग्रजांना सळो की पळो करुन सोडले. त्यांचा नारा होता, 'जमीनदार, महाजन (सावकार), पोलिस व सरकारच्या कर्मचाऱ्यांचा नाश हो.' संथाल सेनेच्या अनेक तुकड्या होत्या. प्रत्येक तुकडीच्या सैनिकांजवळ धनुष्यबाणादि परंपरागत हत्यारे होती. नेमबाजीत प्रत्येक संथाल तरबेज होता. प्रत्येक तुकडीचा एक मुखिया ठरवून दिलेला होता.

एक तुकडी पुलकीपूर गावी गेली. तेथे निळीचे गोरे कारखानदार राहत होते. त्या तुकडीने त्यांच्यावर हल्ला करुन त्यांना ठार केले. दूसरी तुकडी साहबगंजकडे निघाली. तेथल्या गोऱ्यांना त्याची बातमी समजली व ते नावांत बसून गंगेतून जीव घेऊन पळून गेले. भागलपूरचा कलेक्टर राजमहल येथे राहायचा. एक तुकडी राजमहलला त्याला मारुन टाकण्यासाठी गेली. पण तो आपल्या मित्राच्या घरी लपून बसला, म्हणून वाचला.

पैलापूरला निळीचे बरेच इंग्रज कारखानदार राहात होते. संथाल सैन्याने त्यांच्यावर हल्ला केला. सरकारने ताबडतोब भागलपूरहून ५०० शिपायांची एक पलटन पाठविली. तुंबल युद्ध झाले. सरकारी शिपायांचा धीर सुटला. संथालांचा विजय झाला.

पण सरकारी शिपायांच्या गोळीबारात अनेक संथाल वीर मारले गेले. सेनापती कान्हूही त्यात मरण पावला. या युद्धानंतर कहलगावपासून राजमहलपर्यंत व सैंथिया तसेच राणीगंज पर्यंतचा प्रदेश १५ दिवस संथालच्या ताब्यात होता. त्यामुळे संथालांचा उत्साह वाढला. त्यांचे सैन्य पकौड, महेशपूरकडे निघाले. कदमसरच्या निळीच्या कारखान्यावर हल्ला केला. पकौडहून ते सैन्य वीरभूम जिल्ह्यातील पलसा, महेशपूर ला आले. तेथे इंग्रज शिपायांशी त्यांचे घनघोर युद्ध झाले. त्यात २०० संथाल वीर मारले गेले. अनेक जखमी झाले. रघुनाथपूर व संग्रामपूर येथेही त्यांनी इंग्रज सैन्याशी सामना दिला. सिदो आपले सैन्य घेऊन बडहैतला आला बडहैतच्या लढाईत अनेक संथाल वीर मारले गेले. तेथेच एका विश्वासघात्याने सिदोला पकडून दिले. त्याच्याबरोबर अनेक संथाल पकडले गेले. २४ जुलै रोजी बडहैत इंग्रज सैन्याने जिंकले.

संथालचे दमन करण्यासाठी दामिन. इ. कोह जिल्ह्यात ब्रिगेडियर जनरल लॉयड व कर्नल बर्ड खास मोठ्या सैन्यासह आले. या जिल्ह्याच्या उत्तर भागातून दक्षिण भागात आले. सप्टेंबर १८५६ मध्ये ते दुप्पट उत्साहाने या भागात लढू लागले. संथालांच्या या सैन्याने या जिल्ह्याचा देवघरपासून नैऋत्येकडील सीमेपर्यंतचा दक्षिण भाग संथालच्या ताब्यात आला. त्या भागात महामारी सुरु झाल्याने अनेक संथालवीर त्या रोगाला बळी पडले. बिहारच्या दक्षिण भागात सरकारने मार्शल लॉ जारी करुन सर्वत्र १४ हजार सैन्य विखरुन ठेवले. त्यामुळे संथालांना माघार घ्यावी लागली. तरीही ३० हजार संथाल वीर त्या भागात होते. ते लहानसहान हल्ले करीतच राहिले. त्यांनी आपल्या प्राणांची पर्वा केली नाही. आतापर्यंत १० हजार संथालांनी प्राणार्पण केले होते.

सिदो आणि त्याच्याबरोबर पकडले गेलेल्या सर्व संथालांना इंग्रज सेनाधिकाऱ्यांनी अपार जनसूमहासमक्ष फासावर लटकावले. त्यानंतर सरकारने संथालांना काही सवलती दिल्या. हा जंगल तराईचा सर्व भाग कंपनी सरकारच्या ताब्यात आला. खिस्ती मिशनरी त्या भागात गावोगाव गेले. गावागावात त्यांनी सरकारच्या मदतीने चर्च उभारले व ते मोठ्या प्रमाणात संस्थालांचे खिस्ती धर्मात धर्मांतर करु लागले. त्या भागाला कंपनी सरकारने 'संथाल परगणा' हे नाव दिले.

स्वातंत्र्य - प्रिय संथाल आदिवासींनी सिदो व कान्हू यांच्या नेतृत्वाखाली संघटित होऊन कंपनी सरकारशी जबरदस्त लढा दिला. आपल्या स्वातंत्र्यासाठी आणि प्रतिष्ठेसाठी हजारो संथाल वीरांनी या स्वातंत्र्य युद्धात बलिदान केले. ते या वीर जमातीला भूषणावह ठरले.



# २६. मंगल पांडे

२९ मार्च १८५७ चा दिवस. बंगाल सेनेच्या ३४ व्या रेजिमेंटमधील क्र. १४४६ चा ब्राम्हण शिपाई मंगल पांडे एके दिवशी सकाळी प्रातर्विधी उरकून आपला तांब्या जवळच्या तळ्यावर घासून, धुवून त्यात पाणी भरून आपल्या छावणीकडे निघाला होता. तेवढ्यात एक मेहेतर (भंगी) समोरून आला व त्या शिपायाला म्हणाला, ''भाईसाब, पानी पीने के लिए जरा अपना लोटा दीजिए।'' ते एकून मंगल पांडे खवळून म्हणाला,

''तुझे लोटा दिया तो वह अपवित्र हो जाएगा और मेरा धर्म भी भ्रष्ट हो जाएगा।'' त्यावर तो मेहेतर म्हणाला,

''भाईसाहेब, तुम्हारा धर्म तो वैसे भी नष्ट हो जाएगा। अंग्रेज सरकार तुम्हारी नयी बंदुकोंके लिए जो कारतुसे बना रही है, उनके ऊपर गायों की और सूअरों की चर्बी लगाए हुए कव्हर तुम्हें दाँतो से काटने पडेंगे। तब तुम्हारे धर्म का क्या होगा?'' ते ऐकल्यावर मंगल पांडेला धक्काच बसला व तो फक्त म्हणाला, ''ऐं!'' आणि आपल्या छावणीकडे धावला. त्याने छावणीतील सगळ्या हिंदू-मुसलमान सैनिकांना ती बातमी सांगितली व तो म्हणाला, ''ये बदमाश अँग्रेज लोग हमारा धर्म नष्ट करने जा रहे है। हमें बगावत करनी ही होगी।'' त्याचे ते बोल ऐकून सारेच सैनिक खवळले. मंगल पांडे तर आपली बंदूक सरसावून मैदानात आला व सगळ्या सैनिकांना आवाहन करू लागला. ''अंग्रजो को हमें मारना ही चाहिए। चलो उठो! अपनी अपनी बंदूकें सँभालो!''

मंगल पांडेचे इंग्रज अधिकाऱ्यांना आव्हानच होते. त्याचे ते आव्हान ऐकून सार्जंट मेजर ह्यूसन त्याच्याकडे पिस्तुल घेऊन धावला. तो समोर येताच मंगल पांडेने आपल्या बंदूकीने अचूक नेम धरून त्याच्यावर गोळी झाडली. मेजर ह्यूसनला ती वर्मी लागली व तो धाडकन कोसळून तडफडू लागला. ते पाहून लेफ्टनंट बॉब घोड्यावरून त्याच्याकडे पिस्तूल रोखून धावला. पांडेने गोळी झाडली, पण ती त्याच्या घोड्याला लागली व घोडा कोसळला. बॉबही खाली पडला व आपली तलवार उपसून पांडेवर वार करण्यासाठी धावला. तो पांडेवर वार करणार तोच पांडेने आपल्या तलवारीने त्याचा हातच छाटून टाकला व धाडकन कोसळून तडफडू लागला. पांडेने दोघांना यमसदनास पाठविले. बाकीचे सैनिक लांब उभे राहून हा सारा खेळ बघत होते. त्यांनी पांडेलाही साथ दिली नाही की त्या इंग्रज अधिकाऱ्यांच्या मदतीलाही ते धावले नाहीत. एका इंग्रज सैनिकाने ते कांड पाहिले व त्याने कर्नल व्हीलरला ते सांगितले. कर्नल व्हीलरला घोड्यावरून पळत आला व त्याने उभ्या असलेल्या सैनिकांना पांडेला गिरफ्तार करण्यास

सांगितले. पण त्याचा हुकुम कोणीही मानला नाही. म्हणून तो तणतणत जनरल कर्नल हियरसेकडे गेला व त्याने सारी हकीकत त्याला सांगितली. जनरल हियरसे आपल्या हाताखालील अधिकारी व काही गोरे सैनिक घेऊन त्या ठिकाणी आला. शिपायांना तुम्ही पांडेला पकडण्याचा हुकुम का दिला नाही, असे त्याने आपल्या अधिकाऱ्यांना विचारले. तेव्हा त्यांनी सांगितले, "शिपाई आमचा हुकूम मानीत नाहीत." ते ऐकताच तो शिपायाकडे पाहून गरजला,

"कहना नहीं मानते? मेरी बात सुनो, जो पांडे को पकडने आगे नहीं बढेगा उसे मैं गोलीसे उडा दूंगा। फॉरवर्ड मार्च।"

जनरलचा हुकूम ऐकून ते शिपाई पांडेकडे जाऊ लागले. पांडेला त्या आपल्या साथीदारांना तर मारायचे नव्हते. आता पकडले जाण्यापेक्षा मरण पत्करलेले बरे, असा विचार करून बंदुकीची नळी आपल्या छातीकडे वळवली व तिचा घोडा दाबला. गोळी त्याच्या शरीरात शिरली व तो धाडकन खाली पडला, पण मरण पावला नाही. त्याला दवाखान्यात दाखल करण्यात आले. हे सारे कांड २९ मार्च १८५७ रोजी घडले. दवाखान्यात पांडे बरा झाल्यावर त्याच्यावर खटला भरण्यात आला. सैनिकी न्यायालयाने त्याला फाशीची शिक्षा सुनावली.

इंग्रज सैनिकी अधिकाऱ्यांचा आपल्या हिंदी सैनिकांवरील विश्वास या घटनेने उडाला. पांडेला फाशी देण्यासाठी कलकत्त्याहून चार जल्लाद बराकपूरला आणण्यात आले व ८ एप्रिल १८५७ रोजी त्याला फासावर लटकविण्यात आले. मंगल पांडेच्या बलिदानाची हकिकत भारतभरच्या इंग्रजी छावण्यांत पसरली. सारे हिंदी सैनिक आधीच इंग्रजांच्या अन्यायी वागणुकीने असंतुष्ट होते. ते अधिकच संतप्त झाले १८५७ च्या स्वातंत्र्यलढ्याची पार्श्वभूमी मंगल पांडेच्या बलिदानाने तयार झाली. तेव्हापासून इंग्रज अधिकारी प्रत्येक बंडखोराला 'पांडे' असेच संबोधू लागले.



# २७. ईश्वरी पांडे

मार्च १८५७ मध्ये ३४ वी रेजिमेंट मधील शिपाई मंगल पांडे याला कलकत्त्याजवळील डमडम येथील बंदुकीच्या कारखान्यात काम करणाऱ्या एका मेहेतराकडून समजले की, इंग्रजांच्या सगळ्या पलटणीतील शिपायांना यापुढे जी काडतुसे दिली जाणार आहेत, त्या काडतुसांच्या वरील वेष्टणाला गायींची व डुकरांची चरबी लावलेली असून ती वेष्टने प्रत्येक शिपायाला दातांनी तोडावी लागणार आहेत. मंगल पांडे हा ब्राम्हण शिपाई होता. चरबी लावलेली काडतुसे दातांनी तोडली तर आपला व मुसलमानांचा धर्म बुडणार. गाय ही हिंदूंना पवित्र, तर डुक्कर हे मुसलमानांना निषिद्ध, आपला धर्म बुडणार म्हणून तो इंग्रज सरकार विरूद्ध बंड करायला उठला. त्याने ही बातमी आपल्या छावणीत पसरविली आणि सर्व शिपायांनी इंग्रजांविरुद्ध बंड पुकारावे असा प्रचार त्याने केला.

२९ मार्च रोजी आपली बंदूक व तलवार घेऊन तो परेड ग्राऊंडवर येऊन सर्व शिपायांना मोठ्याने सांगू लागला की, 'बंधूनो! इंग्रज सरकार आपला धर्म बुडवायला उठले आहे. म्हणून सर्वांनी इंग्रज सरकारविरूद्ध लढायला तयार व्हावे. मी तर प्रतिज्ञाच केली आहे की, जो कोणी इंग्रज माझ्यासमोर येईल, त्याला मी ठार करीन' त्याचा आवाज ऐकून अनेक देशी शिपाई ग्राऊंडवर आले व तो काय करतो, हे पाहात् त्याच्यापासून काही अंतरावर उभे राहिले. त्यांच्या मध्ये मंगल पांडेचा मित्र जमादार ईश्वरी पांडे हा सुद्धा होता. ही बातमी इंग्रज अधिकाऱ्यांना समजताच त्या पलटणीचा सार्जंट जे. टी. ह्यूसन व लेफ्टनंट व्ही. एच. वाग आपल्या घोड्यांवर बसून ग्राऊंडवर धावत आले. त्यानां पाहताच मंगल पांडेने ह्यूसनवर आपल्या बंदुकीने गोळी झाडली. तो जखमी होऊन खाली पडला. नंतर वागवरही त्याने गोळी झाडली, ती त्याच्या घोड्याला लागली व तो घोड्यासह खाली कोसळला. नंतर उठून तलवार उपसून मंगल पांडेकडे धावला. मंगल पांडेने त्याला आपल्या तलवारीने घायाळ केले. तेवढ्यात त्या रेजिमेंटचा कमांडर कर्नल एस्. जी व्हीलर आपला असिसंट कॅप्टन टूरीसह त्या ठिकाणी आला व त्याने ईश्वरी पांडे या जमादाराला हुकूम सोडला की, 'तू लगेच मंगल पांडेला पकडण्यासाठी तुझ्या शिपायांना सांग.' तेव्हा ईश्वरी पांडे म्हणाला, 'कोणता ही शिपाई हे काम करणार नाही.'' 'का म्हणून?' व्हीलरने विचारले तेव्हा ईश्वरी पांडे म्हणाला की, शिपाई म्हणतात, आम्ही ब्राम्हणाला पकडणार नाही.' हे ऐकल्यावर त्याने शिपायांना मंगल पांडेला पकडण्यास सांगितले. शिपाई १०/१२ पावले पुढे गेल्यावर ईश्वरी पांडे त्यांना म्हणाला, 'ठहरो.' शिपाई तेथेच थांबले.

तेवढ्यात जनरल हिअरसे काही इंग्रज शिपायांसह ग्राऊंडवर आला. तेव्हा शेख पलटू या शिपायाने मागच्या बाजूने जाऊन मंगल पांडेला घट्ट धरुन ठेवले. इंग्रज सैनिकांच्या हातून मरण येण्यापेक्षा आपणच स्वतः मेलेले चांगले. या विचाराने मंगल पांडेने स्वतःवर गोळी झाडून घेतली. व तो जमिनीवर कोसळून बेशुद्ध झाला. तेव्हा त्याला दवाखाण्यात पोचविण्यात आले. उपचारांनंतर तो बरा झाला. त्याच्यावर सैनिकी कोर्टात दावा दाखल केला. त्यात त्याला फाशीची शिक्षा देण्यात आली व ८ एप्रिल १८५७ रोजी त्याला फासावर चढविण्यात आले. त्याच्या बलिदानाने देशातील साऱ्या देशी पलटणी उत्तेजित झाल्या.

ईश्वरी पांडेने मंगल पांडेचे समर्थन केले, आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या हुकुमाची अवहेलना केली, कमांडर व्हीलरचा हुकूम मानला नाही. असे आरोप ईश्वरी पांडेवर ठेवून त्याच्या वरही सैनिकी कोर्टात दावा दाखल करण्यात आला. त्या साठी जरब दाखवून १६ साक्षीदार इंग्रज अधिकाऱ्यांनी तयार केले. सैनिकी न्यायालयाचा अध्यक्ष जाणून बुजून ४३ वी रेजिमेंटचा एक ब्राम्हण मेजर जवाहरलाल तिवारी याची नेमणूक केली. न्यायालयात ईश्वरी पांडेने आपल्या बचावाचे निवेदन केले. 'मी कोणताच अपराध केलेला नाही. मी निर्दोष आहे.' असे त्याने सांगितले, परंतु साक्षीदारांच्या साक्षी विचारात घेऊन ईश्वरी पांडेला मृत्युदंड देण्यात आला. २२ एप्रिल १८५७ रोजी ईश्वरी पांडेला फाशी देण्यात आले.

ईश्वरी पांडे हा उत्तरप्रदेशातील बालिया जिल्ह्यातला रहिवाशी होता. तो ताकदवान आणि बहाद्दुर जवान होता. मंगल पांडे त्याचा जिवलग मित्र होता. आपल्या धर्मरक्षणासाठी या देशभक्त स्वातंत्र्यवीराने आपल्या प्राणांची पर्वा न करता मंगल पांडेचे समर्थन केले आणि स्वातंत्र्याच्या बलिवेदीवर प्राणार्पण केले.



# २८. बादशहा बहाद्दुरशाह 'जफर'

औरंगजेब १७०७ साली मरण पावला. त्याच्या नंतर अत्यंत अविचारी, विलासात दंग राहणारे, दुबळे आणि व्यसनाधीन वारस एकामागून एक दिल्लीच्या गादीवर आले. त्याचा शेवटचा वंशज अबूजफर हा मात्र त्यात अपवाद होता. अबू जफर हा अकबर (द्वितीय) याचा मुलगा होता. त्याचा जन्म २४ ऑक्टोबर १७७५ रोजी झाला होता. त्याचे शिक्षणही चांगले झाले. तो चांगला शायर होता. 'जफर' या नावाने तो उत्तमोत्तम शेर लिहायचा. तो विचारी, दयाळू व भावुक होता. हिंदु - मुस्लिम जनतेविषयी त्याच्या अंतःकरणात अपार प्रेम होते. तो सर्व धर्मियांना समान लेखायचा.

अकबर (द्वितीय) २८ सप्टेंबर १८३७ रोजी मरण पावला. त्यानंतर ३० सप्टेंबर १८३७ रोजी अबूजफर हा दिल्लीच्या तख्तावर 'सिराज उद्दीन मुहम्मद बहादुरशाह' या नावाने आरुढ झाला. त्यावेळी त्याचे वय ६२ वर्षे होते. म्हणजे तो उतारवयाला लागला होता. त्या वेळी दिल्लीचे राज्य फार आकसले होते. दरबारात कटकारस्थानांना ऊत आला होता व बहादुरशाह हे सारे असहायपणे बघत होता. शेरोशायरीत आपले मन गुंतवीत होता. झीनत महल ही त्याची सर्वात लहान व आवडती बेगम. तिचा मुलगा जवॉबख्त हा बहाद्दुरशाहच्या आठही मुलांत सर्वात लहान होता. तरी तिला मनापासून वाटायचे की आपल्या पतीनंतर जवॉबख्त हाच दिल्लीच्या गादीवर बसावा. बहादुरशाहच्या व्याही इलाहीबक्श हा आतून इंग्रजांशी संधान बांधून होता. इंग्रजांचे हेर मुन्शी रजबअली व हाकिम अहसनुल्ला यांच्याशी त्याचा सतत संपर्क असे. तो झीनत महलच्या आकांक्षेला कायम खतपाणी घालीत होता.

गव्हर्नर जनरल लॉर्ड डलहौसी याला मात्र जवॉबख्त याला युवराजपद द्यायचेच नव्हते. कारण त्याला गुप्तहेरांकडून कळले होते की, जवॉबख्त हा इंग्रजांच्या विरोधात आहे. त्याने आपल्या प्रतिनिधीमार्फत बादशहाच्या मनाने दुबळा मुलगा मिर्झा कोयास याच्याशी एक तह करुन टाकला. तो तह अत्यंत अपमानास्पद होता. त्या तहातील अटी अशा होत्या - (१) मिर्झा कोयास याने दिल्लीच्या तख्तावर बसल्यानंतर त्याने स्वतःला कायम 'बादशहा' न म्हणविता फक्त 'शाहजादा' म्हणवून घ्यावे. (२) त्याने दिल्लीचा लाल किल्ला पूर्णपणे कंपनी सरकारच्या ताब्यात द्यावा आणि कुतुबमिनार जवळील महरौली येथील महालात कायमचे वास्तव्य करावे. (३) त्याने दरमहा एक लाख रुपये पेन्शन न घेता फक्त १५ हजार रुपये पेन्शन घेत जावे. (४) बादशहा बहाद्दुरशाहने लगेच लाल किल्ला खाली करुन द्यावा. या कराराचे पत्र बहाद्दुरशाहला पाठविण्यात आले.

तेव्हा ते अत्यंत अपमानास्पद पत्र वाचताच बहादुरशाह संतापाने लाल झाला. त्याने या कराराला स्पष्ट शब्दात नकार दिला. तो स्वतः व त्याची बाकीची सातही मुले इंग्रजांचे घोर शत्रू बनले. बहादुरशाहला यापुढे कोणीही 'हिंदुस्थानचा सम्राट' म्हणू नये असे फर्मान काढून डलहौसीने हिंदुस्थानातील सर्व राजे रजवाड्यांना, अमीर-उमरावांना व जहागीरदारांना पाठविले. कारण त्याने ठामपणे ठरविले होते की, बहादुरशाह जफरनंतर दिल्लीची सल्तनत पूणपणे नेस्तनाबूत करुन टाकायची, डलहौसीने असेही जाहीर करुन टाकले की, बहादुरशाहनंतर दिल्लीची वारस कोण राहील, यासाठी गव्हर्नर जनरलची परवानगी घेणे अपरिहार्य राहील.

बहादुरशाहच्या पूर्वजांकडून सवलती घेऊनच ईस्ट इंडिया कंपनीला हिंदुस्थानात व्यापारास सुरवात करता आली व त्यामुळेच कंपनीचा व्यापार वाढला व पुढे त्यांनी हिंदुस्थानातील लहानमोठी राज्ये कपटकारस्थाने करुन बळकावली, हे सारे तो विश्वासघातकी डलहौसी विसरला होता. त्यामुळेच इंग्लंडची भरभराट झाली होती. याचाही विसर त्याला पडला होता.

१८५७ च्या आरंभीच्या काळात नानासाहेब पेशवे व त्यांचा मंत्री अजीमुल्लाखाँ दिल्लीला येऊन बहादुरशाहला उठावाच्या संदर्भात भेटून गेले होते व त्यांनी विचारविनिमय करुन उठावाची तारीख रविवार ३१ मे १८५७ ही निश्चित केली होती. रविवार सारे इंग्रज चर्चमध्ये प्रार्थनेसाठी जातात. तेव्हा प्रत्येक ठिकाणच्या विद्रोही शिपायांनी त्या त्या ठिकाणच्या चर्चवर हल्ला करुन हिंदुस्थानातील सर्वच्या सर्व इंग्रज मारुन टाकायचे. हिंदुस्थानात एकही इंग्रज जिवंत राहू द्यायचा नाही. अशी ती योजना होती. मोठ्या युद्धाविना हिंदुस्थानातील सर्व इंग्रजांचा नायनाट या योजनेमुळे होणार होता.

नानासाहबांनी हिंदुस्थानातील बहुतेक राजेरजवाड्यांना पत्रे लिहून कळविले की, सर्वांनी एकजुटीने एकाच वेळी आपल्या देशात इंग्रजावर हल्ले करुन आपला देश स्वतंत्र करावा. बहादुरशाहने सुद्धा अशा अर्थाची पत्रे बहुतेक राजे-रजवाड्यांना लिहीली. त्याने त्यात लिहिले होते की, "हे माझ्या हिंदु - मुस्लिम बांधव हो ! तुम्ही सर्वांनी एकत्र येऊन इंग्रजांविरुद्धच्या लढ्यात भाग घ्यावा. मला सत्तेशी अभिलाषा नाही. माझ्याऐवजी तुम्ही एकमताने कोणाही कार्यक्षम नेत्याची निवड करुन त्याच्या हाती हिंदुस्थानची सत्ता सोपवावी किंवा तुम्ही एक राजमंडळ निवडून त्या मंडळाकडे आपल्या देशाचा कारभार सोपवावा. देशात शांतता व सुव्यवस्था स्थापन करण्यासाठी सर्वांनी साह्य करावे. देशातील त्रस्त झालेल्या जनतेला सुखा-समाधानाने जगता यावे, म्हणून सर्वांची एकजूट

होणे आवश्यक आहे. अशा एकजुटीनेच आपल्या समशेरी इंग्रजांवर चालवा. आणि आपला देश इंग्रजांच्या जोखडातून मुक्त करा."

आपल्या देशाच्या हिताच्या बहादुरशाहच्या या तळबळीच्या आवाहनाला फारच थोड्या संस्थानिकांनी चांगला प्रतिसाद दिला. परंतु पंजाबातल्या पतियाळा, नाभा, जिंद च्या राजांनी, ग्वाल्हेरच्या जयाजीराव शिंदे व त्यांचा दीवाण दिनकरराव राजवाडे, जयपूर, जोधपूर, बिकानेर, मधल्या राजपूत राजांनी, नेपाळचा राजा जंगबहादुर याने व हैद्राबादच्या निजामाने बादशहाच्या पत्रांना मुळीच किंमत दिली नाही. उलट या लहान मोठ्या राजांनी इंग्रज सरकारला धन-धान्याची, शस्त्रास्त्रांची व आपल्या पलटणींची मदत दिली. त्यामुळे १८५७ स्वातंत्र्ययुद्ध अयशस्वी झाले. असे बहुसंख्य इतिहासकारांचे मत आहे व त्यात तथ्यही आहे. खरे म्हटले, तर इंग्रजांपुढे लाचार झालेल्या या राजे-रजवाड्यांत इंग्रजांशी टक्कर देण्याची हिंमतच नव्हती व ते आपल्या जनतेला इंग्रज रेसिडेंटाच्या दबावाने पिळून चैन - विलासी जीवन जगत होते. ते सुखमय जीवन सोडून युद्धाचे संकट ओढवून घेण्याची त्यांची तयारीच नव्हती.

कंपनी सरकारने मार्च १८५७ पासून नवी काडतूसे पलटणीत सैनिकांना द्यायला सुरुवात केली. त्या काडतुसांच्या वेष्टनांना गायींची व डुकरांची चरबी लावलेली होती. ते देशी पलटणीतील हिंदू व मुसलमान शिपायांना समजले. तेव्हा हे इंग्रज सरकार आम्हांला धर्मभ्रष्ट करायला लागले आहे, असे त्यांन वाटले. ते सत्यच होते. कारण गाय हिंदुंना पवित्र, तर डुक्कर मुसलमानांना निषिद्ध. ती वेष्टेने दाताने तोडायची असल्याने सर्व हिंदू-मुस्लिम शिपाई बंडाच्या पावित्र्यात उभे राहिले. २९ मार्च १८५७ रोजी कलकत्त्याजवळील बराकपूर छावणीतील मंगल पांडे याने याच कारणासाठी बंडे केले. इंग्रज अधिकाऱ्यांना मारले. म्हणून त्याला फाशी देण्यात आले. ही बातमी हिंदुस्थानातील इंग्रजांच्या सगळ्या छावण्यात पसरली. त्या काळी इंग्रजांचे सगळ्या छावण्यांमधील सैन्य २ लाख ३८ हजार होते. त्यात ३८ हजार गोरे सैन्य आणि दोन लाख देशी सैन्य होते. त्यातही उत्तर हिंदुस्थानातील छावण्यांत अवध, दिल्ली, बिहार या भागातील राजपूत, ब्राम्हण व मुसलमान सर्वाधिक होते. त्या सेनेला बंगाली सैन्य म्हटले जाई. याच सैन्याने १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धात विशेषकरुन भाग घेतला.

१० मे रोजी मेरठ छावणीतील देशी शिपायांनी उठाव केला. त्या छावणीतील सारे इंग्रज मारुन टाकले. तुरुंग फोडून कैद्यांना मुक्त केले व ते सैन्य 'चलो दिल्ली, मारो फिरंगीको' अशा घोषणा देत रातोरात दिल्लीला आले व लाल किल्ल्यासमोर एकत्र येऊन बादशहा बहादुरशाहचा जयजयकार करु लागले. बहादुरशाहला मेरठच्या उठावाची

हकिकत समजली, तेव्हा तो पुरता गोंधळून गेला. त्याने समोर येऊन त्या शिपायांचे म्हणणे ऐकून घेतले व त्यांना तो म्हणाला, ''माझे वय आहे ८२ वर्षांचे. लढण्याची ताकद माझ्यात नाही व माझ्याजवळ तुम्हांला पगार देण्यासाठी खजिना सुद्धा नाही.'' तेव्हा त्याच्या मागे उभी असलेली त्याची आवडती बेगम जीनत महल म्हणाली. ''जहाँपनाह,बिठूरहून सुद्धा नानासाहेब पेशव्यांचे दूत आले आहेत. आज साऱ्या हिंदुस्थानचे डोळे आपल्याकडे लागलेले आहेत. आपण या शिपायांना साथ देणेच योग्य आहे.''

बहादुरशाहला शिपायांनी सांगितले, ''जहाँपनाह, तुम्ही पैशांची काळजी करु नका. आम्ही इंग्रजांचे खजिने लुटून आणून तुमच्या पायाशी ओतू. तुम्ही फक्त आमचे नेते व्हा. दिल्लीच्या तख्तावर 'हिंदुस्थानचा बादशहा' म्हणून विराज मान व्हा.'' तेवढ्यात दिल्लीच्या छावण्यातील हजारो देशी शिपाई सुद्धा तेथे आले. त्यांनीही बादशहाचा जयजयकार केला. दुसऱ्या दिवशी बहादुरशाह जफर दिल्लीच्या तख्तावर समारंभपूर्वक विराजमान झाला. सर्व शिपायांनी अवघ्या ४८ तासात दिल्लीमध्ये एकही इंग्रज शिल्लक ठेवला नाही. सर्व इंग्रजांना कापून काढून दिल्ली स्वतंत्र केली. बादशहाने शहरातील प्रतिष्ठित नागरिक व निरनिराळ्या पलटणींचे सुभेदार यांची बैठक घेऊन सहा सेनाधिकारी व चार प्रतिष्ठित नागरिक अशा १० लोकांची एक कार्यकारिणी (फौजी कोर्ट) शहरातील कायदा व सुव्यवस्था सांभाळण्यासाठी निवडली. सेनापतीची नेमणूक केली.

दिल्ली स्वतंत्र झाल्याचे समजल्यावर अनेक छावण्यांतील देशी शिपाई बंड करुन उठले व त्यांनी तेथले इंग्रज कापून टाकले आणि छावणीतील खजिने घेऊन ते दिल्लीला आले. दिल्लीत अजून गोंधळाचेच वातावरण होते. बरेलीचा खान बहादुरखान याने आपला सेनापती बख्तखां याच्याबरोबर मोठी फौज, खज़िना व रसद दिल्लीला पाठवून दिली. बख्तखाँ हा कुशल योद्धा आणि पराक्रमी सेनानी होता. बादशहाने त्याला प्रमुख सेनापतीपद दिले. नंतर बहादुरशाहने दिल्ली येथील 'पयामे आजादी' (स्वातंत्र्याचा संदेश) या वृत्तपत्रात आपली एक महत्त्वाची घोषणा प्रसिद्ध केली. ''हे हिंदुस्थानातील हिंदु-मुसलमानांनो! उठा! जागे व्हा! बंधुनो, ईश्वराने मानवाला ज्या ज्या देणग्यां दिल्या आहेत, त्यांत आजदी हीच सर्वश्रेष्ठ आहे. ज्या जुलमी व अत्याचारी इंग्रजांनी आमचीही बहुमूल्य देणगी आम्हांला धोका देऊन कपटाने आमच्याकडून हिसकावून घेतली आहे. ते काय आम्हांला या देणगीपासून कायमचे वंचित ठेवणार आहेत? आपल्या आजादीसाठी लढणाऱ्या सैन्यात छोटा - बडा असा भेदभाव मुळीच नाही. सर्वांना समान वागणूक दिली जाते. या पवित्र युद्धात सामील होणारे सारेच भाई-भाई आहेत. हे लक्षात घ्या.'' इंग्रज

वार्ताहर रसेल म्हणतो की, "हे वर्तमान पत्र सुरु करण्यात अजीमुल्लाखाँचा मोठा सहभाग होता."

स्वातंत्र्याच्या या युद्धातले हिंदु - मुसलमानांचे ऐक्य पाहून गव्हर्नरजनरल कॅनिंग अत्यंत बेचैन झाला आणि त्याने हिंदु - मुसलमानांत फूट पाडण्याचे प्रयत्न आपल्या इंग्रज अधिकाऱ्यांकरवी सुरु केले. मुसलमानांना सांगण्यात आले की, "नानासाहेब, कुँवरसिंह व राणी लक्ष्मीबाई हिंदुस्थानात हिंदूचे राज्य स्थापन करण्यासाठी लढत आहेत. म्हणून मुसलमानांनी या युद्धात भाग घेतला, तर त्यांच्यावर हिंदू जुलूम करतील. हे तुम्हांला फायदेशीर ठरणार नाही. "हिंदूंना असे त्या अधिकाऱ्यांनी भरवून दिले की, "बहादुरशाह तुमच्या मदतीने हिंदुस्थानात मुसलमानांची बादशाही स्थापन करण्यासाठी झटतो आहे. मुसलमानी राज्यात हिंदूंवर अत्याचार होत राहतील. हे तुम्हांला योग्य वाटते का?"

इंग्रज अधिकाऱ्यांच्या या चिथावणीने काही माथेफिरु मुसलमानांनी जिहाद पुकारला. हे समजताच बहुदुरशाहने एक फतवा काढला. त्यात त्याने मुसलमानांना बजावले की, "भाईयों! यह जिहाद हिंदूविरुद्ध नहीं है। केवल फिरंगियों विरुद्ध है। तुमने यदि हिंदुओंको मारा, तो तुम्हारी इस देशमें खैर नहीं। सबब यह नीच कर्म तुरन्त बंद करो। इस देशको बचाओ। ध्यान रखो, हिंदू हमारे भाई हैं।" त्यामुळे कॅनिंगचे हिंदु-मुसलमानांत फूट पाडण्याचे प्रयत्न सफल झाले नाहीत. बादशहाच्या या फतव्याचा दोन्ही जमातीवर चांगला परिणाम झाला. हिंदू आणि मुसलमान दिल्लीच्या रक्षणासाठी खांद्याला खांदा लावून लढले. बादशहाने आपल्या कार्यकारिणीच्या हिंदु - मुस्लिम सदस्यांशी विचार विनिमय करुन बकरी ईदच्या दिवशी मुसलमानांनी गोहत्या केली, तर त्यांना कडक शासन केले जाईल, असाही हुकूम काढला. त्याच्या हिंदू शिपायांवर फार चांगला परिणाम झाला.

शिखांच्या गुरुंच्या हत्या बहादुरशाहच्या पूर्वजांनी क्रूरपणे केलेल्या आहेत. म्हणून शिखांनी बहादुरशाहशी लढून त्या हत्त्यांचा सूड घ्यावा, असे इंग्रज अधिकाऱ्यांनी शीख राजांना व शीख सैनिकांना पटवून दिले. म्हणून पतियाळा, नाभा व जिंदच्या राजांनी इंग्रज सेनापती एन्सन याला धनधान्याची, शिख पलटणींची व शस्त्रास्त्रांची भरपूर मदत केली व एन्सन ते शिख सैन्य व रसद घेऊन पंजाबातून दिल्लीकडे निघाला. वायव्य सरहद्द प्रांतातील मुसलमानांना लुटीचे अमिष दाखवून त्यांच्याही पलटणी इंग्रज अधिकाऱ्यांनी उभारल्या व ते त्या पठाण पलणींना घेऊन दिल्लीकडे निघाले.

इंग्रजांकडे लांब पल्ल्याच्या मोठमोठ्या तोफा व नव्या एन्फिल्ड रायफलींचा भरपूर साठा असल्याने दिल्लीत जमलेल्या ठिकठिकाणच्या विद्रोही पलटणींचा त्यांच्यापुढे

निभाव लागणे अशक्य होते. कारण त्यांच्याकडे तलवारी, भाले व जुन्या बंदुकी (मस्केट) होते व तोफाही लांब पल्ल्याच्या नव्हत्या. तरीही या शूर शिपायांनी त्याच हत्यारांच्या साह्याने दिल्लीची इंच इंच भूमी प्राणपणाने लढविली. अनेक वेळा इंग्रजांच्या सैन्याला माघार घ्यायला भाग पाडले. इंग्रजांना नवी कुमक येतच होती. त्यामुळे सुमारे साडेचार महिन्यांच्या अथक प्रयत्नानंतर व शेकडो सैनिकांचे प्राण गमावल्यानंतर २४ सप्टेंबर १८५७ रोजी इंग्रजांनी दिल्ली शहरावर ताबा मिळविला. विद्रोही सैन्य दिल्लीमधून बाहेर निघून जाऊ लागले. सेनापती बख्तखाँ बहादुरशाह जफरकडे येऊन म्हणाला, "जहाँपनाह, दिल्ली हमारे हाथसे गयी । इसलिए आप चिंता मत करना। सारा हिंदुस्थान हमारे साथ है। ऐसी दशा में आपको सुरक्षित स्थान में जाना ही उचित है। सारे हिंदु - मुस्लिम सिपाही आपके झंडेके नीचे जमा होकर मरनेमारने को तैयार हैं। यदि हुजुर मेरे साथ चले तो कुछ ही दिनोंमे मैं सब ठीकठाक कर दूँगा। और जिल्ले सुभानी (बादशहा) को सब चिंताओंसे और कष्टोंसे मुक्त कर दुँगा।"

बख्तखांच्या बोलण्याने बादशहा प्रभावित झाला आणि म्हणाला, "हम हुमायूँ के मकबरे में जा रहे है। कल सुबह तुम वहाँ आओ और हमसे मिलो। उस समय सब बातों का निर्णय हो जाएगा।"

बादशहाचा व्याही इलाहीबक्श याने आडून हे संभाषण ऐकले व बख्तखाँ निघून गेल्यानंतर बादशहाजवळ येऊन म्हणाला, "बख्तखॉने जो कहा, मैं भी उससे सहमत हूँ। किन्तु आप इस बातपर ध्यान दीजिए कि, अंगरेज अँधे नहीं हैं। वे जानते हैं कि, आपने जो किया, मजबूर होकर किया । आपका गदर से और ॲंगरेजों की दुश्मनी से दूर का भी वास्ता न था। आपको उनकी तरफसे कोई आशंका नहीं करनी चाहिए। हाँ, यदि आप विद्रोहियों के साथ चले गये तो यकीनन वे आपको बगावत का जिम्मेदार समझेंगे। और उन्हें आपको अपराधी मानने का बहाना मिल जाएगा। दूसरी बात यह है की, आप इस बुढापे में आपके छोटे - बडे शाहजादे और शाहजादियों को, वैसेही आपके पर्दानशीन बेगमों को कहाँ लिए फिरेंगे? हमारा इसमें ही भला है की, आप विद्रोहियों के साथ न जायें। मैं अंगरजों से मिलकर सब बातों की सफाई कर दूँगा। और आपकी सल्तनत पर तथा आप पर किसी भी प्रकार का दोष न आने दूँगा"

इलाहीबक्शचे म्हणणे ऐकल्यावर बादशहा द्विधेत पडला. काय करावे, हे त्याला सुचेनासे झाले. दुसऱ्या दिवशी म्हणजे १९ सप्टेंबर १८५७ रोजी तो आपल्या सर्व लव्याजम्यासह हुमायूँच्या मकबऱ्यात राहण्यासाठी निघाला. तेव्हा त्याला पोचविण्यासाठी त्याचा एक निराश झालेला शायर मित्र म्हणाला,

दुमदुमाये दम नहीं, खैर माँगो जान की।
ऐ जफर, ठंडी हुई समशेर हिंदुस्थान की।।

अर्थात हे बहादुरशाह जफर, दिवसेंदिवस, प्रतिक्षणी तू थकत चालला आहेस. तुझ्यात दम राहिला नाही. म्हणून तू आता (इंग्रजांकडे) आपल्या प्राणांची भीक माग. आता हिंदुस्थानची तलवार बोथट व थंड झालेली आहे.

त्यावर त्या ८२ वर्षांच्या वृद्ध बादशहाने त्याला एक शेर सुनावला.

गाझियों में बू रहेगी जबतलक ईमान की।
तब तो लंडन तक चलेगी तेग हिंदुस्थान की।।

अर्थात आमच्या वीरांच्या अंतःकरणात स्वातंत्र्याच्या निष्ठेचा शेवटचा बिंदू जोपर्यंत जागृत राहील, तो पर्यंत हिंदुस्थानच्या तलवारी लंडनपर्यंत आपले तेज दाखवत राहतील.

वय सरत आले, सल्तनत गेली, धन-दौलत थोडी सुद्धा राहिली नाही व अंगात ताकद ही उरली नाही, तरीही त्या वृद्ध बादशहाच्या अंतःकरणात देशाभिमानाची आग केवढी प्रखर होती, हेच त्याच्या या शेरावरुन दिसून येते. त्याचा हा शेर पुढच्या ९० वर्षांत क्रांतिकारकांना स्फूर्ती देत राहिला. खुद्द लंडन मध्येच भरं सभांत मदनलाल धिंग्रा यांनी कर्झन वायलीचा आणि ऊधमसिंहानी ओंडायरचा सर्वांसमक्ष खूनकरुन दाखवून दिलेले आहे. किती सार्थ होते हे बहादुरशाहचे बोल!

इंग्रजांचा प्रमुख हेर रजबअली याने इलाहीबक्श याला आश्वासन दिले होते की, "तुम्ही जर बादशहाला विद्रोही सैन्याबरोबर जाऊ दिले नाही, तर इंग्रज सरकार तुम्हांला निहाल करुन सोडील." इलाहीबक्शने बहादुरशाहला बख्तखाँबरोबर जाऊ दिले नाही. दिल्लीतच रोखून धरले, या त्याच्या कामगिरीमुळे इंग्रज सरकार त्याला तह ह्यात १२०० रुपये दरमहा मानधन देत राहिले.

इलाहीबक्शने लगेच रजबअली बरोबर इंग्रज सेनाधिकारी हडसन याला निरोप दिला की, "मी बादशहाला बख्तखांबरोबर जाण्यासाठी रोखले आहे. तुम्ही उद्या सकाळी थोडे सैन्य घेऊन हुमायूँच्या मकबऱ्याच्या पश्चिमेकडील गेट जवळ यावे. त्याचे सैन्य यमुनेच्या वाळवंटात आराम करीत आहे. उद्या सकाळी तो मकबऱ्याच्या पूर्वेकडील गेटमधून मकबऱ्यात येईल. तो गेल्यावर तुम्ही आत येऊन बादशहाला ताब्यात घ्यावे."

ठरल्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी (२० सप्टेंबरला) सकाळी बख्तखाँ बादशहाकडे आला. तेव्हा इलाहीबक्श त्याला म्हणाला, "बादशहाचे उतार वय पाहून तुम्ही त्यांना

ताब्यात घेत आहांत. यावरुन तुमची इच्छा अशी दिसते की, सगळी सत्ता आपल्या हातात घ्यावी व स्वतः दिल्लीची सल्तनत बळकवावी.''

इलाहीबक्शचा हा गलिच्छ आरोप ऐकताच बख्तखाँ रागाने लालबुंद झाला. बादशहाने त्याला शांत केले व तो म्हणाला, ''बहादुर! मुझे तुमपर भरोसा है। किंतु मेरी शारीरिक दुर्बलताने मुझे कहीं दूसरे स्थानपर जाने योग्य नहीं रखा है। तुम मुझे मेरे भाग्यपर छोड दो और अपने कर्तव्यका पालन करो।'' बख्तखाँ निराश व संतप्त होऊन लगेच निघू गेला. त्यानंतर इलाहीबक्शन याने आधीच आलेल्या हडसनला इशारा केला. त्याच्या बरोबर १०० गोरे सैनिक होते. तो काही सैनिकांसह मकबऱ्याच्या दरवाजाजवळ आला व त्याने बादशहाला व त्याच्या शाहजाद्यांना बाहेर बोलावले. ''आमच्या प्राणांच्या रक्षणाची हमी देत असाल, तरच आम्ही बाहेर येऊ.'' असे बादशहाने त्याला सांगितले. हडसनने ते कबूल केले. बादशहा व त्याचे शहजादे बाहेर येताच हडसनने त्यांना अटक केली, तेव्हा बादशहा अत्यंत संतापला व इलाहीबक्शकडे तीक्ष्ण नजर रोखून तो म्हणाला, ''इलाहीबक्श, नमकहराम! तुमने बख्तखाँ के साथ जाने से हमको रोका। तुम्हारी जबान के अनुसार यदि अँगरेज मुझे बेगुनाह समझते हैं?'' यावर इलाहीबक्शजवळ उत्तर नव्हते. तो नुसता खाली मान घालून उभा राहिला. बादशहाची लाडकी बेगम जीनत महल हिला तेव्हा कोठे इलाहीबक्शचा विश्वासघात समजला.

हडसनने बादशहा व बेगमा यांच्यासाठी पालख्या आणि शाहजाद्यांसाठी गाड्या आणल्या होत्या. शाहजाद्यांना त्या गाड्यांत बसविले आणि बादशहा व बेगमा पालख्यांत बसल्या. पालखीत बसतांना बादशहाच्या मनात विचार येऊन गेला. ''इधर आते समय मेरे शायर मित्र ने जो शेर मुझे सुनाया था, उसमें भी तथ्य था।'' पालख्या व गाड्या दिल्लीकडे निघाल्या. दिल्लीच्या खूनीदरवाजाच्या अलीकडे एक फर्लांगावर (सुमारे २०० चे वर मीटर अंतरावर) त्या पालख्या व गाड्या थांबविण्यात आल्या. हडसने शाहजाद्यांना गाडयांमधून खाली उतरवण्यास सांगितले. त्याने त्यांच्या अंगावरील जडजवहीर काढून घेऊन त्यांना आपले कपडे उतरवण्यास सांगितले. ते सारे भेदरलेलेच होते. कपडे उतरुन ते उघड्या अंगाने उभे राहिले. तेव्हा लगेच हडसनने मिर्झा मुघल, मिर्झा खिज्र सुलतान, मिर्झा अबूबकर आणि मिर्झा अब्दुल्लाह यांची मुंडकी आपल्या तलवारीने छाटून त्यांचे ओंजळभर रक्त तो नरराक्षस प्याला व म्हणाला, ''मी जर यांचे रक्त प्यालो नसतो, तर मी पागल झालो असतो.'' नंतर त्याने मी सर्व मुंडकी एका मोठ्या तबकात ठेवून जवळच पालखीत बसलेल्या बादशहाला आपल्या एका सैनिकाकडून नजर म्हणून पाठविली. तेव्हा बादशहा उसासा साडून उद्गारला,

''या खुदा! तेरी शुक्र हे!''

(हे परमेश्वरा, तुला धन्यवाद असोत.)

नंतर त्या चारही शाहज़ाद्यांची प्रेते खुनी दरवाजावर टांगण्यात आली. औरंगजेबाने आपला मोठा भाऊ दारा-शुकोह याचे प्रेतही याच दरवाजावर टांगले होते. नंतरही मोगलांच्या अवलादींचे प्रेते याच दरवाजावर टांगण्यात आली होती. म्हणूनच लोक दिल्लीच्या या दरवाजाला 'खुनी दरवाजा' म्हणू लागले. हडसनची ही कृत्यें पाहून त्याचे इंग्रज सैनिक आनंदाने नाचले. आसपासची जनता पूर्णपणे भेदरुन गेली होती.

२७ जानेवारी १८५८ रोजी लाल किल्ल्यात दीवाण-इ-खास मध्ये लष्करी कोर्टापुढे बादशहा बहाद्दुरशाह याची चौकशी सुरु झाली. त्याच्यावर चार आरोप ठेवण्यात आले.

१) इंग्रज सरकारचा पेन्शनर असून त्याने बंडखोर शिपायांना उत्तेजन देऊन मदत ही केली.

२) त्याने स्वतःच्या शाहजाद्यांना बंड करण्यास प्रवृत्त केले.

३) बंडखोरांचे नेतृत्व पत्करुन 'बादशहा' म्हणून स्वतःची द्वाही फिरविली.

४) सोळा मे १८५७ रोजी इंग्रज व अन्य खिस्ती लोकांच्या हत्त्या करविल्या.

खटल्याचे कामकाज २१ दिवस चालून ते २९ मार्च १८५८ रोजी संपले. बादशहाने या सर्व आरोपांचा इन्कार करुन 'मी निर्दोष आहे' असे सांगितले. त्याला जन्मपेठेची व हद्दपारीची अशा शिक्षा देण्यात आल्या आणि तो, बेगम जीनत महल, तिचा मुलगा जबॉबख्त व त्याची बेगम या चौघांना काही नोकरांसह कलकत्ता मार्गे रंगून जवळीक पेगू येथे पाठविण्यात आले. तेथे त्यांची काय अवस्था होती, हे जवॉबख्तच्या बेगमेने हिंदुस्थानात आपल्या आईला लिहिलेल्या पत्रात नमूद केले आहे.

''पावसात नेहमी गळणारे एक साधे सुधे मोडकळीस आलेले चार खोल्यांचे आमचे घर आहे. त्यात डास खूप असून आम्ही बहुतेक सर्वजण आजारी असतो. आम्हांला सहानुभूती दाखविणारे येथे कोणीही नाही. आम्हांला सहानुभूती जो दाखवील किंवा जो मदत करील, त्याला कैद किंवा फांशीची शिक्षा मिळेल. आईसाहेब येथे आम्ही एकाकी आहोत. आमची कैद अशी आहे की, धड आम्ही कैदीही नाही व धड स्वतंत्रही नाही. आम्ही एक प्रकारच्या कबरस्थानातच आहोत! जिवंतपणी ही कबरस्थानात व मेल्यावरही कबरस्थानात!''

४ नाव्हेंबर १८६२ रोजी त्याच घरात बहादुर शाहचे निधन झाले. मनाने दयाळू, कलाप्रेमी, न्यायी व अव्वल दर्जाचा हा शायर पेगू येथेच कबरीत गेला.

१९४३ रोजी आझाद हिंद सेनेचे कार्यालय जेव्हा सिंगापूरहून रंगूनला आणले, तेव्हा नेताजी सुभाषचंद्र बोस यांनी आपल्या सैनिकांसह त्या कबरीला भेट दिली. हिंदुस्थानच्या सम्राटाची मातीची कबर पाहून ते व्यथित झाले. त्यांनी त्या कबरीला श्रद्धांजली वाहिली व तिचा जिर्णोद्धार करुन त्या बादशहाचे सुंदर स्मारक येथे उभारले. तेव्हा त्यांच्या मुखातून बादशहाचा तो सुप्रसिद्ध शेर बाहेर पडला. गाजियों में बू रहेगी जबतलक ईमान की। तब तो लंडन तक तेज रहेगी तेग हिन्दुस्थान की ॥

माऊंट बॅटनने दुसऱ्या महायुद्धात रंगून जिंकले, तेव्हा त्याने बहादुरशाहचे ते स्मारक उध्वस्त करुन टाकले. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर ते पुन्हा चांगल्या स्वरुपात उभारण्यात आले.



# २९. नानासाहेब पेशवे

सन १७५७ पासून १८५७ च्या शंभर वर्षांच्या कालावधीत ईस्ट इंडिया कंपनीने जवळजवळ सारा भारत पादाक्रांत केला होता. त्या १०० वर्षांच्या पूर्वीच्या काळात हिंदुस्थान साऱ्या जगात 'सुवर्णभूमी' म्हणून प्रसिद्ध होता. पण १७५७ पासून ईस्ट इंडिया कंपनीने व्यापारापेक्षा या देशाचे निरनिराळे प्रदेश आपल्या वर्चस्वाखाली आणण्याचा उद्योग आरंभला आणि या देशातील राजे रजवाडे आपल्या अंकित करण्याचे प्रयत्न आपल्या कपटनीतीने सुरु केले. राजे रजवाड्यांबरोबरच नवीन कायदे करुन गुंडागिरीने साऱ्या जनतेला पिळून काढून हा देश 'कंगाल भूमी' बनवून टाकला. 'हम करे सो कायदा' या न्यायाने या देशात आपली दहशत बसवली. कोट्यावधी लोक गरीबीच्या खाईत पडले. दुष्काळामागून दुष्काळ या देशात पडू लागले. त्यांत अन्नाअभावी सुमारे ५० लाख लोक मरण पावले. पण कंपनी सरकारला त्याचे शुभाशुभच नव्हते. जनता त्रस्त झाली होती. सर्वांच्या मनात इंग्रजांविषयी असंतोष खदखदत होता. लोक उघड उघड म्हणू लागले की, "आता कंपनी सरकारची शंभर वर्षे भरली."

१८४८ साली डलहौसी हा गव्ह. जनरल भारतात आला. त्याने तर नीतिअनीतीचा, न्यायाचा विचार सोडून देऊन या देशातील अनेक राज्ये कसलेही कारण दाखवून दादागिरीने घशात घातली. मराठ्यांचे शेवटचे राज्य दुसरा बाजीराव या नादान पेशव्याकडून त्यांनी आधीच ताब्यात घेतले होते व त्याला सन १८१८ पासून महाराष्ट्रातून घालवून देऊन उत्तरेत गंगातीरी दरवर्षी आठ लाख रुपये पेन्शन देऊन ब्रह्मावर्त (विठूर) येथेच स्थानिक केले होते. तेथे तो चैनविलासात जगत होता. त्याला पुत्रसंतान नव्हते. म्हणून त्याने दत्तक घ्यावयाचे ठरविले. तो जेव्हा ब्रम्हावर्ताला आला, तेव्हा त्याच्याबरोबर अनेक ब्राम्हण कुटुंबे त्याच्या आश्रयाला आली. त्यांमध्ये माथेरान जवळच्या वेणूगावचे माधवराव भट यांचेही कुटुंब होते. त्यांचे बंधूही त्यांच्याबरोबर तेथे आले होते. माधवरावाच्या पत्नीचे नाव वेणूबाई तिच्या पोटी एक सुंदर पुत्ररत्न निपजले. त्याचे नाव त्यांनी 'धोंडू' असे ठेवले. तो तीन साडे-तीन वर्षांचा असतांनाच दुसऱ्या बाजीरावच्या मनात भरला आणि त्याने ७ जून १८२७ रोजी धोंडूला दत्तक घेऊन त्याचे नाव 'नानासाहेब' असे ठेवले. त्यानंतर धोंडूचे दादासाहेब व बाळासाहेब हे दोन्ही बंधूही बाजी रावाने दत्तक घेतले. तिन्ही मुलांचे लालन-पालन दुसऱ्या बाजीरावाच्या विठूर येथील महालात सुरु झाले.

बाजीरावाचा एक भाचा चिमाजी अप्पा हा काशी येथे वास्तव्यास होता. त्याचे अकालीच निधन झाल्याने त्याच्या धर्मखात्यात असलेले मोरोपंत तांबे यांचा आधार तुटला

व तेही आपल्या कुटुंबासह विठूर येथे दुसऱ्या बाजीरावाच्या आश्रयास आले. त्यांची एक सुंदर कन्या होती. तिचे नाव 'मनकर्णिका उर्फ मनू'. ती सुंदर, गोरीपान, चपळ व बोलण्याचालण्यात चुणचुणीत व ठसकेबाज होती. नानासाहेबापेक्षा दहा वर्षांनी लहान होती. तिचा वावर बाजीरावाच्या कड्यात कायमचा असे. बाजीराव तिला 'छबेली' म्हणायचा.

नानासाहेब, दादासाहेब व बाळासाहेब यांचे शिक्षण सुरु झाले, तेव्हा मनूही त्यांच्याबरोबर शिकू लागली. ती आठ वर्षांची झाल्यावर तिचे लग्न बाजीरावाने झांशीचे राजे गंगाधरराव नेवाळकर यांच्याशी लावून दिले. तिचे सासरचे नाव 'लक्ष्मी'.

महंमद अली व अजीमुल्लाखाँ तुर्कस्थान, क्रिमिया, इराण, अफगाणिस्तान, रशिया इ देशांना भेटी देऊन क्रिमियातील युद्धाचे निरीक्षण करुन भारतात परतले. रशियाने त्या युद्धात इंग्रजांची कशी दाणादाण करुन टाकली हे त्यांनी पाहिले होते. सन १८५६ मध्ये ते विठूरला परत आले. अजीमुल्लाखाँच्या प्रयत्नांना यश आले नाही, म्हणून नानासाहेब निराश झाले. पण त्याच्या सल्ल्याप्रमाणे उठाव करायचे त्यांनी ठरविले. नानासाहेब, तात्या टोपे, अजीमुल्लाखाँ व बाळासाहेब तीर्थयात्रेचे निमित्त करुन इलाहाबाद, अयोध्या, दिल्ली, लखनौच्या यात्रेस जाऊन आले. या यात्रेत अनेक राजेरजवाड्यांना त्यांनी उठावासाठी प्रवृत्त केले. त्यानुसार नानासाहेबांनी अनेक राजांना, जहागीरदारांना उठावासाठी गुप्तपणे पत्रे पाठविली आणि ३१ मे रविवार रोजी देशातील सारे इंग्रज ठिकठिकाणच्या चर्चमध्ये प्रार्थनेस जातील तेव्हा त्या सर्व इंग्रजांना कापून काढायची योजना ठरविली. त्याचप्रमाणे नानासाहेब व अजीमुल्लाखाँ यांनी साधूंच्या व फकिरांच्या वेषात अनेक गुप्त हेर देशभरातील इंग्रजांच्या छावण्यामधील देशी पलटणींना उठावासाठी प्रवृत्त करण्यास पाठविले. ते देशी शिपाई इंग्रज सरकारवर असंतुष्ट होतेच. त्यामुळे इंग्रजांच्या अनेक पलटणी उठावास सिद्ध झाल्या. एखादे मोठे संकट वा लढाईचे सैन्य आपल्या भागात येणार आहे, असे कळताच एका गावातून दुसऱ्या गावात चपात्या पाठविण्याची गुप्त यंत्रणा देशात चालू होती. त्याप्रमाणे प्रत्येक गावात चपात्या जाऊ लागल्या व ३१ मे रोजी सर्वांनी दक्ष रहावे, अशा सूचना सर्व गावांत गेल्या. साधू व फकीर कमळे घेऊन असाच संदेश देशी पलटणीत पोचवीत होते. ही प्रचारयंत्रणा एवढी गुप्त होती की, एकाही इंग्रजाला त्याचा सुगावा लागू शकला नाही. फक्त संशयावरुन काही साधूंना व फकिरांना इंग्रज अधिकाऱ्यांनी फांशी दिली.

इंग्रजांच्या पलटणींना देण्यात आलेल्या नव्या एन्फिल्ड रायफलींच्या काडतुसांचा कारखाना कलकत्त्याजवळ डमडम येथे कंपनी सरकारने सुरु केला होता. त्या

कारखान्यातील एका मोची जातीच्या कर्मचाऱ्याकडून बराकपूर छावणीतील मंगल पांडे या ब्राम्हण शिपायाला समजले की, 'सर्व शिपायांना गायींची व डुकरांची लावलेली काडतुसे दिली जाणार आहेत." हे समजताच मंगल पांडेची खात्री झाली की, 'इंग्रज सरकार सर्व हिंदू व मुसलमान शिपायांचा धर्म बुडवायला निघाले आहे." त्यामुळे संतप्त होऊन बराकपूर छावणीतल्या गोऱ्या अधिकाऱ्यांवर हल्ला करुन त्यांना २९ मार्च १८५७ रोजी जखमी केले. त्या गुन्ह्याबद्दल त्याला ८ एप्रिल १८५७ रोजी फांशी देण्यात आले. ही बातमी वाऱ्यासारखी सबंध हिंदुस्थानातील पलटणीत पसरली. आधीच कंपनी सरकार वर असंतुष्ट असलेले सारे हिंदु-मुस्लिम शिपाई संतप्त झाले व इंग्रजांविरुद्ध उठावास उद्युक्त झाले.

९ मे १८५७ रोजी मेरठ छावणीतील ८५ देशी शिपायांनी ती काडतुसे घेण्यास नकार दिल्याने त्या छावणीतील अधिकाऱ्यांनी त्यांना १०/१० वर्षांच्या शिक्षा देऊन तुरुंगात डांबले.

दुसऱ्या बाजीरावाने सत्तरी ओलांडली, तेव्हा त्याला आपले आठ लाखांचे पेन्शन आपल्या निधनानंतर आपला मोठा दत्तकपुत्र नानासाहेब यास चालू राहावे, याची काळजी पडली म्हणून त्यान गव्ह. जनरलकडे तसा अर्ज केला. गव्ह. जनरलकडून त्याला उत्तर मिळाले, "ऐन वेळी त्या संबंधात योग्य निर्णय घेतला जाईल.' दुसरा बाजीराव २८ जानेवारी १८५१ रोजी मरण पावला. त्यानंतर नानासाहेबाने गव्ह. जनरल डलहौसी यांचेकडे आपल्या पित्याचे पेन्शन आपणांस कायम चालू राहण्यासाठी पत्रव्यवहार केला. पण डलहौसीने 'पेन्शन फक्त तहहयातच असते,' ते घेणाऱ्याच्या निधनानंतर बंद होते.' असे नानासाहेबाला कळविले. नानासाहेब त्यामुळे व्यथित झाला व त्यानें आपला विश्वासू सल्लागार अजीमुल्लाखाँ याला आपला वकील म्हणून या प्रकरणी दाद लावून घेण्यासाठी महंमद अली याच्यासह लंडनला पाठविले.

दुसऱ्या बाजीरावाकडून इंग्रजांनी मराठा राज्य हिसकून घेतले व त्याला महाराष्ट्रातून हद्दपार केले, तरी ब्रम्हावर्ताला त्याचे व कानपूरच्या बड्या इंग्रज अधिकाऱ्यांचे संबंध चांगले होते. ते बडे इंग्रज अधिकारी आपल्या कुटुंबासह विठूरला बाजीरावाकडे विश्रांतीला व मौज मजा करण्यासाठी येत असत. बाजीराव त्यांची चांगली बडदास्त ठेवीत असे. त्यांच्यासाठी मेजवान्या, उंची दारु, नाचरंग वगैरेंची उत्तम सोय करीत असे तीच प्रथा नानासाहबाने ही पुढे चालू ठेवली होती. कानपूर छावणीचा प्रमुख व्हीलर, कलेक्टर हिलर्डसन हे तर त्याचे दोस्तच होते. पण पेन्शन मिळविण्यासाठी त्यांचा काहीही उपयोग नानासाहेबाला झाला नाही.

अजीमुल्लाखाँ हा इंग्लिश व फ्रेंच भाषांत प्रवीण होता. त्याला उर्दू, हिंदी व संस्कृत भाषांचे ज्ञान ही प्राप्त झालेले होते. कानपूरच्या इंग्रजी शाळेत त्याने अध्यापनाचे कार्य केलेले होते. तो बहुश्रुत होता. गोरापान व राजबिंडा होता. त्याला व महमद अलीला भरपूर पैसा देऊन नाना साहेबांनी इंग्लंडला आपले वकील म्हणून पाठविले. लंडनला त्याने आपल्या व्यक्तिमत्वाची छाप कंपनीच्या डायरेक्टरांवर आणि पार्लमेंटचा सदस्यांवर पाडली. त्याने नानासाहेब पेशव्यांना पेन्शन मिळावे म्हणून अथक प्रयत्न २/३ वर्षे केले. पण कंपनीच्या डायरेक्टरांनी त्याला स्पष्टपणे सांगितले की, ''गव्ह. जनरलचा निर्णय योग्यच आहे. आम्ही तो बदलू इच्छित नाही.'' ते ऐकल्यावर तो निराश होणे साहजिकच होते. पण त्याने आपले प्रयत्न सोडले नाही. लंडनला गेल्या चौदा वर्षांपासून रंगो बापूजी सातार्‍याचे राजे प्रतापसिंह भोसले यांना त्यांचे राज्य परत मिळविण्यासाठी प्रयत्न करीत होता. पण कंपनीच्या डायरेक्टरांनी त्यालाही असेच उत्तर दिले. त्याची गाठ लंडन येथे अजीमुल्लाखाँशी पडली. दोघांनी विचार - विनिमय करुन भारतात गेल्यावर इंग्रजांविरुद्ध उठाव करण्याचे ठरविले. अजीमुल्लाखाँने नानासाहेबांच्या साह्याने उत्तर भारतात तसा प्रचार करायचा व रंगोबापूजीने दक्षिणेतील राजे रजवाड्यांत तसा प्रचार करायचा. असे ठरल्यावर १८५४ साली रंगो बापूजी भारतात परतला. मेरठच्या सर्व शिपायांनी १० मे रोजी बंड पुकारले. तेथल्या अनेक इंग्रजांना ठार केले व तुरुंग फोडून त्या ८५ शिपायांना मुक्त केले. ते सारे शिपाई रातोरात दिल्लीला पोचले व त्यांनी बहादुरशाह जफर या शेवटच्या मोगल बादशहाला हिंदुस्थानचा सम्राट म्हणून जाहीर केले. त्यांना दिल्लीमधील देशी पलटणीतले सारे शिपाई येऊन मिळाले व त्या सर्वांनी मिळून दिल्लीतील इंग्रजांना कापून काढून दिल्ली स्वतंत्र झाल्याची घोषणा केली. उठाव निश्चित तारखे आधीच सुरु झाल्याने उठावासाठी तयार झालेले सगळेच राजे रजवाडे गोंधळात पडले. नानासाहेब पेशवे व अजीमुल्लाखाँ सुद्धा गोंधळले. पण त्यांनी कानपूर छावणीतील इंग्रज अधिकार्‍यांशी पूर्वीसारखीच सलोख्याची वागणूक सुरु ठेवली.

मेरठ व दिल्ली येथल्या उठावाच्या बातम्या कानपूरचा सेनाप्रमुख व्हीलर आणि कलेक्टर हिलर्डसन यांना समजल्या. तेथल्या छावणीमधील शिपायांत असंतोष वाढू लागल्याची लक्षणे त्यांना दिसू लागली. कानपूर मध्ये फक्त २५० गोरे शिपाई होते आणि इतर पुरुष व बायकामुले ७५० होती. पलटणीत ३००० देशी शिपाई होते. त्यामुळे व्हीलर व हिलर्डसन यांना कानपूरच्या आपल्या मोठ्या खजिन्याची व शस्त्रागाराची चिंता पडली. त्यानी आपला मित्र नानासाहेब याला त्याचे सैनिक व तोफा घेऊन कानपूरला बोलावले आणि कानपूर मधील नबाबगंज येथील आपल्या खजिन्याच्या व शस्त्रागाराच्या संरक्षणाचे काम नानासाहेबाकडे सोपविले. त्यांच्या बरोबर अजीमुल्लाखाँ व तात्या टोपे हे सुद्धा कानपूर येथे आले होते.

कानपूर पलटणींचा सुभेदार टीकासिंह याने नानासाहेबांची भेट घेतली व उठाकसंबंधी चर्चा केली. एके दिवशी सायंकाळी नानासाहेब, अजीमुल्लाखाँ, टीकासिंह व शमसुद्दीन हे गंगेकाठी येऊन जलविहार करण्याच्या निमित्ताने नावेतून गंगेत गेले. तेथे त्यांनी उठावाची बोलणी केली. उठाव कसा करायचा हे ठरले आणि ते परतले.

ठरल्याप्रमाणे ५ जून १८५७ रोजी कानपूरच्या शिपायांनी टीकासिंह याच्या नेतृत्त्वाखाली उठाव केला. नाना साहेबांनीही आपल्या ३०० सैनिकांच्या मदतीने कानपूरचा खजिना व शस्त्रागार व दारुगोळ्याचे भांडार आपल्या ताब्यात घेतले. आणि इंग्रजांविरुद्ध युद्ध पुकारले. व्हीलरने अवघ्या २५० सैनिकांसह आपली बाजू १६/१७ दिवस लढविली. पण सर्व बाजूंनी कोंडी झाल्याने त्यांचा अन्नपाण्याचा साठा संपला या युद्धात अनेक इंग्रज स्त्री-पुरुष ठार झाले. कलेक्टर हिलर्डसन व त्याची बायको एका तोफगोळ्याने ठार झाली. अखेर व्हीलरने शरणागतीचा पांढरा झेंडा फडकविला व युद्ध थांबले. डलहौसीच्या विचारांशी सहमत नसलेल्या सर्व इंग्रजांना नावांमधून इलाहाबाद येथे पाठवून देण्याचे आश्वासन नानासाहेबांनी व्हीलरला दिले. त्यांच्यासाठी सती चौरा घाटावर ४० नौका आणल्या.

२३ मे रोजी इलाहाबाद व बनारस येथील देशी पलटणींनी उठाव केला होता. तेथे हॅवलाक व नील या सेनाधिकाऱ्यांनी तो उठाव अत्यंत क्रुरतेने दडपून टाकला. एकट्या इलाहाबादमध्ये ६ हजार लोकांना त्यांनी मारून टाकले. इलाहाबादमधील प्रत्येक झाडाच्या प्रत्येक फांदीवर २/३ प्रेते लटकत होती. कानपूरच्या उठावाची बातमी ऐकताच ते सैन्यासह कानपूरकडे निघाले. त्या उठावातून सुटलेले सैनिक कानपूरकडे निघाले होते. तेथले हत्त्याकांड पाहून ते इंग्रजांवर भयंकर चिडलेले होते. तात्या टोपेने ४० नावांत सती चौरा घाटावर कानपूरच्या इंग्रज स्त्री पुरुषांना बसवून नावाड्यांना नावा चालविण्याचा इशारा केला. त्याच वेळी इलाहाबादकडून ते इंग्रजांवर संतापलेले सैनिक तेथे पोचले. त्यांनी नावांवर बंदुका रोखलेल्या पाहून त्या सर्व नावाड्यांनी नावांवरुन गंगेत उड्या मारल्या व ते काठावर येऊ लागले. त्या नांवातील इंग्रजांनी त्या नावाड्यांवर गोळ्या झाडण्यास सुरुवात केली. ते पाहताच त्या इलाहाबादच्या सैनिकांनी त्या नावांवर आपल्या बंदुकांतून गोळयांचा भाडिमार केला. कित्येक इंग्रज स्त्री-पुरुष व मुले मरण पावली. ही बातमी कळताच नानासाहेबांना 'स्त्रियांना व मुलांना मारु नका' असा निरोप घाटावर पाठविला. तेव्हा ते हत्त्याकांड थांबले. त्या नावांपैकी एका नावेतून ४ इंग्रज पुरुष पुढे निघून गेले. त्यांनाही गंगेकाठच्या गावातील लोकांनी आपल्या गावठी गोळ्या झाडून

जखमी केले. अखेर दुर्विजयसिंह नावाच्या राजनिष्ठ जहागीरदाराने त्यांना आश्रय दिला व त्यांच्यावर उपचार केले. ते बरे झाल्यावर त्यांना अलाहाबादेस पाठवून दिले.

बाकीच्या नावांत १२५ इंग्रज बायका - मुले उरली होती - त्यांना उतरुन घेऊन नानासाहेबाने 'बिबिघर' नावाच्या कानपूरच्या कोठीत ठेवले. त्यांच्या अन्नपाण्याची व्यवस्था केली. त्या स्त्रियांपैकी काहींना दररोज दळण्याचे काम थोडा वेळ दिले जाई. नानासाहेब व त्यांचे सहकारी विजयोत्सवात दंग झाले. कानपूरहून निघून विठूरला आले. तेथे नानासाहेबांचा राज्यभिषेक झाला. सर्वत्र आनंदीआनंदाचे वातावरण होते.

कानपूरच्या बिबिघर कोठीवर बेगम साहिबा ही एक ताकदवान व खंबीर पठाण स्त्री रखवालीसाठी नेमलेली होती. काही इंग्रजस्त्रियांनी एका भंगिणीला वश करुन घेऊन एक चिठ्ठी इलाहाबादच्या इंग्रज अधिकाऱ्यांकडे पाठविण्यासाठी तयार केले. ते बेगम साहिबा या रखवालदारीणीस समजले. तिने लगेच त्या भांगिणीस सुभेदार टीकासिंह याच्यापुढे उभे केले व ती चिठ्ठी भंगिणीकडून काढून घेतली. तीत लिहिले होते, ''शत्रूकडील लोक विजयोत्त्सव व नाचरंग यांत दंग आहेत. तरी त्यांच्यावर चाल करुन येण्यास हीच वेळ योग्य आहे.'' तो मजकूर वाचून टीकासिंह भयंकर संतापला व त्याने 'बिबिघरातील सगळ्या बायकामुलांची कत्तल करुन टाका' असा हुकूम आपल्या शिपायांना दिला. ते शिपाई बिबिघराजवळ आले. पण त्यांना त्या इंग्रज मुलांना मारावेसे वाटेना. कारण ते भारतीय संस्कृतीत वाढलेले होते. ते शिपाई इंग्रज स्त्रियांना मारायला कचरत आहेत असे पाहून बेगमसाहिबाने गावातून पाच कसाई बोलावले व त्यांना त्या इंग्रज बायकामुलांची कत्तल करायला सांगितले. त्या कसायांनी ती सर्व बायकामुले मारुन टाकून त्यांची प्रेते जवळच्या विहिरीत टाकून दिली व ती विहीर मातीने बुजवून टाकली.

४० नावांवरील इंग्रजांची बिबिघरातील बायकामुलांची कत्तल नानासाहेबाने केली, असा खोटा प्रचार इंग्रज इतिहासकारांनी केला. पण १८५९ साली इंग्रज सरकारने इंग्रजांच्या या दोन्ही कत्तलींच्या चौकशीसाठी कर्नल विल्यमचे कमिशन नेमले. त्या कमिशनने शेकडो लोकांच्या जबान्या घेतल्या. त्यांत एकानेही 'या हत्याकांडांना नानासाहेबांची संमती होती' असे एकाही व्यक्तीने सांगितले नाही. तसे पुरावेही त्या कमिशनला मिळाले नाहीत. सर जॉन फॉरेस्ट, मिचेल, कँपबेल इ. ग्रंथकारांनी इंग्रज स्त्री-पुरुषांच्या व मुलांच्या कत्तलीशी नानासाहेबाचा मुळीच संबंध नव्हता, हे स्पष्टपणे लिहून ठेवले आहे.

कानपूर नानासाहेबाने जिंकले व तेथे हिलर्डसन आणि व्हीलर ठार झाले. ही बातमी कळताच हॅवलॉक भयंकर संतापला. तो क्रूरकर्मा नील याच्यासह मोठे सैन्य घेऊन कानपूरवर चालून आला. नानासाहेबांना हेरांकरवी ते समजताच ते आपल्या सैन्यासह युद्धसज्ज झाले होतेच. कानपूरला तुंबळ युद्ध झाले. त्या युद्धात नानासाहेब, तात्या टोपे, बाळासाहेब, रावसाहेब, टीकासिंह, अजीमुल्ला ज्वालाप्रसाद, शमसुद्दीन हे वीर तर लढलेच, त्याबरोबर नर्तकी अजीजन ही सुद्धा पुरुषवेषात आपल्या पुरुषवेषी स्त्री सैन्यासह लढली. या युद्धात नानासाहेबाचा दारुण पराभव झाला व तो आपल्या माणसांसह विठूरला निघून गेला. अजीजन पकडली गेली व तिला इंग्रजांनी गोळ्या घालून ठार केले.

नानासाहेब विठूरला आले. त्यांनी आपला कुटूंबकबिला व बरेचसे धन बरोबर घेतले व ते १८ जुलै रोजी रात्रीच्या वेळी नावेतून गंगापार झाले. त्याआधी त्यांनी आपली उरलेली तीस लाखांची संपत्ती आपल्या महालातल्या खोल विहिरीत टाकून दिली होती. कानपूरची व्यवस्था लावल्यावर हॅवलाक व नील यांनी तेथील अपराध - निरपराध हजारो लोकांची कत्तल केली आणि ते विठूरला आले. त्यांनी तोफा डागून नानासाहेबाचा महाल, अन्य इमारती व सर्व मंदिरे जमीन दोस्त केली. महालातल्या विहिरीत नानासाहेबाचा मोठा खजिना आहे, हे समजल्यावर त्या विहिरीतले पाणी काही दिवसात उपसून काढून तो तीस लाखांचा खजिना हस्तगत केला. त्यांनी विठूरलाही मोठा नरसंहार केला. मैना ही नानासाहेबाची मुलगी महालाच्या भग्नावशेषांवर बसून रडत होती. तिलाही हॅवलाकने त्या भग्नावषेशांसह जाळून टाकले. कानपूर व विठूर येथे त्यांनी प्रचंड लूटमार केली.

कानपूर इंग्रजांनी जिंकले व नानासाहेब गंगापार निघून गेले, हे कळताच तात्या टोपे २० हजार फौजेसह कानपूरवर चालून आला व त्याने कानपूर जिंकले पण ६ डिसेंबर रोजी हॅवलाकने पुन्हा कानपूरवर ताबा मिळविला.

नानासाहेब गंगापार होऊन रोहीलखंडात शिरले व अवधची बेगम हजरत महल हिच्या मदतीला गेले. बेगम हजरत महल, नानासाहेब, मौलवी अहमदशाह इ.नी लखनौच्या बचावासाठी इंग्रजांशी अनेक झुंजी दिल्या. पण १४ मार्च १८५८ रोजी इंग्रजांनी त्यांचा पूर्ण पाडाव केला. बेगम सर्वांसह लखनौमधून उत्तरेकडे निघाली. नानासाहेबाला पकडून देणाऱ्यास कंपनी सरकारने एक लाख रुपयांचे इनाम जाहीर केले होते. पण त्याच्या लोभात कोणीही पडले नाही. कोलिन कँप बेलला त्यांच्या पाठलागावर मोठे सैन्य घेऊन पाठविण्यात आले. बेगम हजरत महल, खान बहादुर खान, नानासाहेब, राजा

बेनी माधोसह एकत्रितपणे नेपाळच्या सरहद्दीजवळील राप्ती नदीच्या तीरावर तळ ठोकून होते. तेथे त्यांची गाठ कोलिन कँपबेलच्या सैन्याशी पडली. तेथे त्यांच्यात निर्वाणीचे युद्ध झाले. आपली हार होत आहे, असे पाहून नानासाहेब, बेगम हजरत महल, बाळासाहेब नेपाळच्या हद्दीत शिरले. त्यांच्या बरोबर भले मोठे सैन्यही होते. तो प्रदेश मोठ मोठ्या टेकड्यांनी व्यापलेला, नद्यानाल्यांचा व घनदाटजंगलांचा असल्याने कोलिन कॅपबेल आपल्या सैन्यासह परत लखनौकडे निघाला.

सुमारे एक वर्षभर या क्रांतिकारकांचे त्या जंगलात फार हार झाले. १ नोव्हेंबर रोजी व्हिक्टोरिया राणीने ईस्ट इंडिया कंपनीकडून हिंदुस्थानचा कारभार आपल्या पार्लमेंटच्या हाती घेतला व हिंदुस्थानातील क्रांतिकारकांसाठी माफीचा जाहीरनामा त्याच दिवशी काढला. ती बातमी ऐकताच नेपाळमधील क्रांतिकारकांचे बहुतेक सैन्य नेपाळमधून आपापल्या गावी निघून गेले. नानासाहेब व बेगम हजरत महल यांनी शरण यावे, म्हणून नेपाळचा राजा जंगबहाद्दूर यांच्या मार्फत खूप प्रयत्न केले. पण त्यांनी इंग्रजांचा कावा ओळखला होता. त्यांनी बाणेदारपणे नकार दिला. मध्यंतरी तापाने आजारी पडून बाळासाहेब वारला. नानासाहेबालाही त्याच तापाने घेरले. त्यातच त्यांचा अंत देवखरी या गावाजवळच्या ओढ्याच्या काठी ऑक्टोबर १८५९ मध्ये झाला. त्यावेळी त्यांचे क्रियाकर्मांतर करण्यासाठी त्यांच्या दत्तक आईजवळ पैसा नव्हता. तिने आपले जडजवाहिर विकण्यासंबंधी सिद्धमानसिंहामार्फत जंगबहदुरास विनंती केली. तो पैसा हाती येताच ५ नोव्हेंबर १८५९ रोजी नानासाहेबांचे अखेरचे क्रियाकर्मांतर नेपाळातच करण्यात आले. त्यानंतर राजा जंगबहादुराने त्याच्या उर्वरित कुटुंबाला व बेगम हजरत महल हिला तिच्या पुत्रासह काठमांडू येथे आश्रय दिला.

नानासाहेब तात्या टोपे, कुवरसिंह, मौलवी अहमदशाह व बेगम हजरत महल ही १८५७ च्या युद्धातील दिव्य रत्ने होती. देशाच्या स्वातंत्र्यासाठी त्यांनी अखेरच्या काळात अत्यंत हालअपेष्टा सहन केल्या. पण ते इंग्रजांना मुळीच शरण गेले नाहीत. त्यांनीच पुढच्या ९० वर्षात भारतातील क्रांतिकारकांना स्फूर्ती दिली व १५ ऑगस्ट १९४७ रोजी आपल्या देशाला स्वातंत्र्य मिळाले.



# ३०. कुमारी मैना

सन १८५७ साली कानपुरच्या युद्धात नानासाहेब पेशव्यांचा पुर्ण पराभव झाला. तेव्हा ते विठूरला आले व रात्रीच्या वेळी आपली काही संपत्ती व कुटुंबाकबिला घेऊन नावेतून गंगापार झाले व त्यांनी अवध प्रांतात प्रवेश केला. विठूरहून निघण्याच्या वेळी कसे नी काय, ते आपली मानलेली मुलगी कुमारी मैना हिला आपल्या बरोबर जाण्यास विसरले, हे मात्र खरे.

इंग्रज सेनापती हॅवलाक व नील यांनी कानपूर जिंकल्यानंतर ते विठूरला आले. त्यांनी विठूरचा नानासाहेबांचा वाडा लुटला. त्यांना समजले की, नानासाहेबांनी आपली बरीच संपत्ती महालाच्या आवारातील विहिरीत पेट्यांमध्ये टाकून दिली आहे. सलग एक आठवडाभर सैनिकांच्या साह्याने त्या विहिरीतील पाणी त्यांनी उपसून काढले व त्या पेट्या वर काढल्या. त्या पेट्यांत त्यांना ३० लाखांचे सोनेनाणे व जडजवाहीर मिळाले. ते घेऊन ते लखनौकडे निघून गेले. व जनरल हे याचेजवळ थोड्या तोफा ठेवून त्यांनी हे याला सांगितले की, "नानासाहेबाचा वाडा, इतर वाडे व सर्व मंदिरे तोफा डागून जमीन दोस्त कराव्या"

जनरल हे ने नानासाहेबांचा वाडा पाडून टाकण्यासाठी त्या वाड्यावर जेव्हा तोफा रोखल्या, त्यावेळी त्यांना त्या वाडाच्या वरच्या व्हरांड्यात एक सुंदर बालिका उभी असलेली पाहून आश्चर्य वाटले. राजवाडा लुटला त्यावेळी तर ती बालिका कोणाच्याही दृष्टीस पडली नव्हती. तिने जनरल हे याला आपल्या करूण वाणीत राजवाडा पाडू नका, असे इंग्रजीत सांगितले. तेव्हा तिचे अल्पवय आणि करूणामय सुंदर चेहरा पाहून हे याला तिची दया आली. त्याने तिला विचारले, "तुझी काय इच्छा आहे? त्यावर ती म्हणाली, "कृपा करून आमचा हा वाडा पाडू नका,"

"का? कशासाठी तू असे म्हणतेस?"

"तुम्हीच सांगा, हा वाडा तुम्ही का पाडणार आहांत?"

"हा वाडा विद्रोही नेता नानासाहेबांचा आहे, म्हणून सरकारने हा वाडा पाडून टाकण्याचा हुकूम दिला आहे."

" तुमच्या विरूद्ध ज्यांनी लढाई केली, ते दोषी असतील. पण या निर्जीव वाड्याने तुमचा कोणता अपराध केलेला आहे. हा वाडा मला अत्यंत प्रिय आहे, म्हणूनच मी आपणांस विनंती करते की, तुम्हा हा वाडा पाडू नये."

तिचे करुणापूर्ण बोलणे ऐकून जनरल हे याला ही अतिशय वाईट वाटले. पण तो सरकारच्या हुकूमाचा बंदा होता. तेव्हा पुन्हा ती बालिका म्हणाली, "माझे नाव मैना असून मी नानासाहेबांची दत्तक कन्या आहे. मी तुम्हाला ओळखते. तुम्ही जनरल हे आहांत. तुमची लाडकी मुलगी मेरी माझी चांगली मैत्रीण होती. ती आमच्या या वाड्यात वारंवार येत असे व आम्ही एकत्र खेळत असू. तुम्ही सुद्धा आमच्या वाड्यात येत असत व माझ्यावरही आपल्या मुलीप्रमाणे प्रेम करीत असत. मला वाटते, तुम्ही या सर्व गोष्टी विसरुन गेला आहांत. मेरीच्या मृत्युनंतर मी खुप रडले होते. तिचे एक पत्र अजूनही माझ्याजवळ आहे."

हे तिचे बोलणे ऐकून जनरल हे तर थिजून गेला. त्याला सारे काही आठवले. तो म्हणाला,

"आता मी तुला ओळखले आहे. तू माझ्या मुलीची आवडती मैत्रीण होतीस. मी ज्या सरकारचा नोकर आहे, त्या सरकारचा हुकूम मी टाळू शकत नाही. तरीही मी तुझे रक्षण करण्याचा प्रयत्न जरूर करीन."

तेवढ्यात मुख्य सेनापती औट्रम तेथे आला व त्याने जनरल हे याला करड्या आवाजात विचारले, "नानाच्या महाल आतापर्यंत तुम्ही तोफा डागून का उडवून दिला नाही?"

जनरल हे नम्रपणे म्हणाला, "मी ही याच फिकिरीत आहे. पण माझे आपणांस नम्र निवेदन आहे, कोणत्या प्रकारे हा महाल आपण वाचवू शकू?"

औट्रम म्हणाला, "गव्हर्नर जनरलच्या हुकुमाशिवाय हे शक्य नाही. नानासाहेबावर आपल्या वरिष्ठांचा भयंकर क्रोध आहे. त्याचा महाल किंवा वंश यांच्यावर दया दाखविणे अशक्य आहे."

हे म्हणाला, "गव्हर्नर जनरलना तारेने याबाबत विचारून घ्यावे, असे मला वाटते."

"तुम्ही असे का म्हणता? मी नानासाहेबाच्या या महालास जमीन दोस्त करीन व नानाच्या त्या मुलीलाही कैद करीन."

सेनापती हे व्यथित अंतःकरणाने निघून गेला-औट्रमने नानाच्या महालाला वेढा देऊन त्या मुलीचा शोध घेतला. पण ती मुलगी महालात कोठेही दिसली नाही. त्यामुळे औट्रम चकित झाला. त्यामुळे चकित झाला. त्यानंतर तोफा डागून तो महाल, इतर वाडे व मंदिरे त्याने जमीनदोस्त केली.

लंडनच्या 'टाईम्स' या सुप्रसिद्ध वर्तमान पत्रात ६ संप्टेंबर १८५७ रोजी बातमी छापून आली. ''गव्हर्नर जनरल आजपर्यंत त्या अत्याचारी नानासाहेबाला पकडू शकले नाहीत, ही दुःखाची गोष्ट आहे. जोपर्यंत आमच्या शरीरात रक्त राहील, तोपर्यंत कानपूरला नानासाहेबाने केलेल्या आमच्या लोकांच्या हत्याकांडाचा बदला घ्यायला. आम्ही विसरणार नाही, एवढा आमचा नानासाहेबासंबंधी भयंकर क्रोध आहे.''

६ सप्टेबरलाच लंडन येथे 'हाऊस ऑफ लॉर्डस' मध्ये जनरल हे च्या रिपोर्टाची टिंगल करण्यात आली. हे ने नानासाहेबाची मुलगी हिच्यावर दया दाखवावी, असे लिहिले होते. हे वर हा कलंक आहे. ज्या नानासाहेबाने कानपूरला इंग्रज स्त्री-पुरुषांचा संहार केला, त्याच्या मुलीला दया दाखविणे शक्यच नाही. आमच्या मते नानाचे जे कोणी संबंधी असतील, त्यांना तात्काळ ठार करावे. नानाच्या ज्या मुलीशी जनरल हे चे बोलणे झाले, त्या मुलीला हे समोरच फाशी देण्यात यावी.''

कानपूरच्या इंग्रज स्त्री-पुरुषांच्या हत्याकांडाशी नानासाहेबांचा मुळीच संबंध नव्हता, असे प्रत्यक्षदर्शी इंग्रजांनीच लिहून ठेवले आहे. खोट्या बातम्या लंडनला पाठविण्याचा उद्योग काही इंग्रज सातत्याने करीत होते. त्यातलीच ही बातमी आहे.

सप्टेंबर १८५७ मध्येच अर्ध्यारात्री पांढरे स्वच्छ कपडे घालून मैना नानासाहेबांच्या उध्वस्त महालाचा अवशेषांवर बसून रडत होती. जवळच औट्रमचे सैन्य होते. काही सैनिक तिच्याजवळ गेले. ती सारखी रडतच होती. सैनिकांच्या प्रश्नांना उत्तर देत नव्हती. जनरल औट्रमही तेथे आला. तो म्हणाला, ''ओह! ही तर नानासाहेबाची मुलगी मैना आहे.'' त्याने मैनेला अटक केली व तिच्या हातात बेड्या घातल्या. तिला कानपूरच्या किल्ल्यात तुरुंगात ठेवले. त्या नंतर एका महाराष्ट्रीय बखरकाराने आपल्या बखरीत लिहिले,

''काल कानपुरात एक भयंकर हत्याकांड झाले. नानासाहेबाची कन्या मैना हिला मोठ्या आगीत टाकून जाळण्यात आले. त्या भयंकर अग्निज्वालांत मैनेची शांत व निष्पाप अनुपम मूर्ती जळत असतांना तेथे जमलेल्या देशी सैनिकांनी व इतर लोकांनी तिला 'देवी' समजून प्रणाम केला.''

कानपूरचा इंग्रजांचा संहार नानासाहेबांनी केलेलाच नव्हता. त्याबद्दल त्यांच्या अल्पवयीन मुलीवर सूड उगवण्याची नीती इंग्रजांच्या शिवाय दुसऱ्या कोणत्याही जमातीची नसेल, असेच वाटते.



# ३१. तात्या टोपे

"सन १८५७ च्या विद्रोहात जे सर्व नेते सामील होते, त्या सर्व नेत्यांमध्ये तात्या टोपे अप्रतिम साहसी, अति धैर्यवान आणि दृढनिश्चयी होते. त्यांची संघठनशक्ती व प्रतिभा प्रशंसनीय होती".- सर ह्यू रोज.

ह्यू रोज प्रमाणेच जॉर्ज फारेस्ट याने तात्या टोपेला 'सर्वश्रेष्ठ राष्ट्रीय नेता' म्हटले आहे. पर्सीक्रास स्टेडिंगने म्हटले आहे, "तात्या टोपे जगातील सर्वश्रेष्ठ गुरिल्ला सेना नायक होते. ...... जर त्या विद्रोहात त्याच्यासारखे आणखी दोन तरी नेते असते, तर हिंदुस्थान इंग्रजांना तेव्हाच सोडावा लागला असता, यात शंकाच नाही."

तात्या टोपेबद्दल वर दर्शविल्याप्रमाणे लिहिणारे तिन्ही लोक इंग्रज होते, हे लक्षणीय आहे. शत्रूसुद्धा ज्याची अशी प्रशंसा करतात, तो सेनानायक आधी नानासाहेब पेशव्यांच्या पदरी मुख्य लेखनिक होता. तो नानासाहेबापेक्षा दहा वर्षांनी वयाने मोठा होता. कानपूरला जेव्हा नानासाहेबांनी उठावाची सूत्रे हातात घेतली, तेव्हा त्यांनी लेखनिक तात्याला आपल्या दरबारात बोलावले व त्यांना सैनिकी वेष व रत्नजडित तलवार देऊन आपला सरसेनापती घोषित केले. लेखणी टाकून देऊन तलवार हाती घेणारा व युद्धाचा कसलाही अनुभव नसणारा तो सर्वश्रेष्ठ योद्धा ठरला आणि आपल्या देशाच्या स्वतंत्रतेच्या बलिवेदीवर त्याने धैर्यपूर्वक आपले बलिदान केले. आपल्या आयुष्याच्या उण्यापुऱ्या शेवटच्या दोन वर्षांत तात्याने एवढी चिकाटी, निष्ठा, शौर्य व बाणेदारपणा दाखविला की, शत्रूंना (इंग्रजांना) सुद्धा त्याच्या गुणांची व कर्तृत्वाची वाखाणणी करावी लागली.

तात्याचे वडील पांडुरंगराव. ते वेदशास्त्र संपन्न होते. त्यांचे मूळगांव बीड जिल्ह्यातील पाटोदा तालुक्यातील जोळ हे खेडे. त्या काळात पाटोदा तालुका नगर जिल्ह्यात होता. नंतर ते नासिक जिल्ह्यातील येवले या गावी स्थायिक झाले. दुसऱ्या बाजीरावाचा विश्वासू सरदार त्र्यंबकजी डेंगळे हा नगर जिल्ह्यातल्या संगमनेर तालुक्यातील निमगाव जाळी येथला राहणारा. त्याचा व पांडुरंगरावांचा चांगला परिचय होता. त्र्यंबकजी डेंगळ्यांनीच पांडुरंगरावांना दुसऱ्या बाजीरावाच्या सेवेत आणले. त्यांच्याकडे धर्मदाय खाते सोपविण्यात आले. १८१८ मध्ये इंग्रजांनी पेशवाई बुडविली व दुसऱ्या बाजीरावाला आठ लाख रुपये पेन्शन देऊन उत्तरेत गंगेच्या काठी ब्रह्मावर्त (विठूर) येथे स्थायिक केले. दुसऱ्या बाजीरावाबरोबर जी ब्राह्मणमंडळी विठूरला गेली, त्यांत पांडुरंगरावही होते व तेथेही त्यांच्याकडे धर्मदाय खाते होते. ते आधी अण्णासाहेब विंचूरकरांचे आश्रित होते.

पांडुरंगरावांना आठ मुले होती. त्यातला दुसरा रामचंद्र ऊर्फ तात्या. त्याचा जन्म येवले येथे सन १८१४ सुमारास झाला. विंचूरकरांच्या 'तीर्थयात्रा प्रबंध' या तत्कालीन हस्तलिखीतात रामचंद्ररावांचा उल्लेख 'अप्पा टोपे' व तात्यांचा उल्लेख 'तात्या टोपे' असा आहे. यावरून त्यांचे मूळ आडनांव 'टोपे' हेच होते. बाजीरावाने दिलेल्या टोपीवरून त्यांचे आडनाव टोपे असे पडले, ही आख्यायिका त्यावरून बाद ठरते. ते येवले येथे स्थायिक झाल्याने त्यांना येवलेकर असेही आडनाव लाभले. ते देशस्थ ब्राह्मण होते.

नानासाहेब पेशव्यांचे संबंध कानपूरच्या वरिष्ठ इंग्रज अधिकाऱ्यांशी चांगले होते. ते अधिकारी अधूनमधून विठूरला नानासाहेबाकडे येत असत. नानासाहेब त्यांचे आदरातिथ्य उत्तमप्रकारे करायचे. त्यामुळे त्या अधिकाऱ्यांचा नानासाहेबांवर विश्वास होता. १० मे रोजी मेरठच्या पलटणीतील देशी शिपायांनी, ११ मे रोजी दिल्लीच्या देशी पलटणींनी व ३० मे रोजी लखनौच्या पलटणींनी इंग्रजाविरुद्ध उठाव केले. त्याच्या बातम्या कानपूरला येऊन थडकल्या. कानपूरच्या देशी पलटणी तीन होत्या. त्यांत ३००० शिपाई होते. ते ही उठाव करण्याच्या बेतात आले. त्याची कुणकुण तेथला इंग्रज सेनापती व्हीलर व कलेक्टर हिलर्डसन यांना लागली. त्यांनी लगेच नानासाहेबांना त्यांचे शिपाई व तोफा घेऊन कानपूरला बोलावले. नानासाहेब तीनशे सशस्त्र शिपाई व दोन तोफा घेऊन कानपूरला आले. त्यांच्याकडे कानपूरच्या नबाबगंज मधील सरकारी खजिना व दारूगोळ्याचे कोठार आणि शस्त्रागार यांचे संरक्षण करण्याची जबाबदारी इंग्रज अधिकाऱ्यांनी सोपविली. तात्या टोपेही त्यांच्याबरोबर कानपूरला आले होते.

कानपूरच्या पलटणीचा सुभेदार टीकासिंह नानांना व तात्याना भेटला. नानांचा सल्लागार अजीमुल्लाखाँसुद्धा तेथेच होता. चौघांनी उठावाचा बेत आखला. ४ जून १८५७ रोजी टीकासिंहच्या नेतृत्वाखाली कानपूरच्या ३००० शिपायांनी इंग्रजाविरूद्ध बंड पुकारले. त्या छावणीत बायकांमुलांसह फक्त १००० इंग्रज होते. व्हीलरने संरक्षणाची तयारी केलेलीच होती. टीकासिंह व तात्या टोपे यांनी कानपूरच्या रेसिडेन्सिवर हल्ला चढविला. नानासाहेब त्यांचे ८ लाखाचे पेन्शन इंग्रज सरकारने बंद केल्याने मनातून इंग्रजावर चिडलेले होतेच. ते वरवरून मैत्री दाखवित होते. त्यांनीही नबाबगंज मधला इंग्रज सरकारचा खजिना, दारूगोळा-भांडार व शस्त्रागार ताब्यात घेतले. व्हिलरने १६/१७ दिवस चांगली टक्कर दिली. पण रेसिडेन्सीतील अन्नपाणी संपत आले. अनेक इंग्रज मारले गेले. त्यामुळे त्याने शरणागती पत्करली. नानासाहेबांनी उरलेल्या इंग्रजांना अलाहाबादेस पाठवून देण्याचे आश्वासन दिले. कानपूर स्वतंत्र झाले. विठूरला जाऊन नानासाहेबांचा राज्याभिषेक थाटात झाला.

कानपूरची बातमी कळताच हॅवलॉक व नील हे दोघे सेनापती चिडले. नील तर क्रूरकर्माच होता. ते दोघे मोठे सैन्य घेऊन रस्त्यात दिसेल. त्याला फासावर चढवित

कानपूरला पोहचले. कानपूरला टीकासिंह व तात्या टोपे शर्थीने लढले. पण त्यांचा पराभव झाला. नानासाहेब आपला खजिना व सारे कुटुंब घेऊन गंगापार निघून गेले. तात्या उरलेले सैन्य घेऊन ग्वाल्हेरकडे गेला. तात्याने ग्वाल्हेरच्या राजाच्या सैन्याला उठावास प्रवृत केले.

हॅवलॉक व नील लखनौकडे तेथल्या इंग्रजांच्या मदतीला सैन्य घेऊन गेले. ही संधी तात्याने साधली व पुन्हा कानपूर जिंकून घेतले. ते कळताच हॅवलॉक व नील वाटेतून परतले. त्यांनी कानपूरवर हल्ला केला. तात्याने मोठ्या जिद्दीने त्यांचा प्रतिकार केला. पण त्यांचा टिकाव लागला नाही. कानपूर व विठूर हातातून गेले. तात्या पुन्हा पश्चिमेकडे निघाला.

तात्याने जेव्हा कानपूर पुन्हा स्वबळावर जिंकले होते, तेव्हा त्याला युद्धोपयोगी अशी प्रचंड लूट मिळाली होती. त्या लुटीत ५ लाख रुपये, ११ हजार काडतुसांच्या पेट्या, ५०० तंबू, बैलाचे पुष्कळ तांडे, भरपूर धान्ये व कपडे त्याला मिळाले होते. ते त्याने काल्पीच्या किल्ल्यात ठेवून दिले होते. पश्चिमेकडे जाताना शिवराजपूरची देशी पलटण त्याला येऊन मिळाली होती. आता त्याच्या जवळ २० हजारावर सैन्य होते. त्याची बाजू आता भक्कम होती.

सर ह्यू रोजने २० मार्च १९५८ रोजी झांशीला वेढा घातला. राणी लक्ष्मीबाई जिद्दीने लढत होती. पण तिचे सैन्य बेताचेच होते. तिने तात्याला मदतीसाठी बोलावले. तात्या आपले सैन्य घेऊन निघाला पण ह्यु रोजच्या सैन्याने त्याचा पराभव केला. राणी लक्ष्मीबाई झांशीहून मोजक्या सैनिकांसह गुप्तमार्गाने बाहेर पडून काल्पीला आली. तात्याने तिचे सांत्वन केले. नानासाहेब पेशव्यांचे पुतणे रावसाहेब हे सुद्धा तेथे होते. झांशी काबीज केल्यावर ह्यु रोज काल्पीवर चालून आला. तेव्हा राणी लक्ष्मीबाईने ग्वाल्हेरवर हल्ला करण्याचा सल्ला त्यांना दिला. तिघेही आपल्या सैन्यासह ग्वाल्हेरला आले. थोड्याशा चकमकीत ग्वाल्हेर त्यांच्या हाती आले. राजे जयाजीराव शिंदे व त्यांचे दीवाण दिनकरराव राजवाडे आग्ऱ्याला इंग्रजांच्या आश्रयाला निघून गेले.

सर ह्यू रोजने काल्पी जिंकल्यानंतर आपला मोर्चा ग्वाल्हेरकडे वळविला. तेथे तुंबळ युद्ध झाले. त्यात राणी लक्ष्मीबाईचे दुःखद निधन झाले. इंग्रजांनी तात्यासह सर्वांचा तेथे पराभव केला. तात्या आपल्या उरलेल्या सैन्यासह त्या युद्धातून निसटले. जाताना त्यांनी आसपासचे जंगल पेटवून दिले.

तात्याबरोबर रावसाहेब पेशवेही निघाले. तात्याने मार्च १८५९ अखेरीपर्यंत आपल्या दुर्दम्य ध्येयवादाच्या बळावर आपल्या अपुऱ्या सैन्यानिशी गनिमी काव्याने मध्य भारतात

इंग्रज सेनाधिकाऱ्यांना अगदी बेजार करून सोडले. उत्तरेला अलवर ते दक्षिणेला सातपुड्यातील बैतुल, पूर्वेला सागर ते पश्चिमेला छोटा उदयपूर एवढ्या मोठ्या मध्य भारताच्या प्रचंड टापूत जवळ जवळ एक डझन मोठमोठे इंग्रज सेनाधिकारी त्याचा पाठलाग करीत होते पण तात्याचे दर्शन सुद्धा त्यांना होत नव्हते. म्हणून इंग्रज सरकारने तात्याला पकडण्यासाठी एक लाख रुपयाचे पारितोषिक जाहीर केले. पण एवढ्या मोठ्या रकमेच्या लोभाने कोणीही तात्याचा थांगपत्ता इंग्रजांना लागू देत नव्हता.

लढायांच्या काळात सैन्य आपल्या गावाकडे येत आहे. असे कळताच प्रत्येक गावातील सगळे लोक आपले सामान-सुमान घेऊन जंगलात पळून जात असत. त्यामुळे सैन्याला धान्य, किराणा इ. जिवनावश्यक पदार्थ मिळणे दुरापास्त होऊन जाई. आपल्या सैन्यावर तशी पाळी येऊ नये, म्हणून तात्याने रावसाहेब पेशव्यांच्या नावे साऱ्या प्रजेसाठी एक जाहीरनामा काढून तो गावोगावी पोहचविण्याची व्यवस्था केली. ह्या जाहीरनाम्यातील महत्वाचा भाग असा-

" सर्व शहरे, लहानमोठी गावे, खेडीपाडी येथील राहणारे मध्यम प्रतीचे लोक, व्यापारी, दुकानदार, लष्करी लोक व इतर सर्व प्रतीचे लोक यांस कळविले जाते की, जयाचा झेंडा बरोबर बाळगून राजाच्या मुख्याबरोबर असणारी ही जी फौज इकडेस आली आहे, ती फक्त धर्मबाह्य खिस्ती लोकांच्या नाशाकरीता इथे आली आहे. या देशात राहणाऱ्या लोकांची खराबी करण्याकरीता ती इकडे आलेली नाही. या उपर कोणत्याही गावच्या लोकांनी ही फौज गावानजीक आली असता पळून जाऊ नये. या फौजेस ज्या सामानाची गरज लागेल, ते सामान शिरस्त्यापेक्षा काही जास्ती किंमत ठरवून त्या किंमतीने गावकरी लोकांकडून विकत घेतले जाईल. हा जाहीरनामा ज्या गावी जाऊन दाखल होईल, त्या गावच्या मुख्याने तो आपल्या आसपासच्या गावांत पाठवून द्यावा; म्हणजे जेणेकरून लोकांची सर्व भीती दूर होईल."

तात्याला पकडणे शक्य नाही, म्हणून इंग्रज सेनाधिकाऱ्यानी त्याचे म्हातारे वडील, त्याची पत्नी, मुलगा व मुलगी यांना अटक करून ग्वाल्हेरच्या भयाण किल्ल्यात नजर कैदेत ठेवून दिले. मध्य भारतात तात्या २० जून १८५८ ते मार्च १८५९ अखेर सुमारे ९/१० महिने अत्यंत वेगाने आपल्या सैन्यासह इंग्रज सैन्याला झुकांड्या देत घुमवित राहीला. त्याचा दरदिवसाचा वेग ५० मैलाच्या वर होता. तर इंग्रज सैन्य ४० मैलांपेक्षा जास्त अंतर कापू शकत नव्हते. या काळात तात्याने एवढ्या मोठमोठ्या इंग्रज अधिकाऱ्यांना ३००० मैलाच्या वर पायपीट करायला लावली; पण तात्या त्यांच्या हाती लागलाच नाही. म्हणून त्यांनी फितुर शोधायला सुरुवात केली.

२१ जानेवारी १८५९ रोजी तात्याने रावसाहेब पेशवे व फिरोजशहा यांच्यासह अलवर जवळील शिक्कारा (सीकर) या गावाजवळ इंग्रज सेनापती कर्नल मीड याच्याशी शेवटची झुंज दिली. तीत त्यांचा पराभव झाला. रावसाहेब पेशवे नेपाळात निघून गेले व फिरोजशहा इराणकडे निघाला. आता तात्याकडे फारच थोडे सैन्य राहिले. त्याने त्या सैन्यालाही रजा दिली व तो तीन चांगले घोडे, एक तट्टू, रामराव व नारायण हे दोन ब्राह्मण आचारी आणि गोविंद हा मोतद्दार यांच्या सह परोणच्या जंगलात एका सुरक्षित स्थानी निघून गेला.

त्याचा जुना मित्र मानसिंह हा राजपूत जवळच होता. त्या दोघांची भेट झाली. त्यानंतर मानसिंग जाताना म्हणाला, ''मी थोडेसे शिपाई, काही दारूगोळा व अन्नसामग्री घेऊन दोन-तीन दिवसात तुझ्या मदतीला येतो.'' मानसिंहाची जहागीर ग्वाल्हेरच्या राजाने काढून घेतली होती. ती कशी मिळवावी, या चिंतेत तो होता. हे कर्नल मीडला समजले होते. म्हणून मीडने त्याला बोलावून घेतले व त्याला ग्वाल्हेरच्या शिंद्यांकडून अलवरची जहागीरी मिळवून देण्याचे मधाचे बोट त्याला लावले. त्या बदल्यात तात्या टोपे याला पकडून देण्याचे वचन मीडने त्याच्याकडून घेतले.

तात्याला विश्रांती मिळाल्यामुळे तो आता ठाकठिक झाला होता. सिरोज जवळच्या विद्रोही सैन्याला व शिवपूरच्या एक हजार विद्रोही सैन्याला जाऊन मिळण्याच्या व त्यांच्या साह्याने पुन्हा इंग्रजाविरूद्ध लढण्याचा तात्याचा विचार होता. तशी त्यांच्यात निरोपानिरोपी चालू होती. तो मानसिंहाची वाट पाहात परोणच्या जंगलात थांबला होता. पण मानसिंहाने त्याला दगा दिला. ७ एप्रिल १८५९ च्या मध्यरात्री तात्या गाढ झोपेत असताना मानसिंह काही इंग्रज सैनिक घेऊन गुपचूप तात्याच्या मुक्कामी आला व त्याने तात्याला पकडून दिले. त्याआधी त्या सैनिकांनी तात्याची सर्व शस्त्रे हस्तगत केली होती. तात्याची त्यांनी झडती घेतली. तेव्हा तात्याजवळ सोन्याची तीन कडी, एक तांब्याचे कडे, १०८ मोहरांची पिशवी सापडली. तात्यांचे हुजरे मात्र तात्याचे सर्व कागदपत्र घेऊन निसटून गेले. १०८ मोहरांपैकी ९७ मोहरा मीडने मानसिंहला दिल्या. बाकीच्या २१ मोहरा तात्याला पकडणाऱ्या शिपायाना वाटून दिल्या.

१० एप्रिल १८५९ रोजी इंग्रजांच्या मुशैरी छावणीत तात्यांचे शेवटचे वक्तव्य लिहून घेण्यात आले. तात्याने त्यात आपली आत्मकहाणी सांगितली आहे. ती फार विस्तृत आहे. तात्याला शिप्री येथल्या मीडच्या छावणीतील सैनिकी न्यायालयापुढे १४ एप्रिल १८५९ रोजीच उभे करण्यात आले. तीन दिवस तात्याची चौकशी चालली.त्या न्यायालयात तात्याने स्पष्टपणे सांगितले.

"मी जे जे काही केले ते ते माझे धनी नानासाहेब पेशवे यांच्या आज्ञेनुसारच केले. काल्पीपर्यंत मी त्यांच्या हाताखाली वागलो. तेथून पुढे मी रावसाहेबांच्या आज्ञा पाळल्या. न्याय्ययुद्धातल्या व्यतिरिक्त किंवा लढाई व्यतिरिक्त मी किंवा नानांनी एकाही युरोपियन माणसाला किंवा स्त्रीला ठार मारले नाही किंवा फाशी दिले नाही.. . . . कुठलाही साक्षीपुरावा देण्याची माझी इच्छा नाही. मी तुमच्या विरूद्ध युद्ध खेळलो आहे. म्हणून मला पक्के माहीत आहे की, आता मला मरणाला सिद्ध झाले पाहिजे. मला कोणतेही न्यायालय नको आहे व त्यामध्ये मला कोणताच भाग घ्यावयाचा नाही."

१७ एप्रिल १८५९ रोजी तात्याला फाशीची शिक्षा सुनविण्यात आली. तेव्हा त्याला त्याची शेवटची इच्छा विचारण्यात आली. तेव्हा तात्या म्हणाला, माझ्या वृद्ध आईवडिलांचा माझ्या कृत्याशी कोणताच संबंध नाही. म्हणून त्यांना माझ्याकरीता कोणताही त्रास देऊ नये." नंतर बेड्या घातलेले हात उंचावून तात्या धीरगंभीरपणे म्हणाला, आता मला एकच आशा आहे की, या शृंखलातून मुक्त होण्यासाठी मला एक तर तोफेच्या तोंडी द्यावे किंवा फांसावर लटकविले जावे.

नंतर तात्याला वधस्तंभाकडे नेण्यात आले. त्याने शेजारच्या मांगाकडे एक दृष्टीक्षेप टाकला व तो शांतपणे पायऱ्या चढून वर आला. सभोवारच्या इंग्रजांकडे तुच्छतेने दृष्टी टाकून त्याने आपल्या हाताने स्वतःची मान फांशीच्या दोराच्या फासात अडकविली. त्याच्या पायाखालची फळी काढून घेताच एका क्षणापूर्वी तरतरीत व तेजस्वी दिसणारे तात्याचे रुबाबदार, बांधेसुद शरीर क्षणार्धात अचेतन होऊन लोंबकळू लागले. झाले! स्वातंत्र्य युद्धातले चैतन्यच हरपले.

तात्या मध्यम उंचीचा, निमगोरा, धट्टाकट्टा, भव्य कपाळ असलेला, उंच व सरळ नाक असलेला, काळेभोर डोळे व कमानदार भुवया असलेला, भेदक नजर असलेला. तो वीर मातृभूमीच्या कुशीत विलीन झाला. त्याच्या चेहऱ्यावर बुद्धिमत्तेचे तेज विलसत होते. त्याचा चेहरा पाहताच हा मोठा कर्तबगार पुरूष आहे.' असे सर्वांना वाटायचे. तात्याला उर्द, हिंदी, मराठी संस्कृत या भाषांचे चांगले ज्ञान होते. सही करण्याइतके इंग्रजी त्याला येत होते. त्याचे बाळबोध व मोडी अक्षर वळणदार होते. त्याचा पोशाख साधा होता. खांद्यावर काश्मिरी शाल व कमरेला तलवार आणि कुकरी असायची.

स्वदेशाच्या स्वातंत्र्यासाठी हालअपेष्टा सोशीत, इंग्रज सेनाधिकाऱ्यांना सळो की पळो करीत हा अत्यंत स्वाभिमानी वीर योद्धा अखेर विश्वासघाताने प्राणांना मुकला. त्याचे वडील रामचंद्ररावही तीन वर्षांनी ८० वर्षाचे असताना वारले.



# ३२. अजी मुल्ला खाँ

कानपूर शहर हे गंगाकिनारी वसलेले मोक्याचे ठिकाण. तेथे इंग्रजांची मोठी छावणी होती. उत्तरेला गंगाकिनारी त्या छावणीचे परेड मैदान होते. त्या मैदानापासून थोड्या अंतरावर कानपूरचा पटकापूर मोहल्ला होता. त्या मोहल्ल्यात हिंदु - मुसलमानांची मिश्रवस्ती होती. त्या वस्तीत नजीबुल्ला खाँ हा मुसलमान गवंडी आपली बायको करीमन बी व ५/६ वर्षांचा मुलगा अजीमुल्ला खाँ यांच्यासह एका लहानशा घरात राहात होता. छावणीतील घरांचे, चाळींचे व अधिकाऱ्यांच्या बंगल्यांचे बांधकाम सुरु होते. नजीबुल्ला खाँ हा कुशल गवंडी होता व एका इंग्रज अधिकाऱ्याच्या बंगल्याचे बांधकाम करीत होता. त्या इंग्रज अधिकाऱ्यांने एके दिवशी नजीबुल्ला खाँला घोड्यांचा तबेला साफ करण्याचे काम सांगितले. नजीबुल्ला खाँने ते काम करायचे नाकारले. त्यामुळे तो इंग्रज अधिकारी भयंकर संतापला आणि वरच्या मजल्यावर बांधकाम करीत असलेल्या नजीबुल्ला खाँ याला लाथा बुक्क्यांनी बदडून काढले नंतर वरच्या मजल्यावरुन खाली फेकून देऊन एक वीटही नजीबुल्लाखाँ यांच्या डोक्यात मारली वरुन खाली फेकल्याने त्याचा हात मोडला, मारलेल्या विटेने त्याचे डोके फुटले व तो बेशुद्ध पडला. त्याला मजुरांनी उचलले व त्याच्या घरी आणून सोडले आपला नवरा जखमी झाल्याचे पाहून करीमनबी धाय मोकलून रडू लागली. मोहल्ल्यातले हिंदु - मुस्लिम स्त्री पुरुष तेथे हळूहळू जमू लागले. हाकिमाने उपचार सुरु केले. पण उपयोग झाला नाही. नजीबुल्ला खाँ मरण पावला. अजीमुल्ला खाँ हा मोठमोठ्याने रडत आपल्या आईबरोबर कबरस्थानात आला होता. लोक इंग्रज अधिकाऱ्याला शिव्या देत होते. त्याचा परिणाम अजीमुल्ला खाँच्या बालमनावर पडला. आता ती मायलेकरे पोरकी झाली. करीमनबी मजुरी करून कसेबसे पोट भरु लागली. पुढे ती आजारी पडली व त्या आजारातच अल्ला घरी निघून गेली. ५/६ वर्षांचा अजीमुल्लाखाँ एकदम पोरका झाला. नजीबभाई हा एक सज्जन व प्रामाणिक इसम होता. त्याला मोहल्ल्यातले सारे हिंदु-मुसलमान मानायचे. तेव्हा अजीमुल्लाच्या मदतीला शेजारचे माणिकचंदचाचा धावून आले. त्यांची व कानपूरचे कलेक्टर हिलर्डसन साहेबांची चांगली ओळख होती. त्यांनी अजीमुल्ला खाँला हिलर्डसन साहेबांच्या घरी नोकरीला लावून दिले.

अजीमुल्ला खाँ हिलर्डसन साहेबांच्या घरी ते व त्यांची पत्नी सांगतील ती कामे करू लागला. पुढे तो त्यांच्या घरी उत्तम बावर्ची (स्वयंपाकी) बनला. हिलर्डसन साहेबांचा मुलगा व मुलगी कानपूरच्या पेंटन फ्री स्कूलमध्ये शिकत होती. ती जेव्हा घरी अभ्यास करत असत तेव्हा ७/८ वर्षाचा अजीमुल्ला ही त्याच्याजवळ बसून त्यांचा अभ्यास बघत

असे. त्यांचा अभ्यास बघता बघता, अजीमुल्लाखाँही इंग्रजी व फ्रेंच भाषा जाणू लागला. त्याने हिलर्डसन साहेबाजवळ शिकण्याची इच्छा बोलून दाखविली. ते एक प्रेमळ व उदार इंग्रज गृहस्थ होते त्यांनी अजमिुल्लाखाँचे नाव आपल्या मुलांच्या शाळेत दाखल केले.अजीमुलाखाँ सकाळ संध्याकाळची कामे मन लावून करायचा. शाळेत जायचा व रात्रीही अभ्यास करीत बसायचा. आपल्या वर्गात तो सर्व इंग्रज मुलांपेक्षा जास्त गुण मिळवून प्रत्येक वर्गात उत्तीर्ण व्हायचा. त्यामुळे शाळेच्या प्रिन्सिपालचा तो आवडता विद्यार्थी बनला. शिक्षण पूर्ण झाल्यावर हिलर्डसन साहेबांच्या वशिल्याने तो त्याच शाळेत शिक्षक म्हणून काम करू लागला. त्याचे वाचन सतत चालू असे. इंग्रजी व फ्रेंच भाषांवर त्याने प्रभुत्व मिळविले. त्याला इतिहासाचेही चांगले ज्ञान झाले होते.

अजीमुल्लाखाँ आता आपल्या घरी राहू लागला- लोक त्याचा सल्ला घेण्यासाठी त्याच्या घरी येत. इंग्रज लोकांच्या अत्याचाराच्या कहाण्या सांगत. पण त्याला उर्दु, हिंदी, फारसी भाषा चांगल्या रीतीने अवगत नव्हत्या. म्हणून त्याने त्या भाषांचे व संस्कृत भाषेचे ज्ञानही मौलवी निसार अहमद व पंडित गजानंद मिश्र यांच्याकडून करुन घेतले. कानपूरमध्ये तो विद्वान व सज्जन म्हणून लोकप्रिय झाला. त्याची कीर्ती ८/१० मैलावरील ब्रह्मावर्त येथील नानासाहेब पेशव्यांच्या कानी आली. नानासाहेबांनी त्याला आपल्याकडे बोलावून घेतले. आणि त्याला आपला मंत्री बनविले.

नानासाहेबांकडे कानपूरहून हिलर्डसन साहेब, व्हीलर साहेब आदि वरिष्ठ इंग्रज अधिकारी सुटीच्या दिवशी मेजवानीसाठी येत असत. नानासाहेबही त्यांची उत्कृष्ट बडदास्त ठेवीत असत. ते अधिकारी नानासाहेबांचे मित्रच बनले होते.

दुसरा बाजीराव सन १८५१ मध्ये ब्रह्मावर्त येथे वारला. नानासाहेब, दादासाहेब व बाळासाहेब हे त्याचे तीन दत्तकपुत्र होते. बाजीरावाला दरवर्षी आठ लाख रुपये पेन्शन मिळत असे. ते पेन्शन लॉर्ड डलहौसीने बाजीरावाच्या मृत्युनंतर बंद करुन टाकले. ते पुन्हा सुरु करावे, म्हणून नानासाहेबांनी डलहौसीकडे अनेक अर्ज केले. पण पेन्शन हे तहह्यात असते. संबंधित व्यक्ती मरण पावल्यावर ते देता येत नाही. असे उत्तर डलहौसीने नानासाहेबांना दिले. त्यामुळे ते निराश झाले. पण शेवटचा प्रयत्न म्हणून त्यांनी ईस्ट इंडिया कंपनीच्या डायरेक्टर बोर्डाकडे त्यासाठी दाद मागायचे ठरविले.

अजीमुल्लाखाँ हा इंग्रजी व फ्रेंच भाषांत अस्खलितपणे बोलत असे म्हणून नानासाहेबांनी त्याला आपला वकील म्हणून लंडनला पाठवायचे ठरविले. अजीमुल्लाखाँला माहीत होते की, बरेलीचा महंमद अली, नेपाळचा राजा जंगबहादुर याच्या बरोबर इंग्लडला जाऊन आला होता. तिकडचा तो माहितगार होत. तो बरेलीच्या इंग्रजांच्या

छावणीतील शाळेत व रुडकीच्या इंजिनिअरिंग कॉलेज मध्ये शिकला होता आणि लखनौ दरबारी इंजिनिअर म्हणून काम करीत होता. अजीमुल्लाखाँने त्याच्याबद्दल नानासाहेबांना सांगितले व त्यालाही आपल्या बरोबर नेण्याची इच्छा नानासाहेबांना सांगितली नानासाहेबांनी ही होकार दिला. अजीमुल्लाखाँला खर्चासाठी ५० हजार पौंड देऊन त्याला महंमदअलीसह इंग्लंडला पाठविले.

अजीमुल्लाखाँ हा गोरापान, रुबाबदार, राजबिंडा व संभाषणात पटु होता. त्याची छाप कोणावरही सहज पडायची. तो इंग्रजांची सभ्यता, रीतिरिवाज व संस्कृतीशी परिचित होता. लंडनमध्ये तो नबाबाच्या रुबाबात राहायचा त्याचे व्यक्तित्व आकर्षक होते. त्याने ईस्ट इंडिया कंपनीच्या डायरेक्टर बोर्डाच्या सदस्यांशी व पार्लमेंटच्या काही सदस्यांशी ओळखी पाळखी करुन घेतल्या. त्यांना मेजवान्या व भेटीही दिल्या. त्यांच्यासमोर त्याने नानासाहेबांचे पेन्शन सुरु करण्याबाबत आपली कैफियत ही मांडली. पण त्यांनी अजीमुल्लाखाँ याला दाद दिली नाही. अखेर कंपनीच्या डायरेक्टर बोर्डाने त्याला आपला निर्णय स्पष्टपणे सांगितला. "आम्ही गव्हर्नर जनरलच्या निर्णयाशी पूर्णपणे सहमत आहोत. बाजीरावाच्या दत्तकपुत्राला त्याच्या बापाचे पेन्शन दिले जाऊ शकत नाही." अजीमुल्लाखाँ याची तेवढ्यापुरती निराशा झाली. इंग्रजांबद्दल त्याच्या मनात भयंकर चीड होती. एका अरेरावी इंग्रज अधिकाऱ्याच्या निष्ठुरतेनेच त्याच्या वडिलांना व आईला हे जग सोडून जावे लागले होते. हे तो विसरला नव्हता.

आता तो वेगळ्या दृष्टीने विचार करु लागला. त्याच काळात त्याची भेट रंगोबापूजीशी झाली. सातारच्या छत्रपती प्रतापसिंहाला गव्हर्नर जनरलने कपट-कारस्थाने रचून पदच्युत केले होते. सातारचे राज्य परत मिळाले म्हणून प्रतापसिंहांनी रंगोबापूजीला आपला वकील म्हणून इंग्लंडला १८३९ सालीच पाठविले होते. त्यासाठी रंगोबापूजीने सतत १४ वर्षे कंपनीच्या डायरेक्टर बोर्डासमोर प्रतापसिंहाची बाजू मांडली होती. पार्लमेंटच्या सदस्यांसमोरही युक्तिवाद केला होत. पार्लमेंटमध्ये भाषण करुन सप्रमाण दाखवून दिले होते. की, साताऱ्याचे राज्य खालसा करणे हा उघडउघड अन्याय आहे. पण डायरेक्टर बोर्डाने त्यालाही आंगठा दाखविला होता. म्हणून तो इंग्रज सरकारचा तिरस्कार करीत होता. रंगोबापूजीशी भेट झाल्यानंतर अजीमुल्लाखाँ व महंमदअली यांनी त्याच्याशी विचार विनिमय केला व इंग्रजांना हिंदुस्थानातून कसे हाकलून द्यायचे याची योजना आखली. हिंदुस्थानातील राजेराजवाड्यांना व इंग्रजांच्या सैन्यातील देशी पलटणींना इंग्रजांविरुद्ध उठाव करण्यास उद्युक्त करायचे. त्यांनी उठाव केला, तर हिंदुस्थानातील हिंदु-मुसलमान जनता सुद्धा उठावात सामील झाल्याशिवाय राहणार

नाही. कारण इंग्रजांच्या अत्याचारी राजवटीमुळे जनताही त्रस्त झालेली होती. उठाव सर्वत्र एकाच दिवशी ३१ मे १८५७ रविवार या दिवशी करायचा असे ठरले व रंगोबापूजी १८५४ साली हिंदुस्थानात परत येऊन दक्षिण हिंदुस्थानात त्या कामाला लागला.

अजीमुल्लाखाँ व महंमदअली काही दिवस लंडनला थांबले. नंतर त्यांनी इटली, मिस्त्र, तुर्कस्तान,क्रिमिया, रुस आदि देशांना भेटी दिल्या. त्यांनी क्रिमियाच्या युद्धात इंग्रज सैन्याची होरपळ कशी होते आहे, हे प्रत्यक्ष पाहिले व ते हिंदुस्थानात १८५६ साली परत आले.

अजीमुल्लाखाँ व महंमदअली यांनी जेव्हा नानासाहेबांना डायरेक्टर बोर्डाचा निर्णय सांगितला, तेव्हा ते निराश झाले. पण त्यांनी रंगोबापूजीशी झालेली चर्चा व उठाव कसा करायचा आणि इंग्रजांना हिंदुस्थानातून कसे हाकून द्यायचे, याची योजना नानासाहेबांना सांगितली. त्यांनाही वाटले की, आता इंग्रजांशी शेवटचे दोन हात केल्याशिवाय गत्यंतर नाही. नंतर त्यांनी ठरल्याप्रमाणे तीर्थयात्रा करायचे ठरविले. नानासाहेब, बाळासाहेब व अजीमुल्लाखाँ यांनी तीर्थयात्रेच्या निमित्ताने इलाहाबाद, गया, जनकपूर, पारसनाथ, जगन्नाथपुरी, नासिक, पंचवटी, रामेश्वर, द्वारका, अबू, उज्जैन, अंबाला, दिल्ली, लखनौ अशी दीर्घ यात्रा करुन त्या मार्गावरील राजांना व जहागीरदारांना इंग्रजा विरुद्ध उठाव करण्यासाठी प्रवृत्त करण्याचा कसोशीने प्रयत्न केला व ते ब्रह्मावर्ताला परतले. ठरल्यानुसार साधुसंन्याशी फकीर हाती लाल कमळे घेऊन इंग्रजांच्या सर्व देशी पलटणीत उठावाचा प्रचार गुप्तपणे करु लागले. गावोगांव ग्रामप्रमुखांकडून चपात्या वाटल्या जाऊ लागल्या व जनतेस त्याद्वारे लढण्यास सज्ज राहण्याचे इशारे देण्यात आले. ३१ मे रोजी काय करायचे हे प्रमुख व विश्वासातल्या लोकांना समजावून सांगण्यात आले होते. पलटणींनाही ते माहीत होते. पण ठरल्याप्रमाणे अनेक वेळा घडत नाही हेच खरे.

कलकत्त्याजवळील बराकपूर छावणीत बंदुकीच्या नव्या काडतुसांना गायीची व डुकराची चरबी लावलेली असून त्या काडतुसांची वेष्टने दातांनी तोडांवी लागणार आहेत असे त्या छावणीतील मंगल पांडे या ब्राह्मण शिपायाला समजले. गाय हिदूंना पवित्र तर डुक्कर मुसलमानांना निषिद्ध. मंगल पांडेने छावणीतील हिंदुमुस्लिम शिपायांना ही बातमी सांगितली. त्यामुळे सारेच हिंदु-मुस्लिम शिपाई खवळले. मंगल पांडेने आमचा धर्म बुडविण्यासाठी इंग्रज सरकार या काडतुसांचा उपयोग आमच्याकडून करुन घेत आहे. या विचाराने संतप्त झाला आणि त्याने २९ मार्च १८५७ रोजीच बराकपूर छावणीत उठाव केला. त्याला फाशी देण्यात आली ही बातमी वाऱ्यासारखी हिंदुस्थानातील सर्व देशी

पलटणीत पसरली. तिचा परिणाम होऊन १० मे १८५७ रोजी मेरठ येथे उठाव झाला. दिल्लीच्या देशी पलटणीही बिथरल्या. ठराविक तारखे आधीच उठाव झाल्याने बादशहा बहादुरशाह जफर ही गोंधळून गेला. शिपायांनी त्याला आग्रह करुन दिल्लीच्या तख्तावर बसविले. मेरठ व दिल्लीला शेकडो इंग्रज मारले गेले.

दिल्लीची बातमी कानपूरला पोचली. तेथल्या तिन्ही देशी पलटणीही उठावासाठी उताविळ झाल्या. कानपूरला फक्त २५० इंग्रज सैनिक व ७५० देशी सैनिक होते. मोठा खजिना, मोठे शस्त्र भांडार व दारुगोळाही भरपूर होता. त्याच्या रक्षणासाठी तेथला सेनाप्रमुख व्हीलर व कलेक्टर हिलर्डसन यांनी आपला मित्र नानासाहेब पेशवे याला सैन्य घेऊन कानपूरला बोलावून घेऊन त्याच्याकडे नबाबगंजमधील खजिना, शस्त्र-भांडार व दारुगोळ्याचे कोठार यांच्य संरक्षणाची जबाबदारी सोपविली नानासाहेबाबरोबर अजीमुल्लाखाँही कानपूरला आला. त्यांनी ब्रह्मवर्ताहून तीनशे सशस्त्र सैनिक व दोन तोफा आणल्या होत्या.

कानपूरच्या देशी पलटणीचा सुभेदार टीकासिंह आपला साथीदार शमसुद्दीन सह नानासोहब व अजीमुल्लाखाँला भेटले. त्यांनी होडीतून गंगेत जावून उठावाची योजना आखली. ४ जून १८५७ राजी कानपूरच्या पलटणींनी उठाव केला. नानासाहेबांनी इंग्रजांचा खजिना, दारुगोळा व शस्त्रभांडार आपल्या ताब्यात घेतले. दोन्ही बाजूंनी तोफांचा भडिमार चालू होता. तोफेचा एक गोळा लागून कलेक्टर हिलर्डसन व त्याची बायको ठार झाले. अनेक इंग्रज या युद्धात मेले. व्हीलरने १६/१७ दिवस कडवी झुंज दिली. शेवटी तहाचे पांढरे निशाण उभारले. नानासाहेबांनी उरलेल्या सर्व इंग्रज पुरुषांना व त्यांच्या बायकामुलांना इलाहाबादेस ४० नावातून पाठवून देण्याची व्यवस्था केली. त्यावेळी इलाहाबादहून अनेक देशी सैनिक कानपूरजवळ आले होते. इलाहाबादेत त्यांनी इंग्रजांचे क्रौर्य पाहिले होते. इंग्रजांनी तेथे ६ हजार स्त्रीपुरुषांना, मुलांना व म्हाताऱ्याकोताऱ्यांना अत्यंत क्रूरपणे मारलेले त्यांनी समक्ष पाहिले होते. त्यामुळे ते इंग्रजांवर भयंकर संतापले होते. ४० नावात इंग्रज कुटुंबे बसल्यावर त्या इलाहाबादच्या संतप्त सैनिकांनी त्यांच्यावर तुफान गोळीबार केला. बहुसंख्य इंग्रज पुरुष, स्त्रिया व मुले मरण पावली. हे कळताच नानासाहेबांनी ते हत्याकांड बंद करण्याचा हुकूम सोडला व वाचलेल्या १२५ स्त्रियांना व मुलांना बिबिघर या जागेत ठेवून देऊन त्यांच्या अन्नपाण्याची व्यवस्था केली. पुढे त्या इंग्रज स्त्रियांनी एका भंगिणीजवळ गुप्तपणे पत्र देऊन तिला इलाहाबादेस जाण्यास सांगितले. ती पकडली गेली. तेव्हा टीकासिंहांनी त्या बिबिघरातल्या सर्व इंग्रज बायका मुलांची कत्तल करण्याचा हुकूम दिला. त्या

बिबिघराची संरक्षक बेगम साहिरा हिने गावातून ५ कसाई आणून त्यांच्याकडून त्या सर्वांची कत्तल करविली व त्या कसायांनी ती सर्व प्रेते शेजारच्या विहिरीत टाकून ती विहीर मातीने बुजवून टाकली. या सर्व प्रकरणात अजीमुल्लाखाँ व नर्तकी अजीजन यांचा कसलाही संबंध होता. कानपूरमधली सर्वात सुंदर नर्तिका अजीजन हिच्याकडे शमसुद्दीन व अजीमुल्लाखाँ यांनी हेरगिरीचे काम सोपविले होते.

कानपूर नानासाहेबांनी जिंकले. विजयोत्सव सुरु झाला. ब्रह्मावर्ताला जाऊन त्यांनी राज्याभिषेकही करुन घेतला. त्यांनी कानपूरमध्ये शांतता व सुव्यवस्था राखण्याची चांगली व्यवस्था केली. कानपूर हातातून गेल्याचे कळताच इलाहाबादहून हॅवलाक व नील हे दोन इंग्रज सेनापती मोठे सैन्य घेऊन कानपूरवर चाल करुन आले.

कानपूरला देशी सैन्य व इलाहाबादहून आलेले इंग्रज सैन्य यांच्यात घनघोरयुद्ध झाले. त्यात नानासाहेबांबरोबर अजीमुल्लाखाँ सुद्धा लढला. आपला पराभव होतो आहे, असे दिसल्यावर अजीमुल्लाखाँने नानासाहेबांना अवध राज्यात निघून जाण्याचा सल्ला दिला त्याप्रमाणे नानासाहेब विठूरला आले व त्यांनी आपला काही खजिना व सगळा कुटुंब कबिला घेऊन रात्रीच्या वेळी नावेतून गंगापार केली व अवधच्या राज्यात प्रवेश केला. या युद्धानंतर अजीमुल्लाखाँ भूमिगत झाला. बेगम हजरत महल हिचा व नानासाहेबांचा अवध राज्यात पराभव झाला. तेव्हा ते नेपाळच्या तराईत निघून गेले. नंतर अजीमुल्लाखाँ सुद्धा नेपाळात गेला त्याचे निधन नेपाळात भूखलया गावी झाले. १८५७ च्या स्वातंत्र्य युद्धाच्या क्रांतिदूताचा अशा रीतीने दुर्दैवी अंत झाला. काही लेखकांनी अजीमुल्लाखाँचा संबंध कानपूरच्या सलीचौरा घाटाजवळील ४० नावातील इंग्रजांच्या कत्तलीशी व बिबिघरातील इंग्रज बायकामुलांच्या कत्तलीशी जोडला आहे. तो नानासाहेबांच्या विचाराचाच होता. त्यामुळे त्याचा या कत्तलीशी संबंध जोडणे त्याच्यावर अन्याय करण्यासारखेच आहे.



# ३३. मुहम्मद अली

मुहम्मद अली हा १८५७ च्या स्वातंत्र्य युद्धात लखनौची मोर्चेबंदी करणारा लखनौ दरबारच्या कुशल इंजिनिअर होता. त्याचा जन्म उत्तर प्रदेशात बरेली या जिल्ह्याच्या ठिकाणी झाला. त्याचा बाप बरेली येथील इंग्रजांच्या छावणीतील मेसमध्ये खानसामा (स्वयंपाकी) होता. मुहम्मद अलीचे शिक्षण बरेली छावणीतील शाळेत इंग्रज मुलांबरोबर झाले. तो अतिशय बुद्धीमान असल्याने शेवटच्या परिक्षेत तो प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाला. आपल्या बापाच्या मध्यस्थीमुळे त्याला रुडकी येथील इंजिनिअरिंग कॉलेजमध्ये प्रवेश मिळाला. त्या कॉलेजात इंग्रज मुले शिकत होती. इंजिनिअरींगची अंतिम परीक्षा तो प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झाला. इंग्रजांच्या सर्व मुलांपेक्षा त्याला सर्वाधिक गुण त्या परिक्षेत मिळाले होते. तो अस्खलितपणे इंग्रजीत बोलायचा. दिसायला तो रुबाबदार होता. सर्वांशी तो सभ्येतेने वागायचा. त्याने इंग्रज अधिकाऱ्याकडे नोकरीसाठी अर्ज केला. त्याला त्या अधिकाऱ्याने अगदी हलक्या दर्जाची नोकरी दिली. एका सामान्य इंग्रज सुताराच्या हाताखालचा नोकर म्हणून पहाडी भागातील सडका तयार करण्याचे काम देण्यात आला. ही बाब अत्यंत अपमानास्पद होती. पण एका गरीब मुस्लीम खानसाम्याचा मुलगा.पोटासाठी नोकरी करणे त्याला त्याला जरूरीचे होते. तो गोरा सुतार स्वतःला फार श्रेष्ठ समजायचा व मुहम्मद अलीशी तुच्छतेने वागायचा. गोऱ्या सुताराच्या उर्मट वागणुकीला कंटाळून त्याने आपल्या नोकरीचा राजीनामा देऊन टाकला व तो लखनौ दरबारात मानाने इंजिनिअर म्हणून काम करू लागला.

लखनौ दरबारात काम करीत असताना त्याला समजले की, नेपाळचा राजा जंगबहाद्दुर याला इंग्लडला जायचे असून त्याला इंग्रजी भाषेत प्रवीण असणाऱ्या सेक्रेटरीची आवश्यकता आहे. मुहम्मद अलीने लखनौच्या नबाबाच्या परवानगीने राजा जंगबहाद्दुर याच्याकडे सेक्रेटरी पदासाठी अर्ज केला. तो समक्ष त्या राजाला भेटला. जंगबहाद्दुरने त्याची निवड सेक्रेटरी म्हणून लगेच केली व तो त्या राजासह इंग्लंडला गेला.

इंग्लंडहून परत आल्यानंतर त्याने काही संस्थानिकांकडे नोकरी केली. ब्रह्मावर्तचे नानासाहेब पेशवे यांचे दरसालचे आठ लाखांचे पेन्शन बंद केले होते. ते सुरु करण्यास डलहौसी दाद देत नव्हता. म्हणून नानासाहेब पेशव्यांनी आपला विश्वासू मंत्री अजीमुलाखाँ याला आपला वकील म्हणून इंग्लडला पाठविण्याचे ठरविले. अजीमुलांखाँ यांचे इंग्रज व फ्रेंच या दोन्ही भाषांवर प्रभुत्व होते व तो चाणाक्ष, विचारी आणि बुद्धिमान

होता. म्हणूनच नानासाहेबांनी वकील म्हणून त्यांची निवड केली. मुहम्मदअली राजा जंगबहादुराबरोबर इंग्लडला गेला होता. हे अजीमुल्लाखाँ याला माहीत होते. एक माहितगार व अनुभवी म्हणून अजीमुल्लाखाँने मुहम्मद अलीला आपल्या बरोबर घ्यावयाचे ठरवून नानासाहेबांना तसे सांगितले. त्यांनाही त्याला संमती दिली व त्या दोघांना १८५४ साली ५० हजारावर पौंड एवढी रक्कम देऊन इंग्लडला पाठविले.

अजीमुल्लाखाँ याने मुहम्मद अलीसह अनेक इंग्रज उमरावांशी, पार्लमेंट सदस्यांशी व ईस्ट इंडिया कंपनीच्या डायरेक्टरशी चांगले संबंध जोडले. त्यांच्यासाठी खूप पैसाही खर्च केला. पण ईस्ट इंडिया कंपनीच्या धूर्त डायरेक्टरनी त्याला मुळीच दाद दिली नाही. नानासाहेबांचे पेन्शन सुरु करण्याचे नाकारले. ग. ज. डलहौशीचा निर्णय योग्य आहे. त्यात आम्ही फेरफार करू शकत नाही. असे उत्तर अजीमुलाखाँला त्यांनी दिले. त्यामुळे अजीमुलाखाँ व मुहम्मद अली नाराज झाले व त्यांच्या मनांत इंग्रजांविषयी भयंकर चीड निर्माण झाली.

कंपनी सरकारने सातान्याचे छत्रपती प्रतापसिंह भोसले यांना पदच्युत करून त्यांना बनारस येथे नजरकैदत ठेवले होते. आपले राज्य आपणास परत मिळावे, म्हणून प्रतापसिंहानी रंगोबापूजी या आपल्या एकनिष्ठ सेवकास १८३९ साली आपला वकील म्हणून इंग्लंडला पाठविले होते. रंगोबापूजींनी इंग्लंडमध्ये १४ वर्षे सातत्याने त्यासाठी प्रयत्न केले. पण कंपनीच्या डायेरक्टरांनी त्यालाही वरीलप्रमाणे उत्तर देऊन वाटेला लावले. रंगोबापूजीची व अजीमुल्लाखाँ आणि मुहम्मद अली याची भेट लंडनमध्ये झाली. तिघेही इंग्रजावर चिडले होते, याची योजना त्यांनी ठरविली. रंगोबापूजी १८५४ साली, तर अजीमुल्लाखाँ आणि मुहम्मद अली तुर्कस्तान, इराण, अफगणिस्तान या देशांना भेटी देऊन १८५६ साली ब्रह्मावर्तास परत आले. त्यांनी नानासाहेबांना इंग्रजाविरूद्ध उठाव करून त्यांना हिंदुस्थानातून कसे हाकून द्यायचे याची योजना सांगितली. उत्तर हिंदुस्थानात अजीमुल्लाखाँ त्या प्रयत्नास लागला. तर रंगोबापूजीने दक्षिण हिंदुस्थानात तसा प्रयत्न आधीच सुरू केला होता. हिंदुस्थानच्या सर्व भागातून इंग्रजांचा नायनाट करण्याचे ठरले.

इंग्लंडहून परत आल्यावर लखनौची बेगम हजरत महल हिने मुहम्मद अलीला आपल्या दरबारात इंजिनिअर म्हणून नोकरीवर घेतले. १० मे १८५७ रोजी मेरठच्या देशी पलटणीने इंग्रज सरकारविरूद्ध उठाव केला. दिल्लीच्या देशी पलटणीही त्यांना सामील झाल्या. बहादुरशाह जफर याला त्या विद्रोही सैनिकांनी हिंदुस्थानचा बादशहा म्हणून घोषित केले. बरेली येथील देशी पलटणीने ही तसाच उठाव केला. त्या पलटणीतील

सैनिक दिल्लीकडे निघाले. मुहम्मद अलीही त्यांच्याबरोबर दिल्लीला आला. बादशाहाने त्याची नेमणूक युद्धकालात इंजिनिअर म्हणून केली. त्याआधीच त्याने आपली बायको व मुले सुरक्षित स्थानी पोचविली होती.

मुहम्मद अलीने दिल्लीच्या रक्षणाची व्यवस्था उत्तम प्रकारे केली. त्यामुळेच इंग्रजांच्या हाती दिल्ली चार-साडेचार महिने येऊ शकली नाही. दिल्ली इंग्रजांच्या हाती पडल्यानंतर सेनापती बक्तखाँ आणि मुहम्मद अली आपल्या पाच हजार सैन्यासह मथुरेला आले. मुहम्मद अलीने थोड्याच अवधीत यमुना नदीवर नावांचा पूल तयार केला व त्या पुलांवरून ते आपल्या सैन्यासह यमुनापार झाले आणि लखनौ येथे पोचले.

खरे युद्ध तर आता अवध प्रांतातच व्हायचे होते. लखनौला आल्यावर बेगम हजरत महलने मुहम्मद अलीची नेमणूक पुन्हा आपल्या दरबारात इंजिनिअर म्हणून केली. लखनौच्या चहुबाजूंची प्रतिरक्षात्मक व्यवस्था मुहम्मद अलीने केली. त्यामुळेच इंग्रजांना लखनौवर ताबा मिळविण्यासाठी बराच काळ लागला. त्यात त्यांचे काही चांगले सेनापती ठार झाले. सिकंदर बागेच्या रक्षणाची व्यवस्था मुहम्मद अलीनेच केली होती. लखनौ इंग्रजांच्या ताब्यात गेले. तरी सिकंदर बागेवर बादशहाचा हिरवा झेंडा दिमाखाने फडकतच होता. बऱ्याच प्रयत्नांनंतर इंग्रजांनी सिकंदर बागेवर ताबा मिळविला. त्यानंतर तो झेंडा नाहीसा झाला. हे दृश्य मुहम्मद अली दुःखित मनाने शाहनजफमधून पाहत होता.

लखनौच्या युद्धाच्या काळात मुहम्मद अलीने गुप्तहेराचे ही काम केले. एक नोकराच्या डोक्यावर गोड पावांचा हारा देऊन तो पावविक्याच्या वेषात उन्नाव येथल्या इंग्रजांच्या छावणीत गेला. इंग्रज सेनाधिकारी उन्नावच्या छावणीतून किती शिपाई व किती तोफा लखनौला नेत आहेत, ही इत्यंभूत बातमी काढण्यासाठी पावविक्याच्या वेषात उन्नाव छावणीत शिरला होता. इंग्रजांकडे किती युद्ध सामग्री आहे हे सुद्धा त्याला बघायचे होते. तेथेही आपल्या लोकांचे फितुरीचा अनुभव त्याला आला. बरेलीच्या एका देशी सैनिकाने मुहम्मद अलीला ओळखले व त्याने ती बातमी तेथला सेनाधिकारी फोर्बस मिचेल याला दिली. फोर्बस मिचेलने त्याला पकडण्याचा हुकूम काही शिपायांना दिली. त्या शिपायांनी मुहम्मद अली व त्याचा पावांचा हारेवाला या दोघांना पकडले आणि फोर्बस मिचेल पुढे आणले. त्याने मुहम्मद अलीचा कसून चौकशी केली. त्यांच्यात बरीच प्रश्नोत्तरे झाली. चौकशी संपल्यावर मुहम्मद अलीने फोर्बस मिचेलकडून लंडनची इंग्रजी वर्तमानपत्रे मागून घेतली व तो ती वाचू लागला. तेव्हा फोर्बस मिचेलला फार आश्चर्य वाटले. "तुला इंग्रजी भाषेचे एवढे चांगले ज्ञान कसे झाले?" असा प्रश्न त्याने मुहम्मद

अलीला विचारला. तेव्हा त्याने अस्खलखित इंग्रजीत फोर्बसला सांगितले की, ''मी बरेलीला छावणीतील शाळेत व नंतर रुडकीच्या इंजिनिअरिंग कॉलेजमध्ये शिक्षण घेऊन प्रथम क्रमांकाने इंजिनिअरिंगची शेवटची परीक्षा उत्तीर्ण झालो आहे.'' हे ऐकताच फोर्बस मिचेल अधिकच चकित झाला. हिंदी लोकांच्या बुद्धिमत्तेबद्दलचे त्याचे पूर्वग्रह एकदम नाहीसे झाले. मुहम्मद अलीने हे सुद्धा स्पष्टपणे सांगितले की, ''मी पावविक्या म्हणून कशासाठी तुमच्या छावणीत आलो होतो.''

मुहम्मद अलीच्या व फोर्बस मिचेलच्या नंतर बऱ्याच गप्पा मोकळेपणाने झाल्या. मुहम्मद अलीला आता माहीत झाले होते की, येथून आपली सुटका होणे शक्यच नाही. म्हणून त्याने आपल्या मनाची तयारी कोणत्याही शिक्षेला सामोरे जाण्याची केली. त्याच्यावर एका इंग्रजाच्या हत्येचा खोटा आरोप ठेवून त्याला तेथल्या सैनिकी न्यायालयात फाशीची शिक्षा सुनविण्यात आली. तेव्हा दोन तीन इंग्रज सैनिक मुसलमानांना निषिद्ध अशी डुकराची चरबी आणण्यास निघाले. तेव्हा फोर्बस मिचेलने त्यांना तसे करण्यास मनाई केली. म्हणून मुहम्मद अलीने त्याचे आभार मानले व तो म्हणाला,

''आम्ही तुम्हां इंग्रजांची सत्ता उलथून टाकण्याचा प्रयत्न केला, पण त्यात आम्हांला यश आले नाही. तरीही आमचे बलीदान व्यर्थ जाणार नाही. तुमची आमची लढाई यापुढेही चालूच राहील. तुम्ही लखनौला जाल, तेव्हा तुमचे जास्तीत जास्त सैनिक ठार होतील, असाच बंदोबस्त मी केलेला आहे. तुम्ही तो बघालच'' नंतर दुसऱ्याच दिवशी उन्नाव छावणीत मुहम्मद अलीला फांशी देण्यात आले. धन्य तो इंजिनिअर! आणि धन्य त्याचे धाडस!



# ३४. नर्तकी अजीजन

सन १८५७ च्या स्वातंत्र्य युद्धात ज्या महान स्त्रियांनी पराक्रम गाजविला आणि आपले नाव आपल्या देशाच्या इतिहासात अमर केले, अगा स्त्रियांमध्ये कानपूरची अजीजन बेगम हिचाही समावेश करायला हवा. अजीजन ही पेशाने नर्तकी व गायिका असली तरी, ती सर्वसामान्य वेश्यांत गणली जात नव्हती. ती कानपूरातील एक प्रतिष्ठित स्त्री होती. गोल चेहरा, आकर्षक नेत्र, भरदार, सुदृढ व सुडौल शरीरयष्टी, कोकीळेसारखा गोड कंठ यामुळे तिची मोहिनी कोणावरही सहज पडे. नृत्यकलेत व गायनात ती कानपूरच्या परिसरात प्रख्यात होती. तिच्या पायांतील नुपूरांच्या झंकाराने व सुरेल गायनाने वातावरणात बेहोशी निर्माण होत असे. तिच्या मैफली तिच्या महालात, मोठमोठ्या लोकांच्या दिवाणखान्यात व बड्या इंग्रज अधिकाऱ्यांच्या प्रशस्त बंगल्यात होत असत. त्यामुळे कानपूरच्या परिसरातील बड्या लोकांशी व इंग्रज अधिकाऱ्यांशी तिचा चांगला परिचय होता.

अजीजन पराक्रमी पुरुषांचा आदर करायची. ती काही सर्वसाधारण वेश्या नव्हती. फक्त नृत्य व गायन हाच तिचा व्यवसाय होता. तिचा वावर बड्या बड्या लोकांत नेहमीच असायचा. बडे बडे सरदार, नानासाहेब पेशवे, बडे इंग्रज अधिकारी तिच्यावर फिदा होते. अजीमुल्लाखाँ हा बुद्धीमान, देखणा व विद्वान पुरूष जेव्हा नानासाहेब पेशव्यांच्या दरबारात मंत्री म्हणून आला, तेव्हा ती त्याची ही विश्वासपात्र बनली होती.

अजीजन ही आपल्या व्यवसायामुळे श्रीमंत बनली होती. तिला कधीही कशाचीही उणीव भासत नसे. अगदी सुखात लोळायची ती. पण १८५७ च्या स्वातंत्र्य युद्धात तिने सुखाला लाथ मारली व त्या युद्धात तीने हिरारीने भाग घेतला. घोडा पळविण्यात तर ती तरबेज होतीच, पण सफाईने तलवारही चालवायची.

दिल्लीत स्वातंत्र्य युद्धाची धुमश्चक्री मे १८५७ मध्ये सुरू झाली. कानपूरच्या इंग्रजांच्या छावणीतील देशी पलटण अस्वस्थ होऊन इंग्रजाविरुद्ध लढायला अधीर झाली. तिचा सुभेदार टीकासिंह नानासाहेबांना भेटला. एके दिवशी सायंकाळी नानासाहेब, त्यांचे बंधु बाळासाहेब, अजीमुल्लाखाँ, तात्या टोपे, सुभेदार टीकासिंह, जमादार शमसुद्दीन हे गंगेच्या घाटावर एकत्र आले. गंगेत नौकाविहाराला निघाले. तेव्हा त्या नौकेत नानासाहेबांसह सर्वांनी स्वातंत्र्ययुद्धात एक दिलाने व निष्ठेने भाग घेण्याच्या शपथा घेतल्या. आपली पलटण स्वातंत्र्य युद्धात उतरण्यासाठी अधीर झालेली आहे. असे

टीकासिंहाने सांगितले. जमादार शमसुद्दीनने त्याला दुजोरा दिला. लढ्याची योजना आखली गेली व सर्वजण परत आपल्या निवासस्थानी निघून गेले.

कानपूर छावणीचा सेनाधिकारी व्हीलर व कलेक्टर हिलर्डसन यांनाही बंडाची भीती वाटू लागली. त्यांना कानपूरमधील छावणीच्या खजिन्याच्या रक्षणाची चिंता वाटत होती. छावणीत गोरे सैन्य थोडेसेच होते. नानासाहेब तर त्यांचा विश्वासू मित्र होता. त्यांनी नानासाहेबाला सैन्य व तोफा घेऊन विठूरहून कानपूरला बोलाविले. नानासाहेब २०० सैनिक व २ तोफा घेऊन कानपूरला आले. त्यांना नबाबगंजमधील सरकारी खजिन्याच्या रक्षणाचे काम सोपविण्यात आले.

नानासाहेब सतत या इंग्रज अधिकाऱ्यांचे आदरतिथ्य करायचे. पण आपले ८ लाखांचे पेन्शन इंग्रज सरकाने बंद केल्याने ते मनातून इंग्रज सरकारवर चिडलेले होते. संधी येताच उठाव करायचा म्हणून त्यांनी वरीलप्रमाणे युद्धात उडी घ्यायचे निश्चित केले होते. ५ जून १८५७ रोजी सुभेदार टीकासिंह यांच्या नेतृत्त्वाखाली कानपूरच्या देशी पलटणीने इंग्रजाविरूद्ध बंड पुकारले. त्या आधी २ जून १८५७ रोजी जमादार शमसुद्दीनने अजीजनची तिच्या निवासस्थानी भेट घेतली होती. त्याने तिला इंग्रजाविरूद्ध ठरलेला उठावाची योजना समजावून सांगितली. तिनेही त्या उठावात भाग घेण्याची तयारी उत्साहाने त्याला सांगितली व युद्धात सोपवाल ती कामगिरी करण्याचे त्याला वचन दिले. नानासाहेब व अजीमुल्लाखाँ यांनी तिच्याकडे बेमालुम हेरगिरी करण्याचे सोपविले आहे, असे शमसुद्दीन तिला सांगितले. त्यामुळे तिचा उत्साह दुणावला. तिने तिच्या विश्वासपात्र मैत्रिणीसह हे काम करावे, त्यांचीही लहानशा पलटण तयार करावी, असे सांगून शमसुद्दीन घरी परतला.

अजीजनला व तिच्या मैत्रिणींना घोड्यावर रपेट करण्याचा सराव आधीच होता. अजीनन तर सफाईने तलवार चालविण्यातही तरबेज होती. तिने आपल्या मैत्रिणींचे सैन्य गुप्तपणे उभारले. युद्धात आपण कोणते काम गुप्तपणे करायचे हे ही तिने त्यांना सांगितले. सगळ्या जणींना पुरूष वेषात युद्धात भाग घेऊन हेरगिरी करायची व गुप्त बातम्या आणायच्या. अजीननने त्या बातम्या अजीमुल्लाखाँच्या मार्फत नानासाहेबांना द्यायच्या. अजीजनने रात्री इंग्रज अधिकाऱ्यांच्या बंगल्यात नाचगाणे करायचे ते मद्य पिऊन धुंद झाले की, त्यांच्याकडून त्यांचे युद्धाचे बेत जाणून घ्यायचे व अजीमुल्लाखाँला सारे काही सांगायचे, असे ठरले व साऱ्या जणी त्या युद्धात सहभागी होऊन कामाला लागल्या. आपले काम जोखमीचे आहे. इंग्रजांना जर आपल्या या कामाचा संशय आला, तर मरणाशीच गाठ आहे, असेही तिने त्यांना बजावून सांगितले.

ठरल्याप्रमाणे अजीनन हेरगिरीचे काम करू लागली. इंग्रज अधिकाऱ्यांच्या गोटातल्या महत्वाच्या बातम्या अजीमुल्लाखाँमार्फत नानासाहेबांकडे पोचवू लागली. नानासाहेब तिच्या हेरगिरीवर खुश होत असत. अखेर कानपूर नानासाहेबांनी जिंकले. अजीनन त्या विजयोत्सवात आपल्या मैत्रिणीसह सहभागी झाली. या युद्धात त्यांनी जखमी शिपायांवर औषधोपचारही केले होते. त्यांच्या खाण्यापिण्याची काळजी घेतली होती. त्यांच्या कामांवर खुश होऊन नानासाहेबांनी तिला व तिच्या मैत्रिनींना पारितोषिके दिली. नानासाहेब विठूर येथे समारंभपूर्वक गेले. तेथे त्यांनी राज्याभिषेक करून घेतला. पण हा आनंद जास्त दिवस टिकला नाही.

इलाहाबादहून हॅवलॉक व नील मोठे सैन्य व तोफखाना घेऊन कानपूर जिंकण्यासाठी आले. तात्या टोपे आता नानासाहेबांचा सेनापती होता. दोन्ही सैन्यात घनघोर युद्ध झाले. त्या युद्धातही अजीजनने हेरगिरीचे काम उत्कृष्टपणे बजावले. पण नानासाहेबांचा या युद्धात पराभव झाला. ते विठुरला निघून गेले. तात्याही उरलेले सैन्य घेऊन काल्पी ग्वाल्हेरकडे निघून गेले. विठुरचा इंग्रजांनी विध्वंस केला. पकडलेल्या सैनिकांना फाशी देऊन किंवा गोळया घालून ठार करण्यात आले. नव्या इंग्रज अधिकाऱ्यांना अजीननच्या हेरगिरीबद्दल समजले. त्यांनी तिला अटक केली. तिच्या अनुपम सौंदर्यावर ते अधिकारी मुग्ध झाले. त्यांनी तिने केलेल्या कृत्यांबद्दल माफी मागण्यास सांगितले. माफी मागितली तर तुला सोडून देण्यात येईल असेही सांगितले. पण ती देशाभिमानी सौंदर्यवती बाणेदारपणे वागली. ती हॅवलॉकला म्हणाली, " मी आमच्यावर अन्याय करणाऱ्या इंग्रजापुढे मुळीच माफी मागणार नाही." अखेर तिला एका झाडाच्या खोड्याला बांधण्यात आले. हॅवलॉकने हुकुम सोडला, "फायर". गोऱ्या सैनिकांनी आपल्या बंदुकीच्या गोळयांनी तिच्या सुंदर शरीराची चाळणी करून टाकली. धन्य ती नर्तकी!



# ३५. राणी लक्ष्मीबाई

सिंहासन हिले उठे, राजवंशोने भृकुटी तानी थी ।
बुढे भारत में भी आयी, फिरसे नई जवानी थी ।
गुमी हुई आजादी की कीमत सबने पहचानी थी ।
दूर फिरंगी को करने सबने मन में ठानी थी ।
चमक उठी सनसत्तावन में वह तलवार पुरानी थी ।
बुंदले, हरबालों के मुँह हमने सुनी कहानी थी ।
खूब लडी मर्दानी वह तो झाँसीवाली रानी थी ।

स्व. सुभद्राकुमारी चौहान यांची ही कविता भारतातील हिंदी प्रदेशातच नव्हे, तर महाराष्ट्रातही ज्याच्या त्याच्या तोंडी होती. आज ही ती कविता अमर झालेली आहे. राणी लक्ष्मीबाई ची वीरता, तिचा पराक्रम केवळ हिंदी कवियित्रीनेच गायिली नाही, तर तिला पराभूत करणाऱ्या सर ह्यू रोजने सुद्धा तिचे गुणगान अशा शब्दांत केलेले आहे.

"राणी लक्ष्मीबाई जशी दुर्धर शौर्याची व दुर्दम्य धैर्याची मूर्ती होती, तशीच निस्सीम औदार्याचीही देवता होती. काल्पीच्या प्रतिपक्षात तिचेच भय सर्वाधिक होते. राणी या नात्याने तिची प्रतिष्ठा सर्वांहून जास्त होती. त्या सगळ्यांमध्ये झाशीची राणी ही सर्वोत्कृष्ट व वीरश्रेष्ठ सेनानी होती."

राणी लक्ष्मीबाई ही एक कुशल योद्धा तर होतीच, त्याबरोबर ती योग्य प्रशासक, पतिव्रता, ममतामयी व दिलदार ही होती. तिचे विचार धर्मनिरपेक्ष होते. तिच्या सैन्यातील हिंदूच्या प्रमाणे मुसलमान सैनिकांचीही तिच्यावर अढळ निष्ठा होती.

राणीचे वडील मोरोपंत तांबे हे काशी येथे दुसऱ्या बाजीरावाचे कनिष्ठ बंधू चिमाजी अप्पा यांच्या आश्रयाला होते. तिच्या आईचे नाव भागीरथीबाई. तिच्या पोटी राणी लक्ष्मीबाई हिचा जन्म १९ नोव्हेंबर १८३५ रोजी काशी या नगरीत झाला. पण दुर्दैव असे की, तिच्या वयाच्या तिसऱ्या वर्षीच भागीरथीबाई ही इहलोक सोडून गेल्या. त्यानंतर मोरोपंतांचे आश्रयदातेही त्याच काळात कालवश झाले. तेव्हा ब्रह्मावर्त (विठुर) येथे इंग्रज सरकारचे पेन्शन घेत दुसरा बाजीराव राहात होता, त्याने मोरोपंतांना ब्रह्मावर्तास बोलावून घेऊन त्यांची नेमणूक आपल्या होम शाळेत केली. लक्ष्मीबाईचे जन्मनाव मनू असे होते. तीन चार वर्षांची मनू शरीराने उफाड्याची, सडपातळ व गौर वर्णाची होती. तिचे डोळे कमळासारखे सुंदर, चेहरा गोलसर, भव्य कपाळ, नाक चाफेकळीसारखे होते. ती चुणचुणीत असून बाजीरावाच्या वाड्यात तिचा मुक्त संचार होता. म्हणून बाजीराव

तिला 'छबेली' या नावाने हाक मारीत असे. तेथे छबेली हेच तिचे नाव प्रचलीत झालेले होते.

बाजीरावाचे दत्तक पुत्र नानासाहेब (धोंडोपंत) त्यांचे चुलतभाऊ दादासाहेब व बाळासाहेब यांना शिकविण्यासाठी बाजीरावाने एक शिक्षक ठेवले होते. त्यांच्याबरोबरच मनूही शिकू लागली. घोड्यावर बसणे, तलवारीचे हात करणे, लहानशी बदुंक चालविणे, नेमबाजी करणे यातही ती त्यांच्याबरोबर प्रवीण झाली. ती जेव्हा आठ वर्षाची झाली, तेव्हा तिचे लग्न तिच्या भाग्याने झांशीचे संस्थानिक गंगाधरराव यांच्याशी झांशी येथे दुसऱ्या बाजीरावाने थाटामाटात करून दिले. तिचे सासरचे नाव 'लक्ष्मी' असे ठेवण्यात आले. एका भिक्षुकाची कन्या झांशीची राणी झाली.

लक्ष्मीबाईचे पती गंगाधरराव नेवाळकर हे २७ डिसेंबर १८४२ मध्ये झांशीच्या गादीवर आले. ते जेव्हा गादीवर आले, तेव्हा सगळ्या संस्थानावर कंपनी सरकारचे वर्चस्व होते. कंपनीच्या धोरणाप्रमाणे झांशी संस्थानशी कंपनी सरकारने नवा तह गंगाधररावांशी केला व तैनाती फौजेच्या खर्चासाठी झांशी संस्थानमधील २,२७,४५८ रुपये वसुलीचा प्रदेश आपल्या राज्यात सामील करून घेतला. गंगाधररावांच्या राज्यात त्यांची प्रजा सुखाने नांदत होती. त्यांच्या संस्थानाची शिबंदीही भरपूर होती. त्यांचे २२ हत्ती होते. ह्यातला सिद्धबक्श नावाचा हत्ती प्रचंड होता. त्या हत्तीचे सर्व अलंकार, अंबारी व हौदा सोन्याचा होता. त्यांच्या फौजेत ५००० शिपाई, ५०० घोडेस्वार, १०० घोड्यांची खास पागा व चार तोफखाने होते. त्यात अनेक लहानमोठ्या तोफा होत्या.

सन १८५१ मधील मार्गशीर्ष शुद्ध एकादशीला राणीला एक पुत्ररत्न प्राप्त झाले. तेव्हा गंगाधररावांना अत्यानंद झाला. पण तीन महिन्यातच तो पुत्र मरण पावला. त्याचा जबरदस्त धक्का गंगाधररावांना बसला. त्यांची प्रकृती ढासळू लागली. संस्थानच्या भविष्याची त्यांना काळजी वाटू लागली. तेव्हा त्यांच्याच घराण्यातील श्री. वासुदेवराव नेवाळकर यांचा पुत्र आनंदराव याला त्यांनी दत्तक घेतले. त्या दत्तक विधानाच्या वेळी गंगाधरपंतांनी बुंदेल खंडाचे पोलिटीकल एजंट मि. एलिस, सैन्याधिकारी मेजर मार्टिन व रेसिडेंट मि. गार्डन यांना मुद्दाम बोलावून घेतले. त्यांच्या समक्ष दत्तक विधानाचा सोहळा पार पडला. मुलाचे नाव 'दामोदर' असे ठेवण्यात आले. त्यावेळी तो ५ वर्षांचा होता. त्यानंतर गंगाधररावांची प्रकृती फारच खालावू लागली. आता आपले काही खरे नाही, असे पाहून त्यांनी पोलिटिकल एजंट मि. एलिस यांच्या मार्फत गव्ह. जनरल लार्ड डलहौसी याला एक खलिता पाठविला. नंतर ते २१ नोव्हेंबर १८५३ रोजी निधन पावले. तो असा-

''माझे देहावसान झाले, तर आजपर्यंत मी सरकारशी प्रामाणिकपणे वागत आलो, या गोष्टीचा विचार करून माझ्या या दत्तक मुलावर सरकारने मेहेरनजर ठेवावी. माझी पत्नी हयात आहे, तोपर्यंत संस्थानची मालकीण व दत्तकमुलाची मातोश्री समजून संस्थानची व्यवस्था तिच्याकडे सोपवावी. तिला कोणत्याही प्रकारे त्रास पोहोचू देऊ नये.''

पण डलहौसी हा साम्राज्यवादी. त्याने गंगाधररावांच्या या खलित्याला वाटाण्याच्या अक्षता लावल्या व मेजर डी. ए. माल्कम यांना आदेश दिला. तो असा-

''झांशीचे महाराज २१ नोव्हेंबर १८५३ रोजी कैलासवासी झाले. त्यांनी मरणापूर्वी दामोदरराव ह्यास दत्तक घेतले आहे. परंतु नामदार गव्ह. जनरल ह्यांनी ते दत्तकविधान नामंजूर केल्यामुळे हिंदुस्थान सरकारचे सेक्रेटरी ह्यांच्याकडून ७ मार्च १८५४ चा हुकूम आल्याप्रमाणे झांशी संस्थान इंग्रज सरकारच्या अंमलात सामील करण्यात आले आहे. त्याप्रमाणे या जाहीरनाम्याद्वारे तमाम लोकांस कळविण्यात येत आहे की, झांशी प्रांत तूर्त बुदेलखंडाचे पोलिटिकल एजंट मि. एलिस यांच्या ताब्यात दिला आहे. म्हणून झांशी प्रांतातील सर्व प्रजेने आपण इंग्रज सरकारचे अंमलासाठी आहोत असे समजून मेजर एलिस साहेबांस वसूल देत जावा आणि सुखी व संतुष्ट राहावे. कळावे. १३ मार्च १८५४.

हा जाहीरनामा लक्षात घेऊन आपले झांशी संस्थान खालसा झाल्याचे ते भयानक वृत्त ऐकताच राणी लक्ष्मीबाई मेजर एलिस समोर त्वेषाने उद्गारली, '' मैं मेरी झांशी नहीं दूंगी।'' ते ऐकताच मे. एलिस चमकलाच. पण या पाच शब्दांमागे केवढे वादळ दडलेले आहे, याची त्याला त्यावेळी कल्पना आली नाही. ते राणीचे दुःखोद्गार आहेत, असेच तो समजला. त्यानंतर राणी लक्ष्मीबाईने आपला एक स्वतंत्र खलिता कंपनी सरकारला लिहिला. त्यात आपले व आपल्या दत्तक पुत्राचे न्याय्य हक्क' मंजूर करण्याविषयी विनंती केली. पण त्याचा परिणाम राणीला सालाना ६०,००० रुपये पेन्शन तहह्यात कंपनी सरकारने मंजूर केले व तिला राहण्याकरिता झांशी शहरातील तिचा राजवाडा देण्यात आला.

स्वातंत्र्ययुद्ध सुरू होऊन ६/७ महिने होऊन गेले होते. २० सप्टेंबरला दिल्ली, ६ डिसेंबरला कानपूर आणि २१ मार्च १८५८ ला लखनौ ही महत्वाची तीन केंद्रे इंग्रजांनी जिंकून घेतली होती. आता ते इतर ठिकाणांचा समाचार घ्यायला मोकळे झाले होते. १६ मार्च १८५८ रोजी इंग्रजांनी झांशीचे राज्य खालसा केले. राणी लक्ष्मीबाईने युद्धाची तयारी सुरू केली. किल्ल्याच्या तटाची डागडुजी सुरू केली. बंदुका, तोफा, दारूगोळा तयार करण्याचा कारखाना सुरू केला. अन्नसाठा भरपूर प्रमाणात साठवून ठेवला.

आपले सैन्य सज्ज केले. राणीने स्त्रीसैन्य तयार केले होते, तेही युद्धास तत्पर झाले. झलकारी, सुंदर व काशी ह्या राणीच्या अंगरक्षक होत्या. युद्ध सुरू होणार, असे झांशीच्या जनतेलाही कळून चुकले. राणीने बंडाचा झेंडा उभारला. ते समजताच सर ह्यू रोज दक्षिणेकडून मजला मारीत झांशीवर चालून आला. १९ मार्च रोजी त्याने झांशीजवळ चंचलपूरला येऊन तळ ठोकला. त्याने राणीला व तिच्या वडिलांना ५/६ निवडक लोकांसह आपल्या तळावर निःशस्त्र येण्याचा निरोप दिला तो राणीने धुडकावून लावला. तेव्हा २३ मार्च १८५८ रोजी त्याने झांशीला वेढा दिला. युद्ध सुरू झाले.

इंग्रजांचे सैन्य ताज्या दमाचे कवायती व शिस्तबद्ध होते. त्यांच्याजवळ भरपूर व लांब पल्ल्याच्या चांगल्या तोफा होत्या. त्यांच्या तोफांचा भडिमार सुरू झाला. त्याला राणीच्या गोलंदाजांनी चांगले प्रत्युतर दिले. गुलाम गोषखान व कुँवर खुदाबक्ष या राणीच्या गोलंदाजांनी चांगली बहाद्दुरी दाखविली. झलकारीच्या पतीने-पूरचंदाने अविरत तोफांचा मारा केला. झलकारी त्याला मदत करीत होती. राणीने काल्पीला तात्या टोपे आणि रावसाहेब पेशवे यांना मदतीसाठी सैन्य पाठविण्याचा निरोप दिला होता. त्या सैन्याची ती वाट पाहात होती.

सर ह्यूरोज याने काल्पीकडून राणीच्या मदतीला सैन्य येऊ नये म्हणून काल्पीकडे ५० मैलांवर आपल्या सैन्याची एक तुकडी तोफखान्यासह पाठवून दिली. तिने काल्पीचा मार्ग रोखून धरला. तात्या टोपे तोफखान्यासह २०/२२ हजार सैन्य घेऊन निघाला. पण मार्ग रोखून धरलेल्या त्या इंग्रज सैन्याशी त्याला झुंज द्यावी लागली. त्यात तात्याचा पराभव झाला व त्याला आपल्या तोफा टाकून देऊन माघार घ्यावी लागली. सैन्याची मदत येण्याची राणीची आशा दुरावली. इकडे निकराची लढाई सुरू होती. तात्याला माघार घ्यावी लागली, त्यामुळे इंग्रजांचा उत्साह वाढला. त्यांनी नव्या जोमाने किल्ल्याच्या तटावर निकराचा मारा चढविला. त्या तोफ गोळ्यांनी किल्ल्यात आणि झांशी शहरात हाहाकार उडवून दिला. शहरात त्या तोफगोळ्यांच्या माऱ्यामुळे अनेक इमारतींना आगी लागल्या. राणी विषण्ण मनाने तटावरून ते भीषण दृश्य पाहात होती.

राणीने आता निकराने शेवटचा मारा करायचे ठरविले. पुरुषी वेषात ती आपल्या पांढऱ्या घोड्यावर स्वार होऊन युद्धात शिरली. तिच्या बरोबर तिचे सरदार ही इंग्रज सैन्यावर तुटून पडले. राणी रणांगणात बरीच आत शिरली तिने कित्येक गोरे कापून काढले. तेव्हा तिच्या एक वृद्ध सरदाराने तिला परत फिरण्याचा सल्ला दिला व ती आपल्या सरदारांसह किल्ल्यात परतली. तिचा एक गोलंदाज दुलाजी ठाकूर याने फितुरी करून इंग्रजांना किल्ल्याच्या तटावर चढण्याचा मार्ग दाखविला. त्यानुसार इंग्रज सैन्याने

किल्ल्याच्या तटाशी गवताचे भारे रचून त्यांचा जिना तयार करण्यास झपाट्याने सुरूवात केली. आता किल्ला सोडून जाण्याशिवाय मार्ग उरला नाही, असे त्या वृद्ध सरदाराने राणीला सांगितले. किल्ला सोडण्याचे ठरले. तेव्हा तिची शूर दासी झलकारी पुढे आली व तिने स्वतः राणीचा वेष धारण करून एका पाढऱ्या घोड्यावर बसून काही सैनिकांसह किल्ल्याबाहेर उतरून लढाई करावी आणि अंधार पडू लागताच राणीने गुप्त मार्गाने आपल्या निवडक सैन्यासह किल्ल्याबाहेर पडून काल्पीकडे निघून जावे, असे सांगितले. राणीला झलकारीचा उपाय पसंत पडला व झलकारी राणीच्या वेषात युद्धात पडली. राणी सैन्यासह काल्पीकडे निर्वेधपणे निघून गेली. त्या युद्धात झलकारी व तिचा पती मारले गेले.

राणीचा युद्धातला पराक्रम पाहून ह्यु रोज आश्चर्यचकीत झाला होता. राणी किल्ल्यातून निघून जाऊन काल्पीकडे गेली, असे त्याला समजले. तेव्हा त्याने लेफ्ट. बोअर याला तिच्या पाठलागावर पाठविले. त्याने राणीला गाठले. निकाराची चकमक उडाली. त्यात राणीने बोअरला चांगलेच जखमी केले. बोअर परतला. राणी भरधाव वेगाने काल्पीकडे निघाली. तिने आपल्या पाठीशी आपला दत्तक पुत्र याला धोतराने बांधून घेतले होते. सलग २४ तास दौंड करून ती काल्पीला पोचली. तेव्हा रावसाहेब पेशव्यांने तिचे सांत्वन केले.

इकडे इंग्रजांनी झाशीच्या किल्ल्यात प्रवेश केला. त्यांनी राणीच्या उरलेल्या सैन्याची व लोकांची अमानुष कत्तल केली. इंग्रज सैनिकांनी किल्ल्यात व शहरात बेसुमार लूट केली. हजारो अबालवृद्धांना ठार केले. राणीचे वडील मोरोपंत जखमी झाले. त्यांना पकडून आणून राणीच्या राजवाड्यासमोर फांशी दिले. झांशीचा ताबा घेऊन तिथली व्यवस्था लावल्यावर सर ह्यू रोज आपल्या सैन्यासह काल्पीकडे निघाला. तो काल्पीला पोहचल्यावर तीन दिवस उभय पक्षात तुंबळ युद्ध झाले. त्याने काल्पीवर ताबा मिळविला. राणीने तात्याला व रावसाहेबाला ग्वाल्हेर सर करण्याचा सल्ला दिला. त्यांनी ग्वाल्हेरकडे मोर्चा वळविला.

ग्वाल्हेरजवळ आल्यावर रावसाहेबाने जयाजीराव शिंदे याला सहकार्य करण्याचा निरोप पाठविला. पण शिंद्यांचे दिवाण दिनकरराव राजवाडे यांनी जयाजीराव शिंद्यांसह त्यांच्यावरच हल्ला चढविला. त्यात शिंदे पराभूत झाले व दिनकर रावांच्या सल्ल्यानुसार ते दोघेही आपल्या लव्याजम्यासह आग्ऱ्याला इंग्रजांच्या आश्रयास निघून गेले. ग्वाल्हेर रावसाहेब, तात्या व राणी लक्ष्मीबाईने जिंकले. तेथे त्यांच्या हाती शिंद्यांचा प्रचंड खजिना आला. रावसाहेबांने तिथे स्वतःला पेशवा म्हणून राज्याभिषेक करवून घेतला. विजयाने

धुंद झालेल्या रावसाहेब पेशव्यांने आनंदोत्सव सुरु केला. अन्नकोट व ब्राह्मण भोजने, दक्षिणावाटप शिंद्यांच्या संपत्तीतून सुरु झाले. ते १५/१७ दिवस चालले. राणी नव्रलखा बागेत उतरली होती. रावसाहेबाने ३ जूनला दरबार भरविला. त्यात राणी उपस्थित राहिली नाही. कारण तिला रावसाहेबाचे हे कृत्य पसंत नव्हते. पेशव्यांनी युद्ध सज्जता करण्याचे सोडून असे वागावे? त्याचा परिणाम व्हायचा तोच झाला.

४ जून रोजी ह्यू रोज काल्पीहून ग्वाल्हेरकडे वळला. इंग्रजांचे सैन्य जवळ येऊन ठेवले. तात्या टोपे लगेच युद्धास सज्ज झाला. १६ व १७ जून रोजी ग्वाल्हेरला युद्ध सुरू झाले. मुरार छावणी इंग्रजांच्या ताब्यात आली. १७ जून रोजी ब्रिगेडियर स्मिथने फुलबागेवर हल्ला केला. राणीच्या तोफखान्याने इंग्रजांची दाणादाण उडविली. तिने अनेक गोऱ्यांना ठार केले. राणी दिवसभर पुरूषवेषात आपल्या घोड्यावर स्वार होऊन कोटाकी सराई मधील प्रत्येक मोर्चावर जातीने जाऊन सैनिकांन मार्गदर्शन करीत होती. त्या दिवशी प्रचंड प्राणहानी होऊनच कोटाकी सराईची प्रत्येक टेकडी इंग्रजांना ताब्यात घेता आली. दुसऱ्या दिवशी क. स्मिथच्या मदतीला इंग्रज सैन्याच्या तीन तुकड्या येऊन मिळाल्या. १८ जून १८५८ रोजी इग्रजांनी तात्या टोपे व रावसाहेब पेशवे यांचा पराभव केला. ते समजताच राणीच्या सैन्याचे अवसान गळाले व थोड्याच वेळात तिच्या सैन्याची वाताहात झाली. प्रसंगावधानाने राणीने आपला घोडा इंग्रजांची कोंडी फोडून बाहेर काढला. तिच्या बरोबर तिच्या सुंदर व काशी या दोन दासी, दत्तक पुत्र दामोदर आणि सेवक रामचंद्र देशमुख आपापल्या घोड्यांवरून निघाले.

राणी पळून जात असलेली पाहून काही इंग्रज घोडेस्वार तिचा पाठलाग करू लागले. एका इंग्रज स्वाराने राणीच्या सुंदर या दासीला गाठून तिच्यावर तलवारीचा वार केला. किंकाळी फोडून सुंदर खाली कोसळली. ती किंकाळी ऐकताच राणीने आपला घोडा मागे वळविला व त्या इंग्रज स्वाराला आपल्या तलवारीच्या एकाच फटक्यात ठार केले. पुन्हा आपला घोडा वळवून राणीने दौड सुरू केली. दुर्दैवाने मार्गात एक वाहता ओढा आडवा आला. राणीचा हा घोडा पाण्याला बिचकला व ओढ्याच्या काठीच तो चकरा मारू लागला. राणीचा नेहमीचा घोडा काल्पीतच मेला होता. त्या दुसऱ्या घोड्याने दगा दिला. पाठलागावर असलेले इंग्रज घोडेस्वार जवळ येऊन ठेपले. त्यातील एकाने राणीच्या शिरावर तलवारीचा वार केला. डोके फुटले. दुसऱ्या इंग्रज सैनिकाने तिच्या बगलेत आपल्या बंदुकीने एक गोळी झाडली. राणी रक्ताने न्हाऊन निघाली व घोड्यावरून खाली कोसळली. ती मरण पावली. असे समजून ते सर्व इंग्रज घोडेस्वार निघून गेले. परंतु तिच्या अंगात अजून धुगधुगी होती. रामचंद्र देशमुखाने राणीला अलगद

उचलून शेजारच्या गंगादास बाबांच्या झोपडीत नेले. राणीने आपला दत्तकपूत्र दामोदर याला डोळे भरून पाहून घेतले व तिने मान टाकली. राणीने आधीच रामचंद्र देशमुखला सांगून ठेवले होते की, ''माझा मृत्यु झाला, तर माझ्या शरीराला म्लेंच्छांचा स्पर्श होऊ देऊ नका.''

गंगादासबाबांच्या झोपडीपासून जवळच गवताची एक गंजी होती. रामचंद्र राव, काशी व गंगादासबाबा यांनी आपले रडे आवरून राणीच्या मृतदेहाला त्या गंजीवर ठेवून तिचा अग्नीसंस्कार केला. १८ जून १८५८ रोजी राणी या जगातून निघून गेली. पहिल्या भारतीय स्वातंत्र्यसंग्रामाची विद्युत देवता त्या ओढ्याच्या काठी अनंतात विलीन झाली. त्यावेळी तिचे वय अवघे साडे तेवीस वर्षांचे होते. तेथे राणीचे स्मारक उभारले आहे. कविवर्य भा. रा. तांबे यांच्या या काव्यपंक्ती किती सार्थ आहेत !

कडकडा कडाडे बिजली ।
शत्रुची लष्करे थिजली ।
मग कीर्तिरुपे उरली ।
ती पराक्रमाची ज्योत मालवे इथे झांशीवाली ।।



# ३६. वीरांगना झलकारी

१८५७ च्या स्वातंत्र्य युध्दात अनेक स्त्रियांनी पराक्रम गाजविला होता. त्यांच्यात झलकारी या तरुणीचे नाव प्रामुख्याने घ्यावे लागेल. ती राणी लक्ष्मीबाईची दासीच नव्हे तर सहकारी होती. राणी लक्ष्मीबाईने तयार केलेल्या महिलासेनेची ती प्रमुख होती. आपल्या राणीला वाचविण्यासाठी तिने आपल्या प्राणांचे बलिदान करुन झांशीला वेढा देणाऱ्या सर हयू रोजला सुध्दा चकित केले होते.

झांशी जवळ वायव्य दिशेला भोजला या लहानशा गावात तिचा जन्म २० नोव्हेंबर १८३० रोजी झाला होता. तिच्या वडिलांचे नाव मूलचंद आणि आईचे नाव धनिया असे होते. हे कुटुंब कोरी या मागास समाजाचे होते. आईबापांची ती एकुलती एक लाडकी मुलगी होती. वर्णाने सावळी व रुपाने सुंदर होती. भोजला हे खेडे जंगल किनारी असल्याने गावकऱ्यांना हिंस्त्र पशूंना व डाकूंना सतत तोंड द्यावे लागले. त्यामुळे त्या गावातील लोक शस्त्रनिपुण होते. मूलचंद हे राणी लक्ष्मीबाईच्या सैन्यात नोकरी करीत. ते बहादुर सैनिक व तिरंदाजीत तरबेज होते. त्यांची पत्नी ही सुध्दा बहादुर व विचारी स्त्री होती. ते दोघे धर्मनिष्ठ असल्याने झलकारी धार्मिक प्रवृत्तीची बनली.

मूलचंदने आपल्या या लेकीला तिरंदाजी, घोडेस्वारी, शस्त्र संचालन चांगल्या रीतीने शिकविले. ती शरीराने दणगट व धाडसी होती. आकर्षक डोळे, सुंदर चेहरा, भव्य कपाळ यामुळे तिचे सौंदर्य खुलून दिसायचे. त्यांनी आपल्या लाडक्या मुलीचे पालन पोषण मुलासारखेच केले. जंगलात स्वैरपणे हिंडणे, फुले, फळे, सरपण आणणे तिला आवडायचे. शिकार करण्यातही ती पटाईत होती.

एके दिवशी झलकारी गाईगुरांना घेऊन जंगलात त्यांना चरायला घेऊन गेली होती. तिच्या हातात फक्त लाठी होती. अचानक जंगलातून एका चित्त्याने तिच्यावर झडप घातली. तिने बाजूला होऊन आपल्या लाठीने त्या चित्त्याच्या नाकावर जोरात टोला हाणला. त्यासरशी तो चित्ता बेशुद्ध होऊन पडला. झलकारीने चित्त्याला आपल्या लाठीने इतके बदडून काढले की त्या माराने तो मरण पावला. या घटनेने जो तो तिचे कौतुक करु लागला. एके रात्री गावच्या मुखियाच्या घरावर चोरांनी दरोडा घातला लोक आरडा-ओरडा करु लागले. ते ऐकून झलकारी आपली लाठी घेऊन धावून गेली. चोरांच्या पाठीवर जोर जोराने आपल्या लाठीने रट्टे लगावले. तेव्हा लोकही धावून आले. चोर जीव घेऊन पळून गेले. मुखियाने तेव्हापासून झलकारीला आपली मुलगीच मानले तिच्या बहादुरीची चर्चा सर्वत्र होऊ लागली.

राणी लक्ष्मीबाईच्या सैन्यातील तरूण गोलंदाज पूरणचंद याने झलकारीशी लग्न करायचे, असे तिच्या बापाला सांगितले. तो सुध्दा उमदा व सुंदर तरुण होता. झलकारीच्या आईवडिलांना तो पसंत पडला. त्याच्याशी झलकारीचे लग्न झाले. गावच्या मुखियाने तिच्या लग्नात गावभोजन दिले. पूरणचंद झलकारीला घेऊन राणी लक्ष्मीबाईचा आशीर्वाद घेण्यासाठी राणीच्या महालात गेले. राणीने दोघांना आशीर्वाद व भेटही दिली. राणीला झलकारी पसंत पडली. झलकारीला राणीने आपल्या महालाल नोकरी दिली. राणीच्या इतर दासींनी राणीला झलकारीच्या पराक्रमाच्या गोष्टी सांगितल्या. राणीने झलकारीला स्त्रियांची सेना उभारण्यास व त्यांना शस्त्रसंचालनाचे प्रशिक्षण देण्यास सांगितले. झलकारीच्या प्रयत्नाने राणीचे स्त्री-सैन्य उभे राहिले. तेच राणीचे 'दुर्गा दल' होय.

राणीचे पती गंगाधरराव यांनी त्यांच्या निधनापूर्वी दामोदर नावाचा मुलगा दत्तक घेतला होता. तो इग्रंज सरकारने नामंजूर केला व झांसीचे राज्य खालसा करण्यासाठी इंग्रज अधिकारी पाठविला. तेव्हा त्याला राणीने स्पष्ट शब्दांत सांगितले. "मैं मेरी झांसी नहीं दूंगी." तो अधिकारी परत गेल्यावर इंग्रजांनी आक्रमण करुन झांशीचा किल्ला ताब्यात घ्यायचे ठरविले. सर ह्यू रोज हा मोठे सैन्य घेऊन आला व त्याने झांशीच्या किल्ल्याला १९ मार्च १८५८ रोजी वेढा दिला. त्या आधी राणीने युध्दाची तयारी करुनच ठेवली होती. वेढा पडल्याचे पाहून राणीने किल्ल्याच्या व शहराच्या तटावर जातीने फिरुन युद्धाचा बंदोबस्त केला.

२३ मार्च १८५८ रोजी इंग्रजांनी किल्ल्यावर तोफांचा मारा सुरु केला. किल्ल्या तटावरुन राणीचे गोलंदाज आपल्या तोफांतून इंग्रज सैन्यावर आग ओतू लागले. दुलाजी ठाकूर हा गोलंदाज इंग्रजांना फितूर झाला तो इंग्रज सैन्यावर गोळाबारी न करता मोकळ्या जागांवर तोफगोळे सोडू लागले. शहराच्या तटाच्या गुप्त वाटाही त्याने इंग्रजांना दाखविल्या. इंग्रजांच्या तोफगोळ्यांनी झाशी शहरात अनेक ठिकाणी आगी लागल्या. दुलाजी ठाकूराची फितुरी व करतूत झलकारीने राणीच्या कानावर घातली अटीतटीचा प्रसंग पाहून राणीने आपल्या सैन्यातील प्रमुख योद्ध्यांची बैठक घेतली पुढे काय करावे. हा गंभीर प्रश्न होता. त्या बैठकीत झलकारी आली. तिने 'फितुरी झाल्यामुळे इग्रंज सैन्य शहरात शिरले आहे ते किल्लयात शिरले तर समोरासमोर लढावे लागेल. त्यात आपला निभाव लागणार नाही.' असे सांगितले.

राणीने झलकारीला विचारले, "आता यावर उपाय काय, तेच तर ठरवायचे आहे." त्यावर झलकारी म्हणाली,

''बाईसाहेब, अशा परिस्थितीत तुम्ही किल्ल्याबाहेर निघून गेलां पाहिजे. शत्रुला चकविण्यासाठी मी तुमचा वेष अंगावर घालून काही शिपायांसह किल्ल्याच्या बाहेर पळून जाण्याचा प्रयत्न करीन शत्रू मला राणी समजून माझ्या पाठीमागे धावेल. तुम्ही दुसऱ्या बाजूने गुप्तपणे सैन्याच्या एका तुकडीसह किल्ल्यातून निघून जावे. आणि सुरक्षित ठिकाणी जाऊन पुन्हा नव्याने सैन्य संघटित करावे.''

सर्वांना झलकारीची ही योजना पसंत पडली व तिच्या बुध्दीचे कौतुकही वाटले. झलकारीने राणीचा वेष धारण केला व घोड्यावर स्वार होऊन काही सैनिकांनिशी ती किल्ल्या बाहेर पडली. त्यानंतर राणी लक्ष्मीबाई निवडक योध्द्यांसह किल्ल्याच्या दुसऱ्या बाजूने साधारण वेषात काल्पीच्या मार्गाने निघून गेली. झलकारीला इंग्रज सैन्याने राणी समजून घेरले. दुलाजी ठाकराच्या एका माणसाने तिला ओळखले. लगेच तिने त्याच्या अंगावर आपल्या बंदुकीतून गोळी झाडली. घोडा हलल्याने नेम चुकला व त्या गोळीने एका इंग्रज सैनिकाचे प्राण घेतले. सर ह्यू रोजला त्या फितुराने सांगितले की, ही राणी नसून तिची दासी झलकारी आहे. तेव्हा रोजने तिला दम देत म्हटले, ''तू राणीचा वेष घेऊन आम्हांला धोका दिला आहेस. आमच्या एका सैनिकाला तू मारले आहेस मी तुला जिवंत सोडणार नाही.'' नंतर झलकारीने बेधडकपणे रोजला सांगितले.

''मार मला गोळी-मी तयार आहे.'' तेव्हा एक इंग्रज अधिकारी म्हणाला, ''पागलच दिसते ही.'' त्यावर ह्यू रोज गंभीरपणे उतरला,

''भारतात जर अशा एक टक्का स्त्रिया असल्या, तर सर्व इंग्रजांना या देशातून पळून जावे लागेल.'' ह्यू रोजने झलकारीला एका तंबूत सक्त पहाऱ्यात ठेवले. पण ती वाघीण पिंजऱ्यात कशी राहणार ? रात्री सारे पहारेकरी झोपले, तेव्हा हळूच ती तंबू बाहेर पडून किल्ल्यात चपळतेने निघून गेली.

सकाळी लवकर उठून जनरल ह्यू रोजने आपल्या दुर्बिणीतून किल्ल्या तटावरील तोफांच्या मोर्चाकडे पाहिले. तेव्हा तो अतिशय आश्चर्य चकित झाला. एका बुरुजावर झलकारी तिच्या नवऱ्याबरोबर तोफ व्यवस्थित लावीत होती. त्याने लगेच त्या तंबूत जाऊन पाहिले, तो सारे शिपाई झोपलेले असून झलकारीचा तंबूत मागमूसही नव्हता.

लगेच युद्ध सुरु झाले. काही वेळाने एक गोळी सूं सूं करीत आली व पूरणचंदच्या छातीतून आरपार निघून गेली. पूरणचंद खाली कोसळला तेव्हा झलकारीने तोफेतून गोळा सोडला. त्याने अनेक इंग्रज सैनिक ठार झाले. इंग्रज सेनेतून एक गोळा आला आणि त्या गोळ्याने झलकारीच्या शरीराचे तुकडे तुकडे होऊन वर उडाले रक्ताचा सडा पडला. आपल्या मातृभूमीच्या स्वातंत्र्यासाठी धैर्याने प्राणपणे लढणारी एक मागासवर्गीय तरूणी अमर झाली. त्या वीरांगनेला अंतःकरणपूर्वक प्रणाम! धन्य ती वीरांगना झलकारी!



# ३७. भीमाबाई

भीमाबाई ही इंदूरचे राजे मल्हारराव होळकर यांची भगिनी यशवंतराव होळकर (दुसरे) यांची कन्या तिच्या आईचे नाव केशर बाई तिच्या पोटी भीमाबाईचा जन्म सन १८३५ च्या सुमारास झाला होता. तिचे शिक्षण झाल्यावर यशवंतरावांनी तिचे लग्न त्यांच्याच तोलामोलाच्या घराण्यात एका राजकुमाराशी लावून दिले होते. दुर्दैवाने लग्नानंतर तिच्या पतीचे निधन झाले. वैधव्य प्राप्त झाल्यानंतर ती माहेरी निघून आली. पुन्हा सासरी गेलीच नाही. आपल्या पित्याच्या छत्राखाली ती शस्त्रे चालविण्यात, घोडेस्वारी करण्यात निपुण झाली. ती अत्यंत स्वाभिमानी, शूर व पराक्रमी होती. पुरुषांइतकीच युध्दकलेत पारंगत होती. एका कवीने तिच्याविषयी म्हटले आहे.

''वीर, शेरनी लडनेवाली, रण से हुई सगाई थी। खूब लडी मर्दानी रणमें, वह तो भीमाबाई थी॥''

पुरुषांच्या सैनिकी वेषात ती घोडाकेक करीत जायची, तेव्हा ती जणू रणचंडिकाच दिसायची. इंदूर राज्यातील जनतेत तिच्या विषयी खूप आदर होता. आपला भाऊ मल्हारराव याच्यापेक्षा ती राजकारणात अधिक कार्यक्षम होती. मल्हारराव तिच्या सल्ल्याप्रमाणे आपला राज्यकारभार चालवायचा दरबारी लोकांतही तिचा मोठा मान होता.

एकोणवीसाव्या शतकात कंपनी सरकार कुटिल नीतीने हिंदुस्थानातील एकेकराज्य आपल्या अंकित करीत चालले होते. सारा हिंदुस्थान आपल्या सत्तेखाली यावा अशी इंग्रजांची महत्वाकांक्षा होती. म्हणून न्याय-अन्याय, .नीती अनीतीचा विचार न करता हिंदुस्थानातील एकेक राज्य ते हडप करीत चालले होते. आधीच गव्हर्नर जनरल लार्ड वेलस्लीने अनेक राजांना आपल्या राज्यात तैनाती फौज ठेवायला भाग पाडले होते व त्या प्रत्येक राज्यात आपला एक प्रतिनिधी (रेसिडेंट) कायमचां ठेवून दिला होता. तो रेसिडेंट राज्याच्या कामकाजात हस्तक्षेप करायचा व आपला दबाव त्या राजावर ठेवायचा. इंदूरलाही एक रेसिडेंट होताच. त्याचा आपल्या राज्यकारभारातील हस्तक्षेप भीमाबाईला मुळीच आवडत नसे.

यशवंतराव ह्यात होते, तो पर्यंत तेथल्या रेसिडेंटच्या कारवाया ते मुळीच चालू देत नसत. पण तरुण मल्हारराव गादीवर आल्यानंतर रेसिडेंटची लुडबूड राजकारणात वाढू लागली. मल्हाररावाला समजून चुकले की, कंपनी सरकार आपले राज्य सुद्धा हडप करण्याच्या विचारातर आहे. तेव्हा मल्हाररावाने आपली बहीण भीमाबाई हिचा सल्ला

घेतला. भीमाबाईने त्याला स्पष्टपणे सांगितले की, ''आपल्या राज्यकारभारात लुडबूड करण्याचा इंग्रजांना मुळीच अधिकार नाही. त्यांच्याशी युद्ध करून त्यांच्या या कारवाया आपण थांबविल्याच पाहिजेत. ''मल्हाररावाला ही भीमाबाईचे विचार पटले आणि दोन्ही भावा-बहिणींनी गुप्तपणे युद्धाची तयारी सुरु केली. सैन्यभरती करुन नव्या सैनिकांना राज्यात ठिकठिकाणी प्रशिक्षण दिले जाऊ लागले. शस्त्रास्त्रांची खरेदी सुरु केली. तयारी होताच मल्हाररावाने युद्धाची घोषणा केली.

मल्हाररावाच्या सैन्यात दहा हजार पायदळ, पंधरा हजार घोडेस्वार होते व १०० चांगल्या तोफा होत्या. आपले सैन्य घेऊन मल्हाररावाने आपल्या बहिणीसह महीदपूरला तळ ठोकला भीमाबाई तर सर्व सैनिकांना रणचंडीच वाटत होती. पुरुषवेषातील तिचेरूप सैन्याला प्रोत्साहित करीत होते.

इंग्रज सेनाधिकारी हिस्लॉप आणि हंट यांना हे समजताच ते सुद्धा आपले सैन्य घेऊन महीदपूरला मल्हाररावांच्या सैन्यासमोर युद्धाच्या तयारीत येऊन उभे ठाकले. त्या सैन्यात थोडे गोरे सैन्य व बहुतेक देशी सैन्य होते. हिस्लॉप व हंट हे दोघेही अनुभवी सेनाधिकारी होते. हंट हा सडपातळ पण शूर होता. गोऱ्या घोडेस्वार तुकडीचे नेतृत्व त्याच्याकडे होते. त्याला आपल्या रणकुशलतेचा गर्व होता.

गुप्तहेरांनी हंटला सांगितले होते की, मल्हाररावांची बहीण भीमाबाई ही शूर व पराक्रमी असून ती नेहमी पुरुष वेषात असते. ती अत्यंत धाडसी असून ती अतिशय निडर आहे. तिला कोणचीही भीती वाटत नाही. युद्धकलेत ती तरबेज असून ती सुद्धा पुरूषवेषात लढण्यासाठी आलेली आहे. ते ऐकल्यावर हंट तिला बघण्यासाठी उत्सुक झाला व मल्हाररावाच्या सैन्याकडे त्याने दुर्बीण लावली तेवढ्यात भीमाबाई आपल्या घोडेस्वारांच्या तुकडीसह त्याच्यावर चालून आली. हंट चकित होऊन तिच्याकडे बघतच राहिला. तेव्हा भीमाबाई कडाडली.

'हे फिरंग्या, बघतोस काय? युद्धाला तयार हो!' हंट भानावर आला व त्याने आपल्या घोडेस्वारांच्या तुकडीस भीमाबाईच्या सैन्यावर चाल करण्याचा हुकुम दिला. तुंबळ युद्ध सुरू झाले. रणभूमीवर रक्ताचा सडा पडू लागला. हंट व भीमाबाई आपल्या तलवारींचे पाणी एकमेकांस दाखवू लागले. हंट भीमाबाईच्या हातातील तलवार तिच्या हातातून खाली कशी पडेल, याचा प्रयत्न करीत होता. तेवढ्यात भीमाबाईने संधी साधून हंटच्या खांद्यावर आपल्या तलवारीने जोराचा वार केला. त्याच्या खांद्यातून रक्ताच्या धारा वाहू लागल्या. तो चांगलाच घायाळ झाला व आपल्या घोड्यावर पडता पडता वाचला.

भीमाबाई त्याला म्हणाली, 'हे फिरंगी! जा आणि आपल्या जखमेवर उपचार करून घे!' त्यानंतर ही हिस्लॉप आपल्या सैन्यासह मल्हाररावावर धावून आला. मल्हारराव हत्तीवरून लढत गेला. त्याचा हत्ती घायाळ होऊन मागे वळून पळू लागला. भीमाबाई सैन्याच्या पिछाडीला जाऊन थोडा वेळ आराम करीत होती. मल्हाररावांचा हत्ती पळू लागल्याने त्याचे सैन्यही घाबरून पळू लागले. त्याचा पराभव झाल्यासारखेच होते. तेव्हा हिस्लॉपने त्याच्या कडे तहाच्या अटी पाठविल्या. त्या अशा -

१. मल्हाररावाने आपली राजधानी कंपनी सरकारच्या ताब्यात द्यावी व दुसरीकडे राहाण्यास जावे.
२. कंपनी सरकार त्याला दरवर्षी पेन्शन देईल.
३. त्याचा राजकारणात संबंध राहणार नाही.
४. इंदूरमध्ये इंग्रज फौजेची छावणी राहील.

युद्ध थांबलेसे पाहून भीमाबाई घोड्यावर स्वार होऊन मल्हाररावाकडे आली व तिने त्या तहाच्या अटी वाचल्या. तेव्हा ती अत्यंत संतापली व म्हणाली, मी या अटी मुळीच मंजूर करणार नाही. मी माझ्या मातृभूमीच्या स्वातंत्र्यासाठी इंग्रजांशी इंग्रजांशी मरेपर्यंत लढेन.' तिचे उत्तर ऐकून हिस्लॉपचा दूत परत गेला आणि पुन्हा युद्ध सुरू झाले.

भीमाबाई आपल्या घोडेस्वारांसह रणमैदानात उतरली. लगेच हंटही आपल्या घोडेस्वारासह तिच्यापुढे युद्धसज्ज होऊन आला. भीमाबाईने त्याला विचारले, ' हे फिरंगी! घाव भरून आला का?'

दोघेही परस्परांवर तलवार चालवू लागले. हंट आता सावधानतेने लढत होता. कारण मागच्या वेळेस भीमाबाईने त्याला चांगलेच जखमी केले होते. आधीच्या पराभावाने भीमाबाई व्यथित झाली होती. आता ती प्राणपणाने हंटशी लढत होती. हंटने भीमाबाईवर आपल्या तलवारीने जोरात वार केला. तिने तो आपल्या तलवारीवर झेलला खरा, पण तिच्या हातातून तिची तलवार त्या जबरदस्त वाराने निसटून खाली पडली. तेव्हा हंट तिला म्हणला, ''राणीसाहेब! तुम्ही शूर आहात. तुमच्या शौर्याने माझ्या मनात तुमच्याविषयी श्रद्धा निर्माण झाली आहे. तुम्ही निःशस्त्र आहात. निशस्त्र शत्रूवर वार करणे मला योग्य वाटत नाही. तुमची तलवार उचलून तुम्हाला देऊ का?' 'आभारी आहे, पण शत्रूने दिलेल्या तलवारीने युद्ध करणे, हा मी माझा अपमान समजते.''राणीने त्याला बाणेदारपणे उत्तर दिले. हंट म्हणाला, 'मी फक्त ऐकत होतो की, हिंदुस्थानी स्त्रिया रण मैदानात उत्तरून शत्रुशी युद्ध करतात. आज मी ते प्रत्यक्ष बघतो आहे. तुमच्या शौर्याने मी प्रभावित झालो आहे. मला सांगा, मी आपली काय सेवा करू?'

भीमाबाईने विचार करून त्याला लगेच उत्तर दिले. ठीक आहे, तुम्ही तर हिंदी राजांना एकमेकांत लढवून त्यांची राज्ये हडप करीत आहात. तुम्ही कपटनितीने हिंदी लोकांना गुलाम बनवित आहात. तुम्ही काय आमची सेवा करणार ? तेव्हा हंट बोलला, ते जाऊ द्या. मी खरोखरच आपल्यासाठी काही तरी करायला उत्सुक आहे. सांगून तर बघा.

भीमाबाई म्हणाली, 'चांगली गोष्ट आहे, मला तुम्ही वचन द्या की, इंग्रजी फौजेची छावणी इंदूरला यापुढे राहणार नाही.'

हंटला हे वचन देणे अवघड होते. कारण ते त्याच्या अधिकाराच्या कक्षेत येत नव्हते. म्हणून तो म्हणाला, राणीसाहेब, मी वचन तर देऊ शकत नाही. कारण ते माझ्या अधिकारात नाही पण त्यासाठी मी अवश्य प्रयत्न करीन.

हंटने वरिष्ठ सेनाधिकारी हिस्लॉपला भीमाबाईची मागणी सांगितली. पण ते त्याच्या ही अधिकार कक्षेत नव्हते. पण त्याने हंटला आश्वासन दिले की, मी याविषयी आपल्या पोलिटीकल एजंटला अवश्य विनंती करीन.

हिस्लॉपच्या विनंतीला पोलिटिकल एजंटने मान दिला. यामुळे इंग्रजांच्या फौजेची छावणी इंदूरमध्ये न होता, महू येथे झाली.

भीमाबाईच्या युद्धात पराजय झाला. तरी तिने आपल्या मनाप्रमाणे इंग्रज अधिकाऱ्याकडून आपले म्हणणे मान्य करून घेतले. हाच तिचा त्या युद्धातला इंग्रजांवर विजय म्हणवा लागेल. मानी व साध्वी अहिल्याबाई होळकरांची वंशज होती ती!



# ३८. राणा बेनी माधो सिंह

सन १८५७ च्या स्वातंत्र्यसंग्रामात राणा बेनी माधोसिंह यांनी रायबरेली जिल्हा इंग्रजांच्या सत्तेपासून सलग १८ महिने स्वतंत्र ठेवला होता. तात्या टोपेसारखीच दहशत बेनी माधोसिंहाची इंग्रजांना वाटत होती. राणा बेनी माधो सिंह हे उत्तर प्रदेशातील राजपूतांचे सरदार होते. शंकरगड येथील तालुकदार निपुत्रिक होते. त्यांनी बेनी माधोसिंहाना दत्तक घेतले होते. ते दृढनिश्चयी व साहसी होते. त्यांनी कधीही इंग्रजांपुढे शरणागती पत्करली नाही. व्हिक्टोरिया राणीच्या जाहीरनाम्यानंतरही ते इंग्रजांशी लढत राहीले. या युद्धात त्यांनी अवधची बेगम हजरत महल हिला अखेरपर्यंत साथ दिली. ते अध्यात्मिक पुरूष होते. दुर्गामातेची उपासना ते नियमितपणे करीत असत. त्यांच्या गुणामुळे अवधचा नबाब वाजित अली शाह प्रसन्न झाला होता व त्याने बेनी माधोसिंहना 'दिलेरजंग' हा किताब बहाल केलेला होता.

रायबरेलीत चारही दिशांनी स्वातंत्र्य युद्धाच्या बातम्या येऊ लागल्या. त्यामुळे तेथला डेप्युटी कमिशनर घाबरला आणि १० जून रोजी संध्याकाळी अलाहाबादला पळून गेला तेव्हा इंग्रजांची वक्रदृष्टी रायबरेली जिल्ह्यावर पडली. त्यांनी बेनी माधोसिंहाची ११६ गावे जप्त केली. त्यामुळे बेनी माधोसिंह संतप्त झाले आणि त्यांनी या युद्धात भाग घेऊन इंग्रज सत्ता आपल्या देशातून नष्ट करून टाकण्याची प्रतिज्ञा केली. त्यांच्या सैन्यात ४००० शिपाई, २००० घोडेस्वार आणि ४० तोफा होत्या. एक इंग्रज अधिकारी मेजर गॉल लखनौमधून इलाहबादला रायबरेलीच्या बातम्यांची पत्रे घेऊन चालला असतांना त्याला बेनी माधोसिंहाच्या सैनिकांनी गोळया घालून ठार केले. त्यानंतर जो इंग्रज दिसेल त्याला यमलोकात पाठवून देण्याचे सत्रच त्या सैनिकांनी सुरु केले.

रायबरेलीच्या पधरिया भागातील मीर बाकर अली नेहमीच बेनी माधोसिंहाच्या बरोबर असत. बेनी माधोसिंहाच्या सैन्याला रसद, हत्यारे वगैरे पुरविण्याचे काम मीर बाकर अली करीत असत. त्यांच्यासह युद्धात भाग घेत असत. मे १८५८ मध्ये बेगम हजरत महल हिने बेनी माधोसिंहाना आलमनगरच्या युद्धात सहभागी होण्यासाठी सैन्यासह बोलाविले. त्याचप्रमाणे ते त्या युद्धात सहभागी झाले आणि त्यानंतर त्यांनी मे-जून १८५८ मध्ये बहराइचमधून सर्व इंग्रजांना हाकून दिले. लखनौमध्ये युद्ध दीर्घकाळ चालले. त्या युद्धात त्यांनी बेगमेच्या वतीने इंग्रजांशी सतत लढा दिला. इंग्रजांना त्यांची फार दहशत

वाटत असायची. लखनौच्या बेलीगारद युद्धातही त्यांनी इंग्रजांविरूद्ध जबरदस्त लढा दिला होता. कुँवरसिंहासारखे ते गनिमी काव्यात तरबेज होते. बेनी माधोसिंहांना कसे ठार करायचे याची चिंता सतत इंग्रज सेनाधिकाऱ्यांना वाटत असे.

लखनौचा पाडाव झाला, तरी त्यांनी हार मानली नाही. उलट नव्या जोमाने त्यांनी इंग्रजांशी टक्कर देण्याचे ठरविले. इंग्रज सरकार लखनौच्या परिसरात जेथे जेथे इंग्रज अधिकाऱ्यांना राज्यकारभारासाठी पाठवत असे, तेथे तेथे जाऊन बेनी माधोसिंह त्या इंग्रज अधिकाऱ्यांना ठार करीत असत. उतारवयातही त्यांनी हिंमत हारली नव्हती.

इंग्रज अधिकाऱ्यांनी बेनी माधोसिंहाला शेवटी एक पत्र दिले, ते असे -

''इंग्लंडच्या साम्राज्ञीचे घोषणापत्र सोबत पाठवित आहे. तुम्हाला ताकीद देण्यात येत आहे की, त्या घोषणापत्रातील शर्तीनुसार तुम्ही साम्राज्ञीची आज्ञा मानली, तरच तुमचे जीवन सुरक्षित राहील. गव्हर्नर जनरल तुमच्यापाशी कठोरपणे वागू इच्छित नाहीत. तुम्ही दीर्घकाळापासून सशस्त्र बंड करीत आहांत. याआधीच तुम्ही आमच्या सैन्यावर आक्रमण केले आहे. म्हणून तुम्ही तुमचे चारही किल्ले आणि तोफा आमच्या हवाली कराव्या आणि तुमच्या सैन्याला आमच्या सेनाधिकाऱ्यांच्या पुढे शस्त्र खाली ठेवण्यास सांगावे. तेव्हाच तुमचे सैनिक विना दंड आपापल्या घरी जाऊ शकतील''.

इंग्रज सरकारच्या या धमकी वजा पत्राचे उत्तर बेनी माधो सिंहांनी कोलिन कॅंपबेलला बाणेदारपणे दिले - ''मी कोणत्याही परिस्थितीत शस्त्रे खेली ठेवणार नाही. मी बेगम हजरत महल व बिरजिस कद्र यांना सहकार्य करण्याची प्रतिज्ञा घेतली आहे. मी माझ्या मरणापर्यंत त्यांच्याशी मुळीच विश्वासघात करणार नाही''.

बेनी माधोसिंहांचे पत्र हाती पडताच कोलिन कॅंपबेल आपल्या सैन्यासह केशीपूरला आला. होप ग्रँट सुद्धा त्या सैन्याच्या उजवीकडे तीन मैलावर आपले सैन्य घेऊन तळ ठोकून राहीला. पश्चिमेकडून ब्रिगेडिअर इ बेल आपल्या सेनेसह चाल करून आला. राणा बेनी माधोसिंह इंग्रजांची ताकद ओळखून होते. इंग्रज सेनाधिकाऱ्यांना भीती वाटत होती की, राणा केव्हाही आपल्यावर आक्रमण करील. म्हणून ते दक्ष होते. बेनी माधोसिंहांनी आपला शंकरगड किल्ला मोकळा केला. किल्ल्यात चिट पाखरूसुद्धा उरले नाही. १६ नोव्हेंबर १८५८ रोजी ते रायबरेलीच्या मार्गाने आपले सैन्य घेऊन डोडियाखेडा येथे आले. तेथे त्यांची भेट रामबक्श सिंहांशी झाली. दोघांनी मिळून ब्रिगेडिअर इबेलच्या

सैन्याशी लढा दिला. त्यांनी त्या लढाईत मोठा पराक्रम गाजवून इंग्रजांचे शेकडो सैनिक ठार केले. परंतु त्या भल्या मोठ्या सैन्यापुढे त्यांचा टिकाव लागला नाही.

बेनी माधोसिंहाची गाठ कँपबेलच्या सैन्याशी नामपाराच्या उत्तरेला बंकी या गावाजवळ पडली. परंतु तेथेही त्यांचा पराभव झाला. या पराभवानंतर ते नेपाळमध्ये निघून गेले. मोठ्या कष्टानंतर बेगम हजरत महलची व त्यांची बेट झाली. नंतर ते विरक्त झाले. असे म्हणतात की, ते त्यानंतर एकदा साधुवेषात शंकर गडला आले होते. या महान वीराला नैराश्यात कधी व कोठे मृत्युने गाठले. ते मात्र अज्ञात आहे.



# ३९. रंगो बापूजी

शिवछत्रपतींची आणि स्वराज्याची एकनिष्ठतेने सेवा करणारी दोन घराणी शिवाजी महाराजांच्या काळापासून प्रसिद्ध होती. एक बाळाजी आवजी चिटणीसांचे व दुसरे रोहिडखोरेकर देशपांडे दादजी नरस प्रभू गुप्तांचे. यांनी रोहिडेश्वरासमोर बेलभंडार उचलून बालशिवाजी बरोबर स्वराज्याची शपथ घेतली होती.दादजी नरस प्रभू हे कायस्थ. कायस्थ प्रभूनींच पिढ्यान् पिढ्या स्वराज्यासाठी आपले जीवन खर्चीले. शिवछत्रपतींच्या घराण्यावरील आपले इमान कधीही ढळू दिले नाही.

रंगो बापूजी गुप्ते हा दादजी नरस प्रभूंच्या पाचव्या पिढीतला शिवछत्रपतींच्या घराण्याचा एकनिष्ठ सेवक, दादजीचा खापरपणतू. दादजीच्या हयातीतच त्याचे वतन भोरच्या शंकराजी नारायण या ब्राह्मण सचिवाने गिळंकृत केले होते. एवढेच नव्हे तर, त्याने दादजीच्या घरावर धाड घालून त्याचे वतनाचे दस्तऐवजही जाळून टाकून त्याचे घर लुटले होते. दादजींचे मूळ गांव रोहिडखोऱ्यातले 'कारी' वृद्धावस्थेत दादजीला अत्यंत दारिद्र्यात दिवस कंठावे लागले. ते दारिद्र्य रंगो बापूजीपर्यंत चालूच होते. राजाराम महाराजांनी गुप्त्यांचे वतन त्यांना देऊन टाकण्याबद्दल तंबी दिली होती. तिलाही या ब्राह्मण सचिवाने भीक घातली नाही. औरंगजेबाच्या छावणीत महाराणी येसूबाई व पुत्र शाहू यांच्या सेवेसाठी दादजीचा पूत्र कृष्णाजी हा अखेरपर्यंत होता. त्यांची सुटका औरंगजेबाचा मुलगा आजमशहा याने केल्यानंतर शाहू महाराज सातारा येथे गादीवर बसले. त्यांनीही सचिवाला गुप्त्यांचे वतन त्यांचे त्यांना देण्याचे फर्माविले. परंतु सचिवाने ते जुमानले नाही.

शाहू छत्रपतींचे निधन १७४९ साली झाले. त्यानंतर नानासाहेब पेशव्यांने राजकारभाराचा व शिक्षणाचा गंध नसलेला, खेडेगावात राहिलेला ताराबाईचा तथाकथीत नातू रामराजा ह्याला, तो आपल्या हातातले बाहुले राहील म्हणून साताऱ्याच्या गादीवर बसविले. त्याला पेशव्यांच्या खजिन्यातून खर्चासाठी ६ लाख रुपये दरवर्षी दिले जाऊ लागले. राज्याचा खरा धनी छत्रपती साताऱ्याला, राज्याचा महसूल जमा होई पुण्याला पेशव्याच्या खजिन्यात, त्यातून छत्रपतीला खर्चासाठी किती रक्कम द्यायची ते पेशव्यांच्या मर्जीवर! कसा उलटा न्याय पहा! जगात असले उदाहरण सापडायचे नाही. पुढे नाना फडणीसाने तर कडच केली. ६ लाख जास्त होतात म्हणून दरवर्षी एकच लाख छत्रपतींना दिले जाऊ लागले. साताऱ्याच्या गडावरून हत्ती, पागा, तोफा सगळे काही पुण्याला आणून ठेवले. एवढेच नव्हे, तर क्षुल्लक कामासाठीही पेशव्यांची लेखी परवानगी छत्रपतींनी घेण्याचा दंडक घालून दिला. दुसऱ्या बाजीराव पेशव्याने तर साताऱ्याच्या

किल्ल्यावर कडक पहारा बसविला. कोणत्याही मराठी सरदाराने छत्रपतींची भेट घेऊ नये, असा बंदोबस्त केला. छत्रपतींचा भयंकर कोंडमारा होऊ लागला. रामराजानंतर दुसरा शाहू, त्यानंतर प्रतापसिंह गादीवर आला.

दुसऱ्या बाजीरावाने आपल्या सरदारांचे न ऐकता वसई येथे १८०२ साली इंग्रजांशी नामुष्कीचा तह करून इंग्रज रेसिटेंड आपल्या व छत्रपतींच्या मानगुटीवर बसवून घेतला. साताऱ्याच्या गडावर जरी कडक बंदोबस्त असला, तरी छत्रपतींचा व त्यांच्या कुटुंबाचा कसा कोंडमारा होत आहे, याच्या बित्तंबातम्या गडाखाली येतच होत्या. त्या ऐकून प्रजा हळहळत होती. छत्रपतीनिष्ठ चिटणीस, रंगो बापूजी, चाफळकर स्वामी व त्यांचे साथीदार तर संतापाने हात चोळीत होते. त्यांनी खलबत करून छत्रपतींना दुसऱ्या बाजीरावाच्या पंजातून सोडविण्यासाठी पुण्याचा इंग्रज अधिकारी एल्फिस्टन यांच्याशी संधान बांधले. कारण एल्फिस्टन हाच तेव्हा मराठा राज्याचा सर्वेसर्वा होता. बाजीरावाच्या गुप्तहेरांना टाळून त्याची भेट घेणे, हे अत्यंत धाडसाचे काम होते. ते रंगो बापूजीने पत्करले व बोलणी यशस्वी केली.

बाजीरावाने जेव्हा एल्फिस्टन सैन्याशी युद्ध आरंभले, तेव्हा त्या युद्धात त्याचा पूर्ण पराभव झाला व त्याला दरवर्षी ८ लाख रुपये पेन्शन घेऊन उत्तरेस गंगातीरी विठुरला कायमचे राहावे लागले. मराठा राज्य इंग्रजांच्या ताब्यात आले. तेव्हा एल्फिस्टनने उत्तरेकडील नीरा नदीपासून दक्षिणेकडे वारणा नदीपर्यंतचा दोनतीन जिल्ह्यांचा प्रदेश प्रतापसिंहाला देऊन त्याला साताऱ्याच्या गादीवर बसविले. तो अन्य संस्थानिकांप्रमाणे इंग्रजांचा मांडलीक बनला. साताऱ्याला ग्रँटडफ या रेसिडेंटच्या मार्गदर्शनाखाली राज्य कारभार करू लागला. त्याने सातारा राज्याला उर्जितावस्था प्राप्त करून दिली. उत्तम रीतीने राज्यकारभार केला.

ग्रँट डफच्या हाताखाली बाळासाहेब नातू हा महाकारस्थानी चित्पावन ब्राह्मण काम करीत होता. त्याला सातारा राज्याचे दिवाणपद पाहिजे होते. ते त्याला मिळू शकले नाही. म्हणून त्याने खोटे दस्तऐवज करून प्रतापसिंहावर मोठे कुंभाड रचले. परिणामी कंपनी सरकारने प्रतापसिंहाला ४ सप्टेंबर १८३९ रोजी पदच्युत करून एखाद्या गुन्हेगाराप्रमाणे काशीला कायमचे पाठवून दिले. प्रतापसिंहाला दरसाल एक लाख वीस हजार रुपयांची नेमणूक लावून दिली. बघा, धन्याला एक लाख वीस हजार आणि त्याचा नोकर दुसरा बाजीराव याला आठ लाख! इंग्रजांचा न्याय कसा उलटा आहे, हे पाहून कोणाचेही माथे भडकावे. प्रतापसिंहानंतर त्याचा व्यसनीभाऊ आप्पासाहेब याला इंग्रजांनी साताऱ्याच्या गादीवर बसविले.

रंगो बापूजीने प्रतापसिंहाशी गुप्त मसलत केली. नंतर रंगोबापूजीला काही हजार रूपये देऊन इंग्लंडला आपला वकील म्हणून पाठविला. तो सारे कागदपत्र घेऊन लंडनला पोचला. तेथे त्याने महत्प्रयासाने इंग्रजी भाषेचे ज्ञान आत्मसात केले. ईस्ट इंडिया कंपनीच्या डायरेक्टर बोर्डासमोर त्याने त्या कागदपत्रांच्या पुराव्यासह आपली कैफियत मांडून प्रतापसिंहावरील आरोप खोटे आहेत हे सिद्ध करून दाखविले. पार्लमेंट च्या सदस्यांची ओळख करून घेऊन पार्लमेंटमध्येही भाषण करून आपली न्याय्य बाजू मांडली. एवढेच नव्हे तर लंडनमध्ये व अन्य शहरात यासंबंधी शेकडो व्याख्याने दिली. पत्रके छापून घेऊन वाटली.१८४० सालापासून १८५४ सालापर्यंत त्याने इंग्लडमध्ये हाल अपेष्टा सहन करून आपल्या धन्याला न्याय मिळावा, सातान्याचे राज्य प्रतापसिंहाला मिळावे म्हणून जिवापाड कष्ट घेतले. पण त्याचा उपयोग झाला नाही. गव्हर्नर सर राबर्ट ग्रँटने डायरेक्टर बोर्डाला आधीच कळविले होते की, 'ब्रिटीश राज्याच्या सलग मुलखाच्या पट्टीत हे सातान्याचे राज्य म्हणजे निष्कारण अडगळ आहे. ती निर्माण करण्यात पूर्वीच्या आपल्या मुत्सुद्यांची चूक झालेली आहे. ती चूक सुधारण्याची हीच वेळ आहे. हा सातान्याच्या राज्याचा प्रदेश म्हणजे दख्खनचा सर्वात उत्तम सुपीक प्रदेश. तेव्हा आपणच निर्माण केलेले हे राजेशाहीचे बाहुले उचकून फेकून देण्याची आताच छान संधी आलेली आहे.' शेवटी डायरेक्टर बोर्डाने त्यानुसारच रंगो बापूजीला उत्तर दिले. "गव्हर्नर जनरलचा निर्णय योग्य आहे. त्यात आम्हाला बदल करणे योग्य वाटत नाही. हे उत्तर ऐकताच आपले १४ वर्षाच्या वनवासातले कष्ट व पायपीट वाया गेली असे पाहून रंगो बापूजी कमालीचा निराश झाला.

दुसरा बाजीराव १८५१ साली मरण पावला. त्यानंतर गव्हर्नर जनरलने त्याचे दरवर्षी ८ लाख पेन्शन बंद केले. ते ग. ज. पुन्हा बाजीरावाच्या दत्तकपुत्र नानासाहेब पेशवे यांना देईना. म्हणून नानासाहेब पेशव्यांनी आपला इंग्रजी व फ्रेंच भाषा जाणणारा विश्वासू मंत्री अजी मुलाखाँ आला महंमद अलीसह आपला वकील म्हणून भरपूर पैसा देऊन इंग्लडला पाठविले. तेथे त्याने पार्लमेंटचे सभासद, ईस्ट इंडिया कंपनीचे डायरेक्टर बोर्ड व अन्य प्रतिष्ठित इंग्रजांपुढे मोठ्या जिद्दीने नानासाहेबांची बाजू मांडली. परंतु त्याच्या प्रयत्नांना यश आले नाही. रंगो बापूजीला जसे परखड उत्तर मिळाले, तसेच त्याला ही मिळाले. टेम्स नदीच्या काठी रंगो बापूजीची व त्याची भेट झाली. दोघेही इंग्रजावर भयंकर चिडले होते. त्यांनी विचारविनिमय करून भारतात परतल्यावर इंग्रजांना भारतातून कसे हाकून द्यायचे, त्यांचा नायनाट कसा करायचा याची योजना आखली. अजीमुलाखाँने उत्तरेत रान उठवायचे व रंगो बापूजी दक्षिणेत. मात्र अतिशय गुप्त रितीने हे काम करायचे असे ठरले. रंगो बापूजी १८५४ मध्ये भारतात परत आला. अजीमुलाखाँ मिस्त्र, तुर्कस्तान,

रशिया, वगैरे देशात जाऊन त्या देशांकडून आपल्या कार्यात काही मदत मिळेल का? हे पाहून १८५६ मध्ये भारतात परत आला. क्रिमीयन युद्धात रशियन सैनिकांनी इंग्रज सैन्याला कसे पाणी पाजले होते, ते त्यांनी पाहिले होते. इंग्रज हे काही अपराजेय नाहीत, हे त्यांने हेरले होते.

विठुरला परत आल्यावर नानासाहेबांना त्याने पेन्शन मिळू शकणार नाही, असे जेव्हा सांगितले, तेव्हा नानासाहेब कमालीचे निराश झाले, नंतर अजीमुल्लाखाँने इंग्रजानाच आपल्या देशातून कसे हाकून द्यायचे ते त्यांनी सांगितले. त्याप्रमाणे काम सुरू झाले. नानासाहेब, बाळासाहेब, अजीमुलाखाँ यांनी तीर्थ यात्रेच्या निमित्ताने उत्तर भारताची यात्रा केली. बहादुरशहालाही त्यासाठी तयार केले. सगळ्या संस्थानिकांना एकदम उठाव करण्यासाठी पत्रे दिली. रंगो बापूजीनेही दक्षिणेत सातारा, कोल्हापूर, सावंतवाडी, बेळगाव, धारवाड भागातील संस्थानिकांना तयार केले. तेथल्या इंग्रजांच्या छावण्यातील देशी पलटणींना उठावासाठी उद्युक्त केले. या कामी त्याचा मोठा मुलगा सीताराम त्याला साथ देत होता. या कामासाठी पैसा, हत्यारे, रसद मिळवून मोक्याच्या ठिकाणी गुप्तरितीने त्यांचे साठे करून ठेवले. विश्वासू लढवय्ये तयार केले. धाडसी रामोशी व मांग यांच्या संघटना बांधल्या. त्यांना खजिने लुटण्याचे अमिष त्याने दाखविले होते. बंदुकीसाठी गोळ्या तयार करून घेतल्या. रंगो बापूजी साधूच्या वेषात नासिक त्र्यंबकेश्वर पासून दक्षिणेतील बंगळूरपर्यंत उठावासाठी माणसांना प्रवृत करण्याकरिता सारखा हिंडत होता. त्याचा मोठा मुलगा सगळ्या कामांवर गुप्तपणे देखरेख करीत होता.

रंगो बापूजीने कायस्थ प्रभू, मावळे, भंडारी, कातकरी, कोळी यांनाही संघटित केले. साऱ्या लोकांची मने पेटून उठली होती. त्याचे हेरही त्याने सर्वत्र पेरुन ठेवले होते. कोल्हापूरच्या राजाचे कनिष्ठ बंधू चिमासाहेब यांनीही रंगो बापूजीला उत्तेजन दिले. त्यांनी पैसा, हत्यारे व दारुगोळा सुध्दा पुरवला. प्रतापसिंहाची पत्नी राजसबाई हिला रंगो बापूजीबद्दल खूप आदर होता. साताऱ्याच्या दोन्ही राजकुटुंबांचा तर तो आता एकमेव त्राता होता. दक्षिण महाराष्ट्रातील औंध, सांगली, मिरज, इचलकरंजी येथले पेशव्यांचे ब्राह्मण सरदार संस्थानिक मात्र चुळबूळ करु लागले. तेव्हा रंगोबापूजीच्या विश्वासातल्या म्होरक्यांनी त्यांना सज्जड दम भरला, "आमच्या भानगडीत पडाल, इंग्रज अधिकाऱ्यांना कळवाल, तर इंग्रजांच्या आधी तुमचाच चेंदामेंदा करुन टाकू, लक्षात ठेवा. ते भिऊन चूप बसले.

भोरचा देशस्थ ब्राम्हण संस्थानिक पंतसचिव मात्र एका बाजूला रंगोजीला पाठिंबा द्यायचा बहाणा करायचा व दुसऱ्या बाजूला आपला नोकर कृष्णराव सिंदकर याच्या

मार्फत पुण्याच्या इंग्रज कमिशनरला रंगो बापूजीच्या बातम्या पोचवायचा याच सिंदकराने शेवटी घात केला.

सातान्यावर व महाबळेश्वरवर एकाच वेळी हल्ला करायचे ठरले. रंगो बापूजीच्या या उद्योगाची कुणकुण पुण्याच्या इंग्रज कमिशरला लागली. नाझर कोर्टातील शिपाई मानसिंग या कटात सामील आहे, असे समजल्यावर त्याला बंदुकीच्या गोळीने उडविले. नाशिकपासून बेळगाव - धारवाडपर्यंत एकाच दिवशी उठाव करायचे ठरले होते. उठावाचा दिवस जवळ आला म्हणून रंगो बापूजी कृष्णराव सिंदकरला भेटण्यासाठी त्याच्या गावी गेला. सिंदकराने हिवतापाने आजारी असल्याचे सोंग केले होते. रंगो बापूजीने त्याला विचारले, "तू उठावाची व्यवस्था कशी काय लावलीस? उठावाचा तुझा बेत कसा ठरला आहे?" तोच शेजारच्या खोलीतून काही इंग्रज सोजीर आत आले व त्यांनी रंगो बापूजीला पकडले. तेव्हा रंगो बापूजी त्याला त्वेषाने म्हणाला, "बुवा सिंदकरा! आपल्या महाराष्ट्र मायभूमीचा गळा कापलास तू. जातीच्या नावाला कालिमा फासलास. तुझा निर्वंश होईल. मी तर मरणालाच मिठी मारुन आजवर उद्योग केला. तू मात्र आपल्या महाराष्ट्र भूमीचाच घात केला आहेस."

रंगोबाला पकडून दिल्याबद्दल भोरच्या पंत सचिवाची कंपनी सरकारने मोठी वाहवा केली. त्याला अनेक सवलती सन्मानाने दिल्या. कृष्णराव सिंदकराला काही गावांची इनामदारी वंशपरंपरा देऊन त्याला 'विश्वासराव' हा किताब बहाल केला.

रंगो बापूजीला महाराष्ट्रात न ठेवता ग्वाल्हेरच्या तुरुंगात गोऱ्या सोजिरांच्या पहाऱ्यात ठेवले. रंगोबाला इंग्रजी भाषेत अस्सलखित बोलता येत होतेच. त्याने त्या सोजिरांना आपल्या प्रवासातील कहाण्या सांगून सांगून आपलेसे केले व त्यांचा विश्वास संपादन केला. तो पार्लमेंटच्या मेंबरांचाही मित्र आहे. त्याच्या प्रतिष्ठित इंग्रज दोस्तांनी त्याला निरोप देतांना चांदीचे तबक दिले होते. हे ऐकून त्याचा चांगलाच प्रभाव त्या सोजिरांवर पडला. त्यांची चांगली दोस्ती झाली. तेव्हा संधी साधून एके रात्री रंगो बापूजी ग्वाल्हेरच्या किल्ल्यातून जो पळाला, तो जंग जंग पछाडूनही इंग्रजांच्या हाती लागला नाही.

इकडे महाराष्ट्रात ३१ जुलैला जागोजाग उठाव झाले. ते इंग्रज सरकारने दडपून टाकले. त्यात रंगोबाचा मुलगा सीताराम, बेळगांवच्या पलटणीतला ठाकुरसिंह मुनशी, रंगो बापूजीचे मेव्हणे केशव चित्रे, शिवराम कुलकर्णी, गणेश कारखानीस, बाबिया मांग, येशा मांग इ. ना देहान्ताच्या शिक्षा देण्यात येऊन त्यांना फाशी दिले. बाकीच्या क्रांतिकारकांच्या मनाचा ठाव सूड बुध्दीने घेतला. त्यांनी पंढरपूरचे ठाणे उध्वस्त केले.

तेथला मामलेदार नागेश राघवेद्र व त्याचे दोन मुसलमान शिपाई यांना ठार करुन तेथला खजिना लुटला. ते सारे ८/१० बहादुर होते. पैशाच्या लोभाने गिरजाप्पा वाणी याने त्या सर्वांची नावे सांगितली. त्या सर्वांना पकडण्यात येऊन दोघांना फाशी देण्यात आली व बाकीच्यांना जन्मठेपेच्या शिक्षा ठोठावण्यात आल्या. सातान्याच्या छत्रपती घराण्याची एकनिष्ठतेने सेवा करणान्या रंगोबापूजींच्या वंशातील सर्वांचा शिरच्छेद करण्यात आला.

या उठावाच्या मुळाशी सातारचे छत्रपती घराणे आहे. असे समजून इंग्रजांनी छत्रपती घराण्यातील प्रतापसिंहाचा दत्तकपुत्र शाहू ऊर्फ जंगली महाराज, त्याचा चुलता काकासाहेब, राजसबाई, गुणवंताबाई, तिचा पुत्र दुर्गासिंह या सर्वांना अटक करुन मुंबईजवळ बुचर बेटावर अलग अलग ठेवले. तेथून त्यांना १८५८ साली कराचीला नेले. तेथेही वेगवेगळे ठेवून एकमेकांच्या भेटी होऊ दिल्या नाहीत. अप्पासाहेबाचा दत्तक पुत्र व्यंकाजी याला आधी अहमदाबादला व नंतर अहमदनगरला ठेवले. या सर्वांना दरमहा ३८० रु तनखा देण्यात येत असे.

शाहू ऊर्फ जंगली महाराजांना जुलै १८८५ मध्ये मुक्त केले. ते पुण्यात भवानी पेठेत राहत असत. तेथेच १ जून १८९२ रोजी त्यांचे निधन झाले. त्या ठिकाणी त्यांची समाधी आहे. कराचीत अटकेत ठेवलेल्या सर्वांचीच सुटका १८८५ च्या सुमारास झाली व ते महाराष्ट्रात परत आले. रंगो बापूजीचा पत्ता मात्र कोणालाही अखेरपर्यंत लागला नाही. यवतमाळ जिल्ह्यात अडाम नदीच्या तीरावर पुसद शहराजवळ बैरागी महाराजांचा एक मठ आहे. त्या मठात एक समाधी आहे. ती समाधी रंगो बापूजीची आहे व त्यांचा स्वर्गवास याच मठात झाला, असे म्हणतात. तेथे दरवर्षी रंगो बापूजीची पुण्यतिथी साजरी केली जाते. काही इतिहास-संशोधकांचे मतही असेच आहे.



# ४०. फिरोजशहा

१८५७ क्रांतियुद्धात मुघल घराण्यातील ज्या एकमेव व्यक्तीने प्रत्यक्ष रणांगणात भाग घेतला, ती व्यक्ती म्हणजे फिरोजशहा पण तो कोणाचा मुलगा, त्याची जन्मतारीख कोणती, त्याचे शिक्षण किती झाले, याची माहिती मिळू शकत नाही. तरी ही एवढे मात्र खरे की, तो दिल्लीचा बादशहा बहादुरशाह जफरच्या मुलांपेक्षा धाडसी, पराक्रमी व युद्धकलेत निपुण होता. सप्टेंबर १८५७ मध्ये इंग्रजांनी क्रांतिकारी सैन्याकडून दिल्ली जिंकली. बहादुरशाहच्या संपूर्ण परिवाराला कैद केले. त्याच्या सर्व मुलां नातवंडाना ठार केले. त्यातून फिरोजशहा कसा निसटला हे सांगता येत नाही. तो लपत छपत काही महिने हिंडत राहिला आणि थोडेफार सैन्य जमवून उत्तर प्रदेशातील मुरादाबाद या शहरी आला. येतांना तो नानासाहेब पेशव्यांच्या बरोबर मार्च १८५८ मध्ये बरेलीस खान बहादूर खान याला भेटायला गेला होता. व त्यानंतर दोन एक गावे लुटून तो एप्रिल १८५८ मध्ये मुरादाबादेस पोचला होता.

काही दिवस मुरादाबादेस राहिल्यानंतर तो इटावा जिल्ह्यात आला. मे १८५८ मधये त्याला रूपसिंग या झोटिंगशहाशी अनेक ठिकाणी चकमकी कराव्या लागल्या त्यात त्याने रुपसिंगाची नांगीच मोडली. नंतर तो माळव्यातील नीमच छावणीजवळील जीरन या गावी आपल्या सैन्यासह तळ ठोकून बसला. नीमच छावणी जवळचे हे संकट इंग्रजांना दुर्लक्ष करण्याजोगे नव्हते. म्हणून त्यांनी २३ ऑक्टोबर १८५८ रोजी जीरन येथल्या फिरोजशहाच्या तळावर हल्ला चढविला. त्यांनी आधी तोफांची सरबत्ती केली. नंतर त्यांच्या पायदळाने फिरोजशहाच्या शिपायांवर हल्ला केला. तो त्या शिपायांनी परतवून लावला आणि त्यांची एक तोफ हस्तगत केली. नंतर छावणीतून घोडदळ आले व त्याने त्या शिपायांवर जोराचा हल्ला करुन ती तोफ परत मिळविली. दुसऱ्या दिवशी पहाटेस फिरोजशहा आपल्या शिपायांसह तेथून निघून गेला. त्यानंतर १५ दिवसांनी आपल्या सैन्यात अरब, रोहिल्यांची आणखी भरती करुन तो ८ नोव्हेंबर १८५८ रोजी नीमच छावणीवर चालून आला. व १५ दिवस छावणीतील सैन्याला त्याने नीमचच्या चौकात कोंडले. पण छावणीच्या मदतीला मुंबईकडून मोठे सैन्य आल्याने फिरोजशहाने आपला वेढा उठविला व तो मंदसोरकडे वळला.

मंदसोरकडे जातांना त्याने महीदपूरची इंग्रजांची छावणी लुटली. ते कळताच त्या छावणीचा प्रमुख डयूरंड याने आपली घोडेस्वारांची मोठी तुकडी त्याच्या पाठलागावर पाठविली. त्या तुकडीला थोडेफार लूट परत मिळविता आली व ती छावणीत परतली.

त्यानंतर तो माळव्यातून पुन्हा उत्तरप्रदेशात मुरादाबादेला आला. तेव्हा त्याचे सैन्य बरेच कमी झाले होते. कारण पैशांचा अभाव. त्याने मुरादाबादेत पैसा मिळविण्याचा प्रयत्न करुन पाहिला; पण हात हालवीत तो मोहन या गावी आला. तेथे त्याने आपल्या कर्तुत्वाने चांगला जम बसविला.

लखनौ इंग्रजांनी घेतले व अवध प्रांतातली बंडाळी मोडून काढण्याच्या प्रयत्नास ते लागले. त्यांनी बेगम हजरत महल, नानासाहेब आदि नेत्यांना नेपाळकडे रेटीत नेले. त्यांच्याबरोबर फिरोजशहा सुद्धा होता. पण त्याने इंग्रजांना झुकांडी दिली व तो ७ डिसेंबर १८५८ रोजी सीतापूर मार्गे गंगापार होऊन दुआबात उतरला. जातांना त्याने प्रत्येक गावात 'मी इकडे चाललो, तिकडे चाललो, अशा थापा इंग्रजांना आपला ठावठिकाणा लागू नये म्हणून दिल्या होत्या. तसेच टेलिग्राफच्या तारा तोडीतच त्याने डिसेंबर १८५८ मध्ये यमुना नदी ओलांडली. त्याला बुंदेलखंडात जाऊन तात्या टोपेला भेटायचे होते. त्यांचा पत्रव्यवहार अधून मधून चालूच असे. तिकडे तात्या टोपे, रावसाहेब पेशवे इंग्रजांना हैराण करीत होते. त्यांना जाऊन मिळण्यासाठी तो आपल्या सैन्यासह तिकडे निघाला होता.

१७ डिसेंबर १८५८ रोजी चंदेरीजवळ त्याची गाठ इंग्रजांच्या एका सैन्य-तुकडीशी पडली. त्या तुकडीशी झुंज देऊन तो रोहिल खंडातून माळव्याकडे जात असतांना इंग्रज सैन्य त्याच्या पाठलागावरच होते. त्या सैन्याला झुकांड्या देत देत तो १३ जानेवारी १८५९ रोजी तात्या टोपे व रावसाहेब पेशवे यांना भेटला. अतिशय वेगाने लांब लांब मजला मारीत आल्याने त्याच्या सैन्याला विश्रांतीची गरज होती.

१३ जानेवारीच्या भेटीनंतर काही दिवसांनी देवास या गावी त्यांचा तळ पडला. तेथे ते तिघे पुढच्या कार्यक्रमाची चर्चा करीत असतांनाच इंग्रजांचे सैन्य त्यांच्यावर चाल करुन आले.थोड्या चकमकीनंतर ते तेथून निसटले. त्या पळापळीत त्यांची बरीच हानी झाली. बरेच युध्द साहित्य व सैनिक त्यांना गमवावे लागले. त्यानंतर २१ जानेवारी १८५९ रोजी फिरोजशहाने तात्या टोपेचा निरोप घेतला व तो पश्चिमेकडे राजस्थान सिंधमध्ये निघून गेला. आता त्याच्या जवळ फारच थोडे सैन्य उरले होते. निराश होऊन त्याने त्या सैन्यालाही निरोप दिला व तो आपल्या पत्नीसह इराण मध्ये निघून गेला. इराणात त्याचे फार हाल झाले. म्हणून तो मक्केला गेला व थोड्याच काळात त्याचे तेथे निधन झाले.

❖❖❖

# ४१. वाजिद अली शाह

अवधच्या तख्तावर १३ एप्रिल १८४७ रोजी नबाब वाजिद अली शाह बसला. अवधच्या सर्व नबाबात तोच एकटा जनतेचा आवडता नबाब होता. त्याचा जन्म १८२३ साली झाला होता. आपल्या प्रजेच्या तक्रारी तो स्वतः ऐकायचा. योग्य प्रकारे न्याय दान करायचा. बिशप हेबरने म्हणले आहे की, ''अवध राज्यातील शेती फारच सुपीक असून प्रजा सुखासमाधानात आहे. या राज्यातील जनतेची स्थिती आणि उद्योग पाहिल्यावर असे दिसून येते की, येथे कोणावरही अत्याचार होत नाही.'' अवधचे राज्य समृद्ध होते. नबाब धनाढ्य होते. वाजिल अली शाहच्या पूर्वजांनी कंपनी सरकारला वेळोवेळी लाखो रुपयांची मदत केली होती. वॉरन हेस्टिंग्जला युद्ध समयी २ कोटी, लॉर्ड एम्हर्स्टला ५० लाख रूपये, विल्यम बेटिंगला ६२ लाख रूपये दिले होते. अवधचे सगळे नबाब कंपनी सरकारचे दोस्त होते. तरीही कंपनी सरकारने वेळोवेळी त्यांच्याशी अपमानास्पद तह केले. तैनाती फौज व रेसिडेंट ठेवायला लावले. त्यांचा खर्च जबरदस्त होता. आणखी त्या नबाबांना दरवर्षी ७६ लाख रुपये खंडणी म्हणून कंपनी सरकारला द्यावे लागत होते. कंपनी सरकारच्या अधिकाऱ्यांच्या हस्तक्षेपामुळे व धनलोभामुळे अवध राज्याचा कारभार विस्कळीत होत होता. तरीही प्रत्येक गव्ह. जनरलला अवधच्या नबाबांना धमकी देत होती की, ''राज्यकारभारात सुधारणा करा. नाहीतर तुमचे राज्य आम्ही आमच्या ताब्यात घेऊ.'' चोरांच्या उलट्या बोंबा, दुसरे काय? खरे पाहिले तर सारेच इंग्रज गव्ह. जनरल अवधचे राज्य हडपण्यासाठी लालचावले होते.

इंग्रज अधिकाऱ्यांच्या हस्तक्षेपामुळे अवध दरबारात काटकारस्थाने होत होती. इंग्रजांची सत्ताकांक्षा व त्यांची दहशत यामुळे अवधचे नबाब हतबल झालेले होते. वाजिदअली शाह मात्र अत्यंत स्वाभिमानी होता. वयाच्या २५ व्या वर्षीच तो अवधच्या तख्यावर आला होता. त्याच्या पूर्वजांनी व त्याने आपली राजधानी लखनौ या नगरीत अनेक भव्य व कलापूर्ण इमारती बांधल्या. सुंदर बागा तयार केल्या. त्या काळात लखनौ हे अत्यंत सुंदर शहर म्हणून प्रसिद्ध होते. जनता सुखासमाधानाने नांदत होती.

लखनौच्या तख्यावर बसविल्यावर वाजिद अली शाहने आपला राज्यकारभार अतिशय चांगल्या प्रकारे सुरू केला. आज जेथे चारबाग स्टेशन आहे, तेथे त्या काळात एक मोठे मैदान होते. त्या मैदानावर वाजिद अली शाह स्वतः आपल्या सैनिकांची परेड दररोज सकाळी दोन तास घेत असे. आपले सैन्य शिस्तबद्ध आणि लढण्यात वरचढ व्हावे, याचसाठी तो खपत होता. हे रेसिडेंटला पाहविले नाही. त्या इंग्रज रेसिडेंटने

लखनौ दरबारच्या हकिम (वैद्य) याला लाच देऊन आपल्या विश्वासात घेतले व त्याला पटवून दिले की, ''नबाबाने दररोज एवढे कष्ट उपसले, तर त्याला क्षयरोग होईल. म्हणून त्याने परेड घेणे बंद केले पाहिजे. हे तुम्ही नबाबाच्या आईला पटवून द्या.'' त्या हकिमाने वाजिद अली शाहची आई मालिका किश्वर हिला त्याप्रमाणे सांगितले व नबाबाला दररोजची परेड बंद करण्याचे सुचविले. कोणत्याही आईला आपल्या मुलाची काळजी वाटणारच. तिने आपल्या मुलाला ती दररोजची परेड बंद करायला भाग पाडले. त्यामुळे इंग्रज रेसिडेंट सुखावला.

रेसिडेंटने नंतर दुसरी चाल खेळली. नबाब आता मोकळाच असे. रेसिडेंटने त्याला चैनविलासात हळूहळू गुंतविले. वाजिद अली शाह हा जात्याच रंगेल प्रवृतीचा होता. तो चैन विलासात पूर्णपणे गुंतला. दोन तीन दिवसानंतर अधून मधून थोडावेळ दरबारात जात असे. त्यामुळे दरबारीचे फावले. त्यांची कटकारस्थाने सुरू झाली. त्याचा राज्यकारभारावर परिणाम होऊ लागला. अव्यवस्था दिसू लागली. हेच कंपनी सरकारला हवे होते. तरीही अवध राज्यात सुखसमाधान नांदतच होते.

वाजिद अली शाह कलासक्त होता. नृत्य, गायन, संगीत, नाट्य याची त्याला आवड होती. तो स्वतः शायर होता. दीवान-इ-अख्तर आणि हुस्न-इ-अस्तर हे त्याचे दोन गझल संग्रह प्रसिद्ध आहेत. त्याला पैशाची कमतरता नव्हती. दरवर्षीचे त्याचे उत्पन्न १५ लाखांवर होते. त्याने आपल्या दरबारात संगीत, नृत्य, गायन, नाट्य, शेरो- शायरी आदी कलांना उत्तेजन दिले. उदार आश्रय दिला. उर्दू, अरबी, हिंदी, फारसी आणि ब्रज या भाषांवर त्याचे प्रभुत्व होते. त्याचा बहुतेक वेळ या कलांच्या आस्वादातच जाऊ लागला. त्याने एक परीखाना उभारला. शंभरावर सुंदर मुली त्या परीखान्यात ठेवल्या. त्यांच्या संगीत-नृत्य-गायनादी कलांच्या शिक्षणासाठी अनेक उस्ताद ठेवले. कृष्ण कन्हैय्याची रासलीला त्याला फार आवडायची. तो स्वतः कृष्णाची भूमिका कारायचा. परीखान्यातील पऱ्या गोपिका व्हायच्या व त्यांची रासलीला चालायची. परीखान्यात दाखल झालेल्या मुलीला 'परी' म्हणायची पद्धत त्याने सुरू केली होती. बेगम हजरत महल लहानपणी त्या परीखान्यात दाखल झाली, तेव्हा तिचे सौंदर्य पाहून वाजिद अली शाहने तिला 'महकपरी' असा किताब दिला. ती वयात आल्यावर त्याने तिच्याशी निकाह लावला व ती बेगम हजरत झाली. हे लग्न १८३५ मध्ये झाले. १८३८ साली तिला पुत्ररत्न प्राप्त झाल्यावर ती 'बेगम हजरत महल' झाली. ज्या बेगमला मुलगा होत असे, तिच्या नावापुढे 'महल' हे किताब दर्शक नाव लावण्याचा प्रघात होता. हीच बेगम १८५७ सालच्या स्वातंत्र्य युद्धात प्रसिद्ध झाली.

वाजिद अली शाहची राससलीला कैसरबाग या भव्य महालात होत असे. त्याने स्वतः 'राधा कन्हैय्याका किस्सा' हे नाटक लिहिले व त्याचा प्रयोग कैसरबाग महालात केला. कैसर बाग हे भारतातले पहिले नाट्यगृह होते. त्या नाट्यमंचावर आगा हसन अमानत याने लिहिलेले 'इंदर सभा' या नाटकाचाही प्रयोग झाला. वाजिद अली शाह हा भारतीय रंगभूमीचा जनक मानला जातो. त्याने 'बहार-इ-उल्फत' हे नाटक लिहून ४०/५० नृत्य-गायन-निपुण सुंदरीच्या साह्याने कैसर बागच्या रंगमंचावर त्याचे प्रयोग केले होते. त्याला शतरंज (बुद्धिबळ) खेळण्याचा ही शौक होता. तास-न-तास तो त्याखेळात खेळात रंगून जाई. असा हा कलासक्त व बुद्धीमान नबाब इंग्रज सरकारच्या कारवायांना बळी पडला. त्याने प्रत्यक्षपणे इंग्रजांशी रणांगणावर दोन हात केले नाहीत. पण इंग्रजांनी त्याला पदच्युत करताच अवधची जनता इंग्रजाविरूद्ध बंड करून उठली. हे त्याचे स्वातंत्र्य लढ्यातील अप्रत्यक्ष योगदानच आहे.

वाजिद अली शाहच्या काळात स्लीमन हा लखनौचा इंग्रज रेसिडेंट होता. त्याला वाटत होते की, "अवधचे राज्य कंपनी सरकारने आपल्या ताब्यात घेऊ नये." पण ग. ज. डलहौशीने त्याला अवध राज्याविषयी खराब रिपोर्ट पाठविण्यासाठी रेसिडेंट म्हणून पाठविले होते. त्याला तर अवध राज्यात तशी काही चिन्हे दिसेनात. पण वरिष्ठाची आज्ञा म्हणून त्याने तसा सौम्य स्वरुपाचा रिपोर्ट डलहौसीला सादर केला आणि तो आपल्या नोकरीचे त्यागपत्र देऊन इंग्लडला निघून गेला. डलहौशीने त्याच्या जागी आउट्रम याची नेमणूक केली. त्याने स्लीमनच्या रिपोर्टावरूनच अवध दरबाराची बदनामी असलेला रिपोर्ट डलहौसीला दिला. त्याचे काम झाले. त्याला कोणत्याही परिस्थितीत अवधचे राज्य बळकावयाचे होते. कारण कलकत्ता ते दिल्ली पंजाब या मार्गात अवधचे राज्य आड येत होते. तो समृद्ध प्रदेश ताब्यात आल्यावर कंपनी सरकारच्या उत्पन्नात फार मोठी भर पडणार होती. हे राज्य ताब्यात आल्यावर दिल्लीची दुर्बल बादशाही सहज नष्ट करता येईल, अशी डलहौसीची योजना होती. म्हणून त्याने लखनौच्या रेसिडेंटकडे एक तहनामा पाठविला. रेसिडेंटने तो तहनामा ४ फेब्रुवारी १८५४ रोजी वाजिद अली शाह समोर ठेवला. तो तहनामा वाचताच वाजिद अली शाह मनातून संतप्त झाला. पण वरून शांत दिसला. त्याने त्या तहनाम्यावर आपले हस्ताक्षर केले नाही. त्यात पहिले कलम होते, वाजिद अली शाहने स्वतःहून राज्य त्याग करावा आणि आपले अवधचे राज्य कंपनी सरकारच्या ताब्यात द्यावे.' ते वाचताच वाजिद अली शाहने बाणेदारपणे त्या रेसिडेंटला सुनाविले की, "संधियाँ बराबर वालोंमें होती हैं। इस कारण इस सांधिपर मेरे हस्ताक्षरकी जरूरत नहीं है।' दुसरे कलम असे होते की, कंपनी सरकार वाजिद

अली शाहला दरवर्षी १२ लाख रुपये पेन्शन देत जाईल.'' त्यावरही तो सडेतोडपणे म्हणाला, ''अँग्रेजोने मेरा सन्मान और देश छीन लिया हैं। जीवनयापन के लिए मुझे तुम्हारी भीख की जरूरत नहीं हैं। रेसिडेंट एवढेसे तोंड करून परत गेला व त्याने या भेटीची सर्व हकिकत डलहौसीला कळविली. तेव्हा डलहौसीने एकतर्फी जाहीरनामा काढून 'अवधचे राज्य' कंपनी सरकारच्या राज्यात सामील करून घेतले आहे.' असे जाहीर करून टाकले आणि ७ फेब्रुवारी १८५६ रोजी डलहौशीने अवधराज्य बळकावले. त्याच दिवशी रेसिडेंट आऊट्रम याने वाजिद अली शाह याला अटक केली व कलकत्याला त्याला पाठविण्याची तयारी केली बेगम खास महल आणि काही बेगमा आपल्या दास दास्यांसह त्याच्या बरोबर कलकत्त्यास गेल्या. बेगम हजरत महल मात्र लखनौलाच राहिली. वाजिद अली शाह जेव्हा लखनौहून निघाला, तेव्हा त्याने एक शेर म्हटला, 'दरो दिवार पर हसरतकी नजर करते हैं। खुश रहो अहले वतन, हम तो सफर करते हैं।' (प्रत्येक घराच्या दरवाज्यावर आम्हाला दुःखाची छाया दिसते आहे. प्रजाजनांनो तुम्ही खुश रहा. आम्ही तर निघालो आहोत.)

वाजिद अली शाह कलकत्याला पोचल्यावर त्याला व त्याच्या परिवाराला मातीया बुर्ज (मातीचा बुरूज) येथील एका महालात नजर कैदेत ठेवले. तेथेही त्याने नृत्य-नाट्य-गायन-संगीत आदी कलांना उत्तेजन दिले. संगीताची दैवी देणगीच त्याला लाभली होती. २१ जून १८८७ रोजी तेथेच त्याचे निधन झाले. तेथेच त्याची कबर आहे.

वाजिद अली शाहने इंग्रजांशी युद्ध केले नाही. पण त्याच्या पदच्युतीने सारा अवध प्रांत इंग्रजाविरूद्ध बंड करून उठला. शेवटच्या तहनाम्यासंबंधी त्याने बाणेदारपणे रेसिडेंटला सुनावले व पेन्शनही नाकारले, हे त्याचे करणे क्रांतिकारकच होते. त्याच काळात अनेक राजे रजवाडे इंग्रजांपुढे लाचार झाले होते असे उत्तर इंग्रज अधिकाऱ्यांना देण्याची त्यांची हिंम्मतच नव्हती.



# ४२. बेगम हजरत महल

१८५७ च्या स्वातंत्र्य युद्धात गाजलेल्या स्त्रिया दोन आहेत. एक झाशीची राणी लक्ष्मीबाई. ही तर आपल्या शौर्याने आपल्या इंग्रज शत्रूच्याही प्रशंसेस पात्र ठरली. व भारताच्या इतिहासात आपले नाव अमर करून निजधामास गेली. दुसरी अवधनची बेगम हजरत महल हिने झांशीच्या राणी इतकी प्रत्यक्ष युद्धात रणकौशल्य दाखविले नसले तरी ती आपल्या बुद्धीमत्तेने, कुशल सैन्य संचालनाने, रणनिती कौशल्याने, आपल्या अदम्य साहसाने, संघटना कौशल्याने सुमारे दीड वर्षे इंग्रजांशी झुंज देत राहिली. तिचे नैतिक आचरण शुद्ध होते म्हणून साऱ्या लखनौ नगरीतील जनतेच्या आदरास ती पात्र ठरली होती. वाजिद अली शाह पेक्षाही आता तिला जनता मानीत होती.

इंग्रजांविरुध्द उठाव करायचा हे तर ठरलेलेच होते. बेगम फक्त उठावाची ठिणगी केव्हा पडते याचीच वाट बघत होती. उठाव कसा करायचा हे तिने इतर नेत्यांपेक्षा निर्दोषपणे व सुव्यवस्तिपणे ठरविले होते. त्यासाठी तिने आधी आपल्या अधिकाऱ्यांना, सरदारांना, व कर्मचाऱ्यांना गुप्तपणे उत्तेजित केले होते. जनतेला उठावासाठी उद्युक्त करण्यासाठी गुप्तहेरांना फकिरांच्या, साधूंच्या व पंडितांच्या वेषात आपल्या राज्यातील सर्व गावांत पाठविले होते व त्यांनी ही आपले काम चोखपणे बजावले होते. त्यांनी गावागावातून चपात्या वाटण्याचे सत्र सुरु करुन जनतेला सावध केले. तसेच इंग्रजांच्या छावण्यांतील देशी पलटणींना लाल कमळ देऊन उठाव करण्यास प्रवृत्त केले. देवळांमधून व मशिदीतून बैठकी आयोजित करवून हिंदु-मुसलमान जनतेला इंग्रज सरकारच्या अत्याचारांची, जुलूम-जबरदस्तीची, लूटमार करण्याची आणि आपल्याला कंगाल बनविणाऱ्या त्यांच्या कारभाराची जाणीव करुन दिली. तिने हे सारे इतक्या गुप्तपणे व नियोजनबद्धरीतीने केले की, इंग्रजांना त्याचा सुगावाच लागला नाही.

देशी सैन्याने उठाव करुन मेरठ एका दिवसात जिंकले, दिल्ली ६ दिवसात जिंकली व तित बादशहा बहादुरशाह जफर याला हिंदुस्थानचा बादशहा म्हणून जाहीर केले. या बातम्या लखनौला मे १८५७ च्या दुसऱ्या आठवड्यात येऊन थडकल्या लखनौ चा रेसिडेंट हेन्री लारेन्स याने लखनौमधील सगळे इंग्रज पुरुष व बायकामुले यांना आपल्या रेसिडेन्सीत व मच्छीभवनमध्ये नेऊन ठेवून तेथे त्यांची राहण्याची व्यवस्थ केली. अन्न धान्याची व शस्त्रास्त्रांची, दारुगोळ्याची बेगमी करुन ठेवली.

३० मे रोजी लारेन्सला कोणीतरी बातमी दिली की, "आज रात्री लखनौ मध्ये ही उठाव होणार आहे." आणि खरोखरच रात्रीची ९ वाजेची तोफ उडताच ७१ व्या देशी

पलटणी मधील शिपायांनी लखनौमधील इंग्रजांच्या बंगल्यांवर, निवासस्थानांवर हल्ला केला. त्यात लूटमार करुन ते बंगले व निवासस्थाने पेटवून दिली. त्या दिवशीच लखनौच्या उठावाची सुरुवात झाली. अवघ्या दहा दिवसात त्या विद्रोही शिपायांनी सारे लखनौ शहर ताब्यात घेतले. फक्त रेसिडेन्सीत व मच्छीभवनात सारे इंग्रज जीव मुठीत धरुन बसले होते. हे सारे बेगमेच्या नियोजन कौशल्याचे फलित होय. नंतर त्या शिपायांनी लखनौची सारी छावणी व मेस हाऊस पेटवून दिले. अनेक गोऱ्यांची कत्तल केली. तीत लेफ्ट-ग्रँट मारला गेला. ७ व्या घोडेस्वार पलटणीने उठाव करुन खजिना लुटला. फरुखाबाद भागात एकही इंग्रज उरला नाही.

राजा मानसिंह हा हिंदूंचा पुढारी गावागावातून उघडपणे इंग्रजांविरुद्ध लढण्यासाठी जनतेला उत्तेजन देत होता. मौलवी अहमदशाह सुध्दा तेच कार्य करीत होता. ते दोघेही बेगमेचे विश्वासू सहकारी होते. मौलवी अहमदशाहने फैजाबाद जिल्ह्यात इंग्रजांना हैराण करुन सोडले. इंग्रजांनी एक विशेष तुकडी फैजाबाद जिल्ह्यात पाठविली. त्या तुकडीने महत्प्रयासाने मौलवीला अटक करुन तुरुंगात डांबले. त्यामुळे फैजाबादची जनता खवळून उठली. तेथील देशी सैनिकांनी तुरुंग फोडून मौलवी अहमदशाहला मुक्त केले. तो आता दुप्पट उत्साहाने इंग्रजांविरुद्ध ठिकठिकाणी लढू लागला. आता सगळा अवध प्रांत बंड करुन उठला. हिंदु-मुस्लिम जनता आपसातले वैर, धर्मभेद, जातिभेद, मानापमान विसरुन हातात हात घालून लढू लागली. त्यामुळेच अवघ्या दहा दिवसात अवधचे विशाल राज्य स्वतंत्र झाले. बेगम हजरत महल हिचे नेर्तृत्वगुण व संघटना कौशल्य अदभूतपूर्व होते, हेच यावरुन सिध्द होते. आपले संपूर्ण राज्य स्वतंत्र करणारे अवध हेच राज्य १८५७ च्या स्वातंत्र्ययुध्दात एकमेव होते.

चिनहटची लढाई विद्रोही सैनिकांनी जिंकल्यानंतर हेन्री लारेन्सने मच्छीभवन सोडले व सारे इंग्रज पुरुष व इंग्रज बायकामुले घाई घाईने रेसिडेन्सीत आणून ठेवली. त्या काळात अनेक इंग्रज स्त्री-पुरुष व मुले बेगमेच्या कैदेत सापडली त्यांपैकी सगळया इंग्रज पुरुषांची डोकी उडविण्याचा हुकूम बेगमेने दिला व इंग्रज स्त्रिया आणि मुलांची चांगली व्यवस्था ठेवली. अपराधी-निरपराधी पुरुषांची, स्त्रियांची, मुलांची व म्हाताऱ्याकोताऱ्यांची क्रूरपणे हत्या करणाऱ्या अथवा त्यांना झाडाझाडांवर फासांवर लटकविणाऱ्या स्वतःला श्रेष्ठ व सुसंस्कृत म्हणविणाऱ्या इंग्रज सेनाधिकाऱ्यांची संस्कृती कुठे आणि इंग्रज स्त्रियांना व मुलांनाच नव्हे, तर पुरुषांनाही संरक्षण देणाऱ्या भारतीय हिंदू-मुसलमानांची संस्कृती कुठे?

सारे अवध राज्य स्वतंत्र झाल्यावर लखनौनगरीही स्वकियांच्या ताब्यात आली. परंतु लखनौची गादी मोकळीच होती. म्हणून उठावाचे सगळे नेते लखनौच्या राजवाड्यात जमले आणि त्यांनी ठरविले की, बेगम हजरत महलचा मुलगा बिरजिस कद्र याला लखनौच्या गादीवर बसवावे. त्यानुसार ५ जुलै १८५७ रोजी मुसळधार पाऊस पडत असतांना बिरजिस कद्र याला बारादरी महालात (सध्याचे लखनौ संग्रहालय) लखनौच्या गादीवर बसविण्यात आले. त्यावेळी त्याचे वय अवघे ११ वर्षांचे होते. बेगम हजरत महल त्याची संरक्षिका बनली व तिने अवध प्रांताची राज्य सूत्रे आपल्या हाती घेतली. तिने त्यावेळी घोषित केले की, ''बिरजिस कद्र त्याचे पिता वाजिद अली शाह अजून जिवंत आहेत. म्हणून बिरजिस कद्रला बादशाह न मानता केवळ प्रशासक मानावे.''

बेगम हजरत महल हिला 'जनाब-ए-आलिया' हा किताब देण्यात आला. जमलेल्या लोकांनी या शब्दांनी आपला आनंद व्यक्त केला.

गैर ते महताब है बिरजीस कद्र ।
गौहरे नायाब है बिरजीस कद्र ॥

(बिरजीस कद्र हा लज्जाशील चंद्रमा आहे. बिरजीस कद्र हा बहुमूल्य व श्रेष्ठतम रत्न आहे.)

नंतर राय जगन्नाथ ऊर्फ शरफुद्दोला याने सर्वांत आधी बिरजीस कद्र याला नजराणा पेश केला. नंतर राज्याच्या कार्यपालिकेतील सदस्यांची नियुक्ती झाली. वजीर-राय जगन्नाथ ऊर्फ शरफुद्दौला.

जनरल - हिसामुद्दौला.

दीवाणखाना अधिकारी - मम्मू खाँ.

कलेक्टर - राजा जयलाल सिंह.

मकदूम बक्श, घमंडी सिंह, अवसान सिंह, रघुनाथ सिंह, मिश्रीसिंह, राजमल तिवारी, गजाधरसिंह, वाहिद अली व शहाबदी खाँ यांची कार्यपालिकेचे सदस्य म्हणून निवड करण्यात आली. ७ जुलै १८५७ रोजी बेगम हजरत महलने जाहीर केले की, मागच्या काळातील सर्व शिपायांना त्यांच्या नोकरीवर घेण्यात येईल व सर्व शिपायांना दरमहा ६ रुपयांऐवजी १२ रुपये पगार दिला जाईल. त्यामुळे बेगमेच्या सैन्यात मोठी वाढ झाली. बेगम सर्व हिंदु-मुसलमानांना समान लेखत होती. तिच्या मनात धर्म भेद व भेदाभेद नव्हता. तिने बिरजीस कद्रच्या वतीने घोषणा केली की, ''आम्ही दृढसंकल्प

केला आहे की, आमच्या वंशपरंपरागत राज्यातून नीच, निष्ठुर व अत्याचारी फिरंग्यांना (इंग्रजांना ) बाहेर हाकलून देऊ. जेथे जेथे हे फिरंगी दिसतील, तेथे तेथे त्यांची कत्तल करावी.'' नंतर राणा बेनी माधो सिंह याची नेमणूक जौनपूर व आंजमगड जिल्ह्यांचा अधिकारी म्हणून करण्यात आली. अवध प्रांतातील अनेक हिंदु-मुस्लिम जमीनदार, व्यापारी व शिपाई यांनी बेगम हजरत महल हिच्या झेंड्याखाली एकत्र आले व ''आम्ही शाही परिवाराशी एकनिष्ठ आहोत'' असे दाखवून दिले.

मुघल बादशहा बहादुरशाह जफर याने बिरजीस कद्र याला सनद दिली आणि 'सफीरुद्दौला' ही पदवी दिली. नंतर बेगमेने एक जाहीरनामा काढला. तो असा-

''सर्व हिंदु-मुस्लिम जनतेला माहिती आहे की, धर्म- अब्रू- जीवन -संपत्ती या चार गोष्टी प्रत्येकाला अत्यावश्यक वाटतात. स्वदेशी राज्यात धार्मिक स्वातंत्र्य प्रत्येक व्यक्तीला असते. सर्व जाती-पंथाचे लोक समान असतात. मागासवर्गीय सुद्धा समानतेचा दावा करू शकतात. प्रत्येक व्यक्ती आपली आर्थिक उन्नती करीत असते. प्रत्येक हिंदू व मुस्लिम व्यक्तीला सूचित करण्यात येत आहे की, जर तुम्हांला तुमच्या धर्माचे, तुमच्या धार्मिक श्रद्धांचे रक्षण करायचे असेल, तर या फिरंग्यांच्या जाळ्यात फसू नका. त्यांना संरक्षण व मदत देऊ नका. आमच्या सैन्यात येऊन त्यांच्याशी लढायला सिद्ध व्हा.''

२० सप्टेंबरला इंग्रजांनी दिल्ली ताब्यात घेतली बहादुरशाह जफरला कैद केले. त्याच्या मुलांनातवांची कत्तल केली आणि गोऱ्या सैनिकांनी दिल्लीत लुटमारी व कत्तली सुरू केल्या. बादशहाचा सेनापती बख्त खाँ आपले सैन्य घेऊन लखनौला आला. नानासाहेब पेशवे, बाळासाहेब पेशवे, राणा बेनी माधोसिंह, फिरोजशहा आदी क्रांतिकारक नेते आधीच आपल्या सैन्यासह दाखल झाले होते. मौलवी अहमदुल्लाशाह तर लखनौतच ठाण मांडून बसला होता.

दिल्ली, कानपूर ही महत्वाची क्रांतिकेंद्रे हस्तगत झाल्यानंतर आणि त्या दोन्ही स्थानी आपल्या रक्तपिपासेचे शमन झाल्यानंतर इंग्रज पलटणी लखनौवर चालून आल्या. इंग्रज सैन्य आवेशाने लढत होते. पराक्रमाची शिकस्त करीत होते. बेगम हजरत महलही पुरूषी वेषात हत्तीवर बसून आपल्या सैन्याला प्रोत्साहन देत होती. त्यांचा उत्साह वाढवित होती. तिच्या सैन्याने रेसिडन्सीचा वेढा दोन महिने लावून ठेवला होता. चार पाच महिने इंग्रज रेसिडेन्सीत अडकून पडले होते. तो वेढा उठविणे व अडकलेल्या इंग्रजांची सुटका करणे, हेच इंग्रज सेनाधिकाऱ्यांचे आद्य लक्ष्य होते. २५ सप्टेंबरला इंग्रज सैन्याने रेसिडेन्सीचा वेढा उठविला. तरीही बाकीचे लखनौ शहर बेगमच्या ताब्यात होते. इंग्रज सैन्य निरनिराळ्या प्रदेशातून लखनौकडे येतच होते. त्या सैन्यावर प्रत्येक

खेड्यातून जनता हल्ले करीत होती. लखनौ जिंकणे साधी गोष्ट नाही, हे इंग्रज सेनाधिकाऱ्यांच्याही लक्षात आले होते. लखनौच्या प्रत्येक भागातून इंग्रज सैन्यावर हल्ले होतच होते. युद्ध लांबत चालले होते. या युद्धात इंग्रजांचे हेन्री लॉरेन्स, कर्नल नील, हॅवलाक, कूपर, वॅक्स सह बडे सेनाधिकारी ठार झाले.

६ मार्च १८५८ रोजी कोलीन कॅम्पबेल व आऊट्रम आपले सैन्य घेऊन लखनौला आले. ६ मार्च ते १५ मार्च पर्यंत दोन्ही सैन्यात घनघोर युद्ध झाले. २१ मार्च रोजी संपूर्ण लखनौ शहर इंग्रजांच्या ताब्यात आले. तरी अवध प्रांतात बेगमचेच राज्य होते. लखनौ शहर पडल्यानंतर बेगम हजरत महल सैन्यासह लखनौमधून बाहेर पडली. तिच्याबरोबर नानासाहेब पेशवे व इतर सहकारी ही त्यांच्या सैन्यासह होते. त्यांचा पहिला तळ महमूदाबाद येथे पडला. नंतर ते उत्तरेकडे निघाले. नेपाळच्या अलीकडे राप्ती नदीकाठी त्यांना इंग्रज सैन्याने गाठले. तेथेही तुंबळ युद्ध झाले. त्यात इंग्रजांचा विजय झाला. तेव्हा एप्रिल १८५९ मध्ये बेगम, नानासाहेब इत्यादिकांनी आपल्या सैन्यासह नेपाळ राज्यात प्रवेश केला. त्यांनी नेपाळचा राजा जंगबहादुरकडे शरण मागितली. त्यानेही त्यांना आपल्या राज्यात राहण्याची परवानगी दिली.

१ नोव्हेंबर १८५८ पर्यंत बाकीच्या ठिकाणचे बंड शमत आले होते. अपवाद फक्त तात्या टोपे व रावसाहेब पेशवे आणि फिरोज शहाचाच होता. ते मध्य भारतात लढत होते. १ नोव्हेंबर १८५८ रोजी इंग्लडची राणी व्हिक्टोरिया हिने जाहीरनामा प्रसिद्ध करून शस्त्रे खाली ठेवणाऱ्यांना माफी दिली जाईल, असे जाहीर केले. तिच्या जाहीरनाम्यात बेगम हजरत महल हिने एक जाहीरनामा काढून उत्तर दिले. त्यात तिने व्हिक्टेरियाच्या गोंडस भाषेच्या बुरख्याआड दडलेल्या इंग्रजांच्या कुटिल राजनीतीच्या चिंधड्या उडविल्या. त्याचा परिणाम म्हणून अवध प्रांतातील जनतेत इंग्रजांच्या प्रतिकाराची भावना पुन्हा जागृत झाली. बेगम हजरत महल हिने इंग्रजांशी फक्त लष्करी झुंजच दिली नाही, तर बौद्धिक झुंजही दिली. जात्याच ती बुद्धिमान होती. तिने म्हटले होते, मला माहीत आहे की, तुम्ही माझी किती नि कशी इज्जत कराल? आम्हाला आमची इज्जत संभाळता येते. जो पर्यंत तुमची गुलामी आहे तोपर्यंत हिंदुस्थानात अशा अनेक हजरत महल व राणी लक्ष्मीबाई निर्माण होतील.'' बेगम आपला मुलगा बिरजीस कद्र याच्यासह काठमांडूला राहू लागली. तिचे निधन १८७४ साली झाले. काठमांडूत तिची कबर आहे.



# ४३. मौलवी अहमदुल्ला शाह

१८५७ च्या स्वातंत्र्य-लढ्यात हिंदूच्या बरोबरीने अनेक मुसलमानांनी सुद्धा खांद्याला खांदा लावून आपल्या प्राणांचे बलिदान केलेले आहे. अशाच स्वातंत्र्यवीरांत मौलवी अहमदुल्ला शाह याचे नाव अग्रक्रमाने घ्यावे लागेल. त्याचे मूळ गाव मिर्झा अहमदशहा असे होते. मिर्झा या त्याच्या उपाधीवरून तो मुस्लीम राजघराण्यातील होता, हे स्पष्टपणे दिसून येते. तो मोगलांच्या राजघराण्यातील उत्तर मुघलकालातल्या अकबर (द्वितीय) (१८०६ ते १८३७) याचा मुलगा कामरान याचा एक मुलगा होता. तो अतिशय स्वाभिमानी, बुद्धिमान पण गरम डोक्याचा होता. त्याचे शिक्षणात मुळीच लक्ष नव्हते. म्हणून एके दिवशी कामरानने आपल्या या उनाड मुलाच्या थोबाडील जोराने थप्पड लगावली. त्याचा राग येऊन तो पळून गेला. त्याचा कामरानने खूप तपास केला, परंतु तो सापडलाच नाही. आपला वेष बदलून तो हिंदुस्थानातच नव्हे, तर अफगणिस्तान इराण, इराक, अरबस्तान इ. देशात हिंडत राहिला. त्याची गाठ एका चांगल्या फकिराशी पडली. त्या फकिराजवळ तो राहू लागला. त्या फकिराकडून त्याला अरबी व फारसी या भाषांचे व इस्लामच्या धर्मतत्वांचे ज्ञान झाले. नंतर तो हिंदुस्थानात येऊन फकिरांच्या संगतीने निरनिराळया प्रातांत हिंडत राहिला. मद्रास प्रांतात तो बराच काळ राहिला व त्याने तमीळ भाषेवर प्रभुत्व मिळविले. हिंडत असतानाच त्याने हिंदी, ब्रज, उर्दु, मैथिली इ. भाषांचेही ज्ञान प्राप्त करून घेतले. त्याला एकंदर सात भाषांचे चांगले ज्ञान होते. तो फकिराच्या वेषात ग्वाल्हेरला आला, तेव्हा तेथला श्रेष्ठ फकीर मियाँ तुराबशाह यांचा तो चेला बनला. तुराबशाहने त्याचे नाव मौलवी अहमदुल्लाह असे ठेवले. याच नावाने तो पुढे ओळखू जाऊ लागला.

काही दिवसानंतर मियाँ मेहराब शाह या श्रेष्ठ साधकाजवळ राहून त्याची सेवा करू लागला. मियाँ मेहराब शाह याने आपल्या साधकावस्थेत त्याला आशीर्वाद दिला की, "जा मी तुला अवधचा बादशहा बनविले आहे." ज्या काळात लखनौला इंग्रजांनी तैनाती फौज ठेवून आपल्या अंकीत करून घेतले होते, त्याच काळातील ही गोष्ट आहे. अहमदुल्ला शाहने आपल्या गुरुचा शब्द प्रमाण मानून त्याने काही घोडे जमविले, शस्त्रे जमविली. काही अनुयायी मिळविले. त्यांच्यासह तो अवधकडे निघाला. सर्वात पुढच्या घोड्याच्या पाठीवरील अनुयायी आपल्यापुढे डंका (नगारा) ठेवून तो वाजवीत चालला होता. डंका वाजवीतच त्याची स्वारी गावागावातून अवधकडे चालली होती. वाटेत त्याला आणखी काही अनुयायी मिळाले. त्यांची संख्या वाढतच चालली. त्या डंका वाजविल्यामुळे त्याला लोक 'डंका शाह' म्हणू लागले. त्याला गावोगाव नजराणेही मिळू लागले. प्रत्येक

गावात तो बेधडपणे सांगायचा की, ''मी अवधचा बादशहा आहे.'' अशा रीतीने तो आपल्या अनुयायीकरवी डंका वाजवीत लखनौला पोचला. तेथे तो घासमांडीतील एका घरात राहू लागला. तो जेव्हा लखनौ शहरात आपल्या अनुयायांसह हिंडायचा, तेव्हाही आपल्या पुढे डंका वाजवीतच जायचा. त्यामुळे तो लखनौमध्येही 'डंका शाह' म्हणून प्रसिद्ध झाला.

मौलवी अहमद शाह हा फकीर आपल्या सशस्त्र अनुयायांसह नेहमी लखनौमध्ये हिंडत असतो. हे लखनौच्या पोलिसांनी तेथल्या इंग्रज मॅजिस्ट्रेटला सांगितले. तेव्हा मॅजिस्ट्रेटने पोलिसांना सांगितले की, ''त्याच्याकडून तुम्ही शस्त्रे काढून घ्या व त्याला सांगा की, तू जेव्हा लखनौहून निघून जाशील, तेव्हा ही शस्त्रे तुला परत मिळतील.''पोलिसांनी त्याच्याजवळची शस्त्रे जेव्हा मागितली तेव्हा तो त्या पोलिसांच्या अंगावर धावून गेला आणि चवताळून म्हणला, ' मी अवधचा बादशाह आहे. कोणत्या बादशाहने अशा रीतीने कधी आपली शस्त्रे दिली आहेत काय? कोण माझी शस्त्रे घेऊ शकतो. तेच मी बघतो. ''पोलिसांनी त्याला पागल समजून त्याचा नाद सोडून दिला आणि त्याचे म्हणणे मॅजिस्ट्रेटला सांगितले. मॅजिस्ट्रेटने त्यावर सांगितले की, ''त्याला जाऊन सांगा. शस्त्रे देत नसशील, तर लखनौमधून तू तुझ्या अनुयायांना घेऊन निघून जा.'' पोलिसांनी त्याला तसे सांगितले. तेव्हा तो आपल्या अनुयायांसह फैजाबादला निघून गेला. इंग्रज त्याला तेव्हा पासून मॅड मौलावी म्हणू लागले.

कानपूरचा पूर्णपणे पाडाव झाल्यावर नानासाहेब पेशवे लखनौकडे चालले होते. तेव्हा मौलवी अहमदुल्लाह त्यांना भेटला. त्यांचे बरेच बोलणे झाले. आधीपासूनच तो फकिरी वेषात हिंडत असताना इंग्रजांच्या अत्याचारी कारभाराबद्दल गावोगावच्या जनतेला इंग्रजांविरूद्ध भडकवीत होता. नानासाहेबांशी बोलणी झाल्यावर मौलवी अहमदुल्लहाने स्वातंत्र्य लढ्यात उडी घेतली.

फैजाबादमध्येही त्याच्या डंका फेऱ्या सुरु होत्या. एके दिवशी तेथल्या सशस्त्र पोलिसांना सांगितले की, त्या मॅड मौलवीकडून शस्त्रे काढून घ्या.'' त्या पोलिसांनी मौलवीकडे जाऊन त्याची व त्याच्या अनुयायांची शस्त्रे मागितली. तेव्हा तो त्या सशस्त्र पोलिसांच्या अंगावर आपली तलवार उपसून धावून गेला. त्या झटापटीत त्याने दोन पोलिसांना ठार केले व अनेक पोलिसांना घायाळ केले. ते कळताच मॅजिस्ट्रेटने जादा सशस्त्र पोलीस पाठवून त्यांच्याकरवी त्याला अटक केली आणि तुरुंगात डांबून ठेवले. तुरुंगात तो पोलिसांना व इंग्रजांना मोठमोठ्या शिव्या द्यायचा. एके दिवशी तो मॅजिस्ट्रेट तुरुंगात येऊन त्याला म्हणला, आम्ही तुला तुरुंगातून मोकळे केले, तर आमच्यासाठी काय करशील? तेव्हा त्या मॅजिस्ट्रेटला शिव्या देत तो म्हणाला, 'मी माझ्या देशातल्या

सर्व इंग्रजांना ठार करीन." हा खरोखरच मॅड (पागल) आहे, असे समजून तो मॅजिस्ट्रेट गुपचूप निघून गेला.

इंग्रजांच्या देशी पलटणीतील सैनिकांच्या बातम्या चहुकडे पसरल्या. लखनौच्या देशी सैनिकांनी उठाव केला. फैजाबादलाही तेच घडले. फैजाबादच्या देशी पलटणीतील शिपायांनी तेथला तुरुंग फोडला व मौलवी अहमदुल्ला शाहसह सर्व कैद्यांना मुक्त केले. त्यांनी त्या मॅजिस्ट्रेटला व तेथल्या इंग्रज पुरुषांना कैद केले. मौलवी अहमदुल्ला शाहने त्यांच्या बायका-मुलांना नावांत बसवून घागरा नदीतून सुरक्षितपणे इलाहाबादेस पाठवून दिले.

मौलवी अहमदुल्लाह हा हिंदु-मुस्लिम धर्म समान मानीत होता. त्याला धर्मभेद पसंत नव्हता. देशप्रेम व माणुसकी हाच त्याचा धर्म होता. उठाव करणाऱ्या सैनिकांनी त्याला आपला सरदार मानले त्या भागातील जमीनदार व तालुकदारही त्याला येऊन मिळाले. सर्वांनी फैजाबादचा खजिना घेऊन लखनौकडे कूच केले.

इंग्रजांनी लखनौमधील जनतेचा आवडता नबाब वालिद अली शाहला पदच्युत करुन कलकत्ता येथे नजरकैदेत ठेवल्यामुळे लखनौच्या जनतेत इंग्रज सरकारविरुद्ध असंतोष धुमसत होता. इंग्रजांचे राज्य आपल्या देशातून पूर्णपणे नष्ट झाले पाहिजे, असे लखनौच्या जनतेला व तेथल्या देशी पलटणीमधील शिपायांना वाटत होते. त्यासाठी ते कटिबध्द झाले होते. मौलवी अहमदुल्लाशाहने प्रतिज्ञा केली की,

"मादरे हिंद तुझे कैदसे छुडायेंगे ।
या तेरी खाक में हम मिल जायेंगे ॥

(हे माझ्या हिंद-मातृभूमी, आम्ही तुला इंग्रजांच्या कैदेतून मुक्त करु; नाहीतर तुझ्या धुळीत मिसळून जाऊ.)

तो इंग्रजांचे सैन्यबल व शस्त्रबल जाणून होता. त्याने आपल्या सैनिकांसाठी एक जाहीरनामा काढला. त्यात त्याने सैनिकांना महत्त्वाचे मार्गदर्शन केले होते, ते असे -

"आपल्या सैनिकांनी फिरंग्यांच्या सैनिकांशी समोरासमोर सामना देऊ नये. कारण बंदोबस्तात, शिस्तीत व कवायतीत त्यांच्या पलटणी आपल्याहून श्रेष्ठ आहेत. त्यांच्याजवळ मोठमोठ्या तोफा फार आहेत. म्हणून त्यांच्याशी उघडपणे लढाई न करता, त्यांच्या आजूबाजूस राहून त्यांच्या सैनिकी तळांवर वारंवार छापे घालावे. त्यांच्या हालचाली रोखीत जाव्या. नद्यांवरील सर्व घाट व पूल दाबून धरावे. त्यांचे दळणवळण तोडून टाकावे. त्यांची रसद लुटावी. डाक (टपाल) लुटाव्या. त्यांची ठाणी नष्ट करावी.

त्यांच्या तळाभोवती सतत घिरट्या घालाव्या. त्या फिरंग्यांना मुळीच विश्रांती मिळू देऊ नये.''

लखनौला मौलवी अहमदुल्लाह, नानासाहेब पेशवे, बाळासाहेब पेशवे, शाहजादा फिरोजशहा आपापल्या सैन्यासह बेगम हजरत महल हिला येऊन मिळाले. लखनौमधील बेलीगारदमध्ये सारे इंग्रज एकत्र झाले होते. बेलीगारदवर त्यांनी हल्ला केला. त्यात हेन्री लारेन्स व विल्सन हे इंग्रज सेनाधिकारी मारले गेले. त्यानंतर सर्वांनी शाहजहाँपूरवर संघटितपणे हल्ला करुन ते शहर ताब्यात घेतले व तेथून सगळे इंग्रज पळवून लावले. हा त्यांचा मोठा विजय होता. नंतर त्यांनी लखनौवर चाल केली व तेथल्या इमामवाडा आणि मच्छी भवनवर हल्ला करून ती दोन्ही स्थाने बळकावली. तेथून सारे इंग्रज आलमबागेत निघून गेले. दिल्लीहून बख्तख़ाँ हा सेनापती आपल्या पाच हजार सैन्यासह लखनौत दाखल झाला. लखनौच्या मुख्य तुरुंगावर मौलवी अमदुल्लाशाहने हल्ला करुन तो तुरुंग फोडला. कैद्यांना मुक्त केले. या हल्ल्यात जनरल हार्स ठार झाला. इंग्रज सैनिक हताश होऊन निघून गेले. आता तर मौलवी अहमदुल्लाह सगळ्या इंग्रजांना आपला कर्दनकाळच वाटू लागला. त्याला जिवंत किंवा मृत अवस्थेत त्याला पकडलेच पाहिजे, असा इंग्रजांनी निर्धार केला. चिनहटची लढाई सुध्दा या क्रांतिकारकांनी जिंकली त्यांनतर लखनौच्या गादीवर बेगम हजरत महल हिचा अल्पवयीन मुलगा बिरजीस कद्र याला समारंभपूर्वक बसविण्यात आले. बेगम हजरत महल त्याची संरक्षिका बनली व तिने राज्यसूत्रे हाती घेऊन राज्यकारभार सुरु केला.

दिल्ली व कानपूर या महत्त्वाच्या क्रांतिकेंद्रातील विद्रोह शमविल्यानंतर होपग्रँट, ल्यूगार्ड, वालपोल आदी इंग्रज सेनाधिकारी मोठे सैन्य घेऊन लखनौकडे आले. त्यांनी शाहजहाँपूरवर हल्ला चढवून ते शहर जिंकले. लखनौमध्ये मात्र त्यांना इंच इंच भूमिसाठी जिवाचा आटापिटा करून लढावे लागले. त्यात त्यांचे काही सेनाधिकारी कामास आले तरीही नानासाहेब, मौलवी अहमदुल्लाह, बेगम हजरत महल, राणा बेनी माधोसिंह इत्यादिकांचा त्यांच्यापुढे निभाव लागला नाही. ते मोठ्या चातुर्याने लखनौमधून निघून जाऊन नेपाळकडे वळले. सारा अवध प्रांत अजून विद्रोह्यांनी व्यापला होता. तो हस्तगत करण्याचा निश्चय इंग्रजांनी केला. इंग्रजांचे सैन्य नानासाहेब, बेगम हजरत महल व मौलवी अहमदुल्लाह यांच्या पाठलागावरच होते. नेपाळच्या दक्षिण सीमेच्या अलीकडील राप्ती नदीच्या किनारी इंग्रज सैन्याने त्यांचा पूर्ण पराभव केला. तेव्हा ते नेपाळच्या तराईत निघून गेले. लखनौच्या मोहीमेत नेपाळचा राजा १० हजार सैन्यासह येऊन इंग्रजांच्या मदतीला आला होता. म्हणूनच इंग्रजांना लखनौ जिंकता आले.

मौलवी अहमदुल्लाहची पोबेनचा राजा जगन्नाथसिंहाशी ओळख होती. त्याने जगन्नाथसिंहाला मदत करण्यासाठी निरोप दिला. पण इंग्रजांनी त्याला आपल्याकडे वळवून घेतले होते आणि मौलवीला पकडून देण्याबद्दल मोठ्या बक्षिसाची लालूच त्याला दाखविली होती. जगन्नाथसिंहाने मौलवी अहमदुल्लाह याला आपल्या पोबेनच्या किल्ल्यात येण्याचे आमंत्रण दिले. मौलवी येतो आहे, असे समजताच जगन्नाथसिंहाने आपल्या किल्ल्याचे सर्व दरवाजे बंद केले. जगन्नाथसिंह हा गलेलठ्ठ, सुखचैनीने सुस्त व काहीसा मंदबुध्दी होता. इंग्रजांचा सगळीकडे विजय होतो आहे., हे समजताच अवध प्रांतातील बहुतेक राजे-रजवाडे, जहागीरदार, तालुकदार इंग्रजांची जी हुजुरी करु लागले होते. त्यातलाच हा पोबेनचा जगन्नाथसिंह.

मौलवी अहमदुल्लाह आपल्या निवडक सैनिकांनीशी पोबेनच्या किल्ल्याजवळ आला. तेव्हा पाहतो तो किल्ल्याचे दरवाजे बंद आणि तटावर जगन्नाथसिंह व त्याचा लहान भाऊ बलदेवसिंह काही सैनिकांसह तटावर उभे. मौलवीने जगन्नाथसिंहाला दरवाजा उघडण्यास सांगितले. तेव्हा तो गलेलठ्ठ राजा खदखदा हसू लागला. तेवढ्यात बलदेवसिंहाने नेम धरुन मौलवीच्या छातीवर गोळी झाडली. ती त्याच्या छातीतून आरपार निघून गेली व तो आपल्या हत्तीवरुन खाली कोसळला. लगेच त्याचे सैनिक पळून गेले. मौलवी निष्प्राण झाला. हे पाहिल्यावर ते दोघे भाऊ दरवाजा उघडून त्याच्या मृतदेहाजवळ आले व त्याचे मुंडके कापून घेऊन किल्ल्यात गेले. पुन्हा किल्ल्याचे दरवाजे बंद झाले. केवढा हा विश्वासघात! आणि तोही आपल्याच हिंदी राजाकडून! अशा विश्वासघातक्यांचा जेवढा धिक्कार करावा तेवढा कमीच होईल. नंतर त्या दोन्ही भावांनी ते मौलवीचे मुंडके धावत जाऊन इंग्रजांच्या छावणीत सर कोलिन याच्यापुढे ठेवले. तेव्हा कोलिनचा आनंद काय वर्णावा. इंग्रजांच्या कर्दन काळाचे मुंडके त्याच्या समोर पडले होते. त्याबद्दल त्याने जगन्नाथसिंहाला ५० हजार रुपये दिले.



# ४४. कुँवर सिंह

बिहारच्या शाहाबाद जिल्ह्यात जगदीशपूरची जहागिरी सर्वात मोठी होती. तेथील जहागिरदार साहबजादा सिंह मोठे रुबाबदार व गोरगरीबांचे कनवाळू होते. सारावसुलीसाठी ते आपल्या रयतेवर कधीही जुलूम करीत नसत. काही कारणास्तव कंपनी सरकारने त्यांना सहा महिन्यांची तुरुंगवासाची शिक्षा दिली होती. ते पाटण्याच्या तुरुंगात असताना एक वाघ त्या तुरुंगात शिरला. तेव्हा त्यांनी आपल्या तलवारीने त्या वाघाचे तुकडे करून टाकले. त्यांच्या या पराक्रमामुळे कंपनी सरकारने त्यांना मुदतपूर्वीच तुरुंगातून मुक्त केले.

साहबजादासिंहांना चार पुत्र होते. कुँवर सिंह, दयालसिंह, राजपतसिंह आणि अमरसिंह. त्यापैकी मोठे कुँवरसिंह व छोटे अमरसिंह हे दोघे १८५७ च्या क्रांती युद्धात आपले नाव अमर करून गेले. साहबजादासिंह यांचे निधन १८२६ साली झाले. तेव्हा जहागिरीच्या वाटपावरून चौघा भावात वाद निर्माण झाला. त्याचा निकाल लागला. तेव्हा कुँवरसिंहाच्या वाट्याला जहागिरीचा मोठा भाग आला व उरलेला भाग तिन्ही लहान भावांत समसमान वाटून देण्यात आला आणि वाद संपला.

कुँवरसिंहाचा जन्म सन १७८२ मध्ये झाला होता. साहाबजादासिंह जन्म १७८२ मध्ये झाला. साहबजादासिंहाने आपल्या मुलांच्या शिक्षणाकडे फारसे लक्ष दिले नाही. त्यांना शिकविण्यासाठी एक मौलावी मात्र ठेवला होता. त्याने चारही मुलांना फारसी भाषेचे ज्ञान करून दिले. कुँवरसिंहाचे लक्ष त्या शिक्षणात फारसे नव्हतेच. धनुष्यबाण, भाला, बरची, तलवार चालविण्यात व घोडेस्वारी करण्यात त्यांना विशेष रस होता. शिकार खेळण्यात त्यांना फार आनंद वाटायचा. ते मोठे झाल्यावर जितौरा गावाजवळच्या त्यांच्या बंगल्यात राहत असत. त्यांची आई पंचरत्न कुँवर शेजारच्या दलीपपूर नामक गांवात राहत असे. कुँवरसिंह सुद्धा त्यांच्याकडे राहायला जात असत.

कुँवरसिंहाने एक रखेली धरमन बिबी ही मुसलमान सुंदरी होती. तिच्यासाठी त्यांनी जगदीशपूरला व अग्न्याला मशिदी बांधल्या. तसेच अन्य ठिकाणीही मंदिर व मशिदी बांधल्या. ते सर्व धर्मांना सामान मानीत असत. त्या चौघा भावांपैकी दयालसिंह व कुँवरसिंहाचा पुत्र दलभजनसिंह यांचे निधन कुँवरसिंहांच्या निधना आधीच झालेले होते. कुँवरसिंहांचे तिघे लहान भाऊ फारच खर्चिक होते. त्यांना त्यांच्या मालमत्तेच्या किंमतीपेक्षाही जास्त कर्ज झाले होते. सावकारांनी त्या तिघांच्यावर दावा लावला. तेव्हा

कुँवरसिंहांनी त्यांच्या कर्जाची हमी घेऊन हप्तेबंदीने ते कर्ज फेडायचे कबुल केले व आपल्या राजपूत घराण्याची इज्जत राखली. कुँवरसिंह जेव्हा जगदीशपूरच्या गादीवर बसले, तेव्हा त्यांचे दरसाल उत्पन्न ६ लाख होते. त्यांनी चांगल्या रीतीने आपल्या जहागिरीचा कारभार चालविला. जगदीशपूरात त्यांनी एक तलाव बांधला. जंगलांचा विकास केला. आरा येथे एक बाजार बांधला. सध्याही तो बाजार 'बाबू बाजार' म्हणून ओळखला जातो. सन १८४५ व १८५२ मध्ये बिहारमधल्या काही जमीनदारांनी इंग्रज सरकारविरूद्ध उठाव केले. पण त्यांत कुँवरसिंहानी भागा घेतला नाही. १८५७ साल उगवले व नानासाहेबांचे साधुवेषातले व फकिरांच्या वेषातले दूत देशभर क्रांतिच्या ज्वाला गुप्तपणे पसरवू लागले. तेव्हापासून कुँवर सिंहाचा व नानासाहेबांचा पत्रव्यवहार सुरु झाला. परिणामतः कुँवरसिंहांनीही १८५७ क्रांतीयुद्धात उडी घेण्याचे ठरविले. त्यांना त्यांचा लहान भाऊ अमरसिंह याने चांगली साथ दिली.

पाटणा हे वहाबी पंथीय मुसलमानांचे प्रमुख केंद्र होते. कंपनी सरकारच्या विरूद्ध त्यांनी पाटणा येथे गुप्त संघटना उभारली होती. वहाबी मुसलमानांनी कंपनी सरकारविरूद्ध उठाव केला. पीरअलीसह ४३ वहाबींना इंग्रजांनी कैद केले. परिअली व शेख घसीटा यांना फाशी देण्यात आले. पाच जणांना आजीवन कारावासाच्या शिक्षा दिल्या. बाकीच्यांना फटके मारून सोडून देण्यात आले.

पीरअलीच्या फाशीची बातमी ऐकताच दानापूर छावणीतील देशी शिपायांनी इंग्रज सरकारविरूद्ध विद्रोह सुरू केला. त्या सैनिकांनी आपले गणवेश फाडून फेकून दिले व ते जगदीशपूरकडे निघाले. कुँवरसिंहाचे दीवाण हरकिशन सिंह यांनी त्या शिपायांना उत्तेजन दिले. दानापूरचे सारे विद्रोही शिपाई आरा येथे आले. त्यांचे स्वागत हरकिशनसिंह व रणदलसिंह यांनी केले. कुँवर सिंहांनी त्यांचे नेतृत्व स्वीकारले. हरिद्वारच्या मेळयात अनेक हिंदु मुसलमान राजे रजवाडे एकत्र जमले होते. त्यात कुँवरसिंह सुद्धा होते. तेथे सर्वांनी एकमताने निर्णय घेतला की, बिहारमध्ये इंग्रजाविरूद्ध संघटन बाबू कुँवरसिंह यांनी करावे व सर्वांनी त्यांना साथ द्यावी. दानापूर येथील विद्रोही सैनिकांनी कुँवरसिंहांना सांगितले की, 'आपण आमचे राजे आहांत, सेनापती आहात, आपण राजपूत वंशाचे सूर्य आहात. तरी लवकर युद्ध सुरू करावे.'' कुँवरसिंहांनी त्यांना आरा नगरला वेढा देण्यासाठी उद्युक्त केले. त्या सैनिकांनी इंग्रज सरकारचा खजिना लुटला. त्यांच्या कचेऱ्या जाळून टाकल्या. तुरुंग फोडून कैद्यांना मुक्त केले. नंतर त्यांनी आराच्या किल्ल्याला वेढा दिला. किल्ल्यात २५ इंग्रज सैनिक व ५० शीख सैनिक होते.

तीन दिवस वेढा चालू होता. दानापूरहून मेजर डन्वर २७० इंग्रज सैनिक आणि १०० शिख सैनिक घेऊन आरा येथे आला. कुँवरसिंहाचे सैन्य जवळच्या आमराईत खंदक खोदून त्यात लपून बसले होते. डन्वर किल्ल्याजवळ येताच त्यांनी त्याच्या सैन्यावर चहूकडून गोळीबार सुरू केला. तुंबळ युद्ध झाले. त्यात मेजर डन्वर मारला गेला. आता संपूर्ण शाहाबाद जिल्हा कुँवरसिंहांच्या ताब्यात आला. त्यांनी स्वतःला शाहाबादचा राजा म्हणून घोषीत केले. शेख आह्याला मॅजिस्ट्रेट बनविले. शेख मुहम्मद अजीमुद्दीनला जमादार आणि त्याच्या हाताखाली तरब अली आणि कादिम अलीला कोतवाल म्हणून नियुक्त केले. हरकिशनसिंहाला प्रधान केले. थोडे दिवसच कुँवरसिंहाचा अधिकार शाहाबाद जिल्ह्यावर राहिला.

मेजर आयर अफगाणिस्तानवर विजय मिळवून बक्सरला आला. त्याला समजले की, कुँवरसिंहाने इंग्रज सैन्याचा पाडाव करून आरा आपल्या ताब्यात घेतले आहे. बिबिगंज येथे २ ऑगस्ट १८५७ रोजी दोन्ही सैन्यात घनघोर युद्ध झाले. त्यात कुँवरसिंहांचा पराभव झाला. कारण आयरच्या सैन्याजवळ तीन चांगल्या तोफा व नव्या बंदुका होत्या. त्यानंतर कुँवरसिंह जगदीशपूरला निघून गेले व त्यांनी पुन्हा सैन्य संघटन सुरू केले. आयरने आता जगदीशपूरकडे धाव घेतली. जगदीशपूरवर त्याने हल्ला करून ते जिंकले. कुँवरसिंह आपल्या सैन्यासह जगदीशपूरमधून निघून गेले. १४ ऑगस्ट १८५७ रोजी इंग्रज सैनिकांनी जगदीशपूर लुटले. स्त्री पुरूषांवर अत्याचार केले. कित्येक निरपराध लोकांची कत्तल केली. तेथले शिवमंदीर जमीनदोस्त करून टाकले.

कुँवरसह रोहतास, जवळच्या अकबरपूरला व नंतर रेवा येथे गेले. रेवाचा राजा इंग्रजांचा लाचार होता. त्याने कुँवरसिंहांना साथ दिली नाही. सप्टेंबर १८५७ मध्ये त्यांच्याजवळ फक्त ५०० सैनिक होते. नंतर त्यांनी बांदा गाठले. तेथले १५०० सैनिक आपल्याकडे वळवून घेऊन ते काल्पीकडे गेल. कुँवरसिंहाना पकडून देणारास इंग्रज सरकारने २५ हजार रुपयांचे इनाम जाहीर केले. पण त्याला कोणीही भीक घातली नाही.

कुँवरसिंह, अमरसिंह, किसनसिंग व रणदलसिंह काल्पीकडून सासाराम व कैसूर डोंगर दऱ्यात आले. त्या डोंगरदऱ्यात त्यांनी इंग्रज सैन्याला जेरीस आणले. २२ मार्च १८५८ रोजी कुँवरसिंहाच्या व कर्नल मिलमॅन यांच्या सैन्यात आझमगडजवळ घनघोर युद्ध झाले. मिलमॅनला पळ काढावा लागला आणि कुँवरसिंहांनी आझमगडावर आपली विजयपताका फडकविली.

मिलमॅन गाझीपूर व बनारसकडे पळाला. त्याला बनारस येथे कॅ. डेम्स आपल्या सैनिकी तुकड्यांसह येऊन मिळाला. डेम्सच्या नेतृत्वाखाली त्यांनी आझमगडवर

निकराने हल्ला केला. पण कुँवरसिंहांच्या शूर सैनिकांनी त्याला पिटाळून लावले. आता कुँवरसिंहांकडे ५० हजार सैन्य होते. त्यांनी आपल्या सैन्याचे दोन विभाग केले. एका तुकडीकडे आझमगडच्या रक्षणाचे काम सोपवून ते दुसरी चांगल्या लढवयांची तुकडी घेऊन कुँवरसिंह बनारसवर चालून गेले. इलाहाबाद-कलकत्ता हा मार्ग अडविण्याचे त्यांचे धोरण होते. आता त्यांना अवधमधील विद्रोही सैनिक ही येऊन मिळाले.

लॉर्डकॅनिंगने निष्णात सेनापती लॉर्ड मार्ककर याला ५०० इंग्रज सैनिक, देशी पायदळ व आठ तोफा घेऊने आझमगडवर आक्रमण करण्यास पाठविले. आझमगडपासून आठ मैलावर ६ मार्च १८५८ रोजी तेथे दोन्ही सैन्यात घनघोर युध्द झाले. बनारस कडून कुँवरसिंह ही आपले सैन्यासह धावून आले. इंग्रजांकडे लांब पल्ल्याच्या तोफा असल्यामुळे आझमगडच्या सैन्याचा टिकाव लागला नाही. त्या सैन्याने इंग्रज सैन्याची पिछाडी गाठून इंग्रज सैन्यावर जोराचा हल्ला चढविला. मार्ककरने आझमगड गाठला. लखनौहून लुगार्ड आपल्या सैन्यासह मार्कच्या मदतीसाठी धावून आला मघाई येथे कुँवरसिंहाच्या थकलेल्या सैन्याला त्यांच्या सैन्याशी लढावे लागले. तानू नदीवरील पुलावर निवडक सैन्य ठेवून 'आपण आझमगडावर हल्ला करण्यासाठी जात आहोत', अशी हूल कुँवरसिंहांनी उठविली व ते आपल्या मुख्य सैनिक तुकडीसह जगदीशपूरकडे निघाले. तानू नदीच्या पुलावरील सैन्याने लुगार्डच्या सैन्याला तेथेच थोपवून धरले.

कुवरसिंहाला जगदीशपूरकडे जातांना कॅ. डग्लसने आपल्या सैन्यासह गाठले. कुँवरसिंह बालियाकडे गेले, असे समजताच डग्लसने तिकडे धाव घेतली. पण ती हूल होती. इकडे बालियापासून सात मैलावरील घाटावरून कुँवरसिंह आपल्या सर्व सैन्यासह गंगापार झाले. गंगापार होताच आपण आता निर्विघ्न झालो, अशा समजुतीने कुँवरसिंहाच्या सैनिकांनी त्यांची गंगापार होताच जंगी मिरवणूक काढली. कुँवरसिंह, अमरसिंह, हरकिशनसिंह व रणदलसिंह सजविलेल्या हत्तीवरुन चालले होते. कॅ. डग्लस त्यांच्या जवळ येऊन ठेपला होता. गंगेच्या अलीकडील तीरावरुन त्याने लांब पल्ल्याच्या तोफेतून नेम धरुन कुँवरसिंहावर तोफेचा गोळा सोडला. तो गोळा कुँवरसिंहाच्या डाव्या हाताला चाटून गेला व पलीकडे असलेल्या रणदलसिंहाचा प्राणही घेऊन गेला. कुँवरसिंह हत्तीवरुन खाली कोसळले. सावध होताच त्यांनी आपल्या उजव्या हातात तलवार घेऊन आपला डावा हात तोडला व गंगेला अर्पण केला. त्यांच्या डाव्या हाताला वनौषधी लावून पट्ट्या बांधण्यात आल्या व ते सैन्य त्यांना घेऊन जगदीशपूरकडे धावत निघाले. जगदीशपूर आता उजाड झाले होते, पण कुँवरसिंहाचा ध्वज महाद्वारावर फडकत होता.

कुँवरसिंहाना एका झोपडीत ठेवण्यात आले. त्यांना ताप चढू लागला. त्यांचे सहकारी दुःखाने तळमळत होते. उपचार चालूच होते. दोन दिवसांच्या उपचारांनी फरक पडला नाही. अखेर २४ मे १९५८ रोजी या महान क्रांतिकाराने आपल्या फडकत असलेल्या ध्वजाकडे पाहात आपल्या मातृभूमीचा निरोप घेतला. ८० वर्षाचा हा वृद्ध तरुण मातृभूमीच्या स्वातंत्र्यासाठी तुफान वेगाने मध्य भारताच्या पूर्व भागात मी मी म्हणणाऱ्या इंग्रज सेनाधिकाऱ्यांना जुलै १८५७ ते मे १८५८ च्या दहा महिनेपर्यंत धडका देत होता व त्याने कंपनी सरकारच्या तोंडचे पाणी पळविले होते. धन्य तो वीर! धन्य त्याचा देशाभिमान! धन्य त्याचे रणनैपुण्य!



# ४५. अमरसिंह

मे १८५८ च्या शेवटच्या आठवड्यात जगदीशपूरला कुँवरसिंह मृत्युशय्येवर होते, तेव्हा त्यांचे धाकटे बंधु अमरसिंह यांनी त्यांना वचन दिले होते की, "तुमच्यानंतर मी तुमचे स्वातंत्र्यलढ्याचे कार्य प्राणपणाने चालू ठेवीन". आणि खरोखरच कुँवरसिंहाच्या निधनानंतर सुमारे दीड वर्ष अमरसिंहाने स्वातंत्र्यलढ्याची ज्वाला संपूर्ण बिहार प्रांतात पेटवत ठेवले. पुराणकालीन राम-लक्ष्मणाप्रमाणेच एकोणवीसाव्या शतकात या दोघां बंधूंची जोडी प्रसिद्ध होती.

अमरसिंह हा सुद्धा आपल्या मोठ्या बंधुप्रमाणेच शूरवीर, पराक्रमी व उदार होता. कुँवरसिंहानंतर त्याने जगदीशपूरच्या आपल्या जहागिरीचा कारभार हाती घेतला. शासन व्यवस्था सुदृढ केली आणि सैन्य संघटनही उत्तम प्रकारे केले. त्यानंतर इंग्रजांशी लढण्यास तो सिद्ध झाला.

अमरसिंह धार्मिक प्रवृतीचे होते. त्यांनी भारतातील प्रमुख तीर्थक्षेत्रांची यात्रा केली होती उदार हस्ते गोरगरीबांना दान देण्याचा त्यांचा प्रघात होता. ते नियमितपणे रामायण व महाभारताचे पठन करीत असत. त्यांना शिकण्यापेक्षा शस्त्र-संचालनात विशेष रस होता. त्यांच्या गुणामुळे ते त्यांचे वडील साहबजादासिंहाचे लाडके बनले होते. जहागीरदाराचे पुत्र असूनही त्यांना चैनविलासाची विशेष आवड नव्हती.

इंग्रजांविरूद्ध लढणे उचित नाही, असे आधी त्यांचे मत होते. कारण इंग्रज सरकार आपल्यापेक्षा फार बलाढ्य आहे, याची त्यांना जाणीव होती. परंतु कुँवरसिंहांचे दीवाण हरकिंशनसिंह यांना स्वातंत्र्ययुद्धात भाग घेण्यास त्यांना प्रवृत्त केले. त्याप्रमाणे कुँवरसिंहांनी स्वातंत्र्य-युद्धात उडी घेण्यासाठी कमर कसली. त्यांना नानासाहेब पेशव्यांचेही तसे पत्र आले होते. आपला मोठा भाऊ युद्धास सज्ज झाला, तेव्हा अमरसिंहांनेही आपल्या भावाची पाठराखण करायचे ठरविले व अखेरपर्यंत सावलीप्रमाणे त्यांना साथ दिली.

जगदीशपूरच्या जहागीरदारांना बादशहा शहाजहान याने 'राजा' ही पदवी दिली होती. अमरसिंह हे जगदीशपूरचे शेवटचे राजे ठरले. त्यांनी कुँवरसिंहाच्या निधनानंतर नोव्हेंबर १८५९ पर्यंत दीड वर्ष इंग्रजांशी सातत्याने झुंजी दिल्या. आयर या इंग्रजी सेनापतीने जेव्हा जगदीशपूरवर ताबा मिळवला, तेव्हा अमरसिंह आपल्या सैन्यासह सासारामच्या जंगलात गेला. त्यांनी त्या डोंगराळ व जंगलांनी युक्त प्रदेशात आपले वर्चस्व स्थापन केले. सासारामच्या आसपासच्या प्रदेशात त्याचा दबदबा वाढला. आरानगरच्या आसपासची स्थिती आपल्याला भयावह आहे, असे इंग्रज अधिकाऱ्यांना तेव्हा वाटत होते. त्या भागात इंग्रजांच्या पोलिसांना कोणीच जुमानत नव्हते.

पाटण्याच्या कमिशनरने बंगालच्या गव्हर्नरला कळविले की, 'जोपर्यंत अमरसिंह या प्रदेशात आहे तोपर्यंत आरा जिल्ह्यात आपणांस शांतपणे राहणे अशक्य आहे. बहुधा आरा जिल्ह्यावर विद्रोही सैनिकांचा अधिकार होण्याची दुःखद स्थिती निर्माण होईल. आरा जिल्ह्यात विद्रोहाचा उद्रेक झाला, तर तो पाटणा, गया या जिल्ह्यातच नव्हे तर संपूर्ण बिहार प्रांतात पसरेल.'

इंग्रज सरकारने लगेच अमरसिंहाला पकडून देणारास पाच हजार, निशानसिंहाला पकडणारास एक हजार रुपये व  हरकिशनसिंहाला पकडणारास पाचशे रुपये अशी तीन बक्षिसे जाहीर केली. पण कोणीही त्यासाठी पुढे आले नाही.

अमरसिंहाने ग्रँडट्रक रोडवरील कुरीडीह येथे टेलीग्राफच्या तारा तोडून टाकल्या. नंतर तो शाहाबाद जिल्ह्याच्या दक्षिण भागात शिरला व तेथे त्याने इंग्रज सैन्याशी छापामार युद्धे करून त्यांना हैराण करून सोडले. अमरसिंहाची छापामार युद्धनिती इंग्रजांना घातक ठरली. बहुतेक स्थानी त्याने इंग्रजांचा पराभव केला. इंग्रजांचा विजय होत असल्याचे दिसताच अमरसिंह आपल्या सैन्याच्या लहान लहान तुकड्या करून त्यांना नियोजित स्थळी पसार व्हायला लावीत असे व ते सैन्य थोड्याच वेळात दृष्टीआड होऊन जाई. त्यामुळे इंग्रज सेनाधिकारी निष्प्रभ होऊन जात असत. या सैन्याशी सामना कसा द्यावा, हेच त्यांना समजेनासे होऊन जात असे. अमरसिंहाच्या या रणकौशल्यामुळे निराश होऊन जनरल ई. लुगार्ड ६ जून १८५८ रोजी राजीनामा देऊन इंग्लडला निघून गेला. हे अमरसिंहाने फार मोठे यश म्हणावे लागेल.

जनरल म्हणून नंतर डग्लसची नेमणूक झाली. जगदीशपूरला सर लुगार्डची व अमरसिंहाची लढाई झाली. त्यानंतर त्याने जगदीशपूर भोवती गोऱ्या सैनिकांच्या चार तुकड्या व शिख शिपायांची एक तुकडी ठेवून दिली. अमरसिंहाने दलीपपूर, पीरों, जगदीशपूर येथे वारंवार हल्ले करून इंग्रज सेनापतींना हैरान करून सोडले. सर लूगार्डने १४ मे १८५९ रोजी सेनाप्रमुखाला पत्र दिले. त्यात त्याने म्हटले की, इंग्रज सैन्य गर्मीमुळे फारच त्रस्त झाले आहे. अनेक सैनिक गर्मीच्या त्रासाने मरण पावले आहेत. विद्रोहाशी सामना करण्याची व त्यांना या भागातून पळवून लावण्याची शक्ती माझ्यात उरलेली नाही.' अशा स्थितीत अमरसिंहाने त्याच्या छावणीतील हल्ला करून तो आपल्या सैन्यासह डोंगराळ प्रदेशात त्वेरेने निघून गेला.

सर लूगार्ड ने सासाराम, बक्सर, डुमरॉव, आरा, भोजपूर या ठिकाणी विद्रोह्यांशी सामना करण्यासाठी आपल्या सैनिकांचे तळ उभारले. पाटणा येथील कमिशनरने सरकारला कळविले की, ''लवकरात लवकर जगदीशपूर भोवतालचे जंगल कापून टाकावे. म्हणजे विद्रोह्यांना लपण्यास जागाच राहणार नाही.'' सर लूगार्ड, डग्लस

यांच्याशी अमरसिंहाने अनेक ठिकाणी झुंजी दिल्या. एका झुंजीत निशानसिंह पकडला गेला. त्याच्यावर इंग्रजांनी खटला भरुन त्याला बंदुकीच्या गोळ्यांनी ठार केले.

आपला एक शूर साथीदार अशा रीतीने मरण पावला, याचे दुःख अमरसिंहाला होणे साहजिकच होते. पण दोन दिवसातच तो सावरला. आपले सैन्य घेऊन अमरसिंह गाझीपूर जिल्ह्यातील जमानिया येथे गेला. ते समजताच अमरसिंहाचा शाहबाद जिल्ह्यात येण्याचा मार्ग रोखण्यासाठी लूगार्ड रुपसागर येथे रेंटरे, बक्सर येथे डग्लस आणि दलीपपूर येथे स्वतः छावण्या टाकून बसले. त्यांनी एवढा बंदोबस्त केल्यावरही अमरसिंह आपल्या १५०० सैनिकांसह जगदीशपूर जवळ मदनपूरला आला. १२ जून १८५९ रोजी रेटरेशी त्याची मूठभेट झाली. उदवंतनगरला पाच सहाशे सैनिकांनी घेरले. जुलैमध्ये रेटरेने सरनामसिंहाला पकडले आणि त्याच्या कुटुंबातील सर्व पुरुषांसह त्याला गोळ्या घालून ठार केले.

३० जून १८५९ रोजी पाटण्याच्या कमिशनरने सरकारला कळविले की, "जगदीशपूरच्या आसपासच्या प्रदेशात अमरसिंहाचा खूप प्रभाव आहे. नव्हे, त्या भागात त्याचेच शासन आहे. तो सरकारसारखाच आपल्या अधिकाऱ्यांची नियुक्ती करतो. करवसुली करतो आणि अपराध्यांना शिक्षा करतो. अमरसिंहाने स्थापन केलेल्या जगदीशपूरच्या प्रशासनाचा प्रमुख हरकिशनसिंह आहे. त्याची सैन्य-संघटना बलवत्तर आहे. त्याच्या सैन्यात १५०० बंदुकधारी सैनिक व ५०० तलवारधारी शिपाई आहेत.

३० जुलै १८५९ रोजी अमरसिंहाची महौली येथे कर्नल वाल्टर याच्या सैन्याशी लढाई झाली. त्या लढाईत ७५० सैनिक मारले गेले. नंतर त्याने डग्लस व हॅवलाक यांच्या सैन्याशी लढाया केल्या. पाटण्याच्या कमिशनरने सरकारला लिहिले की, 'बरेच विद्रोही नेपाळच्या तराईत निघून गेले आहेत. पण अमरसिंह अदम्य उत्साहाने व अतुल साहसाने लढतोच आहे.' नंतर अमरसिंहाला लढण्यात रस राहिला नाही व तो ऑक्टोबर १८५९ मध्ये नेपाळच्या तराईत जाऊन नानासाहेब पेशव्यांना मिळाला. तराई भागात हिंडत असताना त्याला नेपाळचा राजा जंगबहाद्दूर याने अटक केली. डिसेंबर १८५९ मध्ये त्याने अमरसिंहाने बंगाल सरकारच्या ताब्यात दिले. सरकारने या शूर योद्धाला गोरखपूर तुरुगात डांबले. ४ फेब्रुवारी १८६० रोजी त्याला आमांशाचा भयंकर विकार जडला. तो वाढत जाऊन ५ फेब्रुवारी १८६० रोजी या महान क्रांतिकारकाचे त्या तुरुंगात निधन झाले. एक कवी म्हणतो,

कुँवरसिंह का छोटा भाई वैसाही मस्ताना था।
सब कहते है, अमरसिंह भी बडा वीर मर्दाना था।।



# ४६. हरेकृष्ण सिंह

१८५७ च्या स्वातंत्र्य युद्धातील महान सेनानी जगदीशपूरचे बडे जहागीरदार बाबू कुँवरसिंह यांनी बिहार व उत्तरप्रदेशातील अनेक जिल्ह्यात आपल्या महान पराक्रमाने इंग्रज सरकारची झोप उडविली होती. ८० वर्षाच्या या स्वातंत्र्यसेनानीने त्या युद्धात तरुणांना सुद्धा लाजविले होते. म्हणूनच त्यांना स्वा. सावरकरांनी '८० वर्षाचा तरूण योद्धा असे म्हटले आहे' त्यांना सतत आम जनतेने सहकार्य मिळाले होते. जगदीशपूर, मिर्झापूर, बनारस, इलाहाबाद, कानपूर, लखनौ, आयोध्या, आजमगड, बलिया एवढ्या मोठ्या प्रदेशात इंग्रजांच्या तोंडचे पाणी त्यांनी पळविले व पुन्हा ते जगदीशपूरला आले व तेथेच त्यांचे निधन झाले. त्यांना या युद्धात प्राणपणाने साथ दिली, ती हरेकृष्ण सिंहानी.

हरेकृष्ण सिंहांनी बलाढ्य इंग्रज सरकारला फार मोठे आव्हान दिले होते. शाहाबाद जिल्ह्यातील ऐदलासिंहाचे ते पुत्र होते. त्याचा जन्म सन १८२७ मध्ये झाला होता. त्याचे जन्मगांव होते बारूमी. त्यांना त्या स्वातंत्र्य युद्धाच्या काळात पीरू परगण्याचे तहसीलदार म्हणून काम केले. कुँवरसिंहांचे ते उजवे हात होते. कुँवरसिंहांच्या सांगण्यावरून त्यानी दानापूरच्या इंग्रज छावणीची बित्तंबातमी काढली. त्या छावणीतील देशी सैन्याला स्वातंत्र्ययुद्धात सामील होण्यासाठी प्रवृत्त केले आणि त्या सैनिकांना घेऊन ते जगदीशपूर (आरा) येथे कुँवरसिंहांना येऊन मिळाले. त्यावेळी त्यांचे वय केवळ ३० वर्षांचे होते.

गोरा वर्ण, बळकट शरीरयष्टी, रुबाबदार चेहरा, दाढी-मिशी यामुळे त्यांचा प्रभाव कोणावरही सहज पडायचा. ते घोडेस्वारीत अत्यंत तरबेज होते. क्रांतिकारकांनी आरा जिंकले, तेव्हा त्यांनी त्या प्रदेशाची शासन व्यवस्था उत्तम प्रकारे लावली. आरावर हल्ला करणाऱ्या सैन्याचे ते नेतेच होते. त्यानंतर इंग्रज सैन्याने आरावर आक्रमण केले. आपल्या सैन्याजवळ इंग्रज सैन्याच्या हत्यारांसारखी उत्तम शस्त्रे नसल्याने त्यांना माघार घ्यावी लागली व ते आपल्या सैन्यासह सासारामच्या डोंगरदऱ्यातील जंगलात निघून गेले.

हरेकृष्ण सिंहांना पकडण्यासाठी इंग्रज सरकारने आधी तीन हजार रुपयांचे व नंतर पाच हजार रुपयांचे बक्षीस जाहीर केले. त्यांनी स्वातंत्र्ययुद्धासाठी जनतेला प्रवृत्त करण्यासाठी उत्तर व मध्य भारताचा गुप्तपणे दौरा केला. कुँवरसिंहांबरोबर ते त्यांच्या सावलीप्रमाणे राहिले. आजमगडच्या छावणीतील १७ व्या देशी पलटणीचे सुभेदार बंधुसिंह होते. या पलटणीतील शिपाई माधोसिंह याने लेफ्ट.हचिन्सन याला गोळी घालून ठार केले व या पलटणीने विद्रोहाचे रणसिंग फुंकले. गोरखपूर, फैजाबाद, बनारस येथील

उठावात या पलटणीचा मोठा सहभाग होता. आजमगडच्या युद्धात या पलटणीतील शिपायांनी मोठा पराक्रम गाजविला. त्या शिपायांना त्या प्रदेशातील जनतेने उत्साहाने सहकार्य केले. अजमगडची लढाई १८५७ च्या युद्धात महत्वपूर्ण मानली जाते. या युद्धात इंग्रजांना क्रांतिकारक सैन्याशी फार मोठा सामना द्यावा लागला. शेकडो क्रांतिकारकांनी मरण पत्करले, पण आत्मसमर्पण केले नाही. हा प्रदेश ताब्यात घेण्यासाठी इंच इंच भूमीसाठी भीषण युद्ध करावे लागले. हरेकृष्ण सिंहांनीच या पलटणीला उठावासाठी उद्युक्त केले होते. या युद्धासाठी कुँवरसिंह अयोध्येहून आले होते. हरेकृष्णसिंह आपल्या तीनशे सैनिकांसह त्यांना १७ मार्च १८५७ रोजी अतरौलिया येथे मिळाले. इंग्रज सैन्याचा प्रमुख कर्नल मिलमॅन आपल्या तीनशे सैनिकांसह बुढणपूरजवळ कोइलसा येथे तळ देऊन होता. इंग्रज सैनिक आपली हत्यारे एका बाजूस रचून जेवणाची तयारी करीत होते. कुँवरसिंह व हरेकृष्णसिंहांनी त्या तळावर अचानक धाड घातली. तेव्हा मिलमॅन आपल्या सैनिकांसह बंदुका व तोफा तेथेच टाकून पळून गेला. ते युद्ध साहित्य कुँवरसिंहांनी व हरेकृष्णसिंहांनी आपल्या ताब्यात घेतले.

कुँवरसिंहाजवळ आता ४००० सैन्य होते. त्यांनी गाजीपूरहून येणाऱ्या कर्नल डॅम्सच्या सैन्याचा २७ मार्च १८५८ रोजी पराभव केला. आणि आजमगडवर आपला झेंडा फडकविला. त्यावेळी गव्ह. जनरल कॅनिंग इलाहाबादला होता. त्याने मार्क केर याला १३ वी पलटन घेऊन आजमगडला पाठविले. तेथे कुँवरसिंह व हरेकृष्णसिंह आणि मार्ककेर यांच्यात घनघोर युद्ध झाले. मोठ्या संख्येने कुँवरसिंहांचे सैनिक मारले गेले. त्यांचा पराभव होऊन मार्क केरने आजमगडवर ताबा मिळविला. कारण त्याला लुगार्ड आपल्या पलटणी सह येऊन मिळाला होता. आजमगडच्या या युद्धात हरेकृष्णसिंहांनी आपल्या पराक्रमाची शर्थ केली. पण कुँवरसिंह जखमी झाल्याने त्यांना माघार घ्यावी लागली.

हरेकृष्ण सिंहांनी एप्रिल १८५८ मध्ये जगदीशपूरवर हल्ला करुन सेनाधिकारी ली ग्रँटचा पराभव केला व जगदीशपूरवर पुन्हा ताबा मिळविला. २६ मे १८५८ रोजी कुँवरसिंहांचे निधन झाल्यावर त्यांचे धाकटे बंधू अमरसिंह यांना साह्य करुन जगदीशपूरचा राज्य कारभार सुरळीतपणे सुरु केला. फितुरांना व इंग्रजांना मदत करणाऱ्या देशद्रोह्यांना शोधून काढून त्यांचा निकाल लावला. अल्पकाळातच राज्याची आर्थिक स्थिती सुधारली. नव्याने सैन्य संघटित केले. जगदीशपूरचा किल्ला मजबूत बनविला.

जगदीशपूर हातातून गेल्याने इंग्रज सरकार संतप्त झाले व ब्रिगेडिअर डग्लसच्या नेतृत्वाखाली दानापूर छावणीतून मोठे इंग्रज सैन्य जगदीशपूरला रवाना केले. निरनिराळ्या छावण्यांतून सहा इंग्रज कर्नल आपापले सैन्य घेऊन डग्लसच्या मदतीला पाठविले. हरेकृष्णसिंहांनी विचार केला की, आधुनिक शस्त्रस्त्रांनी सज्ज असलेल्या इंग्रज सैन्यापुढे आपला टिकाव लागणे शक्य नाही. म्हणून ते सैन्य येण्याआधीच त्यांनी जगदीशपूर सोडले. व ते २० ऑक्टोबर १८५८ रोजी जगदीशपूर पासून पाच मैलांवरील जंगलात आपल्या सैन्यासह निघून गेले. आपल्या सैन्याच्या छोट्या छोट्या तुकड्या करुन त्यांना इंग्रज सैन्याशी गनिमी काव्याने कसे लढायचे ते सांगितले. नंतर हरेकृष्णसिंह फरार झाले. परंतु २९ ऑगस्ट १८२९ रोजी बनारसच्या दशाश्वमेध ठाण्याच्या कोलवालाने त्यांना बधोले परगण्यातील होनिया गावात कैद केले त्यांना शाहाबादच्या न्यायालयात हजर करण्यात आले. त्यांच्यावर राजद्रोहाचा खटला दाखल केला विशेष कमिशनर रिचर्डसनने या स्वातंत्र्यवीराला मृत्युदंड सुनावला आणि त्यांना जगदीशपूर येथल्या मुख्य चौकात आमजनतेसमोर फांशी देण्यास सांगितले. या शूर वाघाला अखेर जगदीशपूरच्या मुख्य चौकात फांशी देण्यात आले. त्यांनी इंग्रज सत्तेसमोर न झुकता, स्वातंत्र्य देवतेच्या बलिवेदीवर प्राणार्पण केले आणि ते अमर झाले.



# ४७. खान बहादुर खान

रोहिलखंड अवधचा नबाब शुजाउद्दौला याने इंग्रजांच्या मदतीने जिंकले. रोहिलखंडात बरेली, शाहजहाँपूर, बिजनौर व मुरादाबाद इ. जिल्हे होते. रोहिलखंडाची राजधानी बरेली ही होती. पुढे वीस पंचवीस वर्षातच इंग्रजांनी रोहिलखंड आपल्या अवधच्या तैनाती फौजेच्या खर्चासाठी अयोध्येच्या नबाबाकडून आपल्या ताब्यात घेतले.

नबाब झुल्पिकारखान हा काही काळ बरेलीचा सुभेदार होता. त्याच्यानंतर त्याचा नातू खान बहादूरखान याच्याकडे बरेलीची सुभेदारी आली. त्याचे घराणे खानदानी होते व बरेली जिल्ह्यात प्रतिष्ठित मानले जात होते. खान बहादुर खान हा इंग्रज राजवटीत सदर अमीन (मॅजिस्ट्रेट) सुध्दा होता. सन १८५७ मध्ये १० मे रोजी मेरठला देशी शिपायांनी उठाव केला. तेथल्या इंग्रजांनी कत्तल केली. हे समजल्यावर रोहिलखंडाचा कमिशनर ॲलेक्झांडर याने बहादुरखानाला बोलावून घेतले व त्याला सांगितले की, तुम्ही आपल्या प्रदेशात शांतता राखण्यासाठी आम्हांस मदत करावी. बहादुर खानाने सांगितले की, या काळात ते माझ्या कुवतीतले नाही, म्हणून मी तशी व्यवस्था करण्यास असमर्थ आहे. एवढ्यावरच तो विषय बहादुरखानाने संपविला.

३१ मे १८५७ रोजी बरेली छावणीतील देशी पलटणीने विद्रोह सुरु केला. काही इंग्रज अधिकाऱ्यांची कत्तल केली. काही इंग्रज नैनीतालला पळाले. सुभेदार बख्तखाँ याने खान बहादुरखानाला बरेली परगण्याचा राज्यकारभार हाती घेण्याची विनंती केली. खान बहादुरखानाने बरेलीचा राज्य कारभार आपल्या हाती घेतला. त्याने एक सल्लागार मंडळ नेमले. बख्तखाँजवळ बादशहा बहादुरशाह जफर याच्यासाठी नजराणा व छावणीतला खजिना देऊन पाच हजार सैन्यासह दिल्लीला पाठविले. बहादुरशाह ने खान बहादुरखान याला बरेलीचा सुभेदार म्हणून हुकूम पाठविला. बरेली परगण्यावर बहादुरशाहचे वर्चस्व सुरु झाले. खान बहादुरखान याने बरेली परगण्यात प्रमुख ठिकाणांवर तहसीलदारांच्या नेमणुकी केल्या ठिकठिकाणी पोलीस ठाणी नेमली. बहादुरशाहच्या शिक्क्याची नाणी तयार करण्यासाठी टाकसाळ सुरु केली. बरेली परगण्यात सर्वत्र शांतता राखण्याची तजवीज केली. ठाकूर जयमलसिंगाकडे महसूल खाते सोपविले. ठाकूर रघुनासिंहाला 'राजा' ही पदवी दिली. त्याच्याकडे फरिदाबादचा परगणा दिला.

तोफखाना तयार केला. ५० हजारांवर सैन्य जमा केले. मौलवी अहमदुल्ला शाह, नानासाहेब पेशवे, फिरोजशहा इ. विद्रोही नेत्यांशी संबंध स्थापन केले. खान

बहादुरखानाच्या कारकीर्दीत स्वस्ताई होती. सर्वत्र शांतता होती. हिंदू-मुस्लिम जनता गुण्या गोविंदाने नांदत होती. बरेली शहर तर वैभवात होते. त्याने धर्मशाळा, मशिदी, रस्ते बांधण्याचे काम सुरु केले होते. शस्त्रास्त्रे तयार करण्याचे काम जोरात सुरु होते. प्रत्येक बाबीत बरकत होती. तो प्रजाहितदक्ष व लोकप्रिय होता. विद्रोही सैनिक घोड्यांवर बसून सर्वत्र हिंडत असत - 'हिंडतांना इस्लाम का बोलबाला, फिरंगी का मुँह काला,' अशा घोषणा देत असत.

बहादुरखानाच्या सल्लागारांत मुसलमाना बरोबर हिंदूही होते. त्याने गोवधबंदीचा हुकूम काढल्याने हिंदू जनता ही त्याच्यावर प्रसन्न होती. त्याचा दिवाण शोभाराम हा हिंदू होता.

खान बहादुरखानाने नैनीतालमधून इंग्रजांना हाकून लावण्यासाठी बंदे मीरखान व अलीखान मेवालीच्या नेतृत्वाखाली काही सैन्य नैनीतालकडे पाठविले. नंतर हैदरखान व फजले हक आपले सैन्य घेऊन त्यांना येऊन मिळाले. ते कळताच इंग्रज सैन्याने त्यांच्यावर हल्ला केला. तरीही ते लालडांगी येथे तळ ठोकून राहिले. इंग्रजांनी आपली बायकामुले अल्मोड्याला पाठवून दिली.

इंग्रजांनी तीन बाजूंनी रोहिलखंडावर हल्ला करायचे ठरविले. सरसेनापती सलकॉलिन, ब्रिगेडिअर जनरल वॉल पोल, मेजर जनरल पेनी, ब्रिगेडिअर जनरल जोन्स यांनी गंगेच्या डाव्या तीराकडून, फत्तेगड कडून, रुडकीकडून हल्ले करायचे ठरविले. कोणी कोठे कोणाशी येऊन मिळायचे हेही ठरविण्यात आले. पेनी मेरठहून निघाला. वॉलपोलला रौया येथे देशी सैन्याशी लढत द्यावी लागली. तेथील सरदार नरपतसिंहाने त्याचा चांगलाच प्रतिकार केला. या युद्धात कर्नल ऑट्रियनहोप ठार झाला. दुसऱ्या हल्ल्याच्या वेळी नरपतसिंह किल्ल्यातून निघून गेला. पेनीच्या सैन्याला कुकरौली येथे देशी सैन्याने घेरले. त्याने त्या सैन्याला हरवून मुरादाबादला तळ ठोकला. पेनीही त्या युद्धात मारला गेला. जोन्सने हरिद्वार जवळून गंगा ओलांडून तो बरेलीपासून चौदा मैलावरील मीरगंज येथे आला. पेनीची तुकडी घेऊन सर कॉलिन बरेलीजवळ येऊन ठेपला.

खान बहादुर खान युद्धासाठी तयारच होता. त्याने फौजेचे नेतृत्व बंदे मीरखान, वलीदादखान व फिरोजशहा यांच्याकडे दिले. त्यांच्या सैन्यात गाझींची (काफिरांवर विजय मिळविणारांची) एक तुकडी ही होती. हे लोक इंग्रजांना काफिर समजत जिवावर उदार होऊन लढण्याचा त्यांचा मुख्य धर्म होता ५ मे १८५८ रोजी युद्ध सुरु झाले. धर्माकरता बळी जाण्यासाठी गाझी तत्पर होते. दीन दीनच्या घोषणा देत ते इंग्रज

सैन्यावर तुटून पडले. एका तरुण गाझीने फार मोठा पराक्रम गाजविला. तो जखमी झाला होता. शरीरातून सगळीकडून रक्त वाहात होते. तरी तो लढायला पुढे आला. इंग्रज सैनिकांनी त्याच्या अंगात संगिनी खुपसून त्याला ठार केले.

बहादुरखानाच्या सैन्याने व गाझींनी इंग्रज सैन्यावर निकराचे हल्ले केले. पण इंग्रजांच्या तुफान गोळीबारामुळे रोहिले नामोहरम झाले. या युद्धात फिरोजशहाने आपल्या पराक्रमाची शर्थ केली. इतर सरदार सुद्धा प्राणपणाने लढले. त्या रात्री खान बहादुरखान याने बरेली सोडले व तो तराईकडे निघून गेला. इंग्रजांनी बरेली शहर ताब्यात घेतले. लोक घरेदारे सोडून वाट दिसेल, तिकडे पळून गेले. पुष्कळ घरंदाज स्त्रियांनी नाटाळमोहल्ल्याच्या मशिदीजवळील अथांग पाण्याच्या विहिरीत जीव दिले. बरेली शहरावर स्मशानकळा आली. इंग्रजांनी अनेक लोकांना ठार केला. लूटमार केली.

तराईच्या जंगलात लढत असतांना खान बहादुरखान घोड्यावरुन खाली पडला. इंग्रजांनी त्याला ताब्यात घेतले. त्याच्यावर खटला भरण्यात आला व १८६० च्या सुरुवातीला त्याला कोतवाली समोर फांशी देण्यात आले.



# ४८. पीर अली मर्दाना

पाटणा शहर हे एकोणिसाव्या शतकात वहाबीपंथाच्या कडव्या मुसलमानांचे प्रमुख केंद्र होते. १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धा आधी पाच वर्षे त्या पंथाच्या मौलवींनी आपली गुप्त संघटना उभारली होती. मोठ मोठे श्रीमंत व्यापारी, पेढीवाले, जमीनदार त्या संघटनेचे प्रमुख सदस्य असल्याने संघटनेला त्याचे भरपूर अर्थसहाय्य मिळत असे. ही संघटना इंग्रज सरकारविरुद्ध गुप्तपणे कार्य करण्यासाठी निर्माण केलेली होती. त्या संघटनेत इंग्रजांचे काही पोलिसही सामील झाले. इंग्रजांविरुद्ध लढण्यास तयार असलेल्या शेकडो लोकांना आपल्या सभासदांच्या नांवावर नोकरीस ठेवून या संघटनेच्यावतीने त्यांना नियमित पगारही दिला जात असे. बिहारमधील अनेक गांवातील जमीनदारही या संघटनेचे सभासद होते. त्यामुळे संघटनेला पैशांची ददात नसायची. या संघटनेच्या गुप्तहेरांनी बिहारमधील इंग्रजांच्या देशी पलटणींना आपल्याकडे वळवून घेतले होते. त्यात दानापूरच्या ७ व्या, आठव्या व ४० व्या देशी पलटणी पूर्णपणे संघटनेचे आदेश पाळण्यास तयार झालेल्या होत्या. त्या पलटणी पाटण्याहून कोणता आदेश येतो, याची प्रतीक्षा करीत होत्या. पाटणा शहरातील पोलीस, दुकानदार सुद्धाबंडाची ठिणगी केंव्हा पडते त्यांची वाट पाहात होते. कारण सारी जनता इंग्रजांच्या जुलमी व अत्याचारी राजवटीने असंतुष्ट झालेली होती.

मेरठला देशी शिपायांनी बंड केले, ही बातमी पाटण्याचा कमिशनर याला समजताच त्याने २०० शीख शिपायी बोलावून घेऊन ते कर्नल रॅटरे यांच्या हाताखाली शहराच्या बंदोबस्तास ठेवले.

पाटण्याजवळील तिरहूतमध्ये असलेला पोलीस जमादार वारिसअली याच्याबद्दल तेथल्या इंग्रज अधिकाऱ्यांना संशय आला म्हणून त्यांनी एकदम त्याच्या घरावर धाड टाकली. तेव्हा तो गया येथील करीम अल्ली नावाच्या क्रांतिकारक पुढाऱ्याला एक गुप्त पत्र लिहीत बसलेला त्यांना दिसला. त्यांनी वारिस अलीला पकडून त्याच्या घरातली सर्व कागदपत्रे ताब्यात घेतली. त्यात इंग्रज सरकारविरुद्ध बरीच पत्रे होती. त्यामुळे त्याला फाशी देण्यात आले. गया येथील करीम अल्लीला पकडण्याचा हुकूम टेलरने दिला. गयेच्या इंग्रज अधिकाऱ्यांनी त्याला पकडण्याचा प्रयत्न केला, तेव्हा तो हत्तीवर बसून पळून गेला. त्या अधिकाऱ्यांच्या हाती लागलाच नाही. पण टेलरने अनेक लोकांना संशयावरुन तुरुंगात डांबले.

पाटण्याचा पीर अली हा मूळचा लखनौचा तो पाटण्यास आला व तेथे त्याने पुस्तक-विक्रीचे दुकान थाटले. तो तर पाटण्यातील मुसलमानांच्या गुप्त संघटनेचा एक

प्रमुख नेता होता. दुकानातली पुस्तके तो स्वतः वाचून त्याची माहिती त्याच्याकडे येणाऱ्या संघटनेच्या सदस्यांना देत असे. पुस्तके वाचीत असतांनाच त्याला इतिहासाचे चांगले ज्ञान झाले. त्यांच्याकडे नेहमी संघटनेच्या मान्यवर सभासदांची ऊठबस असे. मोठमोठ्या लोकांत त्याची मोठी प्रतिष्ठा होती. अनेक तरुण त्याचे अनुयायी होते. ते सुद्धा त्या गुप्तसंघटनेचे सभासद होते. "माझ्या शरीरात रक्ताचा अखेरचा थेंब असे पर्यंत मी इंग्रजांशी लढेन व माझ्या मातृभूमीला परदास्यातून मुक्त करीन." अशी शपथ पीर अलीने प्रत्येक सभासदाला घ्यायला लावली होती.

पाटण्यातील या गुप्त क्रांतिकारक संघटनेच्या नेत्यांच्या घरी रात्रीच्या वेळात सभासदांच्या गुप्त बैठकी होत असत. त्यातल्या तीन मौलवींची नावे कमिशनरला कळली ते तिघे त्या गुप्त संघटनेचे प्रमुख होते व पाटणा शहरातील लोक त्यांना मानीत असत. या तिघा मौलवींना पकडण्यासाठी टेलरने एक डाव टाकला. पाटण्यातील सर्व प्रमुख लोकांची बैठक त्याने आपल्या निवासस्थानी घेतली. देशातील धामधुमीच्या काळात पाटणा शहरात शांतता कशी राखावी, हा त्या बैठकीचा विषय होता. बैठक संपताच सारे लोक तेथून निघाले, तेव्हा त्या तिघां मौलवींना टेलरने थांबविले व तो त्यांना म्हणाला, "देशातील धामधुमीच्या काळात तुम्हां तिघांना मोकळे राहू देणे धोकादायक असल्याने तुम्हांस अटक करण्यात येत आहे." असे हसतमुखान म्हणून टेलरने त्या तिघां मौलवींना नजरकैदेत ठेवून दिले. विचारविनिमयासाठी शहरातील प्रतिष्ठितांना आपल्या निवासस्थानी बोलावून, त्यांना अटक करणे, हा विश्वासघात असतो. विश्वास घात करणे, हे तर इंग्रजांच्या रक्तांतच होते. त्यानंतर त्याने आणखी दोन आदेश जारी केल. एक पाटण्यांतील लोकांना निःशस्त्र करण्याचा व दुसरा रात्री ९ वाजेनंतर कोणीही घराबाहेर न पडण्याचा हे आदेश म्हणजे जखमीवर मीठ चोळणेच होते. आधीच तिन्ही मौलवींच्या अटकेने पाटण्यातील हिंदू-मुस्लिम जनता प्रक्षुब्ध झालेली होती. या आदेशांची अंमलबजावणी सुरु होताच पाटण्यातील मुसलमानांनी जिहाद पुकारला व ते आपापली शस्त्रे घेऊन पीर अलीच्या दुकानासमोर जमू लागले. पीर अलीसह त्या दोनशे जिहादींनी पाटण्याच्या चर्चकडे आपला मोर्चा नेला. चर्चसमोर कर्नल लायल शीख सैनिकांसह त्या मोर्चाला रोखण्यासाठी आला. पीर अलीने आपल्या बंदुकीच्या एकाच गोळीने त्याला ठार केले. ते पाहून त्या राजनिष्ठ शीखांनी त्या जमावावर अंधाधुंद गोळीबार केला. त्यात कित्येक जिहादी मरण पावले. कित्येक जखमी झाले. अनेकांना पकडण्यात आले. त्यांत पीर अलीही होता. त्याच्या हातापायांत इतक्या जोराने बेड्या कसण्यात आल्या की, त्या त्याच्या हातापायाच्या मांसात शिरल्या व त्याच्या हातापायातून रक्ताच्या धारा वाहू लागल्या. त्याला फांशीची शिक्षा सुनावण्यात आली.

त्याला फाशीच्या स्थळाकडे नेले, तेव्हा एक इंग्रज अधिकारी त्याला म्हणाला, ''पीर अली, अजूनही वेळ गेलेली नाही. तू तुझ्या साथीदारांची नावे सांग आणि आपले प्राण वाचव.'' ते ऐकताच पीर अली बाणेदारपणे म्हणाला, ''माणसाच्या जीवनात असेही प्रसंग येतात की, तेव्हा आपले प्राण वाचविणे आवश्यक असते. परंतु अनेकदा असेही प्रसंग येतात की, आपले प्राण वाचविण्यापेक्षा ते नष्ट करुन टाकणेच अत्यावश्यक असते. आता तर प्राणदान करणेच योग्य आहे. यावेळी मृत्यूच्याअधीन होणे, हाच अमर होण्याचा एकमेक मार्ग आहे.'' नंतर पीरअली म्हणाला,

''तुम्ही मला ठार करु शकतां. माझ्यासारखे माझे अनेक देशबांधव तुम्ही फांसावर चढवाल.परंतु तुम्ही आमच्या स्वातंत्र्ययुद्धाची परंपरा तोडूच शकणार नाही. माझ्या मरणानंतर माझ्या शरीरातील रक्ताच्या प्रत्येक थेंबातून हजारो बहादुर क्रांतिकारक स्वातंत्र्य युद्धासाठी निर्माण होतील व तुमचे जुलमी राज्य धुळीला मिळवून सुखा-समाधानाने जगू शकतील.''

पीर अलीची भविष्यवाणी लवकरच खरी ठरली. दानापूरच्या ७ व्या, ८ व्या व ४० व्या पलटणी इंग्रजांविरुद्ध लढण्यास उभ्या राहिल्या व त्या जगदीशपूरच्या बिहारकेसरी कुँवरसिंहाला जाऊन मिळाल्या आणि त्यांनी कुँवरसिंहाच्या नेतृत्वाखाली इंग्रजांना सळोकीपळो करुन सोडले. पीरअलीच्या बलिदानानंतर कमिशनर टेलर म्हणाला, ''पीरअली हा अत्यंत साहसी व दृढसंकल्प वीर होता. तो जेवढा कठोर तेवढाच शांत व संयमी होता. त्याच्या वागणुकीत शालीनता होती. असे लोक आपल्या अजेय निष्ठेमुळे खतरनाक शत्रू बनतात. पण आपल्या दृढनिश्चयामुळे ते प्रशंसेस पात्रही ठरतात.''



# ४९. ठाकुर परगन सिंह

१८५७ चे युद्ध १० मे १८५७ रोजी उत्तरप्रदेशातील मेरठ येथे सुरु झाले. त्याचे लोण बिहारमध्ये पाटण्यापर्यंत पसरले. ३ जुलै १८५७ रोजी पाटणा येथील देशी पलटणी इंग्रजांविरुद्ध बंड करुन उठल्या. दानापूरच्या छावणीतील देशी पलटणी त्यांचे नेते हरकिसनसिंह व रणदलनसिंह यांच्या नेतृत्वाखाली बंडास सज्ज झाल्या. त्यांना जगदीशपूरचे ८० वर्षे वयाचे राजपूत जहागीरदार कुँवरसिंह या महापराक्रमीवीराचे नेतृत्व लाभले. कुँवरसिंहाने सारा बिहारप्रांत इंग्रजांविरुद्ध पेटविला. गनिमी काव्याने इंग्रजांच्या फौजांना हुलकावण्या देत त्यांनी इंग्रजांना सळोकीपळो करुन सोडले. इंग्रजांच्या पलटणी त्यांचा पाठलाग करु लागल्या. कुँवरसिंह कधी पाटण्याकडे, तर कधी सासारामकडे, कधी रेवा संस्थानात, तर कधी जबलपूरात, तर कधी काल्पीकडे, कधी आऱ्याकडे, तर कधी आजमगडकडे भयंकर वेगाने आपल्या सैन्यासह इंग्रजांच्या तोंडचे पाणी पळवत होते.

कुँवरसिंह जेव्हा आजमगडकडे आले, तेव्हा आजमगडजवळील हीरापट्टी गावाचे ठाकुर परगनसिंह यांनी त्यांना फार मोठे सहकार्य दिले. परगनसिंह अतिशय धाडसी, पराक्रमी व स्वातंत्र्यप्रेमी होते. इंग्रजांच्या निरंकुश, शोषक आणि अत्याचारी प्रशासनाविषयी त्यांच्या मनात तीव्र असंतोष होता. इंग्रजांचे राज्य आपल्या देशातून कधी नष्ट होईल, हाच विचार त्यांच्या मनात सतत घोंगावत होता. हीरापट्टीगाव त्या काळात विद्रोही सैनिकांचे व विद्रोही जनतेचे केंद्र बनला होता. आजमगड ताब्यात घेऊन तेथे स्वतंत्र सरकार स्थापन करण्यासाठी हीरापट्टीतले तरुण अधीर झाले होते. ठाकुर परगनसिंहानी विद्रोही तरुणांचे मोठे संघटन केले होते. आजमगडच्या परिसरातील गांवातल्या तरुणांना इंग्रजांविरुद्ध लढण्यास उद्युक्त केले व त्याभागांत इंग्रज सैन्याशी अनेक ठिकाणी सामना देऊन बाबू कुँवरसिंहांना मदत केली.

२१ मार्च १८५८ रोजी कर्नल मिलमॅनने आपल्या सैन्यासह परगनसिंहाच्या विद्रोही सैनिकांवर आक्रमण केले. तेव्हा परगनसिंहांनी त्याचा जबरदस्त पराभव केला व त्याच्या कित्येक सैनिकांना ठार केले. त्याचे सुद्धसाहित्यही हस्तगत केले. परगनसिंहांनी चिरैयाकोट, सदर, सगडी, फुलपूर आदी गांवात विद्रोहाची आग भडकविली. त्यांनी फुलपूर तहसीलवर आणि महाराजगंज ठाण्यावर ताबा मिळविला. कोइलसाही जिंकले. फैजाबादचा पूर्वेकडील भाग त्यांच्या संघर्षाचे क्षेत्र बनला होता.

इंग्रज सरकारने परगनसिंहांना पकडून देणाऱ्यास मोठे इनाम जाहीर केले. परंतु ते कधीही इंग्रजांच्या हाती लागले नाहीत. २६ मे १८५८ रोजी बाबू कुँवरसिंहांचे निधन

झाले. त्यानंतर इंग्रजांनी आजमगडवर ताबा मिळविला. परगनसिंहांचे हीरापट्टी गाव लूटून सर्व घरांना आगी लावून दिल्या. तेव्हा हीरापट्टी गावातील बहुसंख्य कुटुंबे गोरखपूर जिल्ह्यात निघून गेली. हीरापट्टी गावातील विणकर व कलाल बनारसकडे निघून गेले. १ नोव्हेंबर १८५८ रोजी व्हिक्टोरिया राणीचा माफीचा जाहीरनामा सर्वत्र जाहीर झाला. त्यानंतर हिरापट्टीतून निघून गेलेल्या लोकांपैकी काही लोक ५/६ वर्षांनी आपल्या गावात परत आले. इंग्रजांनी विद्रोही सैनिकांच्या जमिनी लिलावात विकून टाकल्या अखेर निराश होऊन ठाकूर परगनसिंह नेपाळात निघून गेले.



# ५०. मौलवी अहमदुल्ला (वहाबी)

वहाबी आंदोलन अरबस्तानमध्ये अब्दुल वहाब यांनी सुरु केले. इस्लामचा पुनरुध्दार हा या आंदोलनाचा उद्देश होता. मक्केला हज यात्रेसाठी जाणाऱ्या हिंदुस्थानातील मुसलमानांनी हे आंदोलन हिंदुस्थानात ही सुरु केले. रायबरेलीचे सैयद अहमदशाह आणि दिल्लीचे शाहवलीउल्ला हे या आंदोलनाचे हिंदुस्थानातले प्रवर्तक होते. हिंदुस्थानात इस्लामच्या पुनरुध्दाराबरोबर इंग्रजांच्या सत्तेविरुद्ध येथल्या मुसलमानांत असंतोष निर्माण करणे हा सुद्धा या आंदोलनाचा प्रमुख उद्देश होता. या आंदोलनाचे हिंदुस्थानातील प्रमुख केंद्र पाटणा हे शहर होते. हिंदुस्थानातील उत्तर भागात हे आंदोलन वायव्य सरहद्द प्रांतापासून बंगाल पर्यंत पसरले, ते अत्यंत गुप्त रीतीने. येथे या आंदोलनाला इतका जोर चढला की, येथल्या वहाबींनी १८३० साली पेशावर हे शहर आपल्या ताब्यात घेतले. त्यामुळे या आंदोलनाचा प्रभाव हिंदुस्थानातील सर्व भागातील मुसलमानांवर पडला. या आंदोलनाच्या अनुयायांना 'वहाबी' असे म्हणत असत. याच आंदोलनातून पुढे जमीयत-उल-उलेमा व खुदाई खिदमतगार या दोन संघटना हिंदुस्थानात उदयास आल्या.

दक्षिण बंगालमध्ये या आंदोलनाचे नेते तीतूमियाँ हे होते. तीतूमियाँ आणि त्यांच्या अनुयायांनी हिंदुस्थानातून इंग्रजी सत्ता नाहीशी करुन टाकण्याची घोषणा केली होती. हिंदुस्थानातील या आंदोलनाची दोन रुपे होती. पहिले सांप्रदायिक व दुसरे क्रांतिकारी. बंगाल मध्ये सर्वसामान्य शेतकरी या आंदोलनात मोठ्या संख्येने होते. जमीनदारांविरुद्ध ते होते. त्यामुळे समृद्ध मुसलमान व त्यांच्या तंत्राने.वागणारे मुल्ला मौलवी या आंदोलनाचे विरोधक बनले. तीतूमियाँच्या नेतृत्वाखाली वहाबींनी इंग्रज सरकारविरुद्ध लढा सुरु केला. इंग्रजांच्यो सैन्याने तो दडपून टाकला. त्यात तीतूमियाँ ठार झाला. त्याच्यानंतर दाघूमियाँ या वहाबींचा बंगालमध्ये नेता बनला.

सैय्यद अहमदशाहचे निधन झाल्यावर त्यांचे प्रमुख शिष्य मौलवी अहमदुल्ला हे या आंदोलनाचे प्रमुख नेते बनले. त्यांनी सन १८६३ मध्ये सिताना येथे विद्रोही वहाबींची छावणी उभारली. त्या काळात बहाबींच्या मनात इंग्रज-विरोधाची भावना प्रबल होती. त्यामुळे इंग्रजांना वहाबींची भीती वाटायची. वहाबींनी इंग्रज शासित हिंदुस्तानला 'दारुल-हर्ब' (काफिरांचा - इस्लामची तत्त्वे न मानणारांचा) देश म्हणून घोषित केले. त्या काळात वहाबींच्या समोर दोनच मार्ग होते. एक इंग्रजांविरुद्ध जिहाद (धर्म-युद्ध) घोषित करणे व दुसरा हिजरत दारुल हर्बमधून निघून जाणे.

मौलवी अहमदुल्ला हे बिहारमधील पाटणा जिल्ह्यातील सादिकपूरचे राहणारे होते. त्यांचे घराणे धनिक व विद्यासंपन्न होते. हिंदुस्थानातील तत्कालीन मुसलमानांत त्यांच्याविषयी फार आदर होता. बंगाल पासून वायव्य सरहद्द प्रांतापर्यंत त्यांचे हजारो अनुयायी होते. मौलवी अहमदुल्ला, त्यांचा सर्व परिवार आणि त्यांचे सगळे अनुयायी इंग्रजांना आपला शत्रू मानीत असत. त्यांनी वायव्य सरहद्द प्रांतातील स्वात घाटीतील डोंगराळ प्रदेशात सिताना या गावी विद्रोह्यांची छावणी उभारली. त्या प्रांतातले हजारो वहाबी मुसलमान त्यांचे अनुयायी होते. या छावणीत दीड ते दोन हजार विद्रोही वहाबी राहात होते. त्यांत बंगाल व इतर प्रांतातीलही होते. ते सर्व सशस्त्र होते. मौलवी अहमदुल्ला त्यांना धन, शस्त्रे वगैरे पुरवीत असत. त्यांच्यासाठी दरवर्षी रमजान महिन्यात रोजांच्यानंतर इतर प्रांतातूनही जकातीच्या रुपाने पुष्कळ पैसा जमा केला जात असे. आणि तो पैसा सिताना छावणीत पाठविला जाई. वहाबींचे हे संघठन सुव्यवस्थितपणे उभारले गेले होते. बंगाल, बिहार राज्यांच्या उत्तर भागातून आधी इंग्रजांची सत्ता उखडून टाकण्यासाठी सारे वहाबी उतावीळ झाले होते. त्यांना पोलिसांचेही साहाय्य होते. कारण त्या भागातील बहुसंख्य पोलिस मुसलमानच होते.

मौलवी अहमदुल्ला व वहाबी आंदोलनाविरुद्ध कारवाई करण्यासाठी इंग्रज सरकारला पुरावा मिळत नव्हता. सन १८५२ मध्ये इंग्रजांच्या रावळपिंडी मधील छावणीतील मुन्शी मोहम्मद अलीच्या नावे आलेली काही पत्रे इंग्रजांच्या गुप्तहेरांच्या हाती पडली. त्यांमधून इंग्रज अधिकाऱ्यांना समजले की, मौलवी अहमदुल्ला वहाबींच्या सिताना छावणीला पैसा व हत्यारे पुरवितात. त्या छावणीत आपले अनुयायी सुद्धा पाठवितात. परंतु मौलवी अहमदुल्लांचा मुसलमानांवरील व्यापक प्रभाव पाहून त्यांना अटक करण्यासाठी इंग्रज सरकार कचरत होते. कारण त्यांना मुसलमान व हिंदू जनतेत फूट पाडण्यासाठी मुसलमानांना हाताशी धरायचे होते. तेव्हा मुसलमानांना दुखविणे त्यांना हितावह वाटत नव्हते.

सन १८५७ च्या क्रांतियुद्धात पाटण्याला विद्रोह प्रामुख्याने मुसलमानांच्या वहाबी संघटनेने सुरु केला. तेव्हा पाटण्याचा कमिशनर टेलर याने पाटण्यात शांतता राखण्यासाठी मौलवी अहमदुल्लासह काही प्रतिष्ठित मुसलमानांना आपल्या घरी बोलाविले व बैठक संपल्यावर मौलवी अहमदुल्ला आणि त्यांच्या दोन प्रमुख साथीदारांना अटक केली. त्यांच्या अटकेच्या निमित्ताने पाटण्यातील वहाबींनी उघडपणे विद्रोह सुरु केला. त्यात पीरअली याने लायल या गोऱ्या अधिकाऱ्याला गोळी घालून ठार केले. विद्रोह दडपून टाकण्यासाठी शिख रेजिमेंटला पाटण्याला आणले होते. विद्रोही वहाबींनी शिख

सैनिकांचा जिद्दीने प्रतिकार केला. ३० वहाबींना अटक झाली. पीरअली सह आठ जणांना फांसावर लटकविण्यात आले. फाशी जातांना पीरअलीने घोषणा केली की, "इंग्रज आमच्या देशातून लवकरच पळून जातील." फांशी जाणाऱ्यात नारिस अली हा एक पोलिस इनस्पेक्टर सुद्धा होता. मौलवी अहमदुल्ला यांना कमिशनर टेलर याने नजरकैदेत ठेवले होते. सरकारने टेलरची बदली केल्यानंतर त्यांना मुक्त करण्यात आले.

सन १८५७ चा स्वातंत्र्य संग्राम हिंदुस्थानातील अन्य भागात पाशवी अत्याचार करुन समाप्त केला. परंतु वायव्य सरहद्द प्रांतात तो नंतरही अनेक वर्षे चालू राहिला. १८५७ च्या स्वातंत्र्यसंग्रामातून निसटलेले मुसलमान व हिंदू विद्रोही यांनी सिताना छावणीत आश्रय घेतला. त्यांनी इंग्रजांच्या ठाण्यांवर व छावण्यांवर अनेक वेळे हल्ले केले. तीन वेळा तर युद्धे केली. पहिली लढाई १८५८ मध्ये शाहीनूनलर्णी येथे झाली. दुसरी ३ सप्टेंबर १८६३ मध्ये मौलवी अब्दुल्ला याच्या नेतृत्त्वाखाली टोपी नावाच्या चौकीवर झाली. तिसरी लढाई सुध्दा मौलवी अब्दुल्ला याच्याच नेतृत्वाखाली नोव्हेंबर १८६३ मध्ये अंबेला गावाजवळील कुटलगडच्या डोंगरावर झाली. या लढाईत १२०० हिंदुस्थानी मुजाहिद व पठाण होते. या तिन्ही लढायांत इंग्रज सरकारला करोडो रुपये खर्च करावे लागले. तरीही इंग्रजांचा विजय झाला नाही. अखेर इंग्रजांनी भेदनीतीचा अवलंब केला. पठाणांना पुष्कळसा पैसा देऊन आपल्याकडे वळवून घेतले. शिक्षित व धनिक मुसलमानांना निरनिराळी पदे देऊन किंवा पदव्या देऊन त्यांच्या मनातली इंग्रज विरोधी भावना दूर केली. नंतर अनेक वहाबी पकडण्यात आले. त्यांच्यावर ब्रिटिश साम्राज्ञीच्या विरुद्ध युध्द केल्याचा आक्षेप ठेवण्यात आला व त्यांना कडक शिक्षा देण्यात आल्या. १८६४ ते १८७२ या काळात वहाबींबर पाच मुकदमे चालविले गेले. १८६५ मध्ये मौलवी अहमदुल्लांना कैद केले. त्यांच्यावर इंग्रज सत्तेविरुद्ध युध्दाची योजना आखणे, सिताना छावणीतील वहाबींना पैसा व शस्त्रे पुरविणे, त्या छावणीत अनेक विद्रोही पाठविणे, तसेच हिंदुस्थानातील इंग्रज सरकार नष्ट करणे असे आरोप ठेवण्यात आले. त्यांच्या विरुध्द अनेक सरकारी साक्षीदार त्यांना भरपूर पैसा देऊन तयार केले. मौलाना अहमदुल्लाचा प्रतिनिधी इलाहीबक्ष हा कैदेत होता, त्यालाही पैसा देऊन मुक्त केले व त्याला सरकारी साक्षीदार बनविले.

मौलवी अहमदुल्ला यांना सेशन कोर्टात मृत्यूदंडाची शिक्षा देण्यात आली. हाय कोर्टात अपील केल्यानंतर ती आजीवन कारावासाची करण्यात आली. त्यांना लगेच अंदमानाच्या तुरुंगात पाठवून दिले. त्यांची चल-अचल सर्व संपत्ती जप्त करण्यात आली. त्यांचे बहुमोल पुस्तकालय सुद्धा जाळून टाकले. अंदमानाच्या तुरुंगातूनही मौलवी

अहमदुल्ला यांनी सिताना छावणी चालू ठेवण्यासाठी गुप्तपणे सतत प्रयत्न केले. ती छावणी १९४७ पर्यंत चालूच राहिली. हे विशेषच म्हणावे लागेल. अमीरखाँ हा मौलावी अहमदुल्लाचा उजवा हात होता. त्यालाही आजन्म कारावासाची शिक्षा देण्यात आली.

इंग्रज सरकाराने अनेक वहाबींना पकडून त्यांना जबरदस्त शिक्षा केल्या. त्यामुळे वहाबींच्यामध्ये इंग्रजाविरूद्ध तीव्र द्वेष निर्माण झाला. परिणामतः अब्दुला नावाच्या वहाबीने २० सप्टेंबर १८७१ रोजी बंगालच्या मुख्य न्यायाधीश जॉन पेन्टन न्यायालयाच्या पायऱ्यांवरून उतरत असतांना त्याचा खून झाला. त्याला फाशीची शिक्षा देण्यात आली. मौलवी अहमदूल्लाचा एक साथीदार मौलवी अब्दुला हा सुद्धा अंदमानच्या तुरुंगात आजन्म कारावासाची शिक्षा भोगत होता. फेब्रुवारी १८७२ मध्ये व्हाइसराय लॉर्ड मेयो हा अंदमानाच्या तुरुंगात भेट देण्यासाठी गेला होता. तेव्हा दोन्ही मौलावींना एक योजनी एक योजना आखली. ती अमलात आणण्यासाठी शेरअली या पठाणाला तयार केले. ८ फेब्रुवारी १८७२ रोजी लॉर्ड मेयो मोटर बोटवर चढत असतांना शेर अलीने त्याची हत्या केली. हिंदुस्थानातील इंग्रजांच्या मुख्य प्रतिनिधीची हत्या करवून मौलवी अहमदुल्ला यांनी इंग्रजांना दाखवून दिले की, आम्ही अखेरपर्यंत तुमच्याशी लढतच राहू. सिताना छावणी स्वातंत्र्यप्राप्तीपर्यंत चालू राहिली. हे त्याचे निदर्शक होय. मेयोच्या हत्येने इंग्लंडचे पार्लमेंट हादरून गेले होते. भारतातील इंग्रज अधिकाऱ्यांची तर पाचावर धारण बसली होती. मुसलमानांचे वहाबी आंदोलन आपल्या देशाच्या स्वातंत्र्यप्राप्तीसाठी पूरकच ठरले व त्याचे सारे श्रेय मौलाना अहमदुल्ला यांनाच द्यावे लागेल.



# ५१. विधा मानिक, जोधा मानिक, मुलू मानिक

सौराष्ट्रातील बाघेर जमात अत्यंत शूर, धाडसी, पराक्रमी व स्वातंत्र्यप्रिय होती. या जमातीचे वास्तव बहुतांशी सौराष्ट्राच्या वायव्येकडील ओखामंडल प्रदेशात होते. ओखामंडलचे प्रमुख स्थान द्वारकानगरी होते. द्वारका ही त्यांची राजधानी होती. द्वारकेजवळील बेटेही त्यांच्या ताब्यात होती. ओखामंडल हे जनपद होते. सन १८०२ मध्ये कंपनी सरकारच्या सैन्याने द्वारकेजवळच्या शंखोधर बेटावरील वाघेरांच्या किल्ल्यावर हल्ला केला. पण कंपनी सरकारचे सैन्य वाघेरांच्या जबरदस्त हल्ल्यामुळे त्या किल्ल्यात प्रवेश करू शकले नाही. म्हणून त्या सैन्याने शंखोधर बेटाच्या किनाऱ्या-वरील वाघेरांची सर्व लहान मोठी जहाजे जाळून टाकली. सन १८०६ मध्ये मात्र कंपनी सरकारच्या सैन्याने शंखोधर बेट पुन्हा हल्ला करून जिंकून घेतले व तो किल्ला हस्तगत केला.

शंखोधर बेट गमावल्याचा सल वाघेर वीरांच्या मनात कायम होता. कंपनी सरकारचा अधिकारी द्वारकानगरीत राहात होता. वाघेर वीरांना सन १८२० मध्ये द्वारकेवर हल्ला करून त्या इंग्रज अधिकाऱ्याला द्वारकेतून पिटाळून लावले. ओखामंडलातील जहागीरदार कंपनी सरकारचे समर्थक होते. वाघेर वीरांनी त्या जहागीरदारांना सुद्धा कधीही सुखाचे जिणे जगू दिले नाही.

पुन्हा काही महिन्यांनी कंपनी सरकारच्या मोठ्या सैन्याने द्वारकानगरीवर योजनापूर्वक हल्ला केला. त्या युद्धात शेकडो वाघेर वीर मारले गेले. त्या सैन्याने द्वारकेमधून वाघेरांना हाकून दिले व ती नगरी आपल्या ताब्यात घेऊन तेथे आपली छावणी कायमची ठेवली. त्यामुळे ओखामंडलातली वाघेर जनता भयंकर खवळली. तिच्यावर नियंत्रण ठेवणे कंपनी सरकारच्या सेनाधिकाऱ्यांना अशक्यप्राय होऊन बसले. त्यामुळे कंपनी सरकारने ओखामंडल प्रदेश गायकवाड सरकारच्या ताब्यात देऊन टाकला. कंपनी सरकारचा प्रतिनिधीही तेथे राहू लागला. गायकवाड सरकारने २०० अरबांचे सैन्य द्वारकेच्या रक्षणासाठी ठेवले.

सन १८४७ साली वाघेरांचा नेता विधा मानिक याने आपल्या वाघेर वीरांसह द्वारकेवर हल्ला केला. त्या लढाईत विधा मानिक याने इंग्रज सेनाधिकारी जॉर्ज लॉख याला गोळी घालून ठार केले. तेव्हा नवानगर व पोरबंदर येथील जहागीरदारांनी आपल्या सैन्यासह विधा मानिकचा पाठलाग केला व त्याला पकडून कंपनी सरकारच्या प्रतिनिधीच्या ताब्यात देऊन टाकले. त्याने विधा मानिकला फांशी देऊन ठार केले. तरीही वाघेर वीर कंपनी सरकारच्या छावणीवर हल्ले करीतच राहिले. त्या दोघां जहागीरदारांना

वाघेर वीरांनी त्रस्त करून सोडले. त्या काळात कंपनी सरकारने ओखामंडल आपल्या ताब्यात घेतले होते. कंपनी सरकारने कित्येक वाघेरांच्या जमिनी जप्त करून त्या जमिनी त्या प्रदेशातील जहागीरदारांना देऊन टाकल्या व त्या वाघेरांना अल्पसे पेन्शन देण्यात येऊ लागले. त्यामुळे वाघेर शेतकरी भयंकर संतापले. तेव्हा कंपनी सरकारने चलाखी करून पुन्हा ओखामंडल गायकवाड सरकारच्या ताब्यात देऊन टाकले.

सन १८५७ मध्ये हिंदुस्थानात स्वातंत्र्ययुद्ध सुरु झाले. वाघेरांच्या नवा नेता जोधा मानिक याने कंपनी सरकार, गायकवाड सरकार व त्याचे जहागीरदार यांच्याविरूद्ध लढा सुरु केला. त्या काळात १८५७ ते १८५९ या तीन वर्षात स्वामी दयांनद सरस्वती नर्मदा परिसर, गुजरात व सौराष्ट्र या प्रदेशात सारखे हिंडत होते. जोधा मानिक याला लढण्यासाठी प्रोत्साहन देत होते. वाघेर जनतेतही इंग्रज सरकारविरूद्ध आपल्या प्रवचनांतून प्रचार करीत होते. त्यामुळे हजारो वाघेर वीर जोधा मानिक याच्या लढ्यात सामिल झाले. त्याचे बळ वाढले.

सन १८५८ मध्ये कंपनी सरकारच्या सैन्याने द्वारकेतील मंदिर तोफा डागून उध्वस्त केली. मूर्तीही फोडल्या. वाघेर वीरांजवळ तोफा नव्हत्या. स्वामीजींनी या संबधात लिहिले आहे की, ''या प्रसंगी वाघेरवीर कंपनीच्या सैन्याशी शौर्याने लढले. त्यांनी अनेक इंग्रजांना ठार केले.''

सन १८५९ मध्ये जोधा मानिक याने सारे ओखामंडल जिंकून घेतले. तेव्हा गायकवाड सरकारने कंपनी सरकारकडे सैन्याची मदत मागितली. कंपनी सरकारने जोधा मानिकचा पराभव करण्यासाठी कर्नल होनर याला मोठे सैन्य देऊन पाठविले. कर्नल होनर याच्याबरोबर मोठे सैन्य आल्याचे पाहून जोधा मानिक आपल्या वाघेर वीरांसह काठेवाडात शिरला व त्याने अबपुरा डोंगरावर आपल्या सैन्याची मोर्चे बांधणी केली. ७ डिसेंबर १८५९ रोजी कर्नल होनरने त्या डोंगराला वेढा दिला. तेथे तुंबळ युद्ध झाले. वाघेर वीर परास्त झाले व जोधा मानिकने त्या डोंगरावरून आपले सैन्य काढून घेऊन जंगलचा आश्रय घेतला.

सन १८६० मध्ये जोधा मानिकने जुनागडच्या नबाबाच्या सैन्याशी व गायकवडांच्या सैन्याशी अनेक लढे दिले आणि त्याने कोडिनार हे महत्वाचे ठाणे जिंकून घेतले. तेथे त्याला भयंकर ताप भरला व त्या तापातच तो हे जग सोडून गेला. तेव्हा त्याची जागा मुलू मानिक या नेत्याने घेतली. देवा मानिक हा त्याचा साथीदार होता. पुन्हा जागा मुलू मानिक याने आपल्या वाघेर वीरांसह अबपुरा डोंगराचा आश्रय घेतला. कंपनी सरकारने

आणखी दोन इंग्रज अधिकारी वाघेरांचा उठाव दडपून टाकण्यासाठी पाठविले होते.

कंपनी सरकारच्या सैन्याने अबपुरा डोंगरावर जबरदस्त हल्ला केला आणि मुलू मानिकला देवा मानिकसह पकडले. त्यांना बडोद्यास आणून तुरुंगात डांबले. ते दोघे सन १८६२ मध्ये युक्तिप्रयुक्तीने तुरुंगातून निसटून ओखामंडलात पळून गेले. त्यांनी पुन्हा आपले वाघेर वीर संघटित केले आणि कंपनी सरकारच्या व गायकवाड सरकारच्या अधिकाऱ्यांवर वारंवार हल्ले करून त्यांना सळो की पळो करून सोडले.

सन १८६८ मध्ये कंपनी सरकारच्या अधिकाऱ्यानी सुचविल्याप्रमाणे जुनागड, गोंडल, नवानगर व पोरबंदर येथील जहागीरदारांनी एकजूट करून दोन लाख रुपये जमविले. ती रक्कम त्यांनी वाघेरांना सहाय्य करणाऱ्या छोट्या जमीनदारांकडून दंड म्हणून वसूल केली होती. या रकमेतून त्यांनी एकत्रितपणे सैन्य उभारले व ते सैन्य कंपनी सरकारच्या सेनाधिकाऱ्याकडे सुपूर्त केले. मुलू मानिक व देवा मानिक यांनी तोबरच्या डोंगरावर मोर्चेबांधणी केली होती. कंपनी सरकारच्या मोठ्या सैन्याने त्या डोंगराला चहुबाजूंनी वेढले. तुंबळ युद्ध तेथे झाले. त्यात कॅप्टन लाटूश मारला गेला व मेजर रेनाल्डस घायाळ झाला. डोंगराच्या एका बाजूला नवानगरचे सैन्य होते. त्या सैन्याला लढण्यासाठी इंग्रज सेनाधिकाऱ्यांनी बक्षिसे देण्याची लालूच दाखविली. पण त्या सैन्याने लढण्यास नकार दिला कारण आपल्याच लोकांविरूद्ध शस्त्र उचलणे त्यांना योग्य वाटले नाही. ते पाहून मुलू मानिक व देवा मानिक आपल्या वाघेरवीरांसह डोंगराच्या त्या बाजूने निसटून पळून गेले.

सन १८६४ मध्ये पोरबंदरच्या जहागीरदाराच्या साह्याने कंपनी सरकारच्या सैन्याने मुलू मानिक व देवा मानिक यांना कोंडीत पकडले. त्या वेळच्या युद्धात मुलू मानिक ठार झाला व देवा मानिक जखमी होऊन पळून गेला. त्याचे पुढे काय झाले, हे अज्ञात आहे. अशा रीतीने वाघेर वीरांच्या हा दीर्घकाळ चाललेला लढा सन १८६८ मध्ये मोडीत निघाला. वाघेर वीरांना आपल्या प्रदेशातील जनतेचा पाठींबा असल्यामुळेच ते कंपनी सरकारच्या व कंपनीच्या मांडलीक राजे-जहागीरदांच्या सैन्याशी दीर्घ काळ लढत राहिले, हे निर्विवाद होय. आजही या वाघेर वीरांच्या शौर्यगाथा सौराष्ट्रातील जनता मोठ्या भक्तिभावाने आपल्या लोकगीतांतून गात आहेत.



# ५२. नरगुंदकर भावे

हिंदू धर्मात दत्तक घेण्याची प्रथा पूर्वापारपासून चालत आलेली आहे. ती एक हिंदूची धार्मिक बाब आहे. धार्मिक विधीनुसारच दत्तक घेतला जातो. असा दत्तक नामंजूर करून अनेक राज्ये डलहौसीने आपल्या ताब्यात घेतली. हा हम करे सो कायदा उपटसुंभ इंग्रजांनी हिंदुस्थानात सुरु करून आपले साम्राज्य हिंदुस्थानात वढविले. हीच गत नरगुंद संस्थानचे राजे बाबासाहेब भावे यांची इंग्रजांनी केली व त्यांचे संस्थान खालसा केले.

नरगुंदचे संस्थान धारवाड जिल्ह्यात होते. त्या लहानशा संस्थानचे राजे बाबासाहेब भावे यांचा एकुलता एक मुलगा सन १८४३ मध्ये वारला. तेव्हा दक्षिण महाराष्ट्राचा पोलिटिकल एजंट मॅन्सन याला दत्तक घेण्याची परवानगी भाव्यांनी मागितली. ती त्याने फेटाळून लावली. त्यामुळे बाबासाहेब भावे फारच निराश झाले. सन १८५७ मध्ये उत्तर हिंदुस्थानात इंग्रजांविरुद्ध मोठ्या प्रमाणात उठाव झाला. त्याचे लोण दक्षिण भारतातही पसरले. सोलापूर, कोल्हापूर, सांगली, मिरज, जमखिंडी इत्यादी संस्थानांच्या राजांशी पत्रव्यवहार करुन नरगुंदच्या भाव्यांनी त्यांच्याकडून मदत मागितली. धारवाड जिल्ह्यातील प्रसिद्ध क्रांतिकारक भीमराव मुंदरगी यालाही आपलेसे करुन घेतले. धारवाडच्या कलेक्टरला याचा सुगावा लागू दिला नाही. २५ मे १८५८ रोजी नरगुंदकर भाव्यांनी कंपनी सरकार विरुद्ध उठाव केला, तेव्हा तो कलेक्टर चकीतच झाला. त्याला कधीही वाटले नव्हते की, भावे एवढे धाडस करतील.

कलेक्टरने लगेच मॅन्सला आपले सैन्य घेऊन भाव्यांचा बंदोबस्त करण्यास पाठविले. रामदुर्गचे राजे नरगुंदकर भाव्यांचे धाकटे बंधू होते. ते इंग्रजांना सामील झाले होते. मॅन्सने आपल्या दीडशे स्वारांसह नरगुंदवर चाल केली. बाबासाहेबांना हेरांवी ते आधीच समजे होते. त्यांनी सहाशे स्वारांसह मॅन्सनवर हल्ला केला. बाबासाहेबांना पाहून मॅन्सन घबरला व एका देवळात लपून बसला. त्याला हुडकून काढ़ले व विष्णू कुलकर्णी या स्वाराने पकडले. दोघांचे मल्लयुद्ध झाले. विष्णूने त्याला लोळाविले. तेव्हा तो आपल्या प्राणांची भीक मागू लागला. पण लगेच त्याचा शिरच्छेद करण्यात आला.

भीमराव मुंदरगी हा सुद्धा आपल्या २५०० साथीदारांसह बाबासाहेबांच्या साह्यास धावून आला. मॅन्सनच्या शिपायांचा त्यांनी धुव्वा उडविला. मॅन्सनचे शिर नरगुंदच्या वेशीवर ३० मे १८१८ रोजी टांगण्यात आले. मॅन्सनच्या खिशात दोन पत्रे सापडली. त्यात लिहिले होते की, " किल्ल्यातील कोठारात असलेल्या दारूच्या साठ्यात शेण व बाजरी मिसळून टाकली आहे." बाबासाहेबाच्या कारभाऱ्याचे ते पत्र होते. त्यांचा कारभारीच इंग्रजांना फितूर झाला होता.

मॅन्सन ठार झाल्याने इंग्रज हादरून गेले. लगेच मालकम मोठे सैन्य घेऊन नरगुंदवर चालून आला. त्याने नरगुंदला वेढा दिला. आता आपली धडगत नाही हे पाहून बाबासाहेब वेषांतर करून किल्ल्यातून निसटले. त्यांची माता व पत्नीही किल्ल्यातून बाहेर पडल्या. दहा मैलावरील मलप्रभा नदीच्या काठी आपल्या अंगावरील सर्व दागिने एका ब्राह्मणाला दान करून त्यांनी त्या नदीत जलसमाधी घेतली. त्यांची प्रेते बुदीहाल गावी नदीतीराला लागली. तेथल्या लोकांनी त्यांचा विधिपूर्वक अग्निसंस्कार केला.

नरगुंदवर इंग्रजांचा कब्जा झाला. बाबासाहेबांच्या सेनापतीसह १०/१२ लोकांना इंग्रजांनी फासावर चढविले. बाबासाहेबांना पकडून देणाऱ्यास दहा हजार रुपयांचे बक्षीस इंग्रजांनी जाहीर केले. बाबासाहेब तोरंगळ या गावच्या पाटलाच्या घरी आले. फ्रॅंक सूटर यांच्या मागावर होताच. बाबासाहेब तोरंगळला आहेत, ही बातमी त्याला समजली तोरगळला येऊन त्याने आपल्या सैनिकांसह त्या पाटलाच्या घराला गराडा घातला. थोडी झटापट झाली. बाबासाहेब पकडले गेले. त्यांना २ जून १८५८ रोजी बेळगांवला आणले त्यांच्यावर अनेक आरोप ठेवून खटला भरला. खटल्याचे नाटक झाल्यावर त्यांना फाशीची शिक्षा सुनविण्यात आली. १जून १८५८ रोजी त्यांना बेळगावच्या जनतेसमोर उघड्यावर फाशी देण्यात आली. नरगुंदचे संस्थान खालसा करण्यात आले.

बाबासाहेबांचा साथीदार भीमराव मुंदरगी याने कोयलच्या किल्ल्यात आसरा घेतला होता. इंग्रजांना ते समजले. लेफ्ट-केरने मोठ्या सैन्यानिशी कोयलच्या किल्ल्याला वेढा दिला. अटीतटीची लढाई झाली. त्या लढाईत भीमराव मारला गेला. त्याचे १५० साथीदार पकडले गेले. इंग्रजांनी त्यांना निरनिराळ्या शिक्षा दिल्या. अशा रीतीने नरगुंदचा उठाव दडपून टाकण्यात आला. अशा गुंडगिरीनेच इंग्रजांनी अनेक संस्थाने आपल्या ताब्यात घेऊन हिंदुस्तानात साम्राज्य-विस्तार केला आणि दडपशाही करुन हिंदुस्तानचे आर्थिक शोषण करुन हा देश कंगाल करुन सोडला.



# ५३. भीमराव देसाई

सन १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धात दक्षिण हिंदुस्थानातील दक्षिण महाराष्ट्र व उत्तर कर्नाटक या प्रदेशाचाही मोठा सहभाग होता. या प्रदेशातील जनता असंतोषाने पेटली होती. या प्रदेशातील अनेक ठिकाणी त्या काळात उठाव झाले. धारवाड जिल्ह्यात मुंडरगीच्या भीमराव देसायानेही तसा उठाव केला होता. धारवाड जिल्ह्यातील मुंडरगीचा रंगराव नंदगोडा यांचा मुलगा भीमराव देसाई. तो बेल्लारी जिल्ह्यात तहसीलदार होता. गैरवर्तणुकीच्या कारणावरून त्याला सरकारने बडतर्फ केले. त्यामुळे तो इंग्रज सरकारवर चिडला होता. सोरटूरचे देसाई, डुंबलचा देसाई, कंचनगौडा, हम्मिगीचा देसाई, गोवनकोणचा नाडगौडा इ. लोक त्याचे चांगले मित्र होते. हे सर्वजण इंग्रज सरकारविरूद्ध होते. या प्रदेशातील अनेक देसायांवर व जमीनदारांवर भीमराव देसाई व नरगुंदकर भावे यांचा चांगला प्रभाव होता. भीमराव व भावे यांच्या लोकांकडून इंग्रजाविरूद्ध प्रचार सुरु झाला. भीमराव धाडसी व पराक्रमी असला तरी एकसूत्रपणे काम करणे त्याच्या गावीही नव्हते. धारवाडच्या अतिश्रीमंत व्यापारी बाळाप्पा जायप्पा यांच्याकडे भीमरावाची उठबस असे. हेबळीचे जहागीरदारही भीमारावाचे मित्र होते. हे सारे इंग्रज सरकारला गुप्तहेरांकडून समजत होते. म्हणून बाळप्पा व हेबळीचे जहागीरदार यांच्यावर इंग्रजांच्या गुप्तहेरांनी पाळत ठेवली होती. बेल्लारी, कोप्पल भागातील लोकही भीमरावाला मानीत असत. भीमारावाची पत्नी जिवाबाई हिचे माहेर कोप्पल होते.

बल्लारीहून धारवाडच्या कलेक्टरला कळविण्यात आले की, भीमराव देसाई रंगाराव नाडगौडा याला हाताशी धरून माणसे जमवीत आहे. डुंबल तालुक्यात तलाव बांधण्यासाठी ही माणसे आपण गोळा करीत आहोत, असे ते सांगतात. पण त्यांचा सरकारविरूद्ध उठाव करण्याचा बेत आहे. असे कळते.''

धारवाडच्या कलेक्टरने भीमराव देसाई व सोरटूरचा देसाई यांना बोलावून घेऊन त्यांच्याशी बोलणी केली-तेव्हा भीमराव बेमालूमपणे सफाई केली. खरे तर बादशहा बहादुरशाह जफर याला बादशाहीचे अधिकार मिळावे आणि नानासाहेब पेशवे यांना पेशवेपदाचे अधिकार प्राप्त व्हावे, हाच उठावाचा मुख्य उद्देश होता. भीमरावामुळे बेल्लारी जिल्ह्यात सारावसुलीला अडथळा येतो आहे, असे धारवाडच्या कलेक्टरला कळविण्यात आले होते. भीमराव मोठ्या प्रमाणात शस्त्र-संग्रह करीत आहे, असेही कलेक्टरला समजले होते. म्हणून त्याने पोलिस अधिकाऱ्यांना हुकूम केला होता की, भीमरावाच्या कारवायांवर सतत कडक नजर ठेवावी.

मे १८५८ च्या शेवटच्या आठवड्यात भीमरावाने उठाव केला. काही खेडी लुटली. व तो तुंगभद्रा खोऱ्यात गेला. हम्मिगी या गावी पोलिसांनी शस्त्रांचा मोठा साठा ताब्यात घेतला. भीमरावाने केंचन गौडाला बरोबर घेऊन शस्त्रसाठ्याचे रक्षण करणाऱ्या पोलिसांवर हल्ला केला. व त्याने तो शस्त्रसाठा ताब्यात घेतला. नंतर सरकारी खजिनाही लुटला. भीमरावाने सैन्य वाढू लागले. तो गदगवर चालून गेला. त्याने सरकारी कचेऱ्या उध्वस्त करून टाकल्या. टेलिग्राफच्या तारा तोडून टाकल्या. भीमराव व केंचन गौडा यांचा पाठलाग पोलिसांची पथके करीत होती. कोप्पळचा पोलिस अधिकारी त्याच्या मागावरच होता. त्याने भीमरावाच्या काही सैनिकांना अटक केली. भीमरावाने कोप्पळवर हल्ला केला. कोप्पळचा किल्ला त्याने ताब्यात घेतला. आता त्याने उघडपणे उठाव पुकारला. बेल्लारी, धारवाड, रायचूर येथून इंग्रज सैन्य कोप्पळवर चालून गेले. त्या सैन्याने कोप्पळच्या किल्ल्याला वेढा दिला. इंग्रजांकडून व किल्ल्यातून परस्परांवर गोळीबार सुरू झाला. मेजर ह्यूजस याने आपल्या दुताकरवी भीमरावाला निरोप पाठविला की, भीमरावाने शरण यावे व किल्ला मोकळा करावा. भीमरावाने उत्तर दिलेच नाही. लढण्यासाठी तो तत्पर होता.

१ जून १८५८ रोजी कोप्पळच्या किल्ल्यावर चहूबाजूंनी हल्ला केला. हा किल्ला अत्यंत मजबूत होता व त्याला दुहेरी तटबंदी होती. भीमरावाच्या सैनिकांनी चांगली झुंज दिली. पण त्याच्याजवळ तोफा नव्हत्या. तरीही त्याचे सैनिक प्राणपणाने लढले. इंग्रजांनी तोफांचा मारा करून किल्ल्याच्या तटाला खिंडार पाडले व भीमरावाला शरण येण्यास सांगितले. पण त्याने शरण न येता लढा चालूच ठेवला. किल्ल्याच्या प्रवेशद्वाराच्या पायऱ्यांवर लढत असतांना भीमराव व केंचन गौडा ठार झाले. त्यांचे कित्येक सैनिक मारले गेले. १५० सैनिकांना पकडण्यात आले. काही सैनिक किल्ल्यातून पळून गेले. तिकडे नरगुंदचे भावेही हरले. कोप्पळ व नरगुंद इंग्रजांनी जिंकल्यानंतर डुंबरचे श्रीनिवास देसाई, मुंडरगीचे भीमराव नाडगौडा, गोवेनकोपचा केंचनगौडा, नरगुंदचे भावे यांच्या सर्व जमिनी जप्त करण्यात आल्या.

भीमरावाला दोन बायका होत्या. एक जिवाबाई व दुसरी वेंकूबाई. भीमरावाला रंगराव नावाचा मुलगा होता. त्यांना बेनेहल्ली गावात कायमचे वास्तव्य करण्यास सांगण्यात आले व पेन्शन देण्यात आले. भीमरावाचा व नरंगुदकर भाव्यांचा पाडाव पाहून या गावातील उठाव थंड पडला.

पकडलेल्या सैनिकांवर दावे दाखल करण्यात आले. त्यांचेपैकी ७५ सैनिकांना तोफेच्या तोंडी दिले. भीमरावाचा गुमास्ता भीमाप्पा यालाही तोफेच्या तोंडी देण्याचा निर्णय घेण्यात आला. तेव्हा त्याने इंग्रज अधिकाऱ्यांना सांगितले की, मी या उठावाची

सर्व माहिती आपणास द्यायला तयार आहे. तेव्हा त्याची शिक्षा ताप्तुरती स्थगित करण्यात आली. रायचूरचा डेप्युटी कमिशनर टेलर याच्या समोर ४ जून १८५८ रोजी भीमाप्पाची जबानी घेण्यात आली. त्याने उठावासंबंधीची सगळी माहिती आपल्या जबानीत सांगून टाकली. त्यानंतर त्याला काही वर्षांच्या कैदेची शिक्षा देण्यात आली. अशा रीतीने या भागातील उठाव मोडून काढण्यात आला. भीमराव देसाई व नरगुंदकर भावे यांच्याकडे नानासाहेब पेशव्यांचे दूत नानासाहेबांची उठावाची पत्रे घेऊन आले होते. यावरुन सिद्ध होते की, १८५७ चे स्वातंत्र्य युद्ध नियोजनपूर्वक आखले गेले होते. नानासाहेबांची व बहादुरशाह जफर यांची पत्रे सर्व राजे-रजवाड्यांना, जहागीरदारांना पाठविण्यात आली होती. पण ठरलेल्या ३१ मे १८५७ च्या आधीच उठाव सुरु झाला व सारी योजनाच फिसकटली. या युद्धात हिंदु-मुस्लिमांचे ऐक्य इंग्रजांना दिसून आले. म्हणून त्यांनी या दोन्ही धर्मात फूट पाडण्याचे सत्र सुरु केले.



# ५४. वेंकप्पा नाईक

१८५७ चा स्वातंत्र्यसंग्राम प्रथम उत्तर भारतात सुरु झाला. दक्षिणेतही रंगो बापूजीने बहुतेक संस्थानिकांना इंग्रजांविरुद्ध चेतविले होते. नानासाहेब पेशव्यांचे दूतही दक्षिणेतील प्रत्येक संस्थानिकाला त्याचसाठी गुप्तपणे भेटत होते. विजापूर व सोलापूर या जिल्ह्यांच्या सरहद्दीवर निजामाच्या राज्यात सोरापूर हे लहानसे संस्थान हाते. त्या संस्थांनात बेडर जमात बहुसंख्येने राहात होती. वेंकप्पा नाईक हा त्या संस्थानचा राजा होता. तसा तो वयाने लहानच होता. पण शूर व स्वाभिमानी होता. इंग्रज सरकारने आपल्यावर अन्याय केल्याचे त्याच्या मनात डाचत होते. १८५७ मध्ये तो सोरापूरच्या गादीवर बसला होता.

निजामाने इंग्रजांकडून तो पर्यंत ६२ लाख रुपयांचे कर्ज घेतलेले होते. निजामाला ते कर्ज फेडता येईना, म्हणून इंग्रज सरकारने त्याचा ५२ लाख रुपये उत्पन्नाचा प्रदेश आपल्या ताब्यात घेतला होता. त्यात सोरापूरचे संस्थानही होते. कर्ज फेडीसाठी निजाम सोरापूरच्या राजाकडून ३ लाख रुपये घेऊ लागला. कर्ज निजामाचे व ते फेडायचे सोरापूरच्या राजाने! हा न्याय कसा? सोरापूरचा वेंकप्पा नाईक तरुण व स्वाभिमानी त्याने आपले संस्थान निजामाच्या व इंग्रजांच्या तावडीतून सोडवून स्वतंत्र करण्याचे ठरविले. आपल्या मेव्हण्याला त्याने इंग्रजांच्या ठाण्यावर हल्ला करण्यास पाठविले. पण त्या हल्ल्यात त्याच्या मेव्हण्याला पराभव पत्करावा लागला. त्याची बोच व्यंकप्पाला होतीच. दक्षिणेतील संस्थानिकांनीही वेंकप्पाला उठाव करण्यासाठी प्रोत्साहन दिले. त्यामुळे वेंकप्पा अधिकच उत्साहित झाला आणि त्याने उठावाची तयारी सुरु केली.

आपल्या सैन्यात त्याने ६०० अरब, ४०० रोहिले आणि ५० परदेशी यांची भरती केली. त्याचे स्वतःचे सैन्य होते, ते वेगळेच. त्याचे एकूण सैन्य पाच ते सहा हजार होते. या सैन्याच्या लहान लहान तुकड्या त्याने आपल्या राजवाड्याच्या आसपास ठेवल्या. आपला शिक्षक कॅ. मेडोज टेलर यांच्या संरक्षणासाठी त्याने २५ रोहिल्यांची तुकडी नियुक्त केली.

कॅ. डेव्हीडसन या रेसिडेंटला ही सैन्यभरती खटकली. त्याने वेंकप्पाला विचारले, "एवढे सैन्य कशासाठी? लगेच ते सैन्य कमी करण्यास वेंकप्पाला फर्मावले. वेंकप्पाचे स्वत्व त्यामुळे दुखावले गेले. परंतु मूग गिळून तो शांत झाला आणि नव्याने भरती केलेल्या सैन्याच्या लहान लहान तुकड्या आपल्या राज्यात खेडोपाडी ठेवून दिल्या. एवढे केल्यानंतर कोल्हापूर, मुधोळकडून बातम्या आणण्याचे काम वेंकप्पाने केसोराम, महंमद हुसेन व कस्तुरीराज यांच्याकडे सोपविले. बातम्यांची देवाण-घेवाण चालूच होती. आता

हल्ला करण्यास हरकत नाही, असे पाहून राजाने राजवाड्यात राहूनच सैन्याला इशारा केला. खेडोपाडी विखुरलेले सैन्य एक दिवशी संध्याकाळी धावून आले व त्या सैन्याने कॅप्टन विंडहॅम च्या छावणीवर एकदम हल्ला केला. त्यात कॅम्पबेल ठार झाला. न्यू बेरी गंभीर जखमी झाला. इंग्रजांनी अधिक सैन्य आणवून वेंकप्पाच्या राजवाड्याला घेरले. वेंकप्पाला अटक केली.

वेंकप्पावर खटला भरला. आणि त्याला फाशीची शिक्षा सुनावली. कॅ. मेडोज टेलर हा वेंकप्पाचा शिक्षक होता. त्याने रदबदली करण्याचा प्रयत्न केला. राजाने त्याला एक निवेदन दिले. त्या निवेदनात त्याने उठावात सामील असलेल्या लोकांची व उठावाशी संबंध असलेल्या लोकांची नावे सांगून टाकली.दक्षिण महाराष्ट्रातील सर्व संस्थानिक आणि विशेषतः जमखिंडीकर यांच्या नावाचा उल्लेख त्यात प्रामुख्याने होता. जतच्या जहागीरदाराचाही संबंध या उठावाशी होता, असे त्याने सांगितले. मेडोज टेलरच्या मध्यस्थीने वेंकप्पाची फाशीची शिक्षा टाळली, पण त्याला काळया पाण्याची शिक्षा देण्यात आली त्याला काळया पाण्याच्या शिक्षेसाठी नेत असता, त्याने त्याला नेणाऱ्या इंग्रज अधिकाऱ्याच्या कमरेस लटकवलेले पिस्तुल सहज ओढून घेतले आणि तात्काळ ते पिस्तुल स्वतःच्या हृदयावर झाडून घेऊन प्राणोत्क्रमण केले. काळया पाण्याची शिक्षा शरीराचा कण न् कण झिजवत आणि मनाला कुरतडत लाजीरवाणे जीवन जगण्यापेक्षा मरण पत्करणेच श्रेयस्कर असे त्या स्वातंत्र्यवीराला वाटले असावे. १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धात अशा किती वीरांनी आपल्या मातृभूमीला आपले रक्त अर्पण केले. त्याला गणतीच नाही. धन्य ते वीर! आणि धन्य त्यांची स्वातंत्र्य लालसा! व्यंकप्पा नाईकच्या उठावावरून दिसून येते की, दक्षिण महाराष्ट्र व उत्तर कर्नाटक या प्रदेशात सगळीकडे असंतोष पसरला होता. कोल्हापूर, नरगुंद, कोप्पल, मिरज, रायचूर व सोरापूर ही उठावाची केंद्र होती. ८ फेब्रुवारी १८५८ च्या सोरापूरच्या युद्धामुळे कर्नाटकातील विद्रोही नेत्यांचे बेत फसले. सोरापूरच्या उठावात सामील असलेल्या बेडर, अरब व रोहिले यांना पकडण्यात आले व त्यांना जबर शिक्षा ठोठाविण्यात आल्या. सोरापूरचे संस्थान खालसा करण्यात आले व ४ मार्च १८६१ रोजी ते निजामाच्या राज्यात सामील करण्यात आले.



# ५५. काजीसिंग नाईक

भिल्ल ही डोंगर-दऱ्यांत, जंगलात रहाणारी आदिवासी जमात. इतिहास काळात निरनिराळ्या राजांच्या पदरी रक्षकाचे काम या जमातीच्या लोकांनी केले होते. शिवाजी महाराजांनीही गडकोटांच्या रक्षणासाठी अनेक भिल्लांची नेमणूक केली होती. नेहमीच जंगलात यांचे वास्तव असल्याने या जमातीचे लोक धाडसी, काटक व बलदंड असत. तसेच ते शूरही होते. कंपनी सरकारनेही या जमातीचे काही लोक आपल्या सैन्यात घेतले होते.

काजीसिंग नाईक हा कंपनी सरकारकडे सन १८३१ ते १८५१ पर्यंत नोकरीस होता. सिध्वा ते शिरपूर या ४० मैलांच्या जंगलातून जाणाऱ्या रस्त्यावरील भिल्ल पोलीसांवर देखरेख करण्याचे काम त्याने २० वर्षे इमाने-इतबारे चोखपणे बजावले होते. त्याच्या नोकरीच्या काळात या रस्त्यावर चोरी किंवा खून अथवा लूटमार कधीही झाली नव्हती. दरोडेखोरांचा पाठलाग करण्यात त्याने अनेक इंग्रज पोलीस अधिकाऱ्यांना बहुमोल साहाय्य दिले होते. सन १८५१ मध्ये या रस्त्यावर चोरी करणाऱ्या दरोडेखोरांनी पकडले व त्याला खूप मारले. चुकून एक घाव वर्मी बसला व तो दरोडेखोर मरण पावला. काजीसिंग खुनी ठरला. त्याला सरकारने १० वर्षांची सक्तमजुरीची शिक्षा ठोठावली व तुरुंगात डांबले. नंतर त्याच्या मागच्या २० वर्षाच्या सेवेचा विचार करून सन १८५५ मध्ये कैदेतून मुक्त केले.

काजीसिंगाने पुन्हा आपणास नोकरी द्यावी, म्हणून खूप प्रयत्न केले. पण त्याचा काहीही उपयोग झाला नाही. मे १८५७ मध्ये उत्तर हिंदुस्थानातून बंडाच्या बातम्या दक्षिणेकडे येऊ लागल्या. मुंबईचा गव्हर्नर व त्याचे इंग्रज अधिकारी ते बंड आपल्या प्रदेशात पसरू नये, म्हणून दक्षतेचे उपाय योजू लागले. भिल्ल लोकही उठाव करतील व सोरापूर सिध्वा मार्ग सुरक्षित राहणार नाही, अशी भीती त्यांच्या मनात निर्माण झाली. त्यासाठी काजीसिंगाला त्याच्या पूर्वीच्या नोकरीत घेणे इंग्रज सरकारला अत्यावश्यक वाटले. आणि जून १८५७ मध्ये त्याला सरकारने नोकरी दिली. त्यालाही उत्तरेकडे इंग्रज सरकारविरूद्ध देशी पलटणी, अनेक राजे लढत असून इंग्रज सरकाराचा पराभव होत आहे अशा बातम्या समजल्या होत्या. इंग्रजांची सत्ता आता संपत आली आहे, असे त्याला वाटू लागले.

भिल्लांनाही इंग्रज सरकारविरूद्ध उठाव करावा, असे त्याला उत्तरेकडून निरोप आला. आता आपणांस आपला पूर्वापार चालत आलेला लुटमारीचा उद्योग करावा लागणार, असे त्याच्या मनाने घेतले. तो त्या नोकरीवर असताना एके प्रसंगी कॅप्टन

बर्च व त्याचा रिसालदार यांच्याकडून शिव्या खाव्या लागल्या व तो मनातून पेटून उठला. त्याने सरकारच्या त्या नोकरीवर लाथ मारली आणि आपली माणसे संघटीत केली. इंग्रज सरकारची ठाणी लुटण्याचे सत्र सुरु केले.

होळकर सरकारच्या सैन्यातून काढून टाकलेले सैनिक, झांशीच्या युद्धात पराभूत झालेले शिपाई दक्षिणेकडे सातपुड्यात आश्रयाला आले. ही तर भिल्लभूमीच होती. ते सैनिक काजीसिंगाला येऊन मिळाले. त्याचे बळ वाढले. गावोगावच्या जमीनदारांच्या, सावकरांच्या घरांवर धाडी घालणे, अफूच्या गाड्या लुटणे, सरकारी खजिने हस्तगत करणे यांचा धूमधडाका काजीसिंगाने सुरु केला.

सप्टेंबर १८५७ मध्ये सातपुड्याच्या पूर्व भागातील भीमा नाईकाने आपल्या भिल्ल सहकाऱ्यांसह लेफ्ट. केनेडी याच्या तुकडीवर निकाराचा हल्ला चढवून त्याला पळवून लावले. त्याने खानदेशाच्या पोलीस अधिकाऱ्यांना दम भरला की, तुम्ही इंग्रज सरकारला साथ देत आहांत, याचे परिणाम तुम्हाला भोगावे लागतील. मी दिल्लीच्या बादशहाच्या हुकुमावरून तुम्हाला बाजावून ठेवतो. या भीमा नाईकाला पडकडण्यासाठी इंग्रज सरकारने एक हजार रुपयांचे बक्षीस जाहीर केले होते. त्यानंतर तो काजीसिंगाला आपल्या सहकाऱ्यांसह येऊन मिळाला. २९ ऑक्टोबर १८५७ रोजी काजीसिंगाने भीमा नाईकासह दीड हजार भिल्ल जमवून शिरपूर लुटले. त्यांच्या पाठलाग कॅप्टन बर्चने ५६ मैलांपर्यंत केला. पण ते साहे घनदाट आरण्यात निघून गेल्याने निराश होऊन बर्चला हात हालवीत परत जावे लागले. त्यानंतर काजीसिंग व भीमाने खानदेशातील तीन गावे लागोलग लुटली.

सिन्नर भागातून ४०० भिल्ल त्यांना सामील होण्यासाठी येत आहेत, अशी बातमी जिल्हाधिकाऱ्याला लागल्यावर त्याने खानदेशात अधिक कुमक पाठविण्यास सरकारला कळविले. ती कुमक येण्याआधीच काजीसिंग व भीमा यांनी सिध्वा घाटात सात लाखांच्या सरकारी खजिना लुटला. लुटीत सामील झालेल्या शेकडो भिल्लांची चंगळ झाली. त्या लुटीत त्या खजिन्याच्या रक्षकांनीही हात धुवून घेतला. त्यानंतर त्यांनी अफूने भरलेल्या ६० बैलगाड्या लुटल्या. सरकारी पोस्ट लुटले. टेलिग्राफच्या ताराही तोडून टाकल्या. त्यानंतर त्यांना धारच्या फौजेतून मुक्त झालेले दोन हजार विलायती पठाण येऊन मिळाले.

भिल्लांच्या उपद्रव सारखा वाढत चालल्याचे पाहून इंग्रज सरकारच्या पलटणी त्यांचा बीमोड करण्यासाठी जंग जंग पछाडत होत्या. मेजर इव्हान्सने काजीसिंग, भीमा, दौलतसिंग यांच्या भिल्लांच्या मोठ्या जमाबावर निकाराचा हल्ला चढविला. इव्हान्सच्या

सेनेला भिल्लांनी चोपून मार दिला. अंबापाणीच्या या लढाईत कॅ. बर्च, लेफ्ट. बेसवी हे जखमी झाले. ६५ भिल्ल कामी आले व १७० भिल्ल जखमी झाले. ११ एप्रिल १८५८ ची ही लढाई इंग्रजांना फार महाग पडली. त्यांचे ही कित्येक शिपाई ठार झाले. कित्येक जखमी झाले. हार खावी लागली, ती वेगळीच. या लढाईत मात्र ६२ भिल्ल पकडले गेले. त्यापैकी ५७ जणांना गोळ्या घालून मारण्यात आले. भिल्ल इतक्याच त्यांच्या बायकाही धोकादायक आहेत, हे इंग्रज सरकारला कळून आले, तेव्हा ४०० भिल्लीणींना सरकारने पकडून ओलीस ठेवले. काजीसिंग, भीमा इ. भिल्लांचे नेते सापडेपर्यंत सरकारने त्यांना पकडून ठेवले होते. याचा बदला नगर जिल्हातील भिल्लांनी घेतला.

नगर जिल्ह्यातले ४०० भिल्ल नांदगांव जवळच्या जंगलात एकत्र जमले. ते समजताच लेफ्ट. स्टुअर्ड ३०० सैनिकांसह नांदगांवला आला. नदीकाठच्या दाट जंगलातून भिल्लांनी त्या सैनिकावर जबरदस्त मारा केला. त्यांच्या माऱ्यात कॅ. मॉंटगोमेरी, लॅफ्ट.स्टुअर्ट, लेफ्ट. चेंबरलेन व कॅ. डॉक्सिन जखमी झाले. १९ सैनिक ठार झाले. ५० सैनिक जखमी झाले. २५ भिल्ल मरण पावले. लेफ्ट. स्टुअर्ड २१ एप्रिल १८५८ रोजी दवाखान्यात मरण पावला. त्यानंतर ही सातपुड्यात भिल्लांच्या इंग्रज सैन्याशी वर्षभर चकमकी सुरुच होत्या.



# ५६. भागोजी नाईक

महाराष्ट्रात छत्रपती शिवरायांनी सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यात राहणाऱ्या रामोशी, भिल्ल, कोळी इ. आदिवासी जमातींना आपल्या गडकिल्ल्यांच्या संरक्षणाचे काम दिले होते. त्यांची बलदंड आणि काटक शरीरे, त्यांचा धाडसी व प्रमाणिक स्वभाव हेरूनच छत्रपतींना त्यांना या सन्मानाच्या जागा दिल्या होत्या. त्या लोकांना नायक म्हणजे नाईक अशी पदवीही छत्रपतींना दिली होती. त्यांना त्याच्या या कामाबद्दल गडाजवळच्या जमिनींची वतने दिलेली होती. ती जवळजवळ पेशवाईच्या अखेरीपर्यंत चालू होती. इंग्रजांचे राज्य आल्यावर त्यांना गड संरक्षणाचे अगत्य राहिले नाही व त्यांना या अदिवासी लोकांच्या परंपरागत चालत आलेल्या नेमणूका रद्द करुन टाकल्या. एवढेच नव्हे, तर ज्या जंगलांवर या आदिवासींचे जीवन अवलंबून होते, त्या जंगलात प्रवेश करण्याचा, गुरेढोरे चारण्याचा आदिवासींचा हक्क रद्द करुन टाकला, त्यामुळे या जमातीमध्ये असंतोष माजला व ते लोक इंग्रजीविरुद्ध बंडे करण्यास सज्ज झाले.

३ एप्रिल रोजी इंग्रज सरकारने नाशिक जिल्ह्यातील पेठ व सुरगणा या तालुक्यातील किल्ले आपल्या ताब्यात घेऊन त्या डोंगराळ भागात आपला अंमल चालू केला. सह्याद्रीच्या खोऱ्यांतील महादेव कोळ्यांचे व भिल्लांचे हक्कही रद्द करुन टाकले. त्यामुळे या जमातीचे लोक खवळून उठले. त्यांचे नेतृत्त्व नाशिक जिल्ह्यातील सिन्नर तालुक्यामधील नांदूर शिंगोटे गावच्या भागोजी नाईकाने केले. त्याच्या पाठीशी सारे महादेव कोळी व भिल्ल उभे राहिले. भागोजीने सिन्नर, अकोले, संगमनेर, पारनेर या तालुक्यातील तहसीलदारांना आदेश दिला की, त्यांनी आमच्यासमोर शरण यावे. १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धाच्या बातम्या उत्तरेकडून दक्षिणेकडे येत होत्या. उत्तेरत सर्वत्र इंग्रजांविरूद्ध उठाव सुरु झाले होते. ते ऐकून भागोजीचा उत्साह वाढला. त्याने आपल्या शेकडो साथीदारांसह बंडाचे निशाण उभारले.

भागोजी व त्याचा मुख्य साथीदार मक्राणी फुलदीखान यांनी ६ डिसेंबर १८५७ रोजी पेठ तालुक्यातील हरसूलच्या सरकारी कचेरीवर हल्ला केला आणि तेथल्या तहसीलदाराला ताब्यात घेतले. त्याला पेठ पर्यंत नेले. पेठच्या कचेरीची नासधूस केली. बाजारही लुटला. हरसूलचा खजिना ताब्या घेऊन ते आले होते. त्यानंतर त्यांनी पेठ-सुरगण्याचे महादेव कोळी जातीचे राजे भगवंतराव पवार यांचेकडे जाऊन त्यांना मुजरे केले. ही बातमी समजताच अहमदनगरचा पोलीस अधीक्षक हेन्री आपल्या ४० शिपायांसह भागोजीला पकडण्यासाठी आला. त्याने भागोजीला 'हत्यारे ठेवा आणि शरण या' असा आदेश दिला. तो आदेश भागोजी व त्याचे साथीदार कसा मानणार? त्यांनी

हेन्रीलाच लढण्याचे आव्हान दिले. घुमश्चक्री उडाली व आरंभीच हेन्री भागोजीच्या गोळीला बळी पडला. त्यामुळे त्याचे शिपाई घाबरुन पळून गेले. हेन्रीला भागोजीने ठार केल्याने त्याच्या सर्व साथीदारांत उत्साह संचारला. ही बातमी समजताच लेफ्टनण्ट ग्लासपूल धावून आला. तसेच भागोजीचा भाऊ महिपती या लढाईत ठार झाला. भागोजी आपल्या साथीदारासह सिन्नरकडे निघून गेला. कॅ. नेटाल व ले.ग्लासपूल यांचेशी भागोजीच्या अन्य साथीदारांचा संघर्ष चालूच होता.

शेवटी भागोजीला पकडण्यासाठी सरकारने मेजर फ्रांसाचरला अधिक सैन्य देऊन नासिक भागात पाठविले व त्याबरोबरच त्या सर्व प्रदेशात गुप्तहेरांचे जाळेही पसरले. या सेनाधिकाऱ्यांना समजले की, पेठचा राजा भगवंतराव पवार या क्रांतिकारकांना आतून सामील असून तो त्यांना मदतही करतो. लगेच पेठला जाऊन त्यांनी २८ डिसेंबर १८५७ रोजी भगवंतरावाला पकडून फासावर चढविले.

फरार झालेला म्हातारा पथाजी नाईक स्वतःहून पुण्याला जाऊन पोलीस ठाण्यावर हजर झाला व तेथल्या प्रमुख पोलीस अधिकाऱ्याला म्हणाला, ''साहेब, मी पथाजी नाईक भिल्ल आहे. तुमच्याकडे येऊन तुमच्या हाती पडावे, असे जर माझ्या मनात आले नसते, तर मी कधीही तुमच्या हाती लागलो नसतो. आता तुम्ही मला कैद करा आणि वाटल्यास फाशी द्या. पण तुमच्या अधिकाऱ्यांनी पकडलेल्या माझ्या दोन्ही मुलांना वाचवा.'' त्याच्या वयाकडे पाहून त्याला त्या वरिष्ठ अधिकाऱ्याने माफी दिली.

अहमदनगरचे पोलीस सुपरिंडेंटेंट नोव्हें. १८५९ मध्ये सर फ्रँक साऊटर आपल्या शिपायांसह सिन्नरला आले. तेव्हा त्यांना गुप्तहेरांकडून समजले की, भागोजी तो आंल्याचे समजताच भागोजीने त्या तहसीलदाराला सोडून दिले. व ते जंगलात फरार झाले. ग्लासपूलने आठवडाभर त्यांचा त्यास चालविला, पण त्यात त्याला यश आले नाही. उलट भागोजीने आपल्या साथीदारांसह त्याच्यावर धाड टाकून त्याला कचेरीत डांबून ठेवले.

भागोजीने ले.ग्लासपूलला डांबून ठेवल्याची बातमी कळताच कॅप्टन नेटाल १५० शिपाई व ५० घोडे स्वारांसह त्या भागात आला. त्याची बातमी आधीच भागोजीला समजल्याने त्याने आपल्या साथीदारांसह त्र्यंबकेश्वरला आदल्याच दिवशी धाव घेतली व त्र्यंबकेश्वरचा सरकारी खजिना ताब्यात घेऊन तो अकोले तालुक्यातील समशेरपूरला आला. तेथे ८० वर्षांचा म्हातारा पथाजी नाईक आपल्या साथीदारांसह त्याला येऊन मिळाला. तेथे कर्नल कॅमन, लेफ्ट. ग्रॅहम, मेजर चॅपमन आपल्या शिपायांसह आले. दोन्ही

सैन्यात तुंबळ युद्ध होऊन त्यात हे तिन्ही पोलीस अधिकारी मारले गेले. आदिवासी क्रांतिकारकांचा हा मोठा विजय होता. या घटनेने चिडून जाऊन कॅ. नेटाल व लेफ्ट. ग्लासपूल यांनी निरपराध महादेव कोळी व भिल्ल स्त्रीपुरुषांचा छळ करुन त्यांना पकडून नेले. त्यात पथाजीची दोन तरुण मुलेही होती. वरील अधिकारी ठार झाल्यानंतर पथाजी फरार झाला.

१९ डिसेंबर १८५७ रोजी कॅप्टन बोस्वेल दहावी पलटण घेऊन पेठ भागात आला. कॅ. नेटाल व कॅ. बोस्वेलला भागोजीच्या ५०० क्रांतिवीरांशी सामना द्यावा लागला. त्यात नेटालचा घोडा मारला गेला. सिन्नरजवळच्या माठ-साखर टेकड्यांत विश्रांती घेत आहे. मेजर फ्रांसाचर ही तेवढ्यात आपल्या शिपायांसह तेथे आला. त्यांनी त्या टेकड्यांना वेढा दिला. त्यांनी भागोजीला हत्यारे टाकून शरण येण्याचे आवाहन केले. पण भागोजीने ते मानले नाही. तो आपल्या साथीदारांसह त्यांच्यावर तुटून पडला. अटीतटीची लढाई झाली. शेवटी भागोजीसह त्याचे ४५ साथीदार त्या लढाईत मारले गेले व नासिक भागातील ते प्रचंड वादळ शमले. भागोजी ठार झाल्यानंतर त्या अधिकाऱ्यांनी त्याच्या सर्व कुटुंबियांनाही मारुन टाकले. भागोजीचा वंशच खंडित झाला. भागोजीने ज्या घाटात इंग्रजांशी सामना देऊन बीरमरण पत्करले, तो घाट सिन्नर तालुक्यातील नांदूर शिंगोटे या गावापासून एक कि. मीटर अंतरावर आहे. त्या घाटात त्याची समाधी आहे. त्या घाटाला 'भागोजी नाईक घाट' म्हटले जाते. १८५७ च्या स्वातंत्र्य युद्धात महाराष्ट्रातील या आदिवासी क्रांतिवीरांनीही सिंहाचा वाटा उचलला होता. त्या वीरांचे स्मरण चालू पिढीने आदरपूर्वक ठेवले पाहिजे. तीच त्यांना दिलेली खरी श्रध्दांजली ठरेल.



# ५७. राघोजी नाईक

इंग्रजांनी सन १८१८ मध्ये पेशवाई बुडविली व महाराष्ट्रातील जनतेचे शोषण सुरु झाले. लोकांची वतने गेली, इनामे बुडविली राजे रजवाड्यांचे सैनिक निकामी होऊन बेकार झाले. त्यांचा भार शेतीवर पडू लागल्याने जनतेला अर्धपोटी राहावे लागले. जमीन महसूल दुपटीने झाला. त्यामुळे शेतकरी हैराण झाले. आदिवासींची वतने गेल्याने त्यांच्या मनात इंग्रज सरकारविरुद्ध असंतोष खदखदू लागला. तो सर्वप्रथम उमाजी नाईकाच्या उठावाने प्रकट झाला. त्यानंतर राघोजी नाईक इंग्रजांविरुद्ध चवताळून उठला.

राघोजी नाईक हा अकोले-सिन्नर भागातील महादेव कोळी होता. सन १८३० मध्ये जुन्नर भागातील भाऊ खरे, चिमण दरबारे व जाधव यांनी इंग्रजांविरुद्ध रान उठविण्यास सुरुवात केली. पुणे, ठाणे, नासिक व अहमदनगर भागातील महादेव कोळी व भिल्ल संघटित होऊ लागले. राघोजी नाईक इंग्रजांविरुद्ध रणांगणात उतरला. पुणे जिल्ह्यातील आंबेगाव तालुक्यामधील घोडेगावच्या लोकांनी या उठावाला साथ न देता इंग्रज सरकारच्या सैन्याला मदत केली. त्यामुळे महादेव कोळ्यांचा पराभव झाला आणि ते डोंगरात पसार झाले. ५४ क्रांतिकारी त्यात मारले गेले.

सन १८३८ मध्ये रायगड किल्ल्याच्या परिसरात या आदिवासी वीरांचे इंग्रजांच्या सैन्याशी तुंबळ युद्ध झाले. त्यात या वीरांनी इंग्रजांचा खजिना हस्तगत केला. व तीन गांवातील सावकार जमीनदार बनियांना लुटले. इंग्रज सैन्याने ८० महादेव कोळ्यांना कैद केले. पण राघोजी नाईक त्यांच्या हाती लागला नाही. त्याने इंग्रजांविरुद्धच्या कारवाया बेधडकपणे चालूच ठेवल्या.

नासिक, संगमनेर, अकोला, इगतपुरी इ. ठिकाणी राघोजीने आपल्या महादेव कोळी व भिल्ल वीरांच्या साह्याने इंग्रजांविरुद्ध संघर्ष सुरु केला. त्यात सरकारी खजिना लुटला व काही किल्लेदारांनाही मारले व त्यांना हाकलून दिले. परंतु काही फितुरांना हाताशी धरुन इंग्रजसेनाधिकाऱ्यांनी नासिक व नगर जिल्ह्यातील काही आदिवासीवीरांना कैद केले. त्यांना तुरुंगात डांबून त्यांचा अमानुष छळ केला. त्यातल्या १०० वीरांना प्यायला पाणी व अन्न न दिल्याने ते तुरुंगातच मरण पावले, बाकीच्या कैद्यांना गोळ्या घालून ठार केले. ही बातमी सगळीकडे पसरली. तेव्हा मोठ्या प्रमाणात तरुण कोळी व भिल्ल राघोजीला येऊन मिळाले. इंग्रज सैन्याची कोंडी करण्याचे प्रयत्न राघोजीने सुरु केले. पुन्हा काही फितुरांकरवी त्याची वार्ता इंग्रज अधिकाऱ्यांना समजली व संघर्ष

सुरु व्हायच्या आधीच तो दडपण्याच्या योजना ते आखू लागले. त्यामुळे राघोजी व त्याचे अनेक अनुयायी भूमिगत झाले. ते गनिमी काव्याने इंग्रज सैन्यावर हल्ले करु लागले.

इंग्रजांशी सामना करण्यासाठी बापू भांगरे आपल्या कोळी व भिल्ल वीरांनिशी राघोजीला येऊन मिळाला. इंग्रजांशी सामना देतांना एका फितुराने फितुरी केल्याने बापू भांगरे मारला गेला. इंग्रज सरकारने राघोजीला पकडून देणारास ५ हजार रुपयांचे बक्षीस जाहीर केले. ते ऐकताच राघोजी कोकणात निघून गेला व साधूच्या वेषात गावोगाव हिंडत राहिला. परंतु दुर्दैव त्याच्या पाठिशी लागले होते. एका फितुराने त्याला ओळखले व इंग्रज अधिकाऱ्यांना बक्षिसाच्या लोभाने त्याची बातमी दिली. त्यामुळे तो पकडला गेला. त्याच्या बरोबरच रामचंद्र गोरे व काही महादेव कोळी वीरही पकडले गेले. राघोजीला व त्याच्या या साथीदारांना फाशीच्या शिक्षा सुनावण्यात आल्या. तेव्हा राघोजी म्हणाला,

"मला फाशी न देता, माझे डोके तलवारीने उडविण्यात यावे." परंतु इंग्रजांनी ते मानले नाही व दि. २ मे १८४८ रोजी राघोजीसह या सर्वांना ठाण्याच्या तुरुंगात फाशी देण्यात आले. आपल्या मातृभूमीच्या स्वातंत्र्यासाठी हे वीर स्वतंत्रतेच्या बलिवेदीवर प्राणार्पण करते झाले. या अशिक्षित आदिवासी वीरांचे स्मरण आजच्या पिढीला राहू नये, हे आपल्या देशाचे दुर्भाग्यच म्हणावे लागेल.



# ५८. वीर दराब

सन १८५७ च्या स्वातंत्र्य युद्धाच्या क्रांतिज्वाला शांत झाल्या होत्या. जनता त्या युद्धानंतर इंग्रजांनी केलेल्या क्रूर अत्याचारांच्या आठवणी काढून हळहळत होती. एके दिवशी कानपूर शहरात सरकारच्या वतीने एक दवंडी पिटविली गेली. 'कानपूर मधील जनतेने जिल्हा कारागारासमोर हजर राहावे.' दुसऱ्या दिवशी त्या कारागारासमोर अपार जनसमूह जमला. सर्वांची छाती धडधडू लागली होती. आता हे इंग्रज काय करणार म्हणून.

कारागाराच्या कर्मचाऱ्यांनी दोन प्रेते त्या जनसमूहासमोर उघड्यावर आणून टाकली. त्या प्रेतांवर कफन सुद्धा नव्हते. प्रेतांच्या चेहऱ्यावर शांती विलसत होती, तर जनसमूहाची मने श्रद्धा, प्रेम, आत्मीयता व करुणा या भावनांनी विकलित केली होती.त्या जनसमूहातून एका नुकतेच मिसरुड फुटलेल्या मुलाच्या दोन्ही डोळ्यांमधून अंगार वर्षत होता. ती दोन प्रेते होती, नारगौरचा राजा दरियाब चंद्र व त्याचा सेनापती फकीरशाह यांची. त्यानंतर काही वर्षे उलटून गेली. या दोन्ही हुतात्म्यांचे स्मरण कानपूरची जनता करीत राहिली.

एके दिवशी इटावा-फर्रुखाबाद मार्गावरुन इंग्रज सरकारचा मोठा खजिना चाललेला होता. त्याच्या संरक्षणासाठी सशस्त्र शिपाई त्या खजिन्याच्या गाड्यां बरोबर चालले होते. एका मोक्याच्या वळणावर तो खजिना येताच त्या सशस्त्र शिपायांवर अचानक अंधाधुंद गोळीबार सुरु झाला. त्या शिपायांनी त्याचा प्रतिकार करुन पाहिला, पण व्यर्थ त्यांच्यातले काही शिपाई ठार झाले, काही अत्यंत जखमी झाले, उरलेले पळून गेले. तुफान गोळीबार करणाऱ्याने आपल्या साथीदारांसह तो खजिना लुटून नेला. तो गोळीबार करणारा वीर होता दराब, ज्याने काही वर्षांपूर्वी राजा दरियाबसिंह व सेनापती फकीरशाह यांची प्रेते कानपूरच्या कारागारा समोर पाहिली होती व त्याच्या विस्फारित डोळ्यात अंगार फुलला होता. पळून गेलेले शिपाई त्याच्या सहकाऱ्यांनी पकडून आणले. त्यांच्या अर्ध्या चेहऱ्यावर चुना व अर्ध्या चेहऱ्यावर काजळी फासून दराबने त्यांना दरडावून सांगितले, "तुम्ही माझे देशबांधव आहात. अत्यंत कमी पगारावर तुम्ही या हरामखोर इंग्रजांची चाकरी आपले पोट जाळण्यासाठी करीत आहात. तुमच्या त्या अन्नदात्यांना सांगा की, कोणी गोरी चामडीवाला (इंग्रज) जर माझ्या समोर आला, तर त्याला माझ्या या बंदुकीने नरकात पाठविले जाईल."

दराबचे हे बोल आग्रा व अवधच्या इंग्रज अधिकाऱ्यांच्या कानी त्या शिपायांनी घातले, तेव्हा ते अधिकारी दिङःमुढ होऊन गेले. त्यांनी दराबला शोधण्यासाठी फार हातपाय आपटले, पण दराबला तात्या टोपे याची गनिमी काव्याची युद्धकला अवगत झाली होती. इंग्रज अधिकारी त्याच्यावर दातओठ खात होते. दराब मात्र धाडसाने इग्रंज सरकारचे खजिने लुटीतच होते. त्याच्या टोळीत शेकडो वीर तरूण होते. इटावा, कानपूर व फर्रुखाबाद हे त्यांचे लढाऊ क्षेत्र होते. काही ब्राह्मणांनाच त्याचा ठाव ठिकाणा दराब प्रत्येक पंधरवड्यात एक दिवशी हिंद नदीच्या घाटावरील नार घाटाच्या कबरस्थानात जात असतो आणि इंग्रजांच्या क्रुरतेची शिकार झालेल्या आपल्या बापाच्या कबरीवर दिवा लावीत असतो आणि मनातल्या मनात आपला संकल्प आठवीत असतो.

इटावाच्या प्रदेशात दराबने आपल्या शेकडो साथीदारासंह इंग्रज शिपायांशी मोठा लढा दिला. त्या शिपायांनी त्याच्या तळावर एकदम हल्ला केला होता. रक्ताचे व आगीचे मोठे तांडव त्या तळावर झाले आणि दराबसह त्यांचे साथीदार तेथून पसार झाले. ते त्या शिपायांच्या हाती लागलेच नाही. त्या तळावर एक विझलेली भट्टीच फक्त शिपायांना दिसली. तिच्याजवळ एक चिठ्ठी होती, 'जीव वाचावयाचा असेल तर या भट्टीतली राख आपल्या तोंडांना फासा आणि चुपचाप चालते व्हा.'

फर्रुखाबाद जिल्ह्यातील वीरपूर या गावी दराबच्या मुलीच लग्न आहे, हे इंग्रज अधिकाऱ्यांना फितुरांच्या कडून समजले. एक इंग्रज अधिकारी आपली शिपायांची मोठी टोळी घेऊन वीरपूरला आला. त्या अधिकाऱ्याची खात्री झाली होती की, दराब आपल्या मुलीच्या लग्नासाठी निश्चितच येईल. तो अधिकारी आपल्या शिपायांसह वीरपूरला येण्याच्या आधीच दराब बुरखा घालून लग्न घरी आला व घरात जाऊन त्याने आपल्या मुलीला व जावयाला आशीर्वाद दिले. तोच तो अधिकारी लग्नघरासमोर आला. तेव्हा दराब तात्काळ त्या घराच्या छतावर चढून उभा राहून मोठ्याने गरजला. 'दराब आया था और अब जा रहा है। है कोई माई का लाल जो मेरा रास्ता रोके?'

लगेच त्या अधिकाऱ्याने आपल्या शिपायांना हुकूम सोडला, 'फायर'

त्याचवेळी दराबच्या बंदुकीतून एक गोळी सू सू करीत आली व तिने त्या अधिकाऱ्याच्या छातीचा वेध घेतला आणि तो इंग्रज अधिकारी चित्कारून धडकन जमिनीवर कोसळला व तडफडू लागला. त्याचे प्राण त्याची कुडी सोडून निघून गेले. दराबने घराच्या छतावरून उडी मारली व तो पसार झाला. शिपायांचे तर होशच उडून गेले. ते बंदुकी सरसावू लागले. तोच दरबऱ्या साथीदारांनी त्याच्यावर तुफान गोळीबार केला आणि ते सुद्धा पळून गेले.

दराबला कसे पकडावे, या विचाराने इंग्रज अधिकारी भयंकर चिंताग्रस्त झाले. आता फितुरी व प्रलोभनाशिवाय दुसरा मार्गच उरला नाही त्याचाच अवलंब त्यांनी केला.

एका संध्याकाळी दराब आपल्या पितृतुल्य वृद्ध स्नेहाच्या घरी दराब गेला. तेव्हा त्या वृद्धांने आपल्या कांपऱ्या हाताने दुधाचा पेला त्याला दिला. त्यातल्या दुधाचा घोट दराबच्या घशापर्यंत पोचताच दराबला कळून चुकले की, या दुधात जहाल विष आहे. तो घोट पोटात गेला. याच वृद्ध पुरूषांने दराबला इंग्रजांविरूद्ध बंड करण्याचा उपदेश केला होता. त्याच्यावर दराबचा पूर्ण विश्वास होता आणि त्याच्या विषयी दराबच्या मनात आदरही होता. दराब अधून मधून त्याच्या भेटीस नियमितपणे येत असे. याचा तपास इंग्रज अधिकाऱ्यांना कोणा फितुराकडून लागला होता. त्यांनी त्या वृद्धाला प्रलोभन दाखवून हे काम त्याच्याकडून करवून घेतले.

दराबने आपली बंदूक लगेच फेकून दिली. व त्याने आपले मस्तक त्या पितृतुल्य वृद्धाच्या पायांवर टेकवले व तो म्हणाला, 'ठीक ही किया बाबा। जिन हाथोने दूध पिलाकर बडा किया, उन हाथोनेही जहरके प्याले में मेरा कलेजा डुबा दिया। ओह। मै तो चला। खुदा . . . . . आपको . . . . . . जिंदगी बक्शे।'

लडखडत तो आपल्या बाजी नावाच्या घोडीवर स्वार झाला. त्याला घेऊन घोडी वेगाने निघाली. त्याच्या मागून घोडेस्वार शिपाई दौडत येत होते. आता आपले काही खरे नाही, असे पाहून त्याने मोठ्या हिंमतीने आपल्या घोडीला आदेश दिला, 'ठहर जा बाजी।' लगेच तो त्या घोडीच्या पाठीवरून खाली काटेरी झुडुपात कोसळला. घोडी तेथेच आपली शेपटी हलवीत उभी राहिली.

थोड्याच वेळात ते घोडेस्वार शिपाई तेथे पोचले. घोडी त्या काटेरी झुडुपाजवळ उभी असलेली पाहून ते शिपाई तेथेच दराबला शोधू लागले. त्यांनी चहुकडे आपल्या बंदुकीच्या फैरी झाडल्या. शेवटी दराबची हलचाल न दिसल्यामुळे त्यांनी त्या घोडीजवळ जाऊन पाहिले. दराबचा मृतदेह काटेरी झुडुपात अस्ताव्यस्त पडलेला होता. त्या क्रांतीयुद्धाचा हा शेवटचा अंगार तेथे विझून पडला होता.



# ५९. राजा मर्दन सिंह

१८५७ चे स्वातंत्र्ययुद्ध सुरु झाले आणि इंग्रजांच्या झाशी व ललितपूर छावण्यांमधील देशी पलटणीही त्या युद्धात सामील होण्यासाठी अधीर झाल्या. त्या छावण्यांतील देशी सैनिकांना इंग्रज सरकार विरूद्ध उठाव करण्यास बानपूरचा राजा मर्दनसिंह याने आपली खास माणसे पाठवून प्रवृत्त केले होते. मर्दनसिंहांच्या सूचनेवरून आधी ललितपूरच्या छावणीतील सैनिक इंग्रजाविरूद्ध बंड करून उठले आणि त्यांनी ललितपूर छावणीतून इंग्रज अधिकाऱ्यांना त्या छावणीतून पळवून लावले. १३ जून रोजी त्या इंग्रज अधिकाऱ्यांनी सागर येथील छावणीतून काही तोफा गोऱ्या सैनिकांसह ललितपूरला पाठवून दिल्या. ललितपूरहून पळून गेलेल्या इंग्रजांपैकी कॅ. डॉ. ब्रिथन हा मसौरागढीत राजा मर्दनसिंह याच्या आश्रयाला आला. शरणागवाला आश्रय द्यावा, या भारतीय नीतिनुसार मर्दनसिंहाने त्याला आश्रय दिला. मर्दनसिंह हा राजपूत होता. तो नितीबाह्य आचरण कसे करील? क्षत्रियांची तर ती परंपराच होती. आणखीही काही इंग्रज अधिकारी शरणागत म्हणून त्याच्या आश्रयाला आले. त्यांनाही मर्दनसिंहाने आश्रय दिला. मर्दनसिंहाने आपल्या बुद्धीमानीने त्या इंग्रजाकडून इंग्रजांचे युद्ध बल, युद्धाची तयारी वगैरेंची माहिती काढून घेतली. त्यांचे पुढचे बेत काय आहेत ते ही जाणून घेतले.

मर्दनसिंह नंतर ललितपूरला गेला. तेथल्या सैनिकांना उत्तेजीत करून त्यांच्यासह सागरला गेला. तालबेहट गडात इंग्रजांना १३ जून १८५७ रोजी काही सैनिकांना कैद करून ठेवले होते. त्यांना मर्दनसिंहाने आधी मुक्त केले. देशी सैनिकांना मर्दनसिंहाने आवाहन केले की, "मर्दानो, हीच आता आपल्या मातृभूमीला इंग्रजांच्या पंज्यातून मुक्त करण्याची संधी आहे. तेव्हा तुम्ही आपल्या देशबांधवांच्या, देशी सैनिकांच्या विरूद्ध न लढता गोऱ्या लोकांविरूद्ध लढण्यासाठी तयार व्हा. आणि त्यांना आपल्या देशातून घालवून द्या."

जुलै १८५७ च्या शेवटच्या आठवड्यात मर्दनसिंहाने १३०० सैनिकांसह सागरवर आक्रमण केले. मर्दनसिंहाच्या नेतृत्वाखाली त्या सैन्याने सागर जिल्हा इंग्रजांपासून मुक्त केला. फक्त सागरच्या किल्लाच इंग्रजांकडे राहीला. त्या नंतरच्या पाच महिन्यात मर्दनसिंहाने संपूर्ण बुदंलखंडातून इंग्रजांचे राज्य नष्ट केले. इंग्रजांशी झालेल्या युद्धात इंग्रज सैन्याचा एक कर्नल डॅलन मारला गेला. हातातून गेलेला भूभाग परत मिळविण्यासाठी सर ह्यू रोज याच्या नेतृत्वाखाली मोठे सैन्याने राहतगडावर हल्ला करण्यासाठी चालून आले. हा गड क्रांतिकारकांचे मुख्य केंद्र होता. इंग्रजांच्या तोफखान्याच्या

गोळीबाराने राहतगडाचा तट खिळखिळा झाला. राहतगडातील क्रांतिकारक सैनिकांना कैद करून सर ह्यू रोज विजयोत्सव साजरा करण्याच्या तयारीत असताना मर्दनसिंहाच्या सैनिकानी इंग्रज सैन्यावर अचानक हल्ला केल्याने ते सैन्य विस्कळीत झाले आणि राहतगडावरील कैदी सैनिकांना घेऊन मर्दनसिंह आपल्या सैन्यासह निघून गेला. सर ह्यू रोज हात चोळीत बसला.

बरोदियां गावाजवळ दुसरी विद्रोही सैनिकांची तुकडी मर्दनसिंहाला येऊन मिळाली. त्या सैनिकांना मर्दनसिंहाने झाशीच्या राणीच्या मदतीसाठी पाठवून दिले व तो स्वतः सर ह्यू रोजचा रस्ता अडविण्यासाठी सागरपासून ४० मैलावर मरथौन येथे त्याने ठाण मांडून राहिल त्याच्याशी सामना देण्याची हिंम्मत सर ह्यू रोज याला झाली नाही. म्हणून त्याने वेगळाच डाव टाकला. आपल्या सैन्यासह तो मर्दनसिंहाच्या बानपूरवर चालून गेला. बानपूरात मर्दनसिंहाचे थोडेसेच सैन्य होते. त्यामुळे सर ह्यू रोजला बानपूर सहज जिंकता आले. बानपूरात त्याला तोफांचे गोळे बनविण्याचा कारखाना आढळला. त्या कारखान्यात क्रांतिकारी सैन्यासाठी तोफगोळे तयार करण्याचे काम चालू होते.

मर्दनसिंहाने बानपूरला जाण्याऐवजी आपला मोर्चा झांशीकडे राणी लक्ष्मीबाई हिच्या साह्यासाठी वळविला. परंतु झाशीचा किल्ला फितुरांमुळे इंग्रजांच्या हातात जाणार असे पाहून राणी लक्ष्मीबाईच्या मागोमाग मर्दनसिंह काल्पीकडे आपल्या सैन्यासह निघून गेला. काल्पीला पराभव झाल्यानंतर राणी लक्ष्मीबाई बरोबर मर्दनसिंह ग्वाल्हेरला आला. परंतु ग्वाल्हेरच्या मुरार भागात इंग्रजांनी त्याला पकडले. सैनिकी कोर्टात त्याची सुनवणी होऊन त्याला जन्मठेपेची शिक्षा दिली व लाहोरच्या तुरुंगात रवाना केले. काही वर्षानंतर त्याला वृंदावनला जाण्याची परवानगी मिळाली. वृंदावन येथेच या मर्दाने २२ जुलै १८७९ रोजी आपला देह ठेवला.



# ६०. लाला हुकूमचंद जैन

सन १८५७ च्या स्वातंत्र्य युद्धात हरियाणा राज्यातील हांसी शहरातील प्रसिद्ध कानूनगो परिवारातील लाला हुकूमचंद जैन यांच्या प्राणांची आहुती पडली होती. त्याचा जन्म हांसी शहरात सन १८१६ साली मध्ये झाला होता. त्यांचे वडील दुनीचंद जैन हे दिल्लीच्या मोगल बादशहाचे कानूनगो होते. कानूनगो म्हणजे कायद्यानुसार आपल्या भागात शांतता राखणारा व त्या भागातील गावोगावच्या तलाठ्यांची दप्तरे तपासणारा.हुकमचंद जैन यांचे शिक्षण हांसी येथेच झाले. फारसी भाषा व गणित या विषयांत त्यांनी प्रावीण्य मिळविले होते. वयात आल्यानंतर ते दिल्लीचा शेवटचा बादशहा बहादुरशाह जफर याच्या दरबारात हजर झाले. सन १८४१ मध्ये बहादुरशाह जफरने त्यांची नियुक्ती हांसी आणि करनाल प्रदेशाचे कानुमनो म्हणून नियुक्ती केली. त्याबरोबरच बादशहाने त्यांना त्या प्रदेशाचा प्रबंधक म्हणून नेमले. आपल्या सात वर्षांच्या सेवाकाळात हुकमचंद जैन यांनी बादशहाचा विश्वास संपादन केला.

कालचक्राच्या फेऱ्यात हरियाणा प्रांत इंग्रजांच्या कबजात आला. हरियाणाच्या इंग्रज अधिकाऱ्याच्या कानावर हुकमचंदजैन यांच्या प्रशासन क्षमतेची कीर्ती गेली. त्या अधिकाऱ्यानेही त्यांचे हांसी व करनालचे कानूनगोपद कायम केले. परंतु त्यांच्या मनात या परकीय सत्तेविषयी तिरस्कार निर्माण झाला.

सन १८५७ मध्ये जेव्हा मेरठ, दिल्ली, कानपूर, काल्पी, अवध मध्ये आपल्या देशातील स्वातंत्र्यप्रेमी सैनिक व जनता इंग्रजांशी प्राणपणाने लढू लागली. तेव्हा हुकमचंद जैन यांचे ही अंतःकरण त्या युद्धात सहभागी होण्यासाठी आतुर झाले. त्यांनी दिल्लीला प्रयाण केले व बादशहाची भेट घेतली. विचारविनिमयानंतर हुकमचंदांनी हरियाणामधील जनतेचा संपूर्ण सहयोग देण्याचे वचन त्यांनी बादशहाला दिले. तसेच दारुगोळा पुरविण्याचीही हमी दिली. स्वातंत्र्यप्राप्तीकरिता जीवनाच्या शेवटच्या क्षणापर्यंत लढत राहण्याचाही त्यांनी मनोमन संकल्प केला.

हांसी येथे परत आल्यावर त्यांनी इंग्रजांशी लढण्याकरिता हांसीतील व आसपासच्या खेड्यातील युवकांची संघटना उभारली. एके दिवशी पंजाबमधून दिल्लीकडे जाणारी इंग्रजांची फौज हुकमचंद जैन यांनी पाहिली आणि आपल्या संघटनेतील तरुणांसह त्या फौजेवर हल्ला केला. परंतु त्या मोठ्या फौजेपुढे त्यांना हार खावी लागली व ती फौज दिल्लीकडे निघून गेली.

हुकमचंद या अपयशाने खचून जाणारे नव्हते. त्यांचा एक मित्र मिर्झा मुनीर याच्याशी सल्ला मसलत करुन त्यांनी बादशाह बहादुरशाह जफर याला एक पत्र फारसी भाषेत लिहिले आणि स्वातंत्र्य संग्राम चालू ठेवण्यासाठी, पंजाबातून दिल्लीकडे जाणाऱ्या फौजांना रोखण्यासाठी पुरेसे सैनिक व शस्त्रे पाठवून देण्यासाठी त्या पत्रातून विनंती केली. बऱ्याचकाळा पर्यंत त्यांनी बादशहाच्या उत्तराची वाट पाहिली. परंतु त्यांना पत्रोत्तर मिळालेच नाही. कारण तो पर्यंत दिल्लीवर इंग्रजांचा अधिकार झाला होता. बादशहाला इंग्रजांनी कैद केले होते. त्याची रवानगी ब्रह्मदेशात रंगूनला केली होती. त्याचे सारे कुटुंब नष्ट झाले होते.

दिल्लीवर पूर्णपणे कबजा मिळविल्यानंतर इंग्रजांनी त्याच्या दप्तराची तपासणी सुरु केली. १५ नोव्हेंबर १८५७ रोजी त्या दप्तरात हुकमचंद जैन यांनी बहादुरशाह जफर याला लिहिलेले ते पत्र इंग्रजांच्या हातात आले. ते पत्र दिल्लीच्या इंग्रज कमिशनरने हिसारचा कमिशनर कार्टलँड यांच्याकडे पाठवून त्याला कळविले की, हुकमचंद जैन याच्या विरुद्ध लवकरात लवकर कठोर कारवाई करावी.

पत्र हाती येताच हिसारचा तो कमिशनर इंग्रज सैन्याची एक तुकडी घेऊन हांसी येथे आला आणि त्याने हुकमचंद जैन व मिर्झा मुनीरबेग यांच्या घरावर धाड टाकली. हुकमचंद, त्यांचा पुतण्या व मिर्झा मुनीर बेग यांना कैद करुन हिसारला पाठवून दिले. थातुरमातुर सुनावणी झाल्यावर १८ जानेवारी १८५८ रोजी मॅजिस्ट्रेट जॉन आकिन्सनने लाला हुकमचंद व मिर्झा मुनीर बेग यांना फांशीची शिक्षा सुनावली. हुकमचंद याचा पुतण्या फकीरचंद याला सोडून दिले.

१९ जानेवारी १८५८ रोजी लाला हुकमचंद व मिर्झा मुनीर बेग यांना हुकमचंदच्या घरासमोर आम जनतेसमक्ष फांशी देण्यात आले. त्यानंतर त्या इंग्रजांनी हुकमचंदच्या शवाचे दफन करुन मिर्झा मुनीर बेग याचे शव जाळून टाकून आपल्या नृशंस संस्कृतीचे प्रदर्शन केले. लाला हुकमचंदची पत्नी आपल्या नातलगाकडे गुप्तपणे आपल्या दोन्ही लहान मुलांसह निघून गेली. इंग्रजांनी लाला हुकमचंदांची करोडो रुपयांची मालमत्ता लिलाव करुन विकून टाकली.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर २२ जानेवारी १९६१ रोजी हांसीच्या जनतेने या हुतात्म्यांच्या स्मरणार्थ हांसी येथे एक उद्यान तयार केले.



# ६१. हंसराम

सन १८५७ च्या मे महिन्याच्या शेवटच्या आठवड्यातली घटना आहे ही त्या वेळी दिल्ली स्वतंत्र झाली होती. बादशहा बहादुरशहा जफर दिल्लीच्या तख्यावर बसून आपल्या सल्लागारांच्या साह्याने दिल्लीचा कारभार पाहात होता. देशातील इंग्रजांच्या छावण्यातील देशी सैन्य इंग्रजांच्या विरूद्ध बंड करून उठले होते. देशातली जनताही त्या सैन्याला साथ देत होती. त्या जनआंदोलनाने इंग्रजांची त्रेधा तिरपीट उडाली होती. दिल्लीच्या सभोवतालच्या गावातील जनता तर त्या आंदोलनात अहमहमिकेने भाग घेत होती. आपल्या जवळ असलेल्या परंपरागत शस्त्रांनी लढत होती.

दिल्लीजवळच ग्रँडट्रंक रोडवर अलीपूर नावाचे एक गाव आहे. या गावातील स्वातंत्र्यप्रिय तरुणांनी तहसील कार्यालयात शिरून त्यातली सारी कागदपत्रे जाळून टाकली. इंग्रज सरकारला साथ देणाऱ्या व्यापाऱ्यांची दुकाने लुटून जाळून टाकली. त्यांनी कित्येक इंग्रजांनाही ठार केले. त्यांचा नेता होता तरुण हंसराम. शरीराने एकदम तंदुरुस्त. दिसायला सुंदर व राजबिंडा असलेल्या हंसरामचे व्यक्तित्त्व अतिशय आकर्षक होते.

अलीपूरमधले हे आंदोलन नष्ट करण्यासाठी एकाक्ष मेटकाफ आपले इंग्रज सैन्य घेऊन अलीपूरला आला. त्याचा एक डोळा निकामी असल्याने सारेच त्याला 'कानासाहब' म्हणत असत. अलीपूरला आल्यावर त्याने गावाबाहेर असलेल्या दोन कदंबवृक्षाखाली आपला तळ दिला व अलीपूर गावाभोवती सैन्याचा वेढा दिला. गावाच्या प्रमुख रस्त्यावर तोफा लावून दिल्या. गावातून कोणालाही बाहेर जाण्याची परवानगी दिली नाही. नंतर त्याने अलीपूरमधील ७५ तरुणांना अटक केली. त्यांत हंसरामही होताच. हंसरामचे व्यक्तित्त्व एवढे प्रभावशाली होते की, त्याला कैद करणाऱ्या अधिकाऱ्यालाही त्याचे प्राण वाचवेसे वाटले व त्याने हंसरामला पळून जाण्याचा सल्ला दिला.

आपले सर्व सहकारी इंग्रजांनी कैद केले असता, आपण एकट्यानेच आपली सुटका करून घेणे हंसरामला प्रशस्त वाटले नाही. त्याने प्रतिज्ञाच केली होती की, 'देशाच्या स्वातंत्र्यासाठी जगू किंवा मरु.' त्या मर्दाने त्या अधिकाऱ्याला बाणेदारपणे उत्तर दिले, मी तर माझ्या साथीदारांबरोबर रहायाचे ठरविले आहे. ते जेथे जातील, तेथेच मी सुद्धा जाईन. आम्ही सर्वांनी तर आमच्या मातृभूमीच्या गळ्यातील इंग्रजांच्या गुलामीचा पट्टा तोडून टाकण्याची शपथ घेतली आहे. मी कोणाच्याही दयेचा इच्छुक नाही. आपल्या

ध्येयाच्या प्राप्तीसाठी जर मरण आले, तर त्यांच्याबरोबर आपल्या नश्वर देहाचा त्याग करणे हाच माझा धर्म आहे. त्याचे हे उत्तर ऐकून तो इंग्रज अधिकारी चकित झाला. हंसराज बद्दल त्याला आदर वाटू लागला. आता तर त्याचा नाईलाज होता. शेवटी त्या कैद केलेल्या सर्व ७५ तरुणांना दिल्लीच्या किल्ल्यात आणले.

हंसराजच्या प्रभावी व्यतिमत्वाने लाल किल्ल्यातील इंग्रज अधिकारी व त्यांच्या हाताखालचे कर्मचारीही भारावून गेले. त्याची सुंदर व बलवान काया आणि आकर्षक व्यक्तित्व पाहून त्या इंग्रज अधिकाऱ्यांने हंसरामला सुचविले की, तू गवताचे भारे वाहणाऱ्या मजुराच्या वेषात किल्ल्यातून निघून जा.'

परंतु दृढनिश्यची हंसराम त्या अधिकाऱ्याला म्हणाला, 'मला कोणाच्याही दयेची भीक नको आहे. जर माझ्या देशाला इंग्रजांच्या गुलामीतून मुक्त करण्याचा प्रयत्न करणे हे पाप व गुन्हा असेल, तर मी ते पाप व गुन्हा केलेला आहे आणि त्यासाठी मी माझ्या प्राणांचे बलिदान करण्यास तयार आहे. हंसरामचे हे उत्तर एकून तो इंग्रज अधिकारी नतमस्तक झाला. या देशात असे बाणेदार वीर आहेत, हे पाहून त्याला वाटले असावे की, हा देश केव्हा ना केव्हा स्वतंत्र होईलच.

आपल्या साथीदाराबरोबर हंसराम प्रसन्न वदनाने फांसावर चढला, तेव्हा त्या इंग्रज अधिकाऱ्याने त्याला निश्चितच मनोमन प्रणाम केला असेल.

❖ ❖ ❖

# ६२. उदमीराम

१० मे १८५७ रोजी प्रथम भारतीय स्वातंत्र्ययुद्धाचे रणशिंग उत्तरप्रदेशातील मेरठ येथे फुंकले गेले. मेरठ छावणीतील देशी सैनिक दिल्ली येथे ११ मे रोजी पोचले. त्यांनी बादशहा बहादुर शाह जफर याला तख्तनशीन केले. दिल्लीच्या छावणीतील देशी सैन्य ही त्यांना येऊन मिळाले. या सैनिकांनी 'मारो फिरंगी को' अशा घोषणा करीत शेकडो इंग्रजांना यमसदनी पाठवून दिले. अनेक इंग्रज तोंडाला व अंगाला काळ्या रंगाने रंगवून हरियानामधील सोनीपतकडे पळाले. ग्रँड ट्रंक रोडवरून ते आपला जीव वाचविण्यासाठी सोनीपतकडे जात होते. या रोडवरच लिबासपूर नावाचे गाव आहे. त्या गावात वीर उदमीराम हा प्रसिद्ध नेता होता. त्याला समजले की, अनेक इंग्रज आपल्या गावाकडून सोनीपत येथे चालले आहेत. तेव्हा त्याने लगेच आपले २२ शूर साथीदार जमवून त्या रोडच्या जवळ ठाण मांडले. त्यांच्यापैकी काहींच्या हातात तलवारी लखलखत होत्या, तर काहींच्या हातात भरलेल्या बंदुका होत्या.

रोडवरून येणाऱ्या प्रत्येक इंग्रजाला ठार करण्याचे सत्र त्यांनी सुरु केले. आपली इंग्रज सरकारविषयी असलेली चीड शांत करण्याचा प्रयत्न अशा प्रकारे ते करु लागले. एक इंग्रज आप्ला पत्नीसह एका उंटगाडीवरुन लिबासपूरजवळ आला. तेव्हा ती गाडी त्या टोळीने अडविली. त्या इंग्रजाला गाडीवरुन खाली खेचले व त्याचे तुकडे करुन टाकले. त्याच्या पत्नी मात्र त्यांनी हात लावला नाही. तिला मातेसमाने मानून उदमीरामने त्याच दिवशी सायंकाळी एका ब्राम्हण स्त्रीकडे तिची देखभाल करण्यासाठी सोपविले. तिच्या अन्न-वस्त्रांची सोय लावून दिली.

आसपासच्या गावांत ही घटना वाऱ्यासारखी पसरली. त्या गांवातून अनेक लोक त्या इंग्रज स्त्रीला बघण्यासाठी आले व आपले कुतुहल शांत करुन गेले. त्यांपैकी राठधना गावचा निवासी सीताराम मात्र लिबासपूरलाच थांबला. तो अत्यंत स्वार्थी व धनलोभी होता. त्याने त्या इंग्रज स्त्रीची भेट घेतली. त्याने त्या इंग्रज स्त्रीला सांभाळणाऱ्या ब्राह्मण स्त्रीशीही विचार विनिमय केला. नंतर त्या इंग्रज स्त्रीला त्याने सांगितले की, ''उदमीराम व त्याच्या साथीदारांनी अनेक इंग्रजांना मारुन टाकले आहे.ते तुलाही मारुन टाकतील.'' तेव्हा ती इंग्रज स्त्री घाबरली व तिने सीलारामला विनंती केली की, ''तुम्ही मला रातोरात सुरक्षितपणे पानीपतच्या छावणीत पोचवून द्याल, तर तुम्हां दोघांना मी भरपूर पैसा देईन.'' ती ब्राह्मण स्त्री सुद्धा सीतारामला सामील झाली. सीतारामने घोडा गाडीची व्यवस्था केली व रातोरात त्या इंग्रज स्त्रीला पानीपतच्या छावणीत पोचवून दिले.

त्यांच्याबरोबर ती ब्राह्मण स्त्रीही होतीच. त्या दोघांचे त्या इंग्रज स्त्रीने आभार मानले व त्यांना भरपूर पैसा दिला. त्या स्त्रीने आपली हकीकत पानीपत छावणीतील इंग्रज अधिकाऱ्यांना सांगितली. लिबासपूरच्या उदमीरामने व त्याच्या साथीदारांनी सोनीपतकडे येणाऱ्या आपल्या इंग्रज बांधवांना कसे मारले, हे सुद्धा तिने सांगितले. ते ऐकूण पानीपतच्या छावणीतील इंग्रज अधिकारी संतापले व त्यांनी काही इंग्रज सैनिकांसह लिबासपूरकडे धाव घेतली.

दिल्ली इंग्रजांच्या ताब्यात आली होती. इंग्रज अधिकारी सूडाने पेटले होते. त्यांचे क्रूर दमन, अन्याय, अत्याचार भयंकर रीतीने देशभर सुरु होते. हजारो लोकांच्या कत्तली त्यांनी सुरु केल्या होत्या. पानीपतहून सैन्यासह आलेल्या इंग्रज अधिकाऱ्यांनी लिबासपूरला घेरले. त्यांनी सीतारामला व त्या ब्राह्मण स्त्रीला बोलावून घेतले. ती पहाटेची चार वाजेची वेळ होती. इंग्रज अधिकाऱ्यांनी उदमीरामच्या साथीदारांची नावे इंग्रज अधिकाऱ्यांनी त्या दोघांना विचारली. उदमीराम व त्याचे साथीदार आपपली शस्त्रे घेऊन त्या इंग्रजांशी लढायला एकत्र आले. त्यांनी इंग्रज सैन्याशी लढाई सुरु केली. पण शेकडो शस्त्रसज्ज इंग्रज सैनिकांपुढे त्यांना हार खावी लागली. त्यांच्यातले बहुतेक मारले गेले. बाकीच्यांना इंग्रजांनी कैद केले. कैद केलेल्यांना रस्त्यावर आडवे पाडून त्यांच्या शरीरावरुन भला मोठा दगडी रोडरोलर फिरवून त्यांच्या शरीराची चिपाडे बनवून टाकली. त्यांच्या रक्ताने तो ग्रँडट्रंकरोड लालेलाल झाला. रक्त रस्त्यावरुन वाहू लागले.

लिबासपूरमधले प्रत्येक घर त्यांनी लुटले लिबासपूरमधून धन-धान्य, दागदागिने, मूल्यपान तीस-पस्तीस बैलगाड्यांमध्ये भरुन दिल्लीला पाठवून दिले. सारे गाव उजाड झाले.

उदमीराम याला पकडून त्यांनी एका पिंपळाच्या झाडाला बांधले. त्याचे दोन्ही हात पिंपळाच्या खोडाला लोखंडी खिळे मारुन ठोकून टाकले. त्या खोडावरुन दोन्ही हातांचे रक्त वाहू लागले. त्याचा अनन्वितपणे छळ केला. तब्बल पस्तीस दिवस त्याला अन्नपाणी मिळू दिले नाही. अखेर त्याचे प्राणपखेरु उडून गेले. त्याचे शव त्याच्या कुटुंबाला दिले नाही. ते कोठेतरी जंगलात फेकून दिले. त्याचे पुतणे गुलाबसिंह, रामजससिंह सहजराम, जसराम, रतिया यांनाही गोळ्या घालून ठार केले. या भारतमातेच्या सुपुत्रांनी त्या स्वातंत्र्याच्या यज्ञात आपल्या प्राणांची आहुती देऊन अमरत्व प्राप्त केले. लिबासपूरमधले लोक हे क्रूर हत्याकांड कित्येक वर्षे विसरु शकले नाहीत.



# ६३. कुशलसिंह चंपावत

१८५७ चे स्वातंत्र्ययुद्ध १० मे १८५७ पासून सुरु झाले व ५/६ दिवसांतच दिल्ली क्रांतिकारकांच्या ताब्यात आली. त्यांनी बहादुरशाह जफरच्या नेतृत्त्वाखाली हे युद्ध सुरु ठेवले. त्या काळात इंग्रजांना आपल्या देशातून हाकून लावणे, ही साधी गोष्ट नव्हती. भरपूर मनुष्यबळ, पुष्कळशी संपत्ती व पुरेपूर शस्त्रसाठा त्यासाठी अत्यावश्यक होता. पण बहादुरशाहजवळ ना मनुष्यबळ होते, ना धन होते, ना शस्त्रांचा साठा होता. इंग्रजांच्या पलटणीतले बंडखोर सैनिक दिल्लीत हजारोंच्या संख्येने आले होते, येत होते. त्यांच्या पोटापाण्याची व्यवस्था लावण्याची जबाबदारी बादशाहवरच होती. म्हणून बहादुरशाह जफरने दिल्लीच्या तख्ताचे पूर्वीचे राजनिष्ठ व संबंधित अशा जयपूर, जोधपूर, बीकानेर व अलवार राजांना पत्रे लिहिली, त्यात त्याने त्या राजांना आवाहन केले होते की,

"माझी अशी उत्कट अभिलाषा आहे की, इंग्रजांच्या दास्याच्या शृंखला तोडून छिन्नभिन्न करुन टाकाव्या कोणत्या का उपायाने होईना, पण संपूर्ण हिंदुस्थानला इंग्रजांच्या दास्यातून मुक्त करावे, अशी माझी तीव्र इच्छा आहे. परंतु स्वातंत्र्य प्राप्तीच्या या उद्दिष्टासाठी लढले जाणारे हे क्रांतियुद्ध तेव्हाच सफल होईल, जेव्हा एखादा रणशूर व्यक्ती रणभूमीवर उतरुन या महान आंदोलनाचे संचालन करील, राष्ट्रातील विभिन्न शक्तींना एका सूत्रात बांधील आणि या संपूर्ण अभियानाची जबाबदारी आपल्या खांद्यावर घेईल." इंग्रजांना आपल्या देशातून घालवून दिल्यावर मला या देशावर राज्य करण्याची, सत्ताधीश होण्याची मुळीच इच्छा नाही. जर सारे राजे या स्वातंत्र्ययुद्धात सामील होऊन लढतील, तर मी स्वच्छेने व प्रसन्न मनाने माझे सर्व अधिकार व सत्ता तुम्ही निवडलेल्या राज-मंडळाच्या हाती सुपूर्द करीन व त्यातच मला आनंद मिळेल."

परंतु दुर्दैव असे की, ते सारे राजपूत राजे महाराजे आपल्या स्वाभिमानी व पराक्रमी जातीची आन विसरले आणि लाचार होऊन इंग्रजांचे साहाय्य कर्ते बनले. तरीही त्यांच्या सैन्यात आणि इंग्रजांच्या देशी पलटणीतील सैन्यात आपल्या पूर्वजांची परंपरा चालविणारे हजारो राजपूत वीर होते. त्यांनी निष्ठेने क्रांतिकारकांना साथ दिली.

२१ ऑगस्ट १८५७ रोजी जोधपूर राज्यातील एरिनपूरा छावणीतील देशी सैनिकांनी विद्रोहाची ज्वाला प्रज्ज्वलित केली, त्या सैनिकांत बहुसंख्य राजपूत सैनिक होते. 'चलो दिल्ली-मारो फिरंगी' अशा घोषणा देत ते सैन्य दिल्लीकडे निघाले. त्यांचा पहिला पडाव मारवाडमधील आहुजा नगरीजवळ पडला. तेथील ठाकूर कुशलसिंह चंपावत या राजाने त्या सैनिकांचे नेतृत्व स्वीकारले. आसोप, गुलर आणि आलनियावास येथले ठाकूरही आपल्या सैन्यांसह त्यांना येऊन मिळाले. तेव्हा त्या सैनिकांची संख्या सहा हजारापर्यंत झाली होती.

अजमेरचा चीफ कमिशनर पेट्रीक लॉरेन्स याने या सैन्याच्या प्रतिकारासाठी जोधपूरच्या राजपूत राजाला सैन्य पाठविण्यास सांगितले. जोधपूरचा राजा तख्तसिंह याने आपला किल्लेदार ओनाडासिंह पवार याच्या नेतृत्वाखाली दहा हजार सैन्य व बारा तोफा त्यासाठी पाठविल्या. ज्याच्या पूर्वजांनी वर्षानुवर्ष दिल्लीच्या तख्ताची सेवा केली, त्या तख्ताच्या संरक्षणासाठी जोधपूरच्या राजाने सैन्य व रसद न पाठविता तीच मदत त्या तख्ताच्या विनाशासाठी परक्या इंग्रजांच्या सहायार्थ मात्र सैन्य व रसद पाठवावी, केवढा हा दैवदुर्विलास! जोधपूरच्या राजाचे सैन्य क्रांतिकारकांच्या सैन्याच्या दीड पटीपेक्षा माठे असले तरी क्रांतिकारकाच्या सैन्याने जोधपूरच्या सैन्याची धूळधाण उडवून दिली व त्याच्या सर्व तोफा सुद्धा आपल्या ताब्यात घेतल्या. जोधपूरचा किल्लेदार ओनाडासिंह व त्याचे काही सैन्याधिकारी आपल्या शेकडो सैन्याकांसह या युद्धात ठार झाले. नंतर चीफ कमीशनर पेट्रीक लॉरेन्स व जोधपूरचा पोलिटिकल एजंट आपले सैन्य घेऊन त्या क्रांतिकारकांचा प्रतिकार करण्यासाठी आहुवा येथे आले. १८ डिसेंबर १८५७ रोजी दोन्ही सैन्यात तुंबळ युद्ध झाले. त्या युद्धात इंग्रजांचा पराभव झाला. त्यात मेसन ठार झाला. शेकडो सैनिक ठार झाले व पेट्रीक लॉरेन्सही जीव घेऊन पळून गेला.

गव्हर्नर जनरल लॉर्ड कॅनिंगला जेव्हा हे वृत समजले तेव्हा त्याने २० जानेवारी १८५७ रोजी पालनपूर व नसिराबाद येथील छावण्यातून मोठे सैन्य आहुवा येथे पाठवून दिले. त्या सैन्यापुढे क्रांतिकारकाच्या सैन्यांचा टिकाव लागला नाही. कुशलसिंह चंपावतसह क्रांतिकारकाचे अनेक नेते पकडले गेले. त्यांना बंदीवासाच्या कठोर शिक्षा देण्यात आल्या.

जवळच्या कोटा येथील छावणीतही बातमी पोचली. त्या छावणीतील देशी सैन्याने १५ ऑक्टोबर १८५७ रोजी उठाव केला. त्या सैनिकांनी कोटाचा रेसिडेंट बर्टन आणि काही इंग्रज अधिकाऱ्यांना ठार केले. त्यांनी कोटा राज्याचा खजिना, शस्त्रभंडार व धान्यसाठा आपल्या ताब्यात घेतला. कोटाचे रावरामसिंह यांना नजरकैदेत ठेवून दिले आणि राज्याचा बहुतेक भाग आपल्या ताब्यात घेतला. सहा महिने कोटा राज्य स्वातंत्र्याचा उपभोग घेत होते.

अहुवा येथील क्रांतिकारकांच्या सैन्याचा पराभव केल्यानंतर इंग्रजांचे सैन्य कोटा येथे आले. त्यांनी कोटा येथील विद्रोही सैन्यावर जबरदस्त हल्ला केला. त्या मोठ्या सैन्यापुढे कोटाच्या क्रांतिकारी सैन्याचा टिकाव लागला नाही. अनेक क्रांतिकारी सैनिक या युद्धात कामास आले. त्या क्रांतिकारी सैन्याच्या दोन्ही नेत्यांना जयदयाल आणि महाराव खानाला कैद केले व नंतर त्यांना फासावर चढविण्यात आले. विशेष हे की, पालनपूर व नसिराबाद छावणीतील गोऱ्या सैनिकांबरोबर देशी सैनिकांनी आपल्या देशातील क्रांतिकारी सैन्याचा पराभव करून इंग्रजांना साह्य केले. याला आपल्या देशाचे दुर्दैव म्हणावे लागेल.

❖ ❖ ❖

# ६४. कुँवर सरजू प्रसाद

एकोणवीसाव्या शतकाच्या प्रारंभीच्या काळात विंध्य पर्वताच्या पूर्वेकडील भागात कुशवाहा राजवंशाचे राज्य होते. त्याला मैहर रियासत म्हणत असत. सन १८२६ मध्ये भाऊबंदुकीमुळे या राज्याच्या वाटण्या झाल्या. त्यात छोटा कुँवर प्रगदास सिंह याच्या वाट्याला विजयराघवडाचे राज्य आले. जबलपूर जिल्हयाचे ईशान्य दिशेस विजयराघवगडचा किल्ला आहे. विंध्य पर्वताच्या पूर्वेकडील भागात दूरवर पसरलेल्या मैदानातून पाच किलोमीटर अंतरावरून एक लहानशी नदी वाहते. त्या नदीच्या काठी विजयराघवगडहा भक्कम किल्ला होता. हा किल्लाच कुँवर प्रागदाससिंहाची राजधानी होती. प्रागदाससिंहांनी फक्त १५/१६ वर्षेच राज्य केले. सन १८४२ मध्ये बुंदेलखंडातील राजानी इंग्रज सरकारविरूद्ध बंड केले होते. त्यात प्रागदाससिंहांचा सहभाग असल्यामुळे इंग्रज सरकार त्यांच्यावर नाराज झाले. म्हणून सन १८४८ मध्ये इंग्रज सरकारने विजयराघवगडच्या राज्यात आपला हस्तक सादिकअली याला मॅनेजर म्हणून नेमले. प्रागदाससिंहांच्या पुढे त्याच्या सर्व कारवाया असफल होत गेल्या.

सन १८५६ मध्ये प्रागदाससिंहांचे निधन झाले आणि सादिकअलीचे फावले. प्रागदाससिंहाचे एकुलता एक पूत्र कुँवर सरजू प्रसाद १७/१८ वर्षांचा असतांना प्रागदाससिंहांनंतर विजयराघवगडच्या गादीवर आला. त्याचे लहान वय पाहून सादिकअली राज्यकारभारात हस्तक्षेप करू लागला. फायदा उठवू  लागला. त्याच्या अशा हस्तक्षेपाने जनतेतही त्याच्याविषयी असंतोष निर्माण झाला. त्याची मनमानी चालूच होती. तशात १८५७ चे स्वातंत्र्ययुद्ध सुरु झाले. कुँवर सरजू प्रसादही त्या युद्धात सामील झाला. आपल्या राज्यातील लोकांचे नेतृत्व ह्या स्वातंत्र्य युद्धात केले. विजयराघगडच्या जनतेने सर्वात आधी इंग्रजांच्या हस्तक असलेल्या कारस्थानी सादिकअलीचा काटा काढला. सरजूप्रसाद विरूद्ध तो सतत कारस्थाने करीत असायचा. त्याचे फळ त्याने भोगले.

सरजू प्रसादच्या नेतृत्वाखाली विजयराघवगडमधील तीन हजार सैनिक इंग्रज सरकारविरूद्ध बंड करून उठले. जबलपूर-मिर्जापूर मार्ग त्या काळात उत्तर-दक्षिण भारतातील वाहतुकीचा प्रमुख मार्ग होता. तो मार्ग त्यावर तोफा सज्ज ठेवून या सैनीकांनी बंद करून टाकला व इंग्रजांच्या सैन्याला उत्तरेकडून दक्षिणेकडे जाणे आणि दक्षिणेकडून उत्तरेकडे येणे दुरापास्त करून टाकले. ते समजताच जबलपूरच्या कमिशनरने गोऱ्या सैन्याची एक तुकडी तो मार्ग मोकळा करण्यासाठी पाठविली. पण सरजूप्रसादच्या सैन्याने त्या गोऱ्या सैन्याला पळता भुई थोडी करून सोडली.

अखेर एका फितुराने इंग्रज सैन्याला मार्गदर्शन केले. त्यामुळे ते सैन्य विजयराघवगडापर्यंत पोचू शकले. इंग्रज सैन्याने तोफा डागून विजयराघवगडाच्या तटाला खिंडारे पाडली. व त्या खिंडारातून इंग्रज सैन्य गडात शिरले. सरजूप्रसाद मात्र गुप्तपणे गडातून निसटून जाण्यात सफल झाला. इंग्रजांनी त्या गडातील इमारती तोफा डागून पाडून टाकल्या. गडात भयंकर लुटमार केली. आंज त्या गडाचे फक्त भग्नावशेष शिल्लक आहेत.

कुँवर सरजू प्रसाद फरारी अवस्थेत सलग बारा वर्षे देशाच्या वेगवेगळया भागात हिंडत राहिला. इंग्रज अधिकारी त्याला पकडू शकले नाहीत. म्हणून त्यांनी फितुरीच्या मार्गाने सरजूप्रसादला फकडण्याचा डाव टाकला. ते अधिकारी सरजूप्रसादच्या मेहर भाऊबंदाना भेटले. बाण बरोबर लागला. भाऊबंदकीने डाव साधला. इंग्रज सरकारची कृपा सरजूप्रसादला पकडून दिल्यानंतर त्यांना लाभणार होती. त्यांनी सरजूप्रसादचा तपास करून इंग्रज अधिकाऱ्यांना त्याचा पत्ता सांगितला. त्यामुळे सरजूप्रसाद पकडला गेला.

सरजूप्रसादला कैद करून त्याला कलकत्ता येथे आगगाडीतून नेण्यात येत होते. आपणास कलकत्याला नेऊन आमरण काळ्या पाण्यावर पाठविण्याचा इंग्रजांचा हेतू त्याने ओळखला. बंदीवासात कुजून मरण्यापेक्षा स्वतंत्र होऊन मरण पत्करणे, हेच श्रेयस्कर आहे, असे त्याने ठरविले. गाडी वाराणसीच्या पुढे निघाली आणि बरोबर असलेले पहारेकरी सैनिक पेंगाळले असता, सरजूप्रसादने धावत्या गाडीतून खाली उडी घेतली. त्यानंतर सरजूप्रसादचे काय झाले, हे एकट्या परमेश्वरालाच माहीत! तो पुन्हा इंग्रजांच्या हाती लागला नाही, एवढे मात्र खरे.



# ६५. अहमदअलीखान

फरुखनगर हे हरियाणा राज्यातले दक्षिणेकडील एक नगर असून ते दिल्ली पासून २० मैल अंतरावर आहे. अठराव्या - एकोणवीसाव्या शतकात तेथे एक लहानसे राज्य राज्य होते. बलोच नबाबाच्या वंशजांचे ते राज्य होते. सन १८५७ चे स्वातंत्र्ययुद्ध सुरू झाले, त्यावेळी त्या राज्यावर नबाब अहमद अलीखान राज्य करीत होता. दिल्लीवर स्वातंत्र्य सैनिकांनी ताबा मिळवून बादशाह बहादुरशाह जफर याला 'भारताचा बादशहा' म्हणून घोषित केले. त्या नंतर बादशहाने भारातातील अनेक राजांना या युद्धात सामील होण्यासाठी पत्रे लिहिली. त्यांचा आशय असा होता -

''हे हिन्द के सपूतों, यदि हम संकल्प करें, तो शत्रु को क्षणभरमें नष्ट कर सकते हैं। हम शत्रुओंका नाश कर अपनी जान से प्यारे दीन और स्वदेश को पूरी तरह भयमुक्त कर लेने में कामयाबी हासिल कर लेंगे।''

बहादुरशाहच्या अशा पत्रांनी लहान लहान राज्यांचे मालक युद्धासाठी प्रवृत्त झाले होते. अशा राज्यांच्या राजांवर, विश्वासघात, वचनभंग, अत्याचार, अकार्यक्षम असे वाटेल ते आरोप ठेवून ती राज्ये आपल्या घशात घालण्यासाठी इंग्रज सदैव टपलेले असत, मग ते आरोप खरे असोत की खोटे असोत. त्यांची चौकशी न्याय्यरित्या करणे तर दूरच वरील आशयाचे बादशहाचे पत्र मिळाल्यावर फर्रूखनगरच्या अहमद अली खान या राजाच्या मनातही स्वातंत्र्य संग्रामात उडी घेण्याची ऊर्मी जागृत झाली. नबाब अहमद अली खानने आपले इंग्रजांशी असलेले संबंध तोडून टाकले व बादशाह व क्रांतिकारी सैन्याला साथ देण्याचे जाहीर केले.

स्वातंत्र्य-संग्रामात अहमद अली खान सतत बादशाहशी संपर्क ठेवीत होता. बादशहाला जेव्हा जेव्हा आवश्यकता भासली, तेव्हा तेव्हा रोख रक्कम, हत्यारे, रसद अहमद अलीखानने बादशहाला पुरविली. त्याने २ सप्टेंबर १८५७ रोजी बादशाहला एक पत्र लिहिले.

''जहाँपनाह का हुक्म मिलने के बाद इस गुलाम ने बंदुको की रसद पूरी कर दी है। ... जादा तादाद में बंदुकें उपलब्ध नहीं हो सकीं। लेकिन जितनी भी जादा-से-जादा बंदुकें मैं इकट्ठी कर सका हूँ, इब्राहिम अलीखान के हाथों भिजवा रहा हूँ। ... लुहारों से जैसे ही बंदूकें तैयार होती जाएँ, फौरन शाही फौज को रवाना कर दी जाएगी।''

इंग्रज पलटणींनी पश्चिमेकडून पंजाब मधून दिल्लीत प्रवेश केला होता, परंतु फर्रूखनगर, वल्लभगड, गाजियाबादच्या प्रदेशांतून मात्र इंग्रजांच्या फौजा दिल्लीकडे जाऊ शकल्या नाहीत. जेव्हा दिल्लीच्या सैनिकांना पराभव पत्करावा लागला, बहादुरशाहला इंग्रजांनी कैद केले, त्याला सजा दिली, तेव्हा कोठे सहा महिन्यानंतर इंग्रज पलटणी फर्रूखनगरकडे आल्या. अहमदअलीखानाच्या सैन्याने तीन दिवस इंग्रजी पलटणीवर तोफगोळ्यांचा भडीमार केला. सैनिकांनी ही आपल्या बंदुकांतून सतत गोळीबार चालू ठेवला. परंतु इंग्रजांच्या मोठ्या सैन्यापुढे त्यांना माघार घ्यावी लागली. त्या लढाईत कितीतरी निरपराध, निर्दोष लोकांचे नाहक बळी गेले. अखेर महलसरा भागात इंग्रजांनी नबाब अहमद अली खान याला कैद केले. त्याच्या हातात हातकड्या घालून फर्रूखनगरच्या प्रमुख रस्त्यावरून त्याला दिल्लीला आणले. दिल्लीतच अहमद अली खानावर खटला दाखल करण्यात आला. १२ जानेवारी १८५८ रोजी खटल्याची सुनावणी सुरू झाली. इंग्रजांनी त्याच्यावर खालील आरोप ठेवले -

''हिंदुस्थानात इंग्रज सरकारचा प्रजानन असूनही १० मे १८५७ पासून डिसेंबर १८५७ पर्यंत फर्रूखनगरात, आसपासच्या क्षेत्रांत आणि इतर ठिकाणीही इंग्रज सरकार विरूद्ध विद्रोह करण्यासाठी व युद्ध करण्यासाठी विद्रोहाचा प्रचार करणारा पत्रव्यवहार केला, अशा प्रकारे इंग्रज सरकारविरूद्ध कार्य केले. विद्रोही लोकांना मदत केली. त्यांना इंग्रज सरकार विरूद्ध भडकावले. इंग्रज सरकारचे राज्य नष्ट करण्यासाठी व युद्ध करण्यासाठी विद्रोहींना प्रेरणा दिली; अशा प्रकारे या प्रदेशातून इंग्रजी सत्ता नाहीशी करण्यासाठी प्रयत्न केले, याने इंग्रज सरकारविरूद्ध स्वतः युद्ध केले. याचे हे सारे कार्य १८५७ च्या १६ व्या कायद्यान्वये मोठा गुन्हा होता.''

त्यानंतर अहमद अली खानला विचारण्यात आले, ''तुमच्या विरूद्ध लावल्या गेलेल्या या आरोंपाखाली तुम्ही स्वतःला अपराधी समजतां की, निरपराधी.'' तेव्हा अहमद अली खानने ताठ मानेंने निर्भयतेने जोरात उत्तर दिले, ''निरपराधी.''

त्यानंतर कमिशनर कार्यालयातील मुंशी चिमनलाल व बहादुरशहाचा इंग्रजांना फितुर झालेला हकीम अहसानुल्ला खाँ यांच्या साक्षी झाल्या. त्यांनी नबाब अहमद अली खानाचा पत्रव्यवहार न्यायाधीशापुढे सादर केला. अकरा दिवस या खटल्याचे कामकाज चालले. १३ जानेवारी १८५७ रोजी या खटल्याचा निकाल देण्यात आला.

''सर्व साक्षीदारांच्या साक्षी विचारात घेऊन या अदालतीने निर्णय केला आहे की, फर्रूखनगरचा नबाब कैदी अहमद अली खान सर्व आरोपांबद्दल दोषी ठरला आहे. म्हणून ही अदालत अहमद अली खान नबाब फर्रूखनगर याला फांसावर लटकविण्याची व

जोपर्यंत तो मरणार नाही, तो पर्यंत फासावर लटकवून ठेवण्याची शिक्षा देण्यात येत आहे आणि त्याची सर्व चल-अचल सपंत्ती जप्त करण्याचा आदेश देत आहे.''

मेरठ डिव्हीजनचा कमांडर मेजर जनरल पेनीने त्यावर शिक्कामोर्तब केले आणि जाहीर केले की, ''उद्या दुपारी चार वाजता याला फांशी देण्यात येईल.''

त्यानुसार २४ जानेवारी १८५८ रोजी नबाब अहमद अली खान याला दुपारी ४ वाजता. दिल्लीच्या चांदणी चौकात आम जनतेसमोर फांशी देण्यात आले. नंतर त्याचा मृतदेह इंग्रज अधिकाऱ्यांनी गुपचूप दिल्लीच्या किल्ल्याच्या खंदकात फेकून देऊन आपल्या सभ्यतेचे दर्शन घडविले. किती सार्थक आहे या ओळी !

कुछ खेल नहीं है आजादी ।
इसमें है खुदकी बर्बादी ॥



# ६६. राजा बखत बली

बुंदलखंडचे सुप्रसिद्ध महाराजा छत्रसाल यांच्या घराण्यात बखतबलीचा जन्म झाला होता. महाराजा छत्रसालांचे ते पणतू होते. सन १८४२ मध्ये बखतबली शाहगडच्या गादीवर बसले,आणि आपल्या संस्थानचा राज्यकारभार पाहू लागले. त्यावेळी त्यांच्या सैन्यात १५० घोडेस्वार व ८०० पायदळ सैन्य होते. १८५७ मध्ये स्वातंत्र्ययुद्ध सुरू झाले. इंग्रजांच्या देशी पलटणी बंड करून उठल्या. त्यातून काही सैनिक व घोडेस्वार आपल्या शस्त्रांसह बखत बलीकडे आले. तेव्हा त्यांनी त्या सैनिकांना आपल्या सेवेत घेतले. त्यांचे सैन्य वाढले.

बानपुरचे राजा मर्दनसिंह बखतबलीचे मित्र होते. दोघांनी मिळून सागरचा किल्ला इंग्रजांच्या ताब्यातून मुक्त करायचे ठरविले. दोघांनी मिळून सागरवर आक्रमण केले. पण सागरचा मजबूत किल्ला त्यांना जिंकता आला नाही. परंतु त्यांनी निराश न होता गढकोटा व मालथौन हे दोन किल्ले जिंकले आणि सागरचा किल्ला सोडून बाकीचा सागर जिल्हा आपल्या ताब्यात घेतला. सागरच्या किल्ल्यावर राजा मर्दनसिंहा बरोबर राजा बखतबलीने पुन्हा आक्रमण केले. पण किल्ल्यातील इंग्रज सैन्याची हिंम्मत या दोन्ही वीरांचा सामना करण्यास झाली नाही. गोरे सैनिक किल्ल्यातून बाहेर पडलेच नाहीत.

जबलपूरच्या छावणीतील ५२ व्या देशी पलटणीने इंग्रजांविरूद्ध दंड थोपटले व ती सारी पलटण राजा बखतबलीकडे आश्रयाला आली. त्यामुळे बखतबलीच्या सैन्यात चांगली वाढ झाली. त्यामुळे इंग्रज सरकारला काळजी वाटू लागली. तेव्हा सर ह्यूज रोज मोठे सैन्य व तोफखाना घेऊन बखतबली व मर्दनसिंहावर धावून आला. पण त्याला पराभव पत्करावा लागला. परंतु त्याने गढकोट व राहतगड हे दोन किल्ले मात्र जिंकले. या अपयशामुळे ते दोघे वीर घाबरले नाहीत. आता सर ह्यू रोज झांशीकडे आपले सैन्य घेऊन निघाला. राणी लक्ष्मीबाईकडून त्याला झांशीचा किल्ला जिंकून घ्यायचा होता. सागरकडे जाणारे दोनच मार्ग त्या डोंगराळ भागातून होते. एक मालथौन घाटीतून जाणारा व दुसरा मदनपूर घाटीतून जाणारा. मालथौन घाटीचा मार्ग रोखण्याचे काम बखतबलीने राजा मर्दनसिंह यांचेकडे सोपविले व मदनपूर घाटीचा मार्ग रोखण्याचे काम स्वतःकडे घेतले.

२६ फेब्रुवारी १८५८ रोजी सर ह्यू रोज आपल्या सैन्यासह मालथौन घाटीकडे निघाला. त्या घाटीत पोचताच त्याला दिसून आले की, बंडखोर सैन्य त्या घाटीचा मार्ग अडवून उभे आहे. म्हणून त्याने आपली एक पलटण त्या घाटीत ठेवून तो मदनपूर घाटीकडे निघाला. त्या घाटीतही बंडखोर सैन्याने मार्ग अडविलेला त्याला दिसला. त्याच्या सैन्यावर त्या घाटीत तोफांचा भडीमार सुरू झाला. एका गोळीने सर ह्यू रोज

जखमी झाला. त्याचा घोडाही गोळीबारात खाली कोसळला. तरीही त्याने त्या घाटीच्या डाव्या बाजूने त्या बंडखोर सैन्यावर अचानक हल्ला केला त्यामुळे बखतबलीच्या सैन्याची पांगापांग झाली व त्याचे सैन्य पराभूत होऊन शेजारच्या जंगलात इतस्ततः पसरले. अनेक बंडखोर सैनिकांना त्याने कैद केले. राजा बखतबली चरखाणीला पोचला पेशव्यांच्या सैन्यासह बखतबली झांशीला गेले. तेव्हा सर ह्यू रोजच्या सैन्याने झांशीला वेढा दिलेला होता.

१ एप्रिल १८५८ रोजी सर ह्यू रोजच्या सैन्यावर झांशीच्या पलटणीने हल्ला केला. बखतबलीनेही दुसऱ्या बाजूने आक्रमण केले. नंतर बखतबली बेटवा नदीच्या किनाऱ्यावरील कोटरा गावात गेला. परंतु मेजर आरेच्या सैन्याने त्याचा पाठलाग केला आणि बखतबलीला अचानक कैद केले. परंतु ऐन वेळी राजा मर्दनसिंह धावून आला. त्याच्या सैन्याने आरेच्या सैन्याचा धुव्वा उडविला आणि बखतबलीला मुक्त केले. लगेच बखतबलीने आपल्या सैन्यासह आरेच्या सैन्यावर हल्ला करून त्या सैन्याची धूळधाण उडवून दिली.

एप्रिल १८५८ च्या तिसऱ्या आठवड्यात राजा बखतबली काल्पीला पोचला. तेथेच झांशीची राणी लक्ष्मीबाईची त्याने भेट घेतली. बखत बलीने आपली सेना रावसाहेब पेशव्यांच्या सैन्याच्या साह्यासाठी दिली, आणि त्याने तात्या टोपेला स्वातंत्र्य संग्रामात अखेरपर्यंत साथ दिली. १२ मे १८५८ रोजी बखतबलीने तात्या टोपे सह सर ह्यू रोजच्या सैन्याशी जबरदस्त सामना दिला. परंतु त्यांना माघार घ्यावी लागली.

१ जून १८५८ रोजी राणी लक्ष्मीबाई, रावसाहेब पेशवे व तात्या टोपे यांनी ग्वाल्हेरचा किल्ला जिंकला. बखतबली ग्वाल्हेरकडे निघाला. वाटेतच त्याला दुःखद बातमी समजली की, झांशीची राणी लक्ष्मीबाई युद्धात स्वर्गवासी झाली. अखेर बखतबली निराश होऊन इकडे-तिकडे भटकत राहीला. शेवटी मर्दनसिंहाबरोबर त्यालाही मुरार येथे इंग्रजांनी कैद केले.

बखत बलीला लाहोर येथे पाठवून त्यांना हकीकतराय यांच्या हवेलीत नजर कैदेत ठेवून दिले. तेथे ते खूप आजारी पडले, तेव्हा इंग्रजांनी त्यांना १८७२ साली बुंदेल-खंडात जाण्याची परवानगी दिली. तेथेही आजार वाढतच चालला आणि हा महापराक्रमी स्वातंत्र्ययोद्धा २८ सप्टेंबर १८७३ रोजी स्वर्गलोकी निघून गेला. बुंदेलखंडातली जनता शोकमग्न होऊन गेली. स्वातंत्र्यदेवतेच्या बलीवेदीवर अशा कित्येक महावीरांनी आपल्या प्राणांचे बलिदान केले आहे. त्या सर्वांना आपण विसरलो आहोत.



# ६७. बुलंद शहरचा पंडित

१८५७ च्या स्वातंत्र्य युद्धाला काही इतिहासकार इंग्रजांची री ओढून 'शिपायांचे बंड' म्हणतात. पण वस्तुस्थिती वेगळीच आहे. इंग्रजांच्या अत्याचारी व नृशंस राज्यापेक्षा पूर्वीच्या राजांचे, संस्थानिकांचे, जहागिरदारांचे राज्य फार चांगले होते, मग ते कोणत्याही धर्माचे असोत; अशी हिंदुस्थानातल्या सर्वसामान्य जनांची भावना होती. सर विल्यम हॉवर्डने म्हटले आहे, ''१८५७ चे युद्ध असे होते की, ज्यात सारी जनता आपल्या धर्माच्या नावाने बदला घेण्यासाठी, आपल्या आशा-आकांक्षांची पूर्ती करण्यासाठी जागी झाली होती. या युद्धात संपूर्ण देशाने आपल्यावरील फिरंग्यांचे राज्य उलथून टाकून देशी राजांची सत्ता व देशातील धर्मांचा अधिकार पुन्हा कायम करण्याचा संकल्प केला होता. हा शिपायांचा विद्रोह नसून राष्ट्रीय एकता करण्याचा सर्वात मोठा उठाव होता. त्यात देशातील प्रत्येक वर्गाने भाग घेतला होता. विल्यम हॉवर्ड त्याकाळात लंडन टाइम्सचा प्रतिनिधी म्हणून भारतात आला होता. असेच विचार सुजाण व विद्वान इंग्रज इतिहासकारांनी व्यक्त केलेले आहेत. असेच एक उदाहरण पुढे देण्यात येत आहे.

बुलंदशहरातील एक सर्वसामान्य ब्राह्मण पंडिताला इंग्रजांनी फांशी दिले होते, त्याची ही कहाणी आहे. बुलंद शहराच्या छावणीत ९ वी पलटण देशी शिपायांची होती. तिच्याबद्दल इंग्रजांना असा विश्वास वाटत होता की, देशातील इतर पलटणींनी जरी बंड केले, तरी ही ९ वी पलटण कधीही त्यात भाग घेणार नाही. बुलंदशहर जवळील गावातील लोकांनी एका सर्व सामान्य ब्राह्मण पंडिताला ९ व्या पलटणीत पाठवून त्या पलटणीतील सर्व शिपायांना उठावात भाग घेण्यासाठी उद्युक्त करण्याचे काम त्याच्याकडे सोपविले होते.

पंडित छावणीत पोचला, त्याने ९ व्या पलटणीतील सैनिकांना आपला परिचय दिला. सैनिकांनी त्याचे चांगले स्वागत केले. पंडिताने आपल्या साध्या सरळ पण प्रभावी वाणीने त्या सैनिकांना आपल्या देशाची परिस्थिती व इंग्रजांची कूटनिती समजावून सांगितली. त्याचा प्रभाव त्या सैनिकांवर पडला व त्यांनी त्या पंडिताला 'आम्हीही उठावात हिरीरीने भाग घेऊ', असे आश्वासन दिले. त्यानंतर तो पंडित छावणीतून घरी जायला निघाला. तेव्हा छावणीतील तीन स्वार्थी व लाचार सैनिकांनी तो पंडित कशासाठी छावणीत आला होता, हे छावणीच्या इंग्रज अधिकाऱ्यांना पळत जाऊन सांगितले. त्या इंग्रज अधिकाऱ्यांनी तात्काळ त्या गरीब पंडिताला कैद केले व त्याला लगेच एका गोऱ्या सैनिक तुकडीबरोबर अलिगडला मुख्य कार्यालयात पाठवून दिले.

उठावासाठी तत्पर झालेल्या ९ व्या पलटणीतील सैनिक अत्यंत व्यथित झाले व त्यांच्या मनात इंग्रज सत्तेविषयी तीव्र घृणा निर्माण झाली. त्या पलटणीतले बहुसंख्य देशी सैनिक आपल्या इंग्रज अधिकाऱ्यांना न विचारता आपापल्या शस्त्रांसह अलिगडला निघून गेले. तेथे त्यांना समजले की, त्या पंडिताला २० मे १८५७ रोजी फांशी दिले जाणार आहे. २० मे रोजी त्या पंडिताला अलिगड छावणीत सर्व सैनिकांसमोर फांशी देण्यात आले. त्या काळात ब्राह्मणाला 'ब्राह्मण देवता' म्हणून सारे लोक मानीत असत. त्या ब्राह्मण पंडिताला फांशी दिल्याने सगळ्या सैनिकांच्या मनात इंग्रजांविरूद्ध भयंकर तिरस्कार उत्पन्न झाला. तेव्हा एक सैनिक आपली तलवार उपसून त्या पंडिताच्या निर्जिव देहाकडे ती तलवार दाखवून म्हणाला, ''बंधूंनो, तुम्ही बघत आहात की, या ब्राह्मण हुतात्म्याने आपल्या रक्ताने स्नान केले आहे.''

त्या सैनिकाच्या या उद्‌गारांनी सैनिकांच्या मनात इंग्रजांविषयीच्या द्वेषाची ठिणगी पडली आणि सारे सैनिक गर्जून उठले, ''मारो फिरंगी को ।'' त्या गर्जनेने छावणीतील सगळे इंग्रज भयाक्रांत झाले. त्या गर्जनेचा अर्थच असा होता की, ''इंग्रजांनो, जर तुम्हांला तुमचे प्राण वाचवायचे असतील तर, ताबडतोब अलिगडहून चालते व्हा.''

वास्तविक पाहता त्या सैनिकांनी आपली उदारताच दर्शविली होती. त्यामुळे लगेच औट्राम आणि सर्व इंग्रज आपल्या परिवारासह अलिगड सोडून निघून गेले. अर्ध्या रात्री पर्यंत एकही इंग्रज अलिगडमध्ये उरला नाही. अलिगड स्वतंत्र झाले. ९ व्या पलटणीतील सैनिकांसह अलीगडमधले सर्व हिंदू-मुसलामन सैनिक स्वातंत्र्य-लढ्यात उतरले. मुसलमान सैनिकांना वाटले की, जर हे क्रूर इंग्रज हिंदूच्या पुरोहितांनाही फासांवर चढवितात, तर ते आमच्या मुल्ला-मोलवींना व काजींनाही ठार करण्यास मागे पुढे पाहणार नाहीत. त्या अनाम पंडिताच्या बलिदानाने स्वातंत्र्य युद्ध अधिकच तीव्र झाले.



# ६८. रोशन सिंह

सन १८०३ मध्ये बुलंदशहर जवळील दादरी संस्थानात १३३ गावे होती व त्या संस्थानचे प्रमुख शासक होते दरमाहीसिंह. त्याच वर्षी इंग्रजांनी उत्तरप्रदेशावर ताबा मिळविला होता. इंग्रजांच्या डोळ्यात त्या काळातली लहानमोठी राज्ये व संस्थाने आणि जहागिऱ्या खुपत होत्या. त्याला दादरी संस्थानही अपवाद नव्हते. पण दादरी संस्थान एकदम हडप करणे, त्यावेळच्या इंग्रज अधिकाऱ्यांना प्रशस्त वाटले नाही. तरी त्यांनी याबाबत एक मेख मारुन ठेवलीच. दरमाही सिंहाची राव किंवा राजा ही पदवी त्याच्या निधनानंतर काढून घेतली जाईल, असे त्यांनी दरमाही सिंहाला पत्र देऊन कळविले. सन १८१९ मध्ये दरमाही सिंहाचे निधन झाले. याचीच प्रतिक्षा इंग्रज सरकार करीत होते. त्यानंतर इंग्रज सरकारने त्यांचा मोठा मुलगा रोशनसिंह याला दरमाही सिंहांचा उत्तराधिकारी मानले, पण त्यांची १३३ गांवे आपल्या ताब्यात घेऊन त्यांचा एक नवा परगणा बनविला. रोशनसिंहाला ५०० रूपयांचे पेन्शन सुरू केले. सुसंस्कृतपणाचा दावा करणाऱ्या इंग्रजांचा काय न्याय आहे पाहा. १३३ गावांच्या लाखो रूपयांच्या उत्पन्नाच्या बदल्यात फक्त ५०० रुपये पेन्शन ! कोणालाही याचे वैषम्य वाटल्याशिवाय राहणार नाही. मग रोशनसिंह इंग्रजांविरूद्ध संतापला, तर ते वावगे कसे मानायचे ?

रोशनसिंहाप्रमाणेच दादरी संस्थानातील स्वाभिमानी गुजरांना इंग्रजांचे दास्य असह्य झाले होते. त्यांच्या मनात इंग्रजांविषयी असंतोष धुमसत होताच.

सन १८५७ चे स्वातंत्र्य युद्ध सुरू झाले, तेव्हा रोशनसिंहाचा इंग्रजांविषयीचा राग व दादरी भागातील गुजरांच्या मनातला असंतोष उफाळून आला. त्यांनी केशरी पोशाख चढवून त्या युद्धात अहमिकेने भाग घेतला. रोशनसिंहाचे पुत्र व भाऊ ही त्या युद्धात सामील झाले. दादरी भागातून कोणालाही जिवंतपणे बाहेर पडणे मुश्कील होऊन बसले, सर्वत्र अराजक माजले होते.

रोशनसिंह व त्याचे दोन्ही पुत्र व भाऊ यांनी १८५७ च्या स्वातंत्र्य युद्धात इंग्रजां विरूद्ध बंड केले होते. ते इंग्रजांशी प्राणपणाले लढले होते. त्यांचे साथीदार उमरावसिंह व सुरजितसिंह यांनी इंग्रजांची सत्ता झुगारून दिली होती व आसपासच्या गावांचा कारभार स्वतःकडे घेतला होता. अटाह गावचा इंदरसिंह, आणि नत्थासिंह, गुनापूरचा रामबक्श, जुनेदपूरचा दरियाबसिंह आणि राजपूरचा सरजीत सिंह यांनीही त्या युद्धात हिरिरीने भाग घेतला होता. उमरावसिंह व सुरजितसिंह इंग्रजांशी लढता लढता ठार झाले. युद्ध संपल्यावर इंग्रजांनी रोशन सिंह, त्याचे पुत्र बिशन सिंह व भगवंत सिंह,

इंदरसिंह, दरियाबसिंह, सरजीत सिंह, नत्थासिंह आणि रामबक्श यांना फासावर लटकावले या सर्वांची चल-अचल संपत्ती जप्त केली. या गुजरांची गावे तोफा डागून जाळून टाकली. गुजरांची सर्व गावे इंग्रजांविरूद्ध बंड करुन उठली होती. म्हणून त्यांच्या या नेत्यांना इंग्रजांनी स्वर्गलोकी पाठविले. इंग्रज अधिकाऱ्यांनी युद्धानंतर या प्रदेशात जुलूम, अत्याचार व अनाचाराचे थैमान मांडले होते, कां ? तर पुन्हा हे स्वाभिमानी गुजर, बंड करून उठू नये म्हणून ! अशा दमन चक्राने इंग्रजांनी जनतेला दडपून टाकले होते.

❖ ❖ ❖

# ६९. मेहताब सिंह रणधीर

"ईश्वराची आज्ञा आहे की स्वराज्य प्राप्त करा. कारण स्वधर्म - रक्षणासाठी स्वराज्य अत्यावश्यक असते. जो स्वराज्य - प्राप्तीसाठी प्रयत्न करीत नाही व परदास्यात ही तटस्थ राहतो, तो अधर्मी तर आहेच, देशद्रोही सुद्धा आहे. म्हणून स्वधर्मासाठी स्वराज्य प्राप्त करा." बुलंदशहर जिल्ह्यातील बराल गावचे मेहताबसिंह यांच्या अंतःकरणात हे शब्द जणू कोरले गेले होते.

मेरठ छावणीत स्वातंत्र्य युद्धाची ठिणगी पडली आणि त्या ठिणगीने बरालपासून गुलावटी, मालागड, बुलंद शहरापर्यंतच्या प्रत्येक गावातील तरुणांची मने त्या युद्धात उडी घेण्यासाठी पेटविली होती. प्रत्येक गावातील लोक इंग्रज सरकारविरुद्ध पेटून उठले होते. बराल गावचे तरुण राजपूत मेहताबसिंह रणधीर यांनी त्या जनतेचे नेतृत्व सांभाळले. त्या भागातील सर्व गावांतील तरुणांनी मेहताब सिंहाच्या नेतृत्वाखाली शस्त्रे उपसली व ते इंग्रजांविरुद्ध लढण्यास तत्पर झाले. 'स्वातंत्र्य' हाच शब्द ज्याच्या त्याच्या मुखी होता. सुमारे २०,००० तरुण मेहताबसिंहा भोवती संघटित झाले होते.

बुलंदशहरचा मॅजिस्ट्रेट टर्नबुल याला ही बातमी समजताच तो तेथली एक पटलण घेऊन मेहताबसिंहाचा काटा काढण्यासाठी बराल गावी आला. दोन्ही सैन्यात भयंकर युद्ध झाले. दोन्ही बाजूंचे शेकडोवीर त्या युद्धात मरण पावले. धरती रक्ताने लालेलाल झाली. त्या युद्धात अहीर चौबासी म्हणजे यादवांच्या चोवीस गावातील लोक सुद्धा इंग्रजांविरुद्ध लढले. क्रांतिकारकांनी आपल्या अदम्य उत्साहाने व पराक्रमाने टर्नबुलला व त्याच्या गोऱ्या सैन्याला आश्चर्यचकित केले. मेहताब सिंह दुर्दैवाने या युद्धात कामी आले. बराल आणि आसपासची अनेक गावे टर्नबुलने जप्त केली.

या युद्धाने व्यथित होऊन मालगडचा नबाब वलिदाद खाँ याने बुलंदशहरच्या त्या मॅजिस्ट्रेटला पत्र लिहिले ते असे -

"आपण एक आज्ञापत्र मला पाठविले आहे. त्यात आपण लिहीले आहे की, बराल गावात गुजरांची एक मोठी सेना माझ्या सल्ल्याने जमली आहे व ती फौज संघर्ष करण्यास उतावीळ झाली आहे. सत्य हे आहे की, बराल गाव माझ्या रियासतीत नाही. त्या प्रदेशात माझा हुकूम मानणारे माझ्या जातीचे लोक मुळीच नाहीत.

आपल्या लोकांनी विनाकारण मेहताब सिंहासारख्या व्यक्तीला ठार केले आहे. तो साधारण मनुष्य नव्हता. तो बराल भागाचा मुखिया होता व त्या भागातील लोकांच्या मनात त्याच्याविषयी फार आदर होता. मेहताब सिंहाच्या हत्येमुळे सगळे राजपूत तुमच्या

विषयी नाराज झाले आहेत. जर आपण अशाच रीतीने लोकांना ठार करीत राहिलांत, तर हा जिल्हा बरबाद होऊन जाईल. तुमच्या या कारवाईने १२ हजार लोकांना प्राण गमावावे लागले आहेत. तसेच करोडो रुपयांची संपत्ती नष्ट झाली आहे. मी तुमच्याबद्दलची तक्रार गव्हर्नर जनरल कडे करीन''

मेहताबसिंहाच्या बलिदानामुळे वलीदाद खाँ फार व्यथित झाला होता. हे पत्र लिहिल्यानंतर दोन दिवसांनी वलीदादखाँने बुलंदशहरातून इंग्रजांना पळवून लावले. बुलंदशहर गुलावटी - हापुड मार्गावरील खेड्यातील लोकांनी त्या पळून जाणाऱ्या इंग्रजांवर गोळीबार केला. ३१ मे १८५७ रोजी ते इंग्रज मेरठ येथे पोचले.

बराल गावात ज्या पिंपळाच्या वृक्षाजवळ मेहताबसिंह धारातीर्थी पडले, त्या ठिकाणी बराल गावच्या व आसपासच्या गावच्या लोकानी त्यांचे स्मारक उभारले आहे. त्यांच्या समाधीवर श्रद्धाळू लोक दिवा लावतात व प्रसादही चढवितात. त्या समाधी-स्थानाला 'देवता का थान' म्हटले जाते. थान म्हणजे स्थान. मेहताबसिंह आता सुद्धा त्या प्रदेशात देवतातुल्य मानले जातात. बराल गावाला 'पुण्यभूमी' व 'वीरभूमी' मानले जाते. महान क्रांतिकारी राजा महेद्र प्रताप यांची मूर्ती सुद्धा या गावात स्थापन करण्यात आली असून ते स्थानही पवित्र मानले जाते.

बराल गावाच्या कांडावरून हे लक्षात येते की, केवळ लोकांची संघटना एखाद्या पुरुषाने उभारली, तरी ती इंग्रजांना धोकेदायक वाटत असे. वास्तविक पाहता मॅजिस्ट्रेट टर्नबुलने उतावीळ होऊन हे युद्ध त्या भागातील लोकांवर लादले होते व नाहक हजारो लोक त्या युद्धात बळी गेले होते. लोकांची संघटना उभारणे हा काही गुन्हा नव्हे. त्या संघटनेपासून त्रास झाला, तर त्याचा प्रतिकार करणे योग्य. पण संघटना उभारणेही इंग्रजांच्या निरंकुश सत्तेला सहन होत नव्हते, हेच बराल गावच्या घटनेवरून स्पष्टपणे दिसून येते.



# ७०. लाला झनकूमल सिंहल

मेरठच्या छावणीतील देशी सैन्याने १० मे १८५७ रोजी स्वातंत्र्ययुद्धाचे रणशिंग फुंकले. त्याचे प्रतिध्वनी देशभरात उमटले. गरीब-श्रीमंत, शेतकरी-मजूर, जमीनदार-व्यापारी, जहागीरदार संस्थानिक सर्वांच्याच कंठांतून एकदम उद्‌गार निघाले - 'अत्याचारी इंग्रजांचे राज्य उलथून टाकायचेच.' मग सिसोदिया वंशाचे राजपूत गप्प कसे राहतील? धौलाना, पिलरबुवा, डासना, मसुरी, मुकीमपूर इ. गावातील महाराणा प्रतापांचे वंशज राष्ट्रभक्तीच्या भावनेने उत्तेजित झाले. सिसोदिया वंशाच्या धौलाना गावातील तरुणांनी एकत्र येऊन आपल्या प्रदेशातील इंग्रजांना हाकून लावण्याचा निश्चय केला. तेव्हा त्या गावातील लाला झनकूमल सिंहल या व्यापाऱ्याला महाराणा प्रतापाला आर्थिक साह्य करणाऱ्या भामाशाहची आठवण झाली. तरुणांच्या त्या गुप्त बैठकीत त्याने प्रसन्न चित्ताने घोषणा केली, "तुम्ही महाराणा प्रतापसिंहांचे वंशज आहात. मी भामाशाह एवढा श्रीमंत जरी नसलो, तरी मी माझी संपत्ती या कार्यासाठी तुम्हांला देईन."

धौलाना गावतील या राजपूत तरुणांनी एकत्र जमून धौलाना येथील पोलिस ठाण्यावर प्रथम हल्ला केला. तेथला ठाणेदार जीव घेऊन पळाला व शेजारच्या काकराना गावातील एका शेतकऱ्याच्या घरासमोरील गोवऱ्यांच्या गंजीत लपून बसला. तेथ.न तो लपत-छपत मेरठला गेला आणि त्याने धौलाना गावातील तेरा क्रांतिकारकांची यादी तेथल्या इंग्रज अधिकाऱ्याला देऊन त्यांनी पोलिस ठाण्यावर कसा हल्ला केला, ते सांगितले.

दुसऱ्या दिवशी एक मोठी इंग्रजांची पलटन धौलाना येथे पोचली. तिने त्या गावाला वेढा दिला. सुमेर सिंह, साहब सिंह, मख्खन सिंह, चंदन सिंह, दौलत सिंह आदि तेरा राजपूत तरुणांना अटक केली. नंतर ते लाला झनकूमलकडे वळले त्याला त्यांच्या दुकानातून पकडून आणून त्या पलटणीच्या इंग्रज अधिकाऱ्यासमोर उभे केले.

तो इंग्रज अधिकारी त्याला म्हणाला, 'लाला हे राजपूत बंडखोर होऊ शकतात, पण व्यापाऱ्यांची तर आम्ही फार काळजी घेतो. त्यांचा सन्मान करतो. खरे काय ते सांगा. जर तुम्ही निर्दोष असाल, तर तुम्हांला सोडून देण्यात येईल."

साधासरळ दिसणारा तो लाला एकदम गरजला, "जर हे राजपूत आणि शेतकरी दोषी आहेत; तर मी सुद्धा निर्दोष नाही. परंतु मी स्वतःला दोषी मुळीच समजत नाही. कारण आमच्या मातृभूमीला परकीयांच्या गुलामीतून स्वतंत्र करण्याच्या प्रयत्नांना मी देशभक्तांचा धर्म मानतो."

लाला झनकूमलचे हे बाणेदार उत्तर ऐकताच तो इंग्रज अधिकारी क्षणभर आपली मान खाली घालून बसून राहिला. बहुधा तो लालाच्या उत्तराने प्रभावित होऊन आपली श्रद्धा प्रकट करीत असावा. लगेच तो सावध झाला. त्याने लाला झनकूमलला त्याच्या देशभक्तीचे बक्षीस म्हणून फाशीची शिक्षा दिली.

लाला झनकूमल सह त्या तेरा राजपूत तरुणांना त्या गावातील एका मोठ्या पिंपळाच्या झाडाच्या फांद्यावर सर्व गावकऱ्यांसमोर फांशी देण्यात आले. ते भयानक दृश्य पाहून त्या गावातील बायका-मुलांच्या व पुरुषांच्या मनात धडकीच भरली. जणू क्षणभर त्यांच्या ह्रदयाची गती थांबली होती.

आपल्या सभ्यतेचा, सुसंस्कृतपणाचा तोरा मिरविणाऱ्या त्या सर्व इंग्रजांचे तेवढ्यानेही समाधान झाले नाही. त्यांनी त्या गावातील चौदा कुत्री मारली. एका मोठा खड्डा खणून त्यात त्या फासावर चढविलेल्यांच्या प्रेतांबरोबर त्या चौदा निर्जीव कुत्र्यांची प्रेतेही त्या खड्ड्यात टाकली व त्या अठ्ठावीस प्रेतांचे एकत्र दफन केले.

नंतर त्या इंग्रज अधिकाऱ्याने मोठ्या आवाजात समस्त गावकऱ्यांना धमकी दिली. "गावकऱ्यांनो नीट डोळे उघडून बघा. इंग्रज सरकार विरूद्ध कारवाया करणाऱ्यांना असेच कुत्र्यांच्या मौतीने मरावे लागते, हे नीट लक्षात ठेवा." २६ नोव्हेंबर १८५७ रोजी लाला झनकूमलचे घर त्यांनी लुटले व संपूर्ण धौलाना गाव जप्त केल्याची घोषणा केली.

आपला देश स्वतंत्र झाल्यावर दहा वर्षांनी त्या प्रथम स्वातंत्र्य युद्धाचा शताब्दी महोत्सव देशभर साजरा करण्यात येऊन त्यातल्या क्रांतीकारकांना श्रद्धांजली वाहण्यात आली. धौलाना गावातील ग्रामस्थांनी त्या पिंपळाच्या झाडाजवळ त्या १४ हुतात्म्यांचे मोठे स्मारक उभारले.

❖❖❖

# ७१. राजा बलभद्रसिंह चहलारी

उत्तर प्रदेशात सीतापूर व बहराइच या नगरांच्या मधील प्रदेशातून शरयू (घागरा) नदी वाहते. या नदीच्या तीरी असलेल्या चहलारी घाट नावाच्या गावात चहलारीचे जहागीरदार ठाकुर श्रीपालसिंह यांचे वास्तव्य होते. त्यांची जहागीरदारी आसपासच्या ३३ गावात होती. बहराइच जनपदातील मुरौआडीह गावात त्यांचा मुलगा बलभद्रसिंह याचा जन्म १० जून १८४० रोजी झाला. त्यांच्या वैभवशाली चहलारी गावात बलभद्रसिंहाचे लालन-पालन आणि शिक्षण झाले. युद्धकलेतही तो कुमारवयातच प्रवीण झाला. तो उंचापुरा, धष्टपुष्ट, सुंदर व राजबिंडा तरुण तेजस्वी आणि धीर-गंभीर वृत्तीचा असल्याने त्याची छाप कोणावरही चटकन पडायची. श्रीपालसिंहानंतर बलभद्रसिंह चहलारीचा राजा झाला. त्या आधीच त्याचे लग्न झाले होते. जो राजा झाला तेव्हा त्याचे वय आठरा वर्षांचे होते. बुद्धीमान व कुशल प्रशासक असल्याने त्याने आपला राज्य कारभार उत्तमरितीने चालविला. आपल्या वागणुकीने त्याने आपल्या प्रजेचे प्रेम संपादन केले होते.

१४ मार्च १८५८ रोजी इंग्रजांनी महत्प्रयासाने लखनौ शहरावर ताबा मिळविला होता. तेव्हा लखनौची बेगम हजरत महल हिने आपल्या कोवळ्या वयाच्या मुलासह बिरजिस कद्रसह लखनौ सोडले व तिने आपल्या लव्याजम्यासह बौंडी येथील राजा हरदत्तसिंह यांच्या गढीत आश्रय घेतला. तेथे नानासाहेब पेशवे, मौलवी अहमदशाह व राणा बेनी माधोसिंह हे सुद्धा आपल्या लव्याजम्यासह बौंडीला आले. बौंडी येथे या सर्वांच्या सैन्याने तळ दिला. नानासाहेब पेशव्यांना पकडून देणाऱ्यास इंग्रज सरकारने एक लाख रुपयांचे बक्षीस जाहीर केले होते. इंग्रज सैन्य त्यांच्या पाठलागावरच होते. या सर्वांनी बिरजिस कद्र याला 'अवधचा बादशाह' म्हणून घोषित केले. बेगम हजरत महल हिने आपल्या शरीरात शेवटचा रक्ताचा थेंब असे पर्यंत इंग्रजांशी लढण्याची प्रतिज्ञा केली होती. कोलिन कॅंपबेल मोठे सैन्य व तोफखाना घेऊन त्यांच्या पाठलागावर होता. दुसऱ्या बाजूने होपग्रँट सैन्यानिशी त्यांच्यावर चालून येण्याच्या प्रयत्नात होता. यासंबंधी ते विचार करीत असतांना त्यांना समजले की, चहलरीचा तरुण राजा शूर, धाडसी व रणकुशल आहे. बेगम हजरत महलने त्याला बोलविण्यासाठी एक पत्र दूता करवी बलभद्रसिंहाकडे चहलारीला पाठविले. दूत चहलारीला पोहचला तेव्हा त्याला समजले की, बलभद्रसिंह आपला धाकटा भाऊ छत्रपालसिंह याच्या लग्नासाठी वरात घेऊन शिवपूरला गेला आहे. दूत लगेच शिवपूरला गेला आणि त्याने ते पत्र बलभद्रसिंहाला दिले.

पत्र वाचताच बलभद्रसिंहाने आपले कर्तव्य काये ठरविले. त्याने वरात वळलारीला परत पाठविली व तो शिवपूरहून परस्पर बौंडीला गेला. तेथे त्याने बेगम हजरत महल हिची भेट घेतली. नानासाहेब, मौलवी अमदशाह आदींनी बलभद्रसिंहाचे स्वागत केले. बेगम हजरत महल हिने बलभद्रसिंहाला इंग्रजांविरुद्ध सहकार्य करण्याचे अवाहन केले. बाराबंकी जनपदातील सुप्रसिद्ध तीर्थक्षेत्र महादेवा येथे जाऊन होपग्रँट याच्याशी लढा देण्याचे काम बलभद्रसिंहाकडे सोपविले. बलभद्रसिंहाने प्रसन्न मनाने ते काम स्वीकारले आणि तो लगेच चहलारीला परतला.

बलद्रसिंहाने चहलारीला गेल्यावर आपल्या सैन्याची तयारी केली. युद्धसाहित्य जमविले. त्यानंतर त्याने आपल्या सैन्याला महादेवाकडे कूच करण्याचा आदेश दिला. नंतर राजमहालात जाऊन आपल्या तरुण गर्भार पत्नीचा त्याने निरोप घेतला. त्यावेळी त्याचे वय अवघे अठरा वर्षांचे होते. त्या षोडषवर्षीय पत्नीने त्याला कुंकुमतिलक लावून ओवाळले आणि त्याच्या कमरेला दोन रत्नजडित तलवारी बांधल्या. नंतर त्याने आपल्या आईचा आशीर्वाद घेतला व तो महादेवाकडे प्रस्थान करता झाला. महादेवा येथे आधीच नानासाहेब, बिरजिस कद्र, मौलवी अहमदशाह, राजा बेनी माधोसिंह व बौंडीचा राजा हरदत्तसिंह, बेगम हजरत महलसह उपस्थित होते. बेगम हजरत महल हिने बलभद्रसिंहाला 'राजा' ही पदवी दिली. मानाची वस्त्रे, एक रत्नजडित तलवार, शंभर गावांची जहागीर व एक हत्ती भेट म्हणून दिला.

राजा बलभद्र सिंहाने लखनौ-फैजाबाद मार्गावरील रेठ नदीवरील पुलाच्या पूर्वेस असलेल्या ओबरी गावाच्या विशाल मैदानावर आपल्या सैन्याची व्यूहरचना केली. आपले १६ हजारांचे सैन्य युद्धास सज्ज केले. हे समजताच इंग्रज सेनापती बिग्रेडिअर होप ग्रँट पूर्णपणे तयारी करून आपल्या विशाल सैन्यासह आबरीकडे निघाला. त्याचे सारे सैन्य आधुनिक शस्त्रांसह सज्ज होऊन निघाले. त्या सैन्याबरोबरच लांब पल्ल्याच्या तोफाही होत्या. चिनहरजवळ कर्नल पुरनेल आपल्या १२०० सैनिकांच्या तुकडीसह येऊन होप ग्रँटला मिळाला. होप ग्रँट साऱ्या सैन्यासह आवरीच्या पुलाजवळ बलभद्रसिंहाच्या पुढे येऊन उभा राहिला.

१३ जून १८५८ रोजी होप ग्रँटने रेठ नदीच्या पुलावरून पुढे जाण्याचा आदेश आपल्या सैन्याला दिला. इंग्रजांचे सैन्य पूल पार करून येताच बलभद्र सिंहाने आपले सैन्य चार भागात विभाजित करून इंग्रजांच्या सैन्यावर चारही बाजूंनी हल्ला केला. त्या हल्ल्यामुळे इंग्रज सैन्याचे होश उडाले. होप ग्रँटला आपला पराभव स्पष्टपणे दिसू लागला. पण त्याने आपला धीर सोडला नाही. क्रांतिकारकांचे सैन्य उत्साहाने व

प्राणपणाने लढत होते. होप ग्रँट आपल्या सैन्याच्या मध्यभागी पोचला. त्याने चारी बाजूंनी हल्ला करण्याचा आदेश आपल्या सैन्याला दिला. त्यांच्या हल्ल्याने क्रांतिकारकांच्या सैन्याचा एकमेकांचा संपर्क तुटला. त्याच वेळी उत्तरेकडून इंग्रजांच्या मदतीसाठी आणखी सैन्याच्या दोन तुकड्या आल्या. त्यांनी जोराचा हल्ला केल्याने इंग्रजांची बाजू सावरली गेली. तुंबळ युद्धास सुरूवात झाली. क्रांतिकरकांचे सैन्य मागे हटू लागले. परंतु राजा बलभद्रसिंह त्वेषाने इंग्रज सैन्याशी लढत राहिला. ६०० सैनिकांसह तो धारातिर्थी पडला. तो पराभूत झाला, पण आपली निष्ठा व सन्मानाला डाग लागू दिला नेही. होप ग्रँट ही या युवा योद्ध्याचे धैर्य व शौर्य पाहून चकित झाला. अशाच महान स्वातंत्र्य योद्ध्यांनी भारताचे स्वातंत्र्य जवळ आणले, हे विसरता कामा नये. धन्य तो युवा योद्धा!



# ७२. जगतसेठ रामजीदास गुडवाला

१८५७ चे स्वातंत्र्ययुद्ध सुरू झाले. मेरठच्या छावणीतील देशी पलटणीने १० मे १८५७ रोजी इंग्रजांविरूद्ध बंड पुकारून तेथल्या इंग्रजांना ठार केले. ते रातोरात दिल्लीला आले. त्यांनी दिल्लीचा ८२ वर्षांचा म्हातारा धनहीन बादशाह बहादुरशाह जफर याला दिल्लीचा सम्राट म्हणून घोषित केले. दिल्लीच्या देशी पलटणीही त्यांना सामील झाल्या. आता बादशाहला प्रश्न पडला की, एवढ्या मोठ्या सैन्यासाठी पैसा कसा मिळवावा? तेव्हा दिल्लीचा करोडपती जगतसेठ रामजीदास गुडवाला त्यांच्या मदतीस धावून आला. त्याने करोडो रुपये बैलगाड्यांतून आणून त्यांची रास बादशाह पुढे ओतली. इंग्रजांच्या गुलामीतून आपल्या देशाला मुक्त करण्यासाठी हा अत्यंत धनवान व्यापारी मुक्त हस्ताने आपल्या खजिन्यातून करोडो रुपये वेळोवेळी बादशाहला पुरवू लागला. असा व्यापारी शोधून सापडणे दुर्मिळच!

बहादुरशाह जफर त्यांचा नेहमीच सन्मान करीत असत. त्यांना बादशाहने अनेक किताब दिले होते. त्यांच्या वाड्याच्या सुरक्षितेसाठी बादशाहने खास सैनिकांची नेमणूक केली होती. ज्यावेळी शेटजीच्या घरी विशेष समारंभ असायचा, त्यावेळी बादशाह जातीने त्या समारंभास उपस्थित राहयचा. त्यावेळी शेटजी त्यांना दोन लाख मोहरा भेट देत असे. त्यांची देशभक्ती अतुलनीय होती.

त्या काळापर्यंत ईस्ट इंडिया कंपनीने भारताचा बहुतेक प्रदेश पादाक्रांत केला होता. उत्तर मुघलकालीन सगळे बादशाह नादान निघाले. मुघल साम्रज्याचे अनेक तुकडे होऊन ते त्यांच्याच सुभेदारांनी बळकावले. दिल्लीचा शेवटचा बादशाह बहादुरशाह यांच्या काळात तर मुघलांचे राज्य दिल्ली पुरतेच राहिले. त्यांच्या आधी पासूनच दिल्लीचे बादशाह इंग्रजांच्या हातातले बाहुले बनले होते. दरवर्षी कंपनी सरकार त्यांना १२ लाख रुपये पेन्शन म्हणून देत असे. त्यामुळे त्यांच्या खजिन्यात धनाचा ठणाणा होता. कंपनी सरकार देशातील जनतेचे, लहान मोठ्या राजेरजवाड्यांचे बेमुर्वतरखोरपणे भयंकर शोषण करीत होते. इंग्रजांची हाव वाढतच होती. त्यांच्या दडपणाखाली देशातली जनता भरडून निघत होती. हे कविमनाच्या बहादुर शाह जफरला बघवत नव्हते. तो तर अगदी किंकर्तव्यमूढ होऊन बसला होता. १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धात तो जरी नाईलाजाने सामील झाला होता, तरी त्याच्या अशा थोड्या का होईना पालवल्या होत्या. त्यावेळी जगत सेठ रामजीदास गुडवाला त्याच्यापुढे अगदी देवासारखा येऊन उभा राहिला. शेठजीने गुप्तहेरांची संघटनाही उभारली. बादशाहा भोवतालचे स्वार्थी व विश्वासघातकी व फितुर आणि इंग्रजांच्या हालचाली समजण्यासाठी या गुप्तहेर यंत्रणेचा फार उपयोग झाला.

बादशाहाची हांजी हांजी करणारे त्याच्या दरबारातील लोक तर कुचकामी होते. ते स्वार्थी, आळशी, चैनबाज व आपसात भांडणारे होते. त्यामुळे शेठजींना चिंता वाटत होती. ते लोक या स्वतंत्र्य युद्धासाठी निकामी होते. म्हणूनच त्यांनी बादशाहाला धनाचा व धान्याचा मुक्त हस्ते पुरवठा नव्या जोमाच्या सैन्यासाठी केला. इंग्रज अधिकारीसुद्धा शेटजीचा प्रभाव व स्वभाव ओळखून होते. त्यांनी शेतजीला आपल्याकडे वळवून घेण्याचा खूप प्रयत्न केला. पण शेठजींनी त्यांना दाद तिली नाही.

१२ मे १८५७ ते २० सप्टेंबर १८५७ पर्यंत सुमारे साडेचार महिने दिल्ली स्वतंत्र राहिली. नंतर इंग्रजांनी दिल्ली ताब्यात घेतली. त्यासाठी पतियाळा, नामा व जिंदच्या संस्थानिकांनी इंग्रजांनी सैन्याची, शस्त्रास्त्रांची व धनधान्याची भरपूर मदत केली होती. ग्वाल्हेरचे शिंदे व अनेक राजपूत राजे इंग्रजांच्या बाजूने उभे राहिले होते. ते इंग्रजांपुढे लाचार बनले होते. या स्वातंत्र्य युद्धात त्यांचे कातडी बचाऊ धोरण होते. हे संस्थानिक जर इंग्रजांविरुद्ध उठले असते, तर दिल्लीवर इंग्रजांना विजय मिळविता आला नसता, हे ऐतिहासिक सत्य आहे. अशा स्थितीत विद्रोही सेनापती बख्तखाँ आपल्या सैन्यासह लखनौकडे निघाला. जातांना त्याने बादशाह बहादुरशाहाला आपल्याबरोबर त्याच्या कुटुंब कबिल्यासह लखनौला यायचा सल्ला दिला. पण इंग्रजांना फितुर झालेला बादशाहाचा व्याही इलाहीबक्श याने बादशाहाला बख्तखाँबरोबर जाऊ दिले नाही.

दिल्ली इंग्रजांच्या ताब्यात आल्यानंतर त्यांनी दिल्लीत जो नरसंहार केला, तो अत्यंत भयानक होता. त्यांनी लूटमार करून दिल्लीला कंगाल करून सोडले. हत्याकांडाने दिल्ली उजाड बनली. याबद्दल लॉर्ड एल्फिस्टनने लिहिले, 'दिल्लीचा घेरा उठविल्यानंतर आमच्या सैन्याने जी क्रूरता केली, जे अत्याचार केले, ते पाहून काळजाचा थरकाप होतो. आपला शत्रू कोण, मित्र कोण याचा विचार न करता सूडाचे प्रचंड थैमान मांडले. लूटमार करण्यात तर आमच्या सैन्याने नादिरशाहावरही मात केली. जनरल औट्रम तर संपूर्ण दिल्ली जाळून जमीनदोस्त करण्याचे सांगत होता. दिल्लीच्या चांदणी चौकात हजारो विद्रोहींना फासावर लटकविण्यात आले.' इतिहासकार जॉन के ने लिहून ठेवले आहे, 'दिल्लीत आठ बैलगाड्या दिल्लीच्या गल्यांतली, रस्त्यातली व बाजारपेठांतली प्रेते दूरवर फेकून देण्यासाठी अनेक महिने ती प्रेते घेऊन जात होत्या.' लोहारुच्या नबाबाने लिहिले आहे, 'केवळ दिल्लीतच २६००० हजार लोक मारले गेले. शेकडो देशभक्तांना आजन्म कारावासाच्या शिक्षा दिल्या गेल्या.'

त्या काळात दिल्लीतून जी वृत्तपत्रे निघत होती, त्यांच्या संपादकांना व पत्रकारांना फाशी देण्यात आले. तेव्हा बादशाहाला करोडो रुपयांची मदत व शेकडो मण धान्य

देणाऱ्या जगतसेठ रामजीदास गुडवाला यांना ते क्रूर इंग्रज कसे सोडतील? त्यांनी या शेठजीला पकडून आणून त्यांच्यावर शिकारी कुत्रे सोडले. त्या कुत्र्यांनी शेठजीच्या शरीराचे कित्येक लचके तोडले. नंतर त्यालाही चांदणी चौकात फासावर लटकवले. कोणत्याही विचारी माणसाच्या मनात असा प्रश्न उभा राहील की, जगत सेठ रामजीदास गुडवाला हे गुन्हेगार कसे? त्यांनी इंग्रजांचे काय घोडे मारले होते? त्यांनी बहादूर शाहाला दिलेली संपत्ती व धान्य इंग्रजांची होती काय? त्यांनी आपली स्वतःची संपत्ती व स्वतःचे धान्य बादशाहाला दिले. मित्राने मित्राला मदत केली, तर तिऱ्हाईताला त्याचे वैषम्य का वाटावे? इंग्रजांना ते फितुर झाले नाहीत, याला गुन्हा म्हणायचे काय? पण इंग्रज या देशात जी दडपशाही, गुंडगिरी व अत्याचार करीत होते, त्याच्या अनुरूपच त्यांचे हे कृत्य होते. 'तू नाहीस, तर तुझ्या बापाने' या वृत्तीनेच इंग्रजांनी जूलुम जबरदस्ती करून या देशात अपल्या राज्याचा विस्तार केला होता. भयंकर लूटमार करून या देशाला कंगाल बनविले होते. त्यामुळे हजारो लोक देशोधडीस लागले होते. इंग्रजांची हांजी हांजी करणारे स्वार्थी लोक व राजे रजवाडे मात्र इंग्रजांच्या आश्रयाने सुखासमाधानाने जगत होते. शेठजीला फांशी दिल्यावर त्यांची सारी करोडो रुपयांची संपत्ती इंग्रजांनी हडप केली, हे त्यांच्या संस्कृतीला धरूनच होते, असे म्हणावे लागेल.

❖ ❖ ❖

# ७३. नबाब अब्दुल रहमान खाँ

अब्दुल रहमान खान खाँचा पिता नबाब फैज अली खाँ अत्यंत जुलमी, दुराचारी व व्यसनी होता. त्याच्या कारकीर्दीत त्याची प्रजा अत्यंत पीडीत व दुःखी होती. हरियाणा राज्यातील रोहटक जिल्ह्यात त्याचे झज्जर संस्थान होते. त्याचे निधन झाले तेव्हा झज्जर संस्थानातील प्रजेला हायसे वाटले. त्यांच्या निधनानंतर त्याचा मुलगा अब्दुल रहमान खाँ गादीवर आला तो झज्जरचा नबाब बनला. तो मात्र सद्‌गुणी व विचारी होता. आपल्या प्रजेचे दुःख निवारण करण्यासाठी तो सतत प्रयत्नशील होता. त्यामुळे त्याच्या राज्यात प्रजा सुखा-समाधानाने राहू लागली. त्याने जेव्हा आपल्या संस्थांनचा दौरा केला, तेव्हा त्याला आढळले की, आपल्या बापाच्या काळातले गुमास्ते प्रजेकडून जबरदस्तीने मन मानेल तसा कर वसूल करीत आहेत. तेव्हा त्याने त्या गुमास्त्यांना नोकरीवरून दूर केले व प्रामाणिकपणे काम करणारे गुमास्ते नेमले. वसूल निश्चित केला व ठरल्यापेक्षा जास्त वसूल न करण्याची ताकीद नव्या गुमास्त्यांना दिली. उजाड झालेली गावे पुन्हा बसवली.

अब्दुल रहमान खाँने आधी झज्जरचे पंडित रिजपाल सिंह यांना आपला दीवाण नेमले. त्यानंतर कुलानीचे स्यालू सिंह व बादलीचे चौधरी गुलाब सिंह यांना दीवाणपदी नेमणुका दिल्या. अब्दुल रहिमान खाँ बहराइच वंशीय पठाण होता. तसाच बहादुरगडचा नबाबही त्याच वंशाचा होता. बहादूरगडचा नबाब मोहम्मद इस्माईलखाँ मरण पावला, तेव्हा त्याचा मुलगा बहादूरजंग फक्त अडीच वर्षांचा होता. अब्दुल रहमानखाँने त्याचा सांभाळ तर केलाच पण त्याच्या बहादूरगड संस्थांचा कारभारही उत्तम रीतीने केला. वयात आल्यावर बहादूरजंग याने आपले संस्थान आपल्या ताब्यात देण्याची मागणी अब्दुल रहमान खाँ कडे केली. तेव्हा अब्दुल रहमान खाँ ने त्या संस्थानातील दादरीचा भाग आपल्याकडे ठेवून बहादूरगडच्या संस्थानचा बाकीचा सर्व भाग बहादूरजंगकडे सोपविला. दादरीचे क्षेत्र आपल्या ताब्यात मिळावे, म्हणून बहादुरजंगने दिल्लीच्या रेसिडेंटकडे अपील केले. या दोन्ही संस्थानांच्या कारभारात हसतक्षेप करण्याची संधी इंग्रजांकडे आयतीच चालून आली. त्या रेसिडेंटने दादरी क्षेत्रातील १९ गावे अब्दुल रहमान खाँकडे राहू दिली व बाकीची गावे बहादुरजंगला देऊन टाकली.

सन १८४८ मध्ये बहादुरगड तरुण नबाब बहादुरजंग याची आर्थिक स्थिती भयंकर खालावली. तो कर्जबाजारी झाला. दादरी क्षेत्र लिलावात काढण्याचा प्रसंग आला, तेव्हा झज्जारचा नबाब अब्दुर रहमान खाँ याने बहादुरजंगचे सर्व कर्ज चुकते केले आणि

दादरीचे त्याच्याकडचे क्षेत्र आपल्या ताब्यात घेतले. इंग्रज अधिकारी बहदुरगडचा हा अत्यंत सुपीक भाग गिळंकृत करू पाहात होते. पण अब्दुल रहमान खाँने ते प्रकरण आपसात मिटवून तो सुपीक भाग आपल्या ताब्यात घेतल्याने इंग्रजांचा रोष या दोन्ही नबाबांना पत्करावा लागला.

त्यानंतर १८५७ चे स्वातंत्र्य युद्ध सुरू झाले. इंग्रजांच्या विस्तारवादी व देशी जनतेचे आणि राजे-रजवाड्यांचे शोषण करणाऱ्या कारभाराविषयी अब्दुल ऱहमान खाँ याच्या मनात तीव्र असंतोष होता. तो स्वातंत्र्यप्रिय देशभक्त होता. त्याच्या संस्थानात ३५० गावे होती व वार्षिक उत्पन्न १४ लाख होते. अब्दुल रहिमान खाँ ने आपले सैन्य सुदृढ केले. सैन्यात नवीन भरती केली. दोन छावण्या उभारल्या. त्यांत सैनिकांना गोळीबाराचे प्रशिक्षण दिले जाऊ लागले. नवीन उमदे घोडे सैन्यासाठी खरेदी केले. अवधच्या बेगम केसरने लिहिलेल्या केसरनाम्यात तिने नबाब अब्दुल रहमान खाँ विषयी लिहिले आहे, 'नबाब झज्जरने यह पक्का इरादा कर लिया है की, आजादी की लडाई में वह पूरी मुस्तैदी से बादशाहा का साथ देंगे। उनकी पलटन में पूर्वीये ऊँचे दर्जे के लडाके हैं।' नबाबाने आपल्या झज्जर किल्ल्याची दुरूस्ती केली व त्याच्या बुरुजांवर तोफा लावून ठेवल्या.

१० मे रोजी इंग्रजांच्या छावणीतील देशी पलटणीने उठाव केला व ११ मे रोजी दिल्लीला येऊन बहादुरशाह जफरला आपला नेता बनविले. दिल्लीच्या छावणीतील देशी पलटणीही त्यांना सामील झाल्या. दिल्ली त्यांनी जिंकली. अशा परिस्थितीत इंग्रजांनी अब्दुल रहमान खाँकडे संदेश पाठवून १२ मे १८५७ रोजी पाचशे सैनिक व काही तोफा पाठविण्यास सांगितले. त्याने तशी मदत पाठविलीच नाही. त्याच दिवशी रोहटकलाही इंग्रजांविरूद्ध विद्रोह सुरू झाला. तेव्हा सुद्धा इंग्रजांनी त्याला सैन्याची व तोफांची मदत मागितली. त्याने दोन छोट्या तोफा व काही शिफाई पाठवून दिले. त्या तोफा विशेष कामाच्या नव्हत्या. उलट रोहटककडे जाणारे शिफाई रस्त्यातील गावामधील लोकांना इंग्रजांविरूद्ध भडकवीतच रोहटकला पोचले.

दिल्ली येथील कमिशनर ग्रेसरयाची हत्या विद्राही सैनिकांनी केली. त्यांनी मॅजिस्ट्रेट जॉन मेटकाफवरही हल्ला केला. तेव्हा तो कसाबसा जीव घेऊन पळाला व झज्जरला आला. तेव्हा नबाब अब्दुल रहिमान खाँ त्याला भेटला नाही. त्यानंतर काही इंग्रज अधिकारी अनेक इंग्रज स्त्रियां-मुलांसह झज्जरला आश्रयासाठी आले. त्या सर्वांना त्याने संरक्षण दिले. दिल्ली पुन्हा इंग्रजांच्या ताब्यात आल्यावर त्याने त्या सर्वांना आपला फैजदार मिर्झा हुसेन यांच्यासह दिल्लीला रवाना केले.

अब्दुल रहमान खाँ मात्र विद्रोही सैनिकांना पुरेपूर मदत करीत होता. २४ मे १८५७ रोजी अब्दुल रहमान खाँ ने आपले सैनिक पाठवून रोहटकच्या इंग्रजांच्या छावणीतून २ लाख रुपये लुटून आणले. त्याने रामपूर रेवाडीच्या तुलारामलाही इंग्रजांविरुद्ध लढण्यास मदत केली. त्याने बादशाह बहादुरशाह जफरशीही पत्रव्यवहार सुरू केला होता. पण त्याची पत्रे बादशाहपर्यंत पोचतच नव्हती. मध्येच ती गायब होत होती. कारण त्याचा ब्राम्हण दिवाण पंडित रिछपाल सिंह याला जनरल ॲन्सनने फितुर करून घेतले होते. दिल्लीहून मोठा शस्त्र साठा झज्जरला पाठविला गेला होता. तो मध्येच गायब केला गेला.

दिल्ली ताब्यात घेतल्यावर ब्रिगेडियर शॉवर्स व कर्नल हडसन मोठे सैन्य घेऊन झज्जरकडे निघाले. त्यांनी रेवाडी ताब्यात घेऊन १७ ऑक्टोबर १८५७ रोजी झज्जरवर आक्रमण केले. नबाब अब्दुल रहमानखाँने युद्धाची तयार केलेलीच होती. परंतु इंग्रजांना फितुर झालेल्या पं. रिछपाल सिंह या ब्राम्हण दिवाणाने अब्दुल रहमान खाँ याला इंग्रजांपुढे शरणागती पत्करण्याचा सल्ला दिला. नबाबाने छुछकवास येथील इंग्रजांच्या छावणीत जाऊन आपल्या दिवाणाच्या सल्ल्यानुसार कर्नल लॉरेन्ससमोर आत्मसमर्पण केले. इंग्रजांनी १८ ऑक्टोबर रोजी नारनौल किल्ल्यावर व १९ ऑक्टोबर रोजी झज्जरच्या किल्ल्यावर आपले युनियन जॅक फडकावले. नबाब अब्दुल रहमान खाँ ची लाखो रुपयांची संपत्ती लुटली. झज्जरच्या किल्ल्याच्या चहुबाजूस असलेल्या झाडांच्या फांद्यांवर शेकडो लोकांना फाशी देण्यात आले. तरीही झज्जरच्या सैन्याने पं. रिछपाल सिंहाचा शरणागतीचा सल्ला मानला नाही. ते सैनिक इंग्रजांशी लढता लढता जोधपूर कडील विद्राही सैन्याला जाऊन मिळाले आणि शेवट्या क्षणापर्यंत आपल्या देशाच्या स्वातंत्र्यासाठी लढत राहिले.

अब्दुल रहमान खाँला कळून चुकले की, आपल्या दिवाणानेच आपल्याला फसविले. त्याचा सल्ला मानून आपण इंग्रजांसमोर शरणागती पत्करली, ही आपल्या हातून फार मोठी चूक झाली हे त्याला समजले व त्याने आपल्या कपाळावर हात मारून घेतला. शॉवर्सने अब्दुल रहमान खाँ याला व फर्रखनगरचा नबाब अहमद अली याला अटक करून दिल्लीला आणले. कर्नल लॉरेन्सच्या मदतीसाठी पतियाळा संस्थांच्या राजाने सहाशे पायदळ सैन्य व दोनशे घोडेस्वार झज्जरच्या रक्षणासाठी पाठविले. बहादूर गडच्या नबाब बहादूरजंगलाही पकडून दिल्लीला आणले. अहमद अली व त्याचे ११ साथीदार, नबाब बहादूरजंग यांना नोव्हेंबर १८५७ मध्ये दिल्लीत गोळ्या घालून ठार केले. राजा नाहरसिंगला फांशी दिले. मिलिटरी कमिशनचा अध्यक्ष जनरल चेंबरलेन

याच्यापुढे नबाब अब्दुल रहमान खाँवर राजद्रोहाचा खटला १२ डिसेंबर १८५७ रोजी सुरू केला. विद्रोह्यांना मदत करणे, स्वतः विद्रोहाचा प्रयत्न करणे, विद्रोह्यांना सेना व धन पुरविणे, त्यांना आश्रय देणे, झज्जरच्या व्यापाऱ्यांकडून पाच लाख रुपये वसूल करून ती रक्कम दिल्लीला बहादूरशाह जफरच्या मदतीसाठी पाठविणे इ. आरोप त्याच्यावर ठेवण्यात आले. मेटकाफ फोर्ड, लॉक या इंग्रज अधिकाऱ्यांबरोबर दिवाण रिछपालसिंह व दिवाण स्यालू सिंह यांनी नबाबाविरुद्ध साक्षी दिल्या. हे दोन्ही दिवाण विश्वासघातकी व निमकहराम निघाले, याचे मनस्वी दुःख नबाब अब्दुल रहमान खाँ याला झाले. सुनावणीचे नाटक संपले आणि नबाबाला फाशीची शिक्षा सुनावण्यात आली. या स्वातंत्र्यप्रिय, स्वाभिमानी देशभक्ताला २३ डिसेंबर १८५७ रोजी दिल्लीच्या लाल किल्ल्यासमोर चांदणी चौकात आम जनतेसमक्ष फाशी देण्यात आले. भारताचा एक महान स्वातंत्र्यसेनानी स्वातंत्र्य देवतेच्या बलिवेदीवर बळी गेला. इंग्रजांनी त्याच्या प्रेताचे तुकडे आपणांस साह्य करणाऱ्या देशी संस्थानिकांना व फितुरांना दिले. केवढे हे क्रौर्य! झज्जर संस्थान रोहटक जिल्ह्यात विलीन करण्यात आले. प्रमुख फितुर दिवाण पं. रिछपालसिंह याला झज्जरचा ऑनररी मॅजिस्ट्रेट बनविले व दिवाण स्यालू सिंहला कुतनी गावाची इनामदारी दिली. याच कृपेसाठी ते दोघे दिवाण इंग्रजांना फितुर झाले होते. दुसरे काय?



# ७४. राजा नाहर सिंह

हरियाणा राज्यातील वल्लभ गडचा राजा शेवटचा मोगल बादशाह बहादूरशाह जफर याचा आदरपात्र होता. तो वीर, पराक्रमी आणि बुद्धिमानही होता. हिंदू व मुस्लिम धर्मियांत तो मुळीच भेदभाव करीत नसे. त्याने आपल्या किल्ल्यात मुसलमानासाठी संगमरवरी पाषाणांची मशीद बांधली व आपल्या बागेजवळच्या मैदानात सुदर ईदगाह सुद्धा बांधला होता. तो धर्मनिष्ठ असून धर्मनिरपेक्षवृत्तीने प्रजेशी वागत असे.

१८५७ च्या स्वातंत्र्य युद्धात हरियाणामधील रोहतक, गुडगाँव, हिसार, सिरसा, पानीपत, स्थानेश्वर, अंबाला या जिल्ह्यांतील जनतेने, राजांनी व नबाबांनी मोठ्या उत्साहाने व धाडसाने भाग घेतला होता. हरियाणामध्ये कित्येक ठिकाणी तेथील राजे, नबाब यांनी आपल्या सैन्याच्या व जनतेच्या सह्याने इंग्रज सैन्याचा पराभव करून त्याला पिटाळून लावले होते. तसेच या स्वातंत्र्ययुद्धासाठी बादशाह बहादूरशाह जफर याला भरपूर आर्थिक मदतही केली होती. रसद पुरविली होती. या कार्यात वल्लभगडचा राजा नाहरसिंह याचा सिंहाचा वाटा होता. त्यांनी सुमारे पाच महिने हरियाणाचा हा प्रदेश इंग्रजांपासून मुक्त ठेवला होता.

मेरठच्या छावणीतील देशी सैन्याने इंग्रजांविरूद्ध हत्यार उपसले. तेथल्या इंग्रज अधिकाऱ्यांना ठार करून व तुरूंगातील कैद्यांना सोडवून ते ११ मे १८५७ रोजी दिल्लीला आले व त्यांनी बहादूरशाह जफरला दिल्लीच्या तख्तावर बसवून त्याला हिंदुस्थानचा बादशाह घोषित केले. तेव्हा दिल्लीच्या रक्षणाची व्यवस्था करताना बहादूरशाहने दिल्लीच्या पूर्वेकडील मोर्चावर राजा नाहरसिंहाची नेमणूक केली. नाहरसिंह यांनी दिल्लीच्या पूर्वेकडील भागात अनेक ठिकाणी भक्कम मोर्चेबंदी करून ठेवल्याने त्या बाजूने दिल्लीवर हल्ला करण्याची हिंमत इंग्रजांना अखेरपर्यंत झाली नाही. बरेलीहून पंधरा हजार फौजेसह दिल्लीत आलेला मोहम्मद बख्त खाँ याने दिल्लीचे सेनापती पद सांभाळले व तो इंग्रज सैन्याशी अखेरपर्यंत टक्कर देत राहिला. नाहरसिंहांनी आपली गुप्तहेर यंत्रणा भक्कम केली होती.

दिल्ली साडेचार महिने बहादूरशाहच्या आधिपत्याखाली स्वतंत्र राहिली. इंग्रजांना पतियाळा, नाभा व जिंदच्या संस्थानिकांनी सैन्याची, धनाची व रसदेची मोठ्या प्रमाणात मदत केली. त्यांनी आणखी इंग्रज सैन्य आणले. त्यामुळे त्यांचे पारडे जड झाले. १३ सप्टेंबर १८५७ रोजी इंग्रजांनी काश्मिरी गेटमधून दिल्लीत प्रवेश केला; तेव्हा नाहरसिंहाने बहादूरशाहला त्याच्या जनान्यासह वल्लभगडला चलण्याची विनंती केली.

पण बहादूरशाहचा व्याही इलाही बक्श हा इंग्रजांना फितुर झाला होता. त्याने बादशाहाला नाहर सिंहाबरोबर वल्लभगडला जाऊ दिले नाही. दिल्लीत क्रांतिकारी सैन्याचा इंग्रजांनी पराभव केला व २० सप्टेंबर १८५७ रोजी दिल्ली शहर ताब्यात घेतले. तेव्हा सेनापती मोहम्मद बख्त खाँ यानेही बहादूरशाहला आपल्याबरोबर लखनौला येण्याचा आग्रह केला. पण इलाहीबक्शने तेव्हा सुद्धा बादशाहाला त्याच्या बरोबर जाऊ दिले नाही. त्यानेच बहादूरशाहला हुमायूनच्या मकबऱ्यात जाण्यासाठी तयार केले. बहादूरशाह हुमायूनच्या मकबऱ्यात सहकुटुंब राहण्यास गेल्यावर इलाही बक्शने मेजर हडसन याला ती बातमी दिली. हडसनने त्या मकबऱ्यात जाऊन बादशाहाला व त्याच्या मुलं-नातवांना कैद केले. बादशाहाच्यां मुलां-नातवांना त्याने खुनी गेटजवळ बंदुकेने ठार केले व त्यांचे रक्त तो प्याला आणि त्यांची मुंडकी कापून बादशाहकडे पाठवून दिली.

राजा नाहरसिंह यांनी स्वातंत्र्य युद्धात खंड पडू नये म्हणून दृढ निश्चय केला. नव्याने मोर्चेबंदी केली. आग्ऱ्याहून दिल्लीकडे जाणाऱ्या इंग्रजांच्या सैन्यात व नाहर सिंहाच्या सैन्यात घनघोर युद्ध झाले. त्या युद्धात नाहरसिंहांनी इंग्रजांच्या सैन्याची धूळधाण उडवून दिली. इंग्रजांचे बहुसंख्य सैनिक मारले गेले. शेकडो गोऱ्या सैनिकांना नाहसिंहांच्या सैन्याने कैद केले. इंग्रजांच्या लक्षात आले की, आपण नाहरसिंहाला युद्धात पराभूत करू शकत नाही. तेव्हा त्यांनी त्या युद्धात वेगळाच डाव टाकून पांढरे निशाण फडकविले युद्ध थांबले. इंग्रज सैन्याचे दोन प्रमुख नाहरसिंहांना वल्लभगडच्या किल्ल्यात भेटायला आले. त्यांनी नाहरसिंहांना सांगितले की, 'इंग्रज व बहादूरशाह यांच्यात संधीची बोलणी चालू आहेत. त्यासाठी बादशाहांनी तुम्हांला दिल्लीला बोलाविले आहे. म्हणूनच आम्ही पांढरे निशान फडकवले आहे.' कसेही असो, नाहरसिंह विजयाच्या आनंदात हे विसरून गेला की, बादशाहाचा दूत इंग्रजांकडे येण्याऐवजी माझ्याकडेच यायला पाहिजे होता. इंग्रजांचा डाव ते ओळखू शकले नाहीत. ते दिल्लीकडे निघून गेले. दिल्ली तर आता इंग्रजांच्या ताब्यात होती. नाहरसिंहांनी दिल्लीच्या लाल किल्ल्यात प्रवेश केला, तेव्हा आत लपून बसलेले गोरे सैन्य त्यांच्यावर तुटून पडले. नाहरसिंह जखमी झाले. त्या अवस्थेतच त्यांना गोऱ्या सैनिकांनी अटक केली.

इंग्रजांनी दुसऱ्याच दिवशी वल्लभगडावर जबरदस्त आक्रमण केले. नाहरसिंहाचे सेनापती गुलाबसिंह यांच्या नेतृत्वाखाली त्यांच्या सैन्याने तीन दिवसापर्यंत घनघोर युद्ध केले. त्यात इंग्रजांचा विजय झाला. वल्लभगड इंग्रजांनी ताब्यात घेतला.

नाहरसिंहावर राजद्रोहाचा खटला भरण्यात आला. सुनावणीचे नाटक संपले. तेव्हा बहादूरशाहला अटक करून त्यांच्या मुलांचा शिरच्छेद करून त्यांचे रक्त पिणारे मेजर

हडसन पुढे येऊन नाहरसिंहांना म्हणाला, "फांशीच्या शिक्षेतून तुला सुटायचे असेल, तर तू स्वतःहून आत्मसमर्पण कर." नाहरसिंह समजून चुकले होते की, इंग्रज लोक विश्वास घातकी व धोकेबाज आहेत. तेव्हा त्यांनी त्या नरपशूला बाणेदारपणे उत्तर दिले. 'नाहरसिंह शत्रूसमोर शरणागती पत्करणारा राजा नाही, हे लक्षात ठेव. इंग्रज आमचे शत्रू आहेत. मी त्यांची क्षमा मागूच शकत नाही. एक नाहर नाही राहिला, तर उद्या त्याच्या सारखे लाखो नाहर आमच्या देशात जन्म घेतील.' ते ऐकताच तो नीच हडसन संतापाने लालबुंद झाला. आणि त्याने जाणूनबुजून नाहरसिंहांना दिल्लीच्या चांदणी चौकात त्यांच्या जन्मदिनीच फाशी देण्याचे न्यायाधिशाकडून वदवून घेतले.

९ जानेवारी १८५८ हा दिवस नाहरसिंहांचा वाढदिवस होता. त्या दिवशी त्यांनी ३५ वे वर्ष ओलांडले होते. त्यांना फांशी देण्याआधी विचारण्यात आले, 'तुमची शेवटची इच्छा काय आहे?' त्यावर नाहरसिंहांनी ताठ मानेने उत्तर दिले, 'की तुम्हाला आणि इंग्रज सरकारला काही मागून माझा स्वाभिमान सोडू इच्छित नाही. मी तर माझ्यासामोर उभ्या असलेल्या माझ्या देशबांधवांना हेच सांगतो की, क्रांतिची ही भडकलेली आग मुळीच विझू देऊ नका.'

त्यानंतर चांदणी चौकातील कोतवालीजवळ नाहरसिंहांना फाशी देण्यात आली. त्यांच्या बरोबरच त्यांचे सेनापती गुलाबसिंह, खुशालसिंह आणि भुरेसिंह या तिघांनाही तेथेच फासावर चढविण्यात आले. तेथे जमलेलल्या जनतेची अंतःकरणे दुःखाने चूर चूर होऊन गेली. भारतमातेच्या या सुपुत्रांनी तिच्या स्वातंत्र्यासाठी तिच्या पुढील बलिवेदीवर आपल्या प्राणांचे बलिदान केले. हरियाणाची जनता अजूनही या वीरांचे गुणगान परंपरागत गीतांमधून करते आहे. वल्लभगडात नाहर सिंहांची भव्य छत्री तेथल्या जनतेने उभारली असून वल्लभगडमध्ये त्यांच्या नावाने एक पार्क तयार केला आहे. अन्य हुतात्म्यांसाठी एक हुतात्मा स्मारक सुद्धा उभारले आहे.



# ७५. शाहमल जाट

१८५७ च्या स्वातंत्र्य युद्धात इंग्रजांच्या देशी पलटणींच्या बरोबर शेतकऱ्यांनी, शेत मजुरांनी व आदिवासींनी मोठ्या प्रमाणात इंग्रजांविरूद्ध भाग घेतला होता. हे सारे इंग्रज सरकारच्या जुलमी राजवटीत भरडून निघाले होते. बहुसंख्य शेतकऱ्यांची तरुण मुले इंग्रजांच्या देशी पलटणीत होती. त्यांनीच या स्वातंत्र्य युद्धात फार मोठी कामगिरी केली होती.

सन १८३६ मध्ये उत्तर प्रदेश इंग्रजांच्या ताब्यात आला, तेव्हा इंग्रज अधिकारी प्लाउडेन याने नव्याने शेतकऱ्यांवर जबरदस्त भूमिकर लादला. त्यामुळे शेतकऱ्यांनी विरोध केला. तरीही इंग्रजी अधिकाऱ्यांनी शेतकऱ्यांकडून तो अन्यय्य भूमिकर वसूल करण्यास सुरुवात केली. त्यामुळे शेतकरी हवालदिल झाले. इंग्रज अधिकाऱ्यांनी बागपत व बडौतमधील जमीनदरांना व शेतकऱ्यांना बजावले की, जो जमीनदार व शेतकरी निर्धारित भूमिकर देणार नाहीत, त्यांच्या जमिनी जप्त केल्या जातील व जे जमीनदार निर्धारित भूमिकर देण्याचे मान्य करतील, त्यांना त्या जमिनी कसायला देण्यात येतील. जर भूमिकर न देता जे जमीनदार व शेतकरी त्या जमिनी पेरून पीक घेतील, तर त्यांचे ते पीक जप्त करून त्याचे लिलाव केले जातील आणि लिलावाची रक्कम सरकारी खजिन्यात जमा केली जाईल. इंग्रज सरकारने हा बंदोबस्त धमकीवजा आदेश देऊन जमीनदारांवर व शेतकऱ्यांवर जोरजबरदस्ती केल्याने १८४० पासून १८५० पर्यंत त्या प्रदेशात अशांततेचे वातावरणात निर्माण झाले होते. कित्येक जमीनदारांच्या व शेतकऱ्यांच्या जमिनी जप्त करण्यात आल्या आणि त्या बाहेरच्या जमीनदारांना देण्यात आल्या.

मेरठ, बागपत, बडौत, बिजरौल या भागात जाट जमीनदार व जाट शेतकरी मोठ्या संख्येने आहेत. बिजरौल गावाच्या शिवाराचे कुल्लो व भोली हे दोन भाग होते. कुल्लो भागातील सारी जमीन शाहमल जाटाच्या मालकीची होती. १० मे १८५७ रोजी मेरठ येथील इंग्रजांच्या देशी पलटणीने उठाव केला, तेव्हा मेरठच्या परिसरातील गावामधील शेतकरी व जमीनदारांना इंग्रजांविरूद्ध लढण्याची संधी मिळाली. ज्या जमीनदारांच्या व शेतकऱ्यांच्या जमिनी जप्त होऊन नव्या जमीनदारांना देण्यात आल्या होत्या, त्या जमिनी नव्या जमीनदारांना हुसकून देऊन आधीच्या जमीनदारांनी ताब्यात घेतल्या. या जमीनदारांचे नेतृत्व शाहमल जाट या क्रांतिकारकाने केले. त्याने हजारो शेतकरी व जमीनदार संघटित करून व्यापाऱ्यांना लुटले. बडौत तहसील कार्यालयावर हल्ला करून त्या कार्यालयाची इमारत जमीनदोस्त केली. शाहमलने दिल्लीच्या

क्रांतिकारी सैनिकांच्या नेत्यांशी संपर्क साधला. त्यांनी शाहमलला मेरठ भागाचा सुभेदार नेमले. मेरठच्या देशी सैन्याने मेरठचा तुरुंग फोडून जे शेकडो कैदी मुक्त केले होते, तेही शाहमलला येऊन मिळाले. शाहमलची ताकद त्यामुळे वाढली. शाहमलने आपल्या अनुयायांसह बागपतजवळचा यमुना नदीवरील पूल नष्ट करून टाकला. त्याने त्या भागातील ८४ गांवांतील जाटांना भडकावून इंग्रज सरकारविरूद्ध लढण्यास प्रवृत्त केले. आपल्या या भागातून धान्य व हत्यारे गोळा करून दिल्ली येथील विद्रोही सैनिकांना तो पुरवू लागला.

शाहमल जाटाने बडौत व आसपासचे तीनचार परगणे आपल्या ताब्यात घेतले व तो स्वतःला त्या प्रदेशाचा राजा म्हणवू लागला. ज्यावेळी इंग्रज सेनेने दिल्लीला वेढा दिला, त्यावेळी शाहमलने पुरविलेल्या रसदीमुळेच दिल्लीतील सैन्य व जनता जगू शकली. त्याने आपली गुप्तहेर यंत्रणा उत्तम रीतीने तयार केली. बडौत प्रमाणेच बागपत तहसील कार्यालय व बागपतचा बाजारही लुटला. इंग्रज सैन्याचे दिल्लीकडे जाणारे मार्ग खोदून नष्ट केले. बसौद गावी त्याने दिल्लीतील विद्रोही सैनिकांसाठी व जनतेसाठी ८००० मण गहू व डाळीचे भांडार सज्ज ठेवले. जेव्हा इंग्रज सैन्याने बसौदवर हल्ला केला, तेव्हा तो त्या गावातून गुप्तपणे निघून गेला. पंरतु त्याने साठवून ठेवलेल्या धान्याला हात लावायची कोणाचीही हिंमत झाली नाही. एवढा त्याचा धाक त्या भागात होता. त्या इंग्रज सैन्याची शाहमलच्या सैन्याने दाणादाण उडवून दिली.

मेठर, बागपत, बडौत प्रदेशात पूर्वीपासून जाट व गुजर जातितील लोकांत वैमनस्य होते. परंतु शाहमलच्या प्रभावाने ते वैमनस्य नाहीसे झाले. जाटांबरोबर गुजरांनी सुद्धा शाहमलला चांगली साथ दिली. त्यांच्या पराक्रमामुळे तो त्या भागातील सर्व जातित लोकप्रिय झाला होता. त्या चौऱ्यायशी गावांच्या प्रदेशाला 'चौऱ्यांयशी देश' म्हटले जात असे. त्या भागात जाटांची वस्ती मोठ्या प्रमाणात होती. ते सर्व जाट जमीनदार व शेतकरी शाहमलच्या पाठीशी उभे केले होते. त्याचे ७००० सडे सैन्य त्याने त्या भागातूनच उभे केले होते. इंग्रज अधिकाऱ्यांना त्याचे पारिपत्य कसे करावे याची मोठी चिंता होती. त्यांनी शाहमलला जिवंत किंवा मृतावस्थेत पकडून देणाऱ्यास १००० रुपयांचे बक्षीस जाहीर केले. पण त्याला कोणीही भीक घातली नाही. शाहमलच्या विद्रोही करावाया आणि दिल्लीतील देशी सैन्याशी त्याचे घनिष्ट संबंध यामुळे इंग्रज सेनाधिकारी त्रस्त झाले होते. जुलै १८५७ मध्ये इंग्रज सैन्याने शाहमलच्या सैन्यावर जबरदस्त आक्रमण केले. शाहमलने आपल्या ७००० सैनिकांनिशी त्या सैन्यावर प्राणपणाने हल्ला केला. शाहमलचा पुतण्या भगत याने इंग्रजांचा मुख्य सेनाधिकारी डनलॉप याचा वेगाने पाठलाग केला.

डनलॉप त्याला घाबरून जिवाच्या आकांताने पळून गेला म्हणून वाचला. शाहमलचा साथीदार सूरजमल याने तर इंग्रज सैन्याला पळता भुई थोडी केली. बडौतच्या दक्षिण भागातील एका बागेत शाहमल इंग्रजांच्या खाकी रिसाल्याशी लढत होता. त्या बागेत तुंबळ युद्ध झाले. त्या युद्धात शाहमल मारला गेला. इंग्रजांची झोप उडविणारा स्वातंत्र्यवीर शाहमल आपल्या जन्मभूमीच्या स्वातंत्र्यासाठी लढता लढता युद्धभूमीवर शहीद झाला. इंग्रजांचा हा फार मोठा विजय होता. त्यांनी शाहमलचे शीर तलवारीने धडावेगळे केले व ते मोठ्या भाल्याच्या टोकावर खोचून आपल्या युनियन जॅकसह गावागावातून फिरवीत नेले. जनतेला दहशत बसावी म्हणून इंग्रजांनी शाहमलच्या शिराचे असे क्रूर प्रदर्शन केले.

शाहमलचा पुतण्या भगत व साथीदार सूरजमल तरीही डगमगले नाहीत. त्यांनी पुन्हा सैन्य संघटित केले. मुजफ्फरनगर व रोहिलखंडात आणि अवध प्रांतात इंग्रजांशी लढणाऱ्या स्वातंत्र्यवीरांना ते जाऊन मिळाले. पण त्यांनी आत्मसमर्पण केले नाही. शाहमलच्या निधनानंतरही हिंमत न हारता त्याचे अनुयायी इंग्रजांशी लढत होते. याचे आश्चर्य इंग्रजांना वाटत होते. त्यांचे देशप्रेम पाहून ते अधिकारी थक्क होऊन गेले होते.



# ७६. मौलवी लियाकत अली

मौलवी लियाकत अली धर्मनिष्ठ होते. संपूर्ण कुराण त्यांनी कंठस्थ केले होते. दररोज पाच वेळा ते नियमितपणे नमाज पढत. मुलांना कुराणाचे ते अध्यापन करीत असत आणि कुराणाच्या आज्ञांचे पालन करायला लावीत असत. ते मानवतावादी होते. राम आणि रहीम कबीरांप्रमाणे एकच मानायचे त्यांचा आदर मुसलमानच नव्हे, तर हिंदूही करीत असत. इंग्रजी सत्तेमुळे जनतेचे होत असलेले शोषण व त्यामुळे देशवासियांना गरिबीत कंठावे लागणारे जीवन पाहून ते व्यथित होत असत. ते सुरुवातीला अलाहाबादच्या चक मोहल्ल्यातील एका मुस्लिम महिलेच्या मुलाची शिकवणी करीत होते. नंतर ते इंग्रजांच्या सैन्यात दाखल झाले. सैन्यातील शिपायांत ते राष्ट्रीय वृत्तीचा प्रचार करीत. त्यांमुळे त्यांना सैन्यातून काढून टाकण्यात आले. त्यानंतर ते मौलवी झाले व महगावच्या मशिदीत नमाज अदा करू लागले. इंग्रज सरकार विषयी त्यांच्या मनात कमालीचा असंतोष खदखदत असायचा. त्यामुळेच अलाहाबादमधील सैनिकांनी १८५७ मध्ये इंग्रजांविरूद्ध उठाव केला, तेव्हा ते त्या उठावात सामील झाले.

अलाहाबादच्या देशी पलटणीतील सैनिकांनी त्यांच्या इंग्रज अधिकाऱ्यांची कत्तल केली. त्यांचे बंगले लुटून जाळून टाकले. खजिनाही लुटला. तुरुंग फोडून कैद्यांना मुक्त केले. अलाहाबादच्या आसपासच्या गावातील लोकांनीही त्या सैनिकांना साथ दिली. सैनिकांनी अलाहाबाद व आसपासची गावे ताब्यात घेतली. मौलवी लियाकत अली ७ जून १८५७ रोजी अलाहाबादला आले. त्यांनी खुसरू बागेत सैनिकांचा व जनतेचा मोठा दरबार भरविला. सर्व गांवात कोतवालांची, तहसीलदारांची, ठाणेदारांची व इतर अधिकाऱ्यांची नियुक्ती केली. त्या भागात प्रति सरकार स्थापन केले. त्यांनी लखनौचा शाहजादा बिरजिस कद्र याच्या नावाने आम जनतेत घोषणा केली की, 'साऱ्या देशात, विशेषतः अलाहाबादच्या परिसरात इंग्रज लोकांनी लुटमार, हत्या, गावांना आगी लावणे, निरपराध लोकांना मारणे, हिंदू-मुसलमानांचे पवित्र ग्रंथ जाळून टाकणे इत्यादी प्रकारे क्रूरतेचे थैमान माजविले. त्यामुळे सर्वांनी संघटित होऊन धर्मयुद्धासाठी तयार व्हावे आणि कपटी व पापी ईसाई लोकांना ठार करावे.'

मौलवी लियाकत अलीच्या नेतृत्वाखाली देशी शिपायांनी व जनतेने अलाहाबादच्या परिसरातील इंग्रजांचे बंगले जाळले, लूटमार केली. सरकारी खजिने लुटले. हे सत्र ९ जून ते १४ जून पर्यंत चालू होते. त्याला त्या भागातील प्रतिष्ठित हिंदू-मुसलमानांचा पाठिंबा होता. त्यानंतर कलकत्त्याहून कर्नल नील मोठे सैन्य घेऊन आला. रस्त्यातील

सगळी गावे त्याने जाळून टाकली. गावातील स्त्री-पुरुष, बाल-बच्चे म्हातारे-कोतारे यांच्या कत्तली केल्या. प्रतिकार करणाऱ्या हजारो लोकांना झाडांच्या फांद्यांवर फाशी दिले. रस्त्यावरील सर्व झाडांवर अनेक प्रेते लटकत होती. त्याची माहिती लिहून मौलवी लियाकत अलीने दिल्लीला बहादूरशाह जफरकडे पाठवून दिली. जे लोक जीव घेऊन पळाले ते वाचले. लियाकत अलीसुद्धा कानपूरला जाऊन नानासाहेब पेशव्यांना मिळाले. अलाहाबादच्या छावणीत बंडखोर शिपायांनी कानपूरला प्रयाण केले. त्यांनी कर्नल नीलची राक्षसी कृत्ये पाहिली होती. इंग्रजांवर ते चिडलेलेच होते. नानासाहेब पेशव्यांनी पकडलेल्या इंग्रज स्त्री-पुरूषांना सतीचौरा घाटावरून चाळीस नावांमधून अलाहाबादकडे रवाना केले. तेव्हा या सैनिकांनी त्या नावांतील इंग्रजांवर अंधाधुंद गोळीबार केला. ते लियाकत अलीने पाहिले होते. नीलच्या अमानुष कृत्यांमुळेच चिडून त्यांनी त्या नावां-मधील कित्येक इंग्रज स्त्री-पुरूषांना यमसदानास पाठविले. आपल्या या कृत्याबद्दल नीलनेच एका पत्रात लिहिले होते की, 'निरपराधी अथवा अपराधी, क्रांतिकारी किंवा आमच्याशी प्रामाणिक, आमचे भले इच्छिणारी वा विश्यासघाती, सूड घेण्याच्या भावावेशात सर्वांना मारले गेले... सुमारे सहा हजार लोकांची हत्या करण्यात आली. झाडांच्या प्रत्येक फांदीवर सर्वत्र दोन-तीन प्रेते लटकत होती. सलग तीन महिने सकाळपासून संध्याकाळपर्यंत आठ बैलगाड्यांमधून झाडांवरील व खांबावरील प्रेते काढून त्या बैलगाड्यांत भरून गंगेत सोडली जात होती.' असा नरराक्षस होता तो नील.

मौलवी लियाकत अली प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष आपले क्रांतिकार्य करीतच होते. इंग्रज दिसला की, त्याला ठार करीत होते. त्याचे नाव निघताच इंग्रज स्त्री-पुरूषांना, त्यांच्या मुलांना धडकी भरायची.

लियाकत अली पुन्हा तीन हजार फौज व दोन तोफा घेऊन अलाहाबादला आले. तेथे त्यांनी इंग्रजांशी मोठी लढाई केली. पण तीमध्ये ते पराभूत झाले व परत नानासाहेबांकडे आले. नानासाहेब पराभूत होऊन विठूरहून लखनौकडे निघून गेल्यानंतर ते दक्षिणेकडे गेले. मुंबईला पोचले. तेथे इंग्रजांच्या गुप्तहेरांनी त्यांना पकडून दिले. त्यांनी सरकारविरूद्ध बंड केल्याचा आरोप ठेवून त्यांच्यावर सैनिकी न्यायालयात दावा दाखल करण्यात आला. त्यात त्यांना जन्मठेपेची शिक्षा देण्यात आली. त्यांनी माफी मागावी म्हणून इंग्रज अधिकाऱ्यांनी खूप प्रयत्न केले. त्यांना प्रलोभनेही दाखविण्यात आली. त्यांना ना माफी मागितली ना ते इंग्रजांच्या प्रलोभनांना बळी पडले. आपला देश या क्रूर व अत्याचारी इंग्रजांच्या तावडीतून केव्हा व कसा मुक्त होईल याचे मनन-चिंतन करीतच ते तुरूंगवास भोगताना अल्लाघरी निघून गेले. या थोर धर्मनिष्ठ क्रांतिकारकाला शतशः

प्रणाम! जबरदस्तीने किंवा प्रलोभने दाखवून हिंदू-मुसलमानांचे ईसाई धर्मांतर करणाऱ्या मिशनऱ्यांना पाहून ते संतप्त होत असत. परंतु हिंदू लोकांविषयी त्यांना प्रेम होते. असेच मौलवी भारतात सर्वत्र अखेरपर्यंत असते, तर भारताची फाळणी मुळीच झाली नसती. हे निर्विवाद होय.



# ७७. राणी अवंतिकाबाई लोधी

१८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धात पुरूषांबरोबर स्त्रियासुद्धा इंग्रजांविरूद्ध लढल्या. राणी लक्ष्मीबाई तर सर्वांनाच परिचित आहे, हे स्वातंत्र्ययुद्ध सर्वप्रथम उत्तरप्रदेशात पेटले. त्याचे लोण मध्यप्रदेशातही छोट्या छोट्या राज्यांत पसरले. मध्यप्रदेशात नर्मदा नदीच्या दक्षिणेस मांडला जिल्ह्यात रामगडचे छोटेसे राज्य होते. ते डोंगराळ व जंगलांनी युक्त असे होते. त्यात ठिकठिकाणी अनेक तलावही होते. लक्ष्मणसिंह लोधी हा रामगडचा राजा होता. त्याचे निधन झाल्यावर त्याचा मुलगा विक्रमजितसिंह रामगडच्या गादीवर आला. तो स्वाभिमानी व पराक्रमी म्हणून त्या भागात प्रसिद्ध होता. तो त्या भागातील प्रमुख क्रांतिकारी होता. त्याच्या सनकी स्वभावामुळे इंग्रजांनी त्याला वेडा ठरविले होते. दुर्दैवाने अकालीच त्याचे निधन झाले. अमान सिंह व शेरसिंह ही त्याची दोन्ही मुले अजून अजाण असल्याने इंग्रज सरकारने ते विक्रमजितसिंहाचे औरस पुत्र असूनही त्यांना रामगड राज्याचे उत्तराधिकारी मानले नाही व रामगडचा राज्यकारभार पाहण्यासाठी एका प्रशासकाची नियुक्ती केली व विक्रमजित सिंहाची पत्नी अबंतिकाबाई लोधी हिला पेन्शन सुरू केले. त्यामुळे अवंतिकाबाई खवळून उठली. तिने त्या प्रशासकाला आपल्या राज्यातून घालवून दिले आणि इंग्रजांच्या दडपशाहीला चांगला दणका दिला. आणि राज्याचा कारभार आपल्या हाती घेतला.

जबलपूरच्या कलेक्टरला त्या प्रशासकाने ही हकीकत सांगितली, तेव्हा तो अत्यंत संतापला व राणीला आदेश दिला की, तिने लगेच मांडलाच्या डेप्युटी कलेक्टरची भेट घ्यावी. पण अवंतिकाबाईने तो आदेश धुडकावून लावला आणि तिने त्याचे परिणाम ओळखले. तिने युद्धाची तयारी सुरू केली. रामगड किल्ल्याची मजबुती केली. आपले सैन्य सुसज्जित केले. पण तेवढे सैन्य इंग्रजांशी टक्कर देण्यास पुरेसे नव्हते. म्हणून राणीने आसपासच्या राजांना पत्रे लिहून सर्वांनी मिळून आपल्या स्वातंत्र्याचे रक्षण करण्यासाठी आवाहन केले. तिच्या आवाहनाने त्या राजांना लढण्यासाठी उद्युक्त केले. मात्र रेवा संस्थांनच्या राजाने राणीला मदत न करता इंग्रजांना साह्य केले. राणी आपल्या सरदारांना म्हणाली "बंधुंनो, जो पर्यंत इंग्रज आपल्या देशात आहेत, तो पर्यंत ते आपल्याला सुखाने जगू देणार नाहीत. त्यांना आपल्या देशातून घालवून देण्यासाठी आपणांस आपल्या सुखांवर पाणी सोडावे लागेल व रक्त वाहवावे लागेल. त्यासाठी सर्वांनी सिद्ध झाले पाहिजे." राणीचे सरदारही उत्साहाने युद्धाच्या तयारीला लागले.

शाहपूरच्या राजाने नारायण गंज छावणीवर आक्रमण केले. बहादुरसिंह लोधीने शहरपुरावर हल्ला केला. सलीमाबाद येथल्या छावणीतील देशी सैन्याने इंग्रजांविरूद्ध दंड

थोपटले. ते पाटण येथे जाऊन सुभेदार बलदेवसिंहाला मिळाले. स्वतः राणी अवंतिकाबाई व विजय राघवगडचा राजा सूरज प्रसाद यांनी एकत्र येऊन नर्मदा नदीच्या उत्तरेकडील प्रदेशात विद्रोहाची आग भडकावली.

राणीने मांडलावर हल्ला करण्यासाठी मांडला नजीकच्या खैरी गावाजवळ आपल्या सैन्याची व्यूहरचना केली. तोच इंग्रज सेनापती वेडिंग्टन मोठे सैन्य घेऊन त्या सैन्यावर चालून आला. दोन्ही सैन्यात अटीतटीचे युद्ध सुरू झाले. राणी पुरुषवेषात घोड्यावर बसून आपल्या तलवारीचे पाणी इंग्रज सैन्याला चाखवीत होती. सेनापती वेडिंग्टनने आपला घोडा राणीकडे वळविला. दोघांनी परस्परांवर तलवारीने जबरदस्त वार केले. घोडा थोडा पुढे सरकल्याने राणीचा तलवारीचा वार चुकून वेडिंग्टनच्या घोड्याच्या मानेवर पडला. त्याच्या घोड्याचे मुंडके तुटून जमिनीवर पडले. घोड्याची मान तुटलेली पाहून वेडिंग्टनच्या मनात धडकीचं भरली. तो घोड्यावरून उडी घेऊन पळून गेला. राणीने त्याच्या सैन्यातील कित्येक सैनिक जमिनीवर लोळविले. वेडिंग्टन आपले सैन्य घेऊन पळून गेला.

एका स्त्रीच्या हातून झालेला आपला पराभव त्याच्या मनाला बोचत होता. त्याने पुन्हा मोठे सैन्य घेऊन रामगडवर हल्ला करायचे ठरवून तो रामगडला आला. त्याने गढाला वेढा दिला. तो पुन्हा मोठ्या तयारीने येणार, याची खात्री राणीला होतीच. राणीने रामगड पूर्णपणे खाली करुन ती आपल्या सैन्यासह तो येण्याआधीच देवहारगडच्या टेकडीवरील जंगलात आपला मुक्काम हलविला होता. त्याने रामगडला आग लावून दिली व तो राणीच्या शोधात निघाला. रामगडला येतांना त्याने रामगडच्या आसपासची विजयराघवगड, पाटन, संग्रामपूर, सलीमनाबाद, नारायणगड, धुगरी आदि राज्ये जिंकून घेतली होती. या राज्यांतून राणीला मदत मिळू नये म्हणून आधीच ही सावधगिरी बाळगून कारवाई केली होती.

राणी अवंतिका बाईने आता गनिमी काव्याने लढायचे ठरविले. कारण तिच्या सैन्यबलापेक्षा वडिंग्टनचे सैन्यबल फार मोठे होते. तिने आपल्या सैन्याच्या काही तुकड्या करुन त्या तुकड्यांकरवी वेडिंग्टनच्या सैन्यावर अनेक वेळा हल्ले चढवून त्या सैन्याची दाणादाण उडवून दिली. वेडिंग्टनच्या मदतीसाठी रेवा संस्थानचे व इतर काही संस्थानांची सैन्ये येऊन पोचली. तरीही राणी मोठ्या जिद्दीने शत्रु-सैन्याशी लढतच राहिली. शत्रुसैन्याने देवहारगडच्या टेकडीला चहुबांजुनी घेरले. तरीही राणीने हिंमत न हारता शत्रूच्या कित्येक सैनिकांना यमसदनास पाठविले. आता राणीचे सैन्य बरेच कमी झाले होते. ते पाहून राणीने आपल्या उमरावसिंह या सरदाराला म्हटले, "भैया

उमराव, मला वाटते शत्रू मला जिवंत पकडू इच्छितो. शत्रूच्या हाती जिवंतपणी न सापडता, मला माझे जीवन स्वतःच नष्टकरुन टाकावेसे वाटते. ''त्यावर उमरावसिंह म्हणाला,

''राणीजी, आधी मला या शत्रूंच्या सैन्याला माझ्या तलवारीची करामत दाखवू द्या. माझ्या पश्चात तुम्हांला जे योग्य वाटेल, ते करा.''

त्यानंतर उमरावसिंह भयंकर वेगाने शत्रुसैन्याचा संहार करीत त्या सैन्यात शिरला, आणि दिसेनासा झाला. राणी एकटीच राहिली. तिने आपली तलवार आपल्या पोटात खुपसून घेऊन प्राणार्पण केले आणि 'हरिओम' हा मंत्र उच्चारीत ती हे जग सोडून गेली.



# ७८. राणी तपस्विनी

सन १८५७ स्वातंत्र्य संग्रामात राणी तपस्विनी हिचे विशेष कार्य होते. ती झांशीची राणी लक्ष्मीबाई हिची भाची होती व झांशीचे सरदार नारायण राव यांची कन्या होती. बालपणीच ती विधवा झाली. तिचे मूळ नाव सुनंदा. या बालविधवेने विरक्तीचे जीवन पसंत केले. दररोज पूजापाठ, धार्मिक ग्रंथांचे वाचन, देवीची उपासना यातच ती दंग असायची. जणू ती संन्यासिनीच बनली. तरीही ती घोडेस्वारी, शस्त्रचालन यांचा अभ्यास राणी लक्ष्मीबाई प्रमाणेच करीत असे. स्वभावाने मानी व स्वातंत्र्यप्रिय होती. निराशा तिला माहीतच नव्हती. वडिलांच्या मृत्युनंतर तिने त्यांच्या जहागिरीचा कारभार उत्तमपणे चालविला होता. तिच्या धार्मिक वृत्तीमुळे व वैराग्यामुळे ती प्रजेच्या आदाराचे स्थान बनली होती. तिचे शरीर सुडौल होते, निरोगी होते. रंग गोरा होता. चेहरा तेजस्वी दिसायचा. त्यामुळे तिचे सौंदर्य खुलून दिसायचे. ऐहिक जीवनात तिला रस नव्हता. सदैव चंडीमातेचा जप ती करीत असे. ती तिची शक्ति-उपासनाच होती. ती निर्भय असल्याने तिला कोणाचीही भीती वाटत नसें. साहस आणि धैर्य या गुणांची ती प्रतिमूर्तीच होती.

आपल्या वडिलांचा किल्ला दुरुस्त करून तिने भक्कम बनविला. नवीन सैनिकांची भरती तिने आपल्या सैन्यात केली व त्यांचे सैनिकी शिक्षण सुरू केले. इंग्रजांविषयी तिच्या मनात भयंकर तिरस्कार होता. तो अधून-मधून ती आपल्या बोलण्यातून प्रकटही करीत असे. इंग्रजांना तिच्या कार्याची माहिती मिळाली. तेव्हा त्यांनी तिला विनाचौकशी नजरकैदेत ठेवून दिले. तिची संन्यस्त वृत्ती पाहून इंग्रज अधिकाऱ्यांना वाटले की, ही स्त्री आपल्याला धोकेदायक नाही. म्हणून त्यांनी तिला नजर कैदेतून मुक्त केले. त्यानंतर ती नैमिषारण्यात राहून चंडीमातेची उपासना व साधना करू लागली. इंग्रजांना वाटले, ही तर संन्यासिनीच झाली. म्हणून ते तिच्याविषयी निश्चिंत झाले. नैमिषारण्यात लोक नेहमी तिच्या दर्शनास जात असत. ती त्या लोकांना उपदेश करीत असे व चंडीमातेची उपासना करायला सांगत असे. तेव्हा पासून लोक तिला 'माता तपस्विनी' असे म्हणू लागले.

त्यांच्या नैमिषारण्यातील आश्रमात त्यांच्या आशीर्वाद घेण्यासाठी सतत लोक येत असत. त्या लोकांना उपदेश करीत. तसेच काही विश्वासू भक्तांना त्यांनी साधूंच्या व फकिरांच्या वेषात इंग्रजांच्या छावण्यातील देशी सैनिकांना इंग्रज सरकार विरूद्ध उठाव करण्यासाठी प्रवृत्त करण्यास तयार केले. १८५७ सालच्या सुरवातीपासूनच हे साधू व फकीर छावण्यांमधून हिंडू लागले. ते सैनिकांना सांगायचे, 'इंग्रज लोक तुम्हाला हीन

लेखतात. तुम्हाला 'काला निगर' म्हणतात. हे अपमानास्पद शब्द तुम्ही कां ऐकून घेता. इंग्रज हे लुटारू आहेत. आपल्या देशाला लुटून त्यांनी कंगाल बनविले आहे. ते तुम्हाला तर थोडासाच पगार देतात. गोऱ्या सैनिकांना मात्र भरपूर पगार देतात. ते त्या पैशांवर मजा मारतात. तुम्हीला काटकसर करून किती रुपये तुमच्या घरी पाठविता येतात? दरमहा एक-दोन रुपयेच फक्त आणि तुमचा व गोऱ्या सैनिकांचा पगार तर आपल्या देशाच्या उत्पन्नातूनच दिला जातो. इंग्रजांच्या देशातून तो दिला जात नाही. त्यांच्या हुकुमानेच तुम्ही आपली राज्ये बुडविण्यास त्यांना मदत केली आहे. हे कसे तुमच्या लक्षात येत नाही. तुम्ही त्यांचे मीठ खात नाही; आपलेच मीठ खाता त्या आपल्या मिठाला जागा आणि इंग्रजांना आपल्या देशातून हाकून लावण्यासाठी त्यांच्या विरुद्ध उठाव करा. बहुतेक छावण्यातील आपले सैनिक उठाव करण्यास तयार झाले आहेत. इंग्रजांनी आपला देश हडप केला आहे. ते आता आपला धर्म बुडवून आपल्याला ईसाई बनविण्याच्या उद्योगास लागले आहेत. तुम्हाला ईसाई होणे मान्य आहे का? विचार करा. या देशात मग हिंदू राहणार नाहीत की मुसलमान दिसणार नाही. सारेच ईसाई होऊन जातील. म्हणून जागे व्हा. उठाव करण्यास सज्ज व्हा.' हे सारे राणी तपस्विनीनेच या साधू-फकिरांना शिकविले होते.

सन १८५७ चे स्वातंत्र्य युद्ध सुरू व्हायच्या आधी नानासाहेब, बाळासाहेब, तात्या टोपे व अजीमुल्ला खॉं, राणी तपस्विनीच्या दर्शनासाठी येऊन गेले. त्यांची उठावाबाबत चर्चा झाली. अजीमुल्ला खॉंने छावण्यातून उठावाची निशाणी म्हणून लालकमळ प्रत्येक छावणीत साधू-फकिरांकरवी पाठविण्यास सुचविले. एखातें मोठे संकट येणार आहे, सैन्य येणार आहे, लढाई होणार आहे याची सूचना गावागावातून देण्यासाठी गावोगाव चपात्या पाठविण्याची प्रथा पूर्वीपासूनच चालत होती. चपात्या पाठवून जनतेला उठावासाठी तयार राहण्याचा संदेश देण्याचेही ठरले. त्याप्रमाणे साधू, फकीर छावण्यांमधून व गावागावतून हिंडू लागले. हे कार्य इतक्या गुप्तपणे चालले होते की, एकाही इंग्रज अधिकाऱ्याला ते समजू शकले नाही.

ठरल्याप्रमाणे निश्चित तारखे आधीच उठाव झाला. राणी तपस्विनीच्या प्रभावाने गावोगावाचे लोक उठावात सामील झाले. देशी सैनिक, जनता जिद्दीने लाढली. इंग्रजांच्या आधुनिक शस्त्रांमुळे व देशाचा खजिना त्यांच्याच ताब्यात असल्यामुळे त्यांनी हा उठाव दडपून टाकला व जनतेवर आपल्या क्रौर्याने मोठी दशहत बसविली. राणी तेजस्विनीच्या लक्षात येऊन चुकले की, इंग्रजांशी युद्ध केल्याने काहीच लाभ होणार नाही. आपल्या देशातील राजे रजवाड्यांची इंग्रजांपुढे लाचारी व धन लोभाने फितुरी यामुळे

युद्ध करून यश मिळविणे कठीण आहे. ते राणी तेजस्विनीने जाणले. ती नानासाहेबां-बरोबर नेपाळात गेली. नेपाळचा राजा जंगबहादुर हा इंग्रजांचा मित्र झालेला होता. नेपाळातही तिनें देवळांतून प्रवचने केली. त्यांतून स्वातंत्र्याचे महत्त्व लोकांना पटवून देऊ लागली. पण त्या लाचार राजाच्या राज्यात राहणे तिला आवडले नाही. म्हणून नेपाळातून ती दरभंग्याला आली. तेथून कलकत्त्याला गेली.

राणीने कलकत्त्यात 'महाभक्ती पाठशाळा' सुरू केली. मुले-मुली त्या शाळेत शिक्षण घेऊ लागले. लोकमान्य टिळक जेव्हा कलकत्त्याला गेले, तेव्हा एक मराठी महिला तेथे एक शाळा चालवीत आहे, याचे त्यांना कुतुहल वाटले. त्यांनी राणी तपस्विनींची भेट घेतली. त्यांच्याबरोबर त्यांच्या 'केसरी' वृत्तपत्राचे उपसंपादक, नाटककार खाडिलकर हे सुद्धा होते. त्यांना नेपाळात शस्त्रांचा कारखाना गुप्तरितीने सुरू करायचा होता. नेपाळचे सेनापती समशेरजंग यांच्याशी राणीचा परिचय होता. राणीच्या ओळखीमुळे त्यांना जर्मनीतल्या क्रुप्स फर्मची सहायता मिळून नेपाळात टाईल्स बनविण्याचा कारखाना सुरू करता आला. त्या कारखान्यात टाईल्सबरोबर शस्त्रनिर्मितीही सुरू झाली. ती शस्त्रे बंगालमध्ये पाठविण्यात येत असत. पण फितुरीमुळे खाडिलकरांचे कार्य उघडकीस आले ते नेपाळात कृपाराव म्हणून ओळखले जात होते. शेवटी ते पकडले गेले. पण मोठ्या शिताफीने त्यांनी आपली सुटका करवून घेतली व ते महाराष्ट्रात परतले. आपल्याच लोकांकडून क्रांतीचे प्रयत्न विफल केले जातात, हे पाहून राणी तपस्विनी कमालीच्या निराश झाल्या, हा आपल्या देशाला परमेश्वराचा शापच आहे, असे समजून त्या खिन्न झाल्या.

राणी तपस्विनी वृद्धावस्थेने थकल्या होत्या. त्यांचे मनही उदास झाले होते. तरीही त्यांनी वंगभंग चळवळीत भाग घेतला. अखेर भारताची ही महान विदुषी व क्रांतिकारिणी सन १९०७ मध्ये कलकत्त्यात निधन पावली. महाराष्ट्राच्या या महान कन्येचा महाराष्ट्रालाच विसर पडावा, याचाच मनाला खेद वाटतो. त्यांच्या जीवनाविषयी संशोधन करायची आवश्यता आहे.



# ७९. ठाकूर रणमत सिंह

जगदीशपूरचे ८० वर्षीय योद्धा बाबू कुंवरसिंह १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धात इंग्रजांना हुलकवण्या देत, जेव्हा रेवा संस्थानात आपल्या ४५ हजार सैन्यासह शिरले आणि त्यांनी रेवानगरी पासून ८ मैलावर आपल्या सैन्याचा पडाव टाकला; तेव्हा रेवा संस्थानच्या राजाने तेथल्या राजनैतिक एजंट लेफ्टनंट असबोर्न याला भिऊन कुंवरसिंहला पत्र पाठविले की, 'तुम्ही आमच्या संस्थानातून निघून जावे.' ते पत्र वाचून स्वाभिमानी वीर कुंवरसिंह पश्चिमेकडे बांद्याकडे आपल्या सैन्यासह निघून गेले.

वास्तविक पाहता रेवा संस्थानच्या राजाचा कुंवरसिंहांशी नातेसंबंध होता. पण रेवाचा राजा इतर संस्थानिकांप्रमाणेच इंग्रजांच्या दबावाखाली होता. तो राजा विश्वनाथ सिंहाचा पुत्र होता. विश्वनाथ सिंहांचे सरदार महिपतसिंह त्यांचे मित्र होते. विश्वनाथ सिंहानंतर त्याचा पुत्र रघुनाथसिंह रेवा संस्थानच्या गादीवर बसला. महीपत सिंहाचा पुत्र रणमस्त सिंह हा त्याचा मित्र व्र सरदारही होता. रणमस्त सिंहाचा जन्म १८२५ साली झाला. रणमस्त ऐवजी सारेच त्याला रणमत सिंह म्हणू लागले. राजा रघुनाथसिंहाचा रणमत सिंहावर फर विश्वास होता. पण रणमतसिंह हा स्वतंत्र वृत्तीचा व शूर होता. आपल्या संस्थानमधील इंग्रजांचे प्राबल्य त्याला फार खटकत होते. पण राजा रघुनाथ सिंह इंग्रज एजंट आसबोर्न यांच्याशी दबून वागत होता. ते मात्र रणमत सिंह याला पसंत नव्हते. रेवा संस्थानच्या सैन्यात व तेथल्या इंग्रजांच्या सैन्यातील देशी सैनिकांत इग्रजांविरूद्ध तीव्र असंतोष होता. सरदार रणमत सिंहाविषयी या दोन्ही सैनिकांच्या मनात फार आदराची भावना होती.

रेवा संस्थानच्या राजावर आसबोर्नची कडी नजर होती. स्वातंत्र्य सैनिकांना तो जाऊन मिळू नये, म्हणून आसबोर्न दक्ष होता. ठाकूर रणमत सिंहाने ते पाहून इंग्रजां-विरूद्ध युद्ध छेडले. जनतेचीही ठाकूर रणमत सिंहाला साथ होती. जनतेने आसबोर्नच्या बंगल्यावर हल्ला केला. तेव्हा तो कसातरी जीव घेऊन पळून गेला. ठाकूर रणमत सिंह व त्याचे सहकारी लालधीर सिंह, लाल पंजाब सिंह, लाल श्याम शाह, लाल लोचन सिंह व पहलवान सिंह या योध्यांसह चित्रकूटच्या जंगलात आपल्या सैन्यासह आश्रयाला निघून गेला. त्यांनी नागौद येथल्या इंग्रजांच्या रेसिडेन्सीवर हल्ला केला. नागौदचा रेसिडेंट त्यांना भिऊन अजयगडच्या बुदेल्यांच्या आश्रयाला निघून गेला. ठाकूर रणमत सिंहाने त्या रेसिडेंटचा पाठलाग केला. तेव्हा अजगडच्या राजा केशरीसिंह बुंदेला याच्याशी त्याचा सामना झाला. धनघोर युद्ध झाले. त्यात केशरीसिंह रणमत सिंहाच्या हातून मारला गेला.

काही दिवसांच्या विश्रांतीनंतर रणमत सिंहाने इंग्रजांच्या नौगाव छावणीवरही हल्ला केला व ती छावणी लुटली. बरोंधा येथे त्याची इंग्रजांच्या सैन्याच्या एका तुकडीशी गाठ पडली. तेव्हा रणमत सिंहाने आणि त्याच्या साथीदारांनी त्या सैन्य तुकडीची धूळधाण उलवून दिली. त्यातील कित्येक मारले गेले व काही पळून गेले.

बांद्यामध्ये असतांना इंग्रजसेना ठाकूर रणमत सिंह यांच्या पाठलागावर आली. रणमत सिंहांनी डभौराच्या रणजित राय यांच्या गढीचा आश्रय घेतला. तेथेही ती इंग्रज सेना पाठलाग करीत आली. नंतर रणमत सिंह सोहागला गेले. इंग्रज सेना पाठलागावर होतीच. तेथेही ती सेना आली. जेव्हा रणमत सिंह क्योटीच्या गढीत गेले. तेव्हा इंग्रजांची सेना व रेवा संस्थानची सेना यांनी मिळून त्या गढीला वेढा दिला. तेव्हा करचूलीचे ठाकूर दलथम्हन सिंह यांनी रणमत सिंहांना गढीतून सुरक्षितपणे निघून जाण्यास मदत केली.

इंग्रजांनी त्यांना पकडण्यासाठी २००० रुपयांचे बक्षीस जाहीर केले. तसेच रेवा संस्थाच्या राजाने रणमत सिंहांना पकडून देण्यासाठी त्या राजावर दबाव आणला. नाईलाजाने रेवाच्या राजाने रणमत सिंहांना पत्र देऊन बोलावून घेतले. रणमत सिंह गुप्त मार्गाने रेवाच्या राजमहालात आले. रेवाच्या राजाने त्यांना आत्मसमर्पण करण्यास सांगितले. इंग्रजांच्या वतीने त्यांना आश्वासन दिले. अखेर आपल्या आईची संमती घेऊन रणमत सिंहांनी रेवाच्या राजासमोर आत्मसमर्पण केले. परंतु त्या राजाने रणमत सिंह त्याचा प्रामाणिक मित्र असूनही त्याचा विश्वासघात केला, कां? तर इंग्रजांची मर्जी संपादन करण्यासाठी. ठाकूर रणमत सिंह आपला जिवलग मित्र विजयशंकर नाग याच्या वाड्यातील तळघरात विश्रांती घेत पहुडला होता, तेव्हा रेवाच्या राजाने त्याचा पत्ता इंग्रज सेनाधिकाऱ्याला सांगितला. त्याने त्या तळघरात रणमत सिंहांना कैद केले आणि त्यांना आग्रा येथील तुरूंगात १८५९ साली अनंत चतुर्दशीच्या दिवशी फांशी देण्यात आले. रेवा संस्थानच्या स्वातंत्र्यासाठी लढणारा हा स्वातंत्र्यवीर विश्वासघातानेच फासावर लटकला आणि अमर झाला.



# ८०. अमरचंद बाठिया

सन १८५७ च्या स्वातंत्र्य युद्धाची तयारी करण्यासाठी आपल्या देशातील त्या काळच्या साधूंनी, फकिरांनी गुप्तचराचे कार्य करून उठावाची आग आपल्या धार्मिक प्रवचनातून, उपदेशांतून भारतभर गुप्त रीतीने फैलावली. साधू व फकीर सतत या गावाहून त्या गावाला हिंडत राहतात. त्यांच्या मुक्त संचाराला कोणीही अटकाव करू शकत नाही. ते गुप्तपणे क्रांतीचे वारे देशभर पसरवीत आहेत, हे परक्या इंग्रज सरकारला कसे कळणार? नानासाहेब पेशवे आणि त्यांच्या सहकऱ्यांनी या साधूंना व फकिरांना या कामी लावले होते. कारण हे साधू व फकीर आपल्या प्रवासात इंग्रजांचे जनतेवरील अत्याचार पाहातच होते. त्यामुळे त्यांनाही वाटे की या लालतोंड्यांचे राज्य आपल्या देशातून नाहीसे झाले पाहिजे. क्रांतिकारकांचे अनेक हिंदू व मुसलमान गुप्तहेरही साधूंच्या व फकीरांच्या वेषात इंग्रजांविरूद्ध उठावाचा प्रचार आपल्या प्रवचनातून करीत असत. त्यामुळे इंग्रजांच्या अत्याचारांनी त्रस्त झालेली जनतासुद्धा इंग्रजांविरूद्ध उठाव केव्हा सुरू होतो, याची प्रतीक्षा करीत होती.

ग्वाल्हेरच्या शिंद्यांचे खजिनदार अमरचंद बाठिया हे श्वेतांबर जैन पंथाचे धर्मनिष्ठ, प्रामाणिक व मेहनती होते. ते दररोज सकाळी स्नानानंतर मंदिरात जायचे व साधू-महंतांचे प्रवचन ऐकल्यावरच घरी परतायचे. एका संन्याशाने त्यांना सांगितले की, कलकत्त्याजवळच्या ४७ व्या पलटणीने ब्राम्हणदेशच्या युद्धात भाग घेण्यासाठी जाण्यास नकार दिला. ती मधील मुसलमान सैनिकांनी दुप्पट भत्ता मागितला. हिंदूंना तर मनुस्मृतीच्या आज्ञेनुसार समुद्रपार जाणे निषिद्धच होते. तेव्हा इंग्रज अधिकाऱ्यांनी त्या ४७ व्या पलटणीवर तोफांचा मारा करून त्यांना ठार केले. वाचलेल्या सैनिकांना फाशी दिले व ती पलटन नष्ट करून टाकली. हे ऐकल्यावर अमरचंद बाठियाच्या मनात इंग्रजांविरूद्ध रोष निर्माण झाला. ते बेचैन होऊन गेले.

राणी लक्ष्मीबाई, तात्या टोपे व रावसाहेब पेशवे यांनी आपल्या सैन्यासह ग्वाल्हेरवर आक्रमण करून ग्लाल्हेर ताब्यात घेतले. रावसाहेब पेशव्यांना मराठा राज्याचा उत्तराधिकारी म्हणून तेथे त्यांचा राज्याभिषेक करण्यात आला. तेव्हा खजिनदार अमरचंद बाठियाने ग्वाल्हेरच्या खजिन्यातून भरपूर संपत्ती त्यांच्या स्वाधीन केली. त्यांना धनाबरोबर धान्य व शस्त्रेही दिली. त्या धनातून त्यांनी ५ महिन्यापासून थकलेला पगार तर दिलाच वर प्रत्येक सैनिकाला बक्षीसी सुद्धा दिली. अमरचंद बाठियाने वेळोवेळी त्या खजिन्यातून पैसा काढून रावसाहेबाला दिला.

अमरचंद बाठियाने दिलेल्या धनामुळे लक्ष्मीबाई, तात्या टोपे व रावसाहेब पेशव्यांचे बळ वाढले. जेव्हा सर ह्यू रोज व जनरल स्मिथने ग्लाल्हेरवर हल्ला केला, तेव्हा क्रांतिकारी सैन्याने त्यांच्याशी जबरदस्त लढा दिला. पराभवाची लक्षणे दिसू लागताच लक्ष्मीबाई घोड्यावर बसून रणक्षेत्रातून निसटून निघून जाऊ लागली. ते पाहताच काही गोरे घोडेस्वार तिचा पाठलाग करण्यासाठी धावले. एका वाहत्या ओढ्याजवळ राणीचा घोडा अडला. तेव्हा एका गोऱ्या सैनिकाने तिच्यावर वार केला. घोड्यावरून पडता पडता राणीने आपल्या तरवारीने त्याचा शिरच्छेद केला. तो १८ जून १८५८ चा दिवस होता. राणी मरण पावल्यावर तिच्या रामचंद्रपंत नावाच्या सैनिकाने जवळच्या गवताच्या गंजीत तिचा अग्निसंस्कार केला.

ग्वाल्हेर इंग्रजांच्या ताब्यात आले. आग्रा येथे आपला दिवाण दिनकरराव राजवाडे यांच्या सल्ल्याने पळून जाऊन इंग्रजांच्या आश्रयास राहिलेला ग्वाल्हेरचा राजा जयाजीराव शिंदे ग्वाल्हेरला परत आला. क्रांतिकारकांच्या हाती ग्वाल्हेरचा खजिना सोपविला म्हणून ब्रिगेडियर नेपियर या इंग्रज सेनाधिकाऱ्याने खजिनदार अमरचंद बाठियाला कैद केले. २२ जून १८५८ रोजी न्यायाचे नाटक रचून त्या देशभक्त खजिनदाराला लष्कर भागातील सराफा बाजारातील एका निंबाच्या झाडाच्या फांदीवर फासावर चढविले. जनतेत आपला धाक जमविण्यासाठी त्याचे प्रेत त्या झाडावरच तीन दिवस लटकत ठेवले.

खजिना ग्वाल्हेरच्या शिंद्यांचा. त्यांच्या खजिनदाराने तो क्रांतिकारकांना दिला. त्याच्यावर इंग्रजांचा अधिकार कोणत्या न्यायाने पोचतो? तेव्हा खजिनदार अमरचंद बाठिया यांना त्यांनी गुन्हेगार ठरविण्याचा काय अधिकार? याचे उत्तर स्पष्ट आहे. इंग्रजांनी ग्वाल्हेर ताब्यात घेतल्या समयी जयाजीराव शिंदे आग्रा येथे इंग्रजांच्या आश्रयाला होते. त्यांच्या अनुपस्थितीत ता खजिना इंग्रजांना हस्तगत करायचा होता. पण त्या अधीच तो अमरचंदांनी क्रांतिकारकांना देऊन टाकला होता. इंग्रजांना तो खजिना मिळू न शकल्याने ते संतापले व त्यांनी अमरचंदांना फासावर लटकविले. इंग्रज हे लुटारू आहेत. छलकपट, गुंडगिरी, लूटमार करण्यात ते कसलेही शुभाशुभ मानीत नव्हते. एवढेच नव्हे, तर कसलेही कारण नसता या देशातील लहान-मोठ्या राज्यांवर देशी सैन्याच्या साह्याने आक्रमणे करून ती राज्ये लुटून बरबाद केली होती व तेथल्या राजांना आपल्या ताटाखालीची मांजरे बनविली होती. ग्वाल्हेरचे शिंदेही त्यातलेच.

ग्वाल्हेरच्या शिंद्यांनी तरी कोठे घाम गाळून ती गडगंज संपत्ती जमविली होती? त्यांनीही अनेक राज्यांवर आक्रमणे करून त्या राज्यांचे खजिने हडप केले होते. जनतेचे

शोषण करून आपला खजिना भरला होता. त्या खजिन्यातली संपत्ती अर्थात जनतेचीच होती. ती देशाच्या स्वतंत्र्य लढ्यासाठी अमरचंदांनी दिली, हे योग्यच होते, असेच म्हणावे लागेल. आजही त्यांना ज्या निंबाच्या झाडावर फाशी दिले, तो निंब अमरचंदांची स्मृती जागवत तेथे उभा आहे. त्यांचे कानपूरचे वंशज हजारीमल बाठिया यांनी कानपूर येथे अमरचंदांचा भव्य पुतळा उभारून त्यांना श्रद्धांजली वाहिली आहे.



# ८१. राजा बख्तावर सिंह व राजा रघुनाथ सिंह

माळव्यातील अमझेरा संस्थानचे राजा बख्तावर सिंह आणि त्यांचे पुत्र राजा रघुनाथ सिंह यांनी १८५७ च्या स्वातंत्र्य-युद्धात इंग्रजांच्या अनेक छावण्यांवर हल्ले करून इंग्रजांना पराभूत केले होते. या स्वातंत्र्ययुद्धाचे महान नेते तात्या टोपे जेव्हा अमझेरा येथे आले, तेव्हा बख्तावर सिंहांनी स्वातंत्र्य-युद्धा संबंधी त्यांच्याशी विचार-विनिमय केला आणि स्वातंत्र्य-युद्धात उडी घेण्याचा निर्णय त्यांनी घेतला. त्यांनी विंध्य पर्वताच्या डोंगर-दऱ्यांत वस्ती करून राहिलेल्या भिल्ल, राजपूत आणि मुसलमान वीरांना संघटित केले. त्यांना गनिमी काव्याचे प्रशिक्षण दिले.

बख्तावरसिंहांनी आपल्या सैन्यासह २ जुलै १८५७ रोजी इंग्रजांच्या भोपावर येथील छावणीवर आक्रमण केले. तेव्हा त्यांच्या सैन्यात १,५०० सैनिक होते. या सैनिकांनी छावणीतील इंग्रज अधिकाऱ्यांची कत्तल करून त्या छावणीला आग लावून दिली. तेथे केशरी ध्वज फडकावला. छावणीचा कॅप्टन एचिनसन छावणी सोडून पळून गेला. बख्तावरसिंहच्या सैन्याला भरपूर शस्त्रे मिळाली. नंतर १० ऑक्टोबर रोजी पुन्हा त्या भोपावर छावणीवर बख्तावरसिंहांनी हल्ला केला, तेव्हाही त्यांना भरपूर शस्त्रे व तोफा मिळाल्या. त्या तोफा ते अमझेरा येथे घेऊन गेले. नंतर ११ ऑक्टोबर १८५७ रोजी माळव्यातील सरदारपूर छावणीवर चहुबाजूंनी त्यांनी आक्रमण केले. त्यामुळे इंग्रजांच्या छावणीतील सैन्य इकडेतिकडे पळाले व इंग्रजांच्या सेवेतील भिल्ल पलटणीने बख्तावर सिंहासमोर आत्मसमर्पण केले. या सफल आक्रमणांनी उत्साहित होऊन त्यांनी इंग्रजांच्या मानपूर गूजरी छावणीवर १६ ऑक्टोबर १८५७ रोजी हल्ला केला. ती छावणी ताब्यात घेतली. तिचे प्रमुख कॅप्टन केंटीज व जनरल क्लार्क पळून गेले. छावणी मधील शस्त्रे व तोफा बख्तावरसिंहाने ताब्यात घेतल्या.

माळव्यातील इंदूरपलीकडचा सगळा डोंगराळ व जंगलांचा नैर्ऋत्येचा विस्तृत प्रदेश बख्तावर सिंहांच्या ताब्यात आला. त्यानंतर त्यांनी काही राज्यांच्या संस्थानिकांशी व त्यांच्या दिवाणांशी चर्चा करून संपूर्ण माळवा प्रदेश इंग्रजांच्या तावडीतून मुक्त करण्याचा निर्णय घेतला. त्यासाठी तयारी सुरू केली. परंतु या भागात इंग्रजांनी मोठी सेना आणल्यामुळे त्यांचा दबदबा वाढू लागला. दुर्भाग्य असे की, एका भारतीय व्यक्तीनेच इंग्रजांची मर्जी संपादन करण्यासाठी १३ नोव्हेंबर १८५७ रोजी ते स्नान करीत असतांना अचानक धोका देऊन पकडून दिले. त्यांच्यावर राजद्रोहाच्या व विद्रोहाच्या आरोपाखाली खटला भरला. त्यात २१ डिसेंबर १८५७ रोजी त्यांना फाशीची सजा सुनावण्यात आली व १० फेब्रुवारी १८५८ रोजी त्यांना फाशी देण्यात आली.

जुलै १८५७ पासून बख्तारवर सिंहांचे पुत्र राजा रघुनाथ सिंह आपल्या पित्याबरोबर प्रत्येक युद्धात पराक्रम गाजवीत होते. बख्तावर सिंहानंतर अमझेऱ्याच्या गादीवर राज्याभिषेक करून घेऊन ते बसले. त्यांनीही इंग्रजांविरूद्ध युद्धाची तयारी मोठ्या प्रमाणात सुरू केली. त्यामुळे इंग्रजांची चिंता वाढली. त्यांनी ग्वाल्हेरच्या शिंद्यांशी चर्चा केली. शिंद्यांच्या ताब्यात असलेला गुजराथमधील पंचमहाल जिल्हा आपल्या ताब्यात घेऊन त्यांना रघुनाथसिंहाचे अमझेरा राज्य दिले.

अमझेऱ्याचा विद्रोह दडपून टाकण्याचा आदेश ग्वाल्हेरच्या पोलिटिकल एजंटने माळव्याच्या कमिशनरला दिला. त्याच्या आदेशाने इंग्रजांच्या सैन्याने व ग्वाल्हेरच्या शिंद्यांच्या सैन्याने एकत्र येऊन अमझेऱ्यावर आक्रमण केले. क्रांतिवीर रघुनाथ सिंहाने आपल्या सैनिकांच्या व जनतेच्या साह्याने त्यांचा प्रतिकार केला. पण शत्रूचे सैन्यबळ व युद्धसाहित्य मोठे असल्याने त्यांना माघार घ्यावी लागली. त्यानंतर पुन्हा इंग्रजांनी व शिद्यांनी लालगडवर आक्रमण केले. परंतु इंग्रजांचे सैन्य विंध्य पर्वताच्या डोंगरदऱ्यात भटकले गेले. रघुनाथ सिंहांच्या भिल्ल व स्थानिक सैन्याने शत्रू सैन्यावर जबरदस्त आक्रमण केले. त्यांनी शत्रू पक्षाचे कित्येक सैनिक ठार झाले. इंग्रजांचा पराभव झालेला पाहून शिंद्यांनी इंग्रजांच्यावतीने रघुनाथ सिंहांशी तहाची बोलणी केली. इंग्रज सरकार अमझेरा मुक्त करील. रघुनाथ सिंहांनी इंग्रज छावण्यावर आक्रमण करू नये, असे ठरले.

रघुनाथसिंहांनी मात्र सावधगिरीने लालगड किल्ला मजबूत केला. किल्ल्यात पुरेसे सैन्य तैनात केले. आसपासच्या डोंगरावर भिल्ल सैनिकांच्या तुकड्या ठेवल्या. त्यांनी वेळप्रसंगी अचानक हल्ले करायचे, अशा सूचना त्यांना देऊन ठेवल्या रघुनाथ सिंह धार्मिक वृत्तीचे होते, तरी त्यांच्या सैन्यात हिंदूबरोबर मुसलमान व भिल्ल सैनिकांची संख्या मोठी होती. त्यांची ते सतत काळजी घेत. त्यांना सोयी-सवलती उपलब्ध करून देत असते. जनतेतही ते लोकप्रिय होते.

तहात ठरल्याप्रमाणे इंग्रजांनी अमझेरा रघुनाथ सिंहांना सुपूर्द करायला हवा होता. पण रघुनाथ सिंहांनी त्यांच्याकडे अनेक वेळा मागणी करूनही इंग्रजांनी अमझेरा त्यांच्या ताब्यात दिला नाही शिंद्यांनी इंग्रजांना त्यासाठी तयार करायला हवे होते. पण ग्वाल्हेरचे शिंदे हे इंग्रजांपुढे लाचार बनले होते. इंग्रजांच्या मनाविरूद्ध कोणतीही गोष्ट करायची हिंमत त्यांच्यात नव्हती; मग ती न्याय्य असो वा अन्याय्य असो. इंग्रज तर लुटारूच होते. भारतातून जे काही हडपता येईल, ते हडपण्याची संधी ते चुकवत नसत. रघुनाथ सिंहांसारख्या राजाला ते काय दाद देणार? त्यांनी रघुनाथ सिंहांचा राजमहालसुद्धा त्यांना दिला नाही. इंग्रजांनी आपल्या पित्याला नाहक फाशी दिली हे शल्य ते विसरूच शकत नव्हते.

रघुनाथ सिंहांनी इंग्रजांच्या भोपावर, छावणीवर हल्ला करण्याची तयारी केली. ते इंग्रजांना कळले. त्यांनी आपल्या व शिंद्यांच्या सैन्यासह लालगडवर चढाई केली. तुंबळ युद्ध झाले. इंग्रज सैन्याने किल्ल्यात प्रवेश केला. त्या युद्धात रघुनाथ सिंह हा स्वातंत्र्यप्रेमी व स्वाभिमानी राजा कामास आला. त्यानेही तोफा डागून लालगड जमीनदोस्त केला. रघुनाथ सिंहांच्या कुवर किसनसिंह यांच्यासह सर्व लहान राजपुत्रांचीही निष्ठूरपणे हत्या केली. राणीला अखेरचे जीवन वृंदावनला हरिभजनात घालवावे लागले.

❖❖❖

# ८२. ठाकूर दौलत सिंह

१८५७ मध्ये माळव्यात इंग्रजांविरूद्ध जो उठाव झाला, त्यात देवास जिल्ह्यातील राधोगडचे महाराणा ठाकूर दौलत सिंह यांचा सिंहाचा वाटा होता. माळव्यातील उठावाचे ते प्रमुख नेते होते. राधोगड हे स्थान इंदूर-नेमावर मार्गावर इंदूरपासून २२ मैल अंतरावर आहे. राधोगडच्या क्षत्रिय वंशातील या राज घराण्याचा त्या प्रदेशात सामाजिक दृष्टीने फार मोठा मान होता. राधोगडचा राज्यकारभार हाती आल्यावर ठाकूर दौलत सिंहांनी आपल्या संस्थानाची सुधारणा करण्यासाठी व आपली शक्ती वाढविण्यासाठी नेटाने प्रयत्न सुरू केले. त्यांनी आपल्या सैन्यात नव्याने भरती करून राधोगडला त्या सैन्याच्या प्रशिक्षणाचे केंद्र बनविले. त्या फौजेत हिंदू व मुसलमान शेतकऱ्यांची विशेषतः तरुणांची संख्या जास्त होती. सैन्यासाठी चांगले घोडे खरेदी केले; तसेच उत्तम शस्त्रेही जमविली. मुसलमानांसाठी त्यांनी एक मशीदही बांधली. त्यांच्या संस्थानात २० गावे होती व संस्थानचे उत्पन्न दरवर्षी ९ लाख रुपये होते.

नानासाहेब पेशव्यांकडून त्यांना इंग्रजांविरूद्ध उठाव करण्यासंबंधी पत्र मिळाले होते. राधोगडच्या गढीत ठाकूर दौलत सिंह आपल्या सहकाऱ्यांसमवेत उठावासंबंधात विचार-विनियम करू लागले. वाढीव सैन्यामुळे खर्चही वाढला. त्यांना पैशांची कमतरता भासू लागली. काय करावे, असा मोठा प्रश्न उभा राहिला. शेजारचा सतवास किल्ला ऐतिहासिक व सामाजिकदृष्टीने महत्त्वाचा होता. त्यात मोठा खजिनाही होता. दौलत सिंहांनी सतवास किल्ल्यावर हल्ला करून त्यातला खजिना ताब्यात घेतला व आपली आर्थिक परिस्थिती सुधारली. इंग्रज अधिकाऱ्यांच्या दृष्टीने सतवास किल्ल्याचे विशेष महत्त्व होते. कारण काही काळापूर्वी हा मजबूत किल्ला चित्तू पेंढाऱ्याचे मुख्य केंद्र म्हणून गणला जात होता. या किल्ल्यावरील दौलत सिंहांच्या विजयामुळे ग्वाल्हेरचे शिंदे व इंदूरचे होळकर सावध झाले. ते दौलत सिंहाविषयी नाराज झाले. एवढेच नव्हे, तर इंग्रज सेनाधिकारीसुद्धा संतप्त झाले. परंतु दौलतसिंहांनी या सर्वांची पर्वा केली नाही. ते उत्तरेकडे स्वातंत्र्ययुद्ध केव्हा सुरू होते, याची प्रतीक्षा करू लागले.

१ जुलै १८५७ रोजी होळकर संस्थानचा प्रमुख गोलंदाज सआदत खाँ व त्याचा सहकारी भगीरथ बारगीर यांनी आपल्या सैन्यासह इंदूर रेसिडेन्सीवर हल्ला केला. त्याच दिवशी इंग्रजांच्या महू छावणीतील देशी पलटणीनेही इंग्रजांविरुद्ध शस्त्र उगारले. क्रांतीच्या ज्वाला मध्य भारतात पसरू लागल्या. ठाकूर दौलत सिंह यांचीच वाट बघत होता. इंदूरचा रेसिडेंट कर्नल डुरेण्ड २०० घोडेस्वार व ३०० भिल्ल सैनिक घेऊन

सिहोरकडे पळाला. सिहोरला राधोगडमार्गे जाता येत होते. डुरेण्ड राधोगडच्या परिसरात येताच दौलत सिंहाने आपल्या सैनिकांसह त्याच्यावर वेगाने हल्ला केला. तुंबळयद्ध झाले. काही सैनिक मारले गेले. परंतु डुरेण्ड जीव घेऊन पळून गेला.

इंग्रजांनी ठिकठिकाणाहून कुमक मागवून घेऊन मोठ्या सैन्यानिशी राधोगडवर अचानक हल्ला केला. त्यांच्याबरोबर मोठ्या तोफा होत्या. त्या तोफांच्या गोळ्यांच्या माऱ्याने राधोगडचा तट ढासळला, तेव्हा दौलतसिंहांनी आपल्या सर्व शक्तिनिशी इंग्रज सैन्याचा सामना केला. पण इंग्रजांच्या प्रचंड शक्तीपुढे त्यांचा टिकाव लागला नाही. दौलत सिंहाचे अनेक सैनिक या युद्धात कामी आले. अखेर ते उरलेल्या सैन्यासह राधोगड सोडून निघून गेले, आणि इंदूर जिल्ह्यातील आकिया गावच्या पटेलांच्या वाड्यात त्यांनी आश्रय घेतला. त्यांना स्थानिक जनतेचा पाठिंबा होता. गढी अम्बापाणीच्या आदिल मुहम्मद खाँ या क्रांतिकारी नेत्याचा तसेच तात्या टोपे, रावसाहेब पेशवे आणि शाहजादा फिरोजशाह यांच्याशीही त्यांचा संपर्क होता. देवासच्या नागरिकांनी त्यांना २५ हजार रुपयांची मदत स्वातंत्र्ययुद्धासाठी दिली होती. पण त्याचा उपयोग झाला नाही. इंदूरचा रेसिडेंट डुरेण्टने दौलतसिंहांना पकडण्यासाठी अनेक जहागीरदारांना व संस्थानिकांना पत्रे लिहून कळविले. इंग्रजांच्या दबावामुळे देवासच्या संस्थानिकाने त्यांना पकडण्यासाठी २ हजार रुपयांचे इनाम जाहीर केले. अखेर ग्वाल्हेरच्या शिंदे सरकारच्या सैनिकांनी त्यांना धोका देऊन पकडले. डुरेण्डने त्यांना गुणा छावणीत फासावर लटकावले. राधोगडचे राज्य ग्वाल्हेर संस्थानात व देवास संस्थानात विलीन करून टाकले. आपली शक्ती थोडीशी असूनही हा स्वातंत्र्यवीर आपल्याच लोकांकडून पकडला गेला व फाशी गेला, हे आपल्या देशाला लांछनच म्हणावे लागेल.



# ८३. सआदत खाँ

नानासाहेब पेशव्यांचे दूत त्यांची पत्रे व निरोप उत्तरेकडे पंजाबपासून दक्षिणेकडे कर्नाटकापर्यंत गुप्तरीत्या पोचवीत होते. इंग्रजांच्या जुलमी राजवटीमुळे भारतातील राजा-महाराजांपासून सर्व जनतेला असह्य झाली होती. साऱ्या देशात त्यांची गुंडगिरी चालू होती. राव-रंकांचे शोषण ते जबरदस्तीने करीत होते. देशात इंग्रजांविरूद्ध सर्वत्र एकाच वेळी इंग्रजांविरूद्ध उठाव करण्याचे निश्चित झाले होते. पण तो उठाव एकाच दिवशी न होता, वेगवेगळ्या दिवशी भारतभर सुरू झाला.

मध्य भारतातील इंदूरच्या तुकोजीराव (दुसरे) होळकरांनाही नानासाहेबांचे गुप्त पत्र या संबंधात मिळाले होते. तुकोजीरावांनासुद्धा इंग्रजांची अरेरावी असह्य झाली होती. पण इग्रजांच्यापेक्षा आपली ताकद कमी असल्याने ते स्वतः प्रत्यक्ष उठाव करू शकत नव्हते. तरीही त्यांचा प्रमुख गोलंदाज सआदत खाँ याने १८५७ मध्ये इंग्रजांविरूद्ध उठाव केलाच. त्या आधी ६ जून १८५७ रोजी इंदूरजवळच्या नीमच छावणीतील देशी सैन्याने उठाव केला. त्यामुळे इंदूरमध्ये राहणाऱ्या इंग्रजांना धडकी भरली. त्यांनी यथाशक्ती आपल्या संरक्षणाचे उपाय योजले. तेवढ्यात महितपूर छावणीतील माळवा पलटणीने १० जून १८५७ रोजी विद्रोह केला. १४ जून १८५७ रोजी झाशी येथील सैन्याने उठाव केला. १८ जून १८५७ रोजी इंदूरमध्ये इंग्रज रेसिडेंटच्या निवासस्थाना जवळील अफूच्या गोदामाजवळील तीन तोफा विद्रोही सैनिकांनी छावणीजवळच्या चौकात आणून ठेवल्या. तेथून त्या तोफा दूर करू दिल्या नाहीत.

सआदत खाँ राजस्थानातील मेवात गावचे रहिवासी होते. दिसायला सुंदर पण बलवान तरूण होते. ते इंदूरला येऊन तुकोजीराव होळकरांच्या सेवेत दाखल झाले. आपल्या पराक्रमाने त्यांनी महाराजांचा विश्वास संपादन केला. महाराजांनी त्यांची नेमणूक आपल्या सैन्याचा प्रमुख गोलंदाज म्हणून केली. इंदूरमध्ये भोपाळचा एक नबाब वारिस मुहम्मद खाँ हा राहत होता. त्याने सहादत खाँची भेट घेऊन विद्रोह करायचे ठरविले. होळकरांच्या सेवेतील मौलवी अब्दुल समद, कमांडर रहमतुल्ला, जमादार शेर खाँ, हवालदार दुर्गाप्रसाद व जमादार मुहम्मद अली हे त्यांचे साथीदार होते.

इंदूर रेसिडेन्सीच्या संरक्षणासाठी होळकरांच्या सैन्यातील ३०० घोडेस्वार सैनिक खान नदीच्या किनारी तैनात होते. सआदत खाँने त्यांना तेथून ३० जून रोजी परत बोलावून घेतले. त्यांच्याऐवजी दुसरे सैनिक तेथे पाठविले नाहीत. म्हणून रेसिडेंट ड्यूरेण्ड याने तेथला खजिना महूच्या छावणीत पाठवायचे ठरविले. सैनिकांनी तो आदेश

मानला नाही. होळकर महाराजांचा आतून पाठिंबा या विद्रोही नेत्यांना होता. एवढेच नव्हे, तर त्यांनी त्यांना गुप्तपणे साहाय्य देण्याचे कबूल केले होते.

सआदत खाँ सात-आठ घोडेस्वरांसह लष्करी पोशाखात रेसिडेन्सीमध्ये आले व त्यांनी तेथल्या सैनिकांना आवाहन केले. 'सज्ज व्हा. इंग्रजांना मारून टाका.' तेथे उपस्थित असलेले सर्व सैनिक व नागरिक इंदूर रेसिडेन्सीतील रेसिडेंट कर्नल ड्युरेण्ड यांच्या बंगल्यासमोर आले. सर्वात पुढे सआदत खाँ होता. त्याचे व ड्युरेण्डचे संभाषण चालू असतांना ड्यूरेण्ड ने त्याला शिवी दिली. त्यामुळे सआदत खाँ ने आपल्या बंदुकीतून त्याच्या रोखाने गोळी झाडली. थोडक्यात चुकले व ती गोळी ड्यूरेण्डचा गाल व कान छेदून गेली. घायाळ अवस्थेत तो आपले सारे कुटुंब घेऊन सिहोरला निघून गेला.

१ जुलै १८५७ रोजी इंदूरच्या सदर बाजारात विद्रोह भडकला. इंदूरच्या सदर बाजारात विद्रोह भडकला. सारे इंदूर शहर हादरून गेले. सआदत खाँने आपल्या तोफखान्याला गोळीबार करण्याचा आदेश दिला. त्यात २९ इंग्रज मारले गेले. कर्नल ट्रॅवर्सने आपल्या सैनिक तुकडीला विद्रोही सैनिकांवर गोळीबार करण्याचा आदेश दिला. पण त्या सैनिकांनी त्याला धुडकावून लावले. विद्रोही सैनिकांच्या गोळीबारात पोस्टातले व तार घरातले अनेक इंग्रज अधिकारी मारले गेले. त्यांनी रेसिडेन्सीला इंग्रजांच्या ताब्यातील खजिना लुटला आणि सगळ्या इंग्रजांचे बंगले जाळून टाकले.

सआदत खाँने आपला एक साथीदार भगीरथ बारगीर याला एक पत्र देऊन दिल्लीला बहादुरशाह जफरकडे पाठविले. बहादुरशाहने त्याच्याजवळ तुकोजीराव होळकरांना एक परवाना दिला. तो परत येत असता हातोदजवळ देपालपूरच्या तहसीलदाराने त्याला पकडले व देपालपूरला नेऊन भगीरथ बारगीरला फाशी दिली.

इंग्रजांना मोठी कुमक मिळाली. तेव्हा ड्यूरेण्डने तुकोजीराव होळकरांना पत्र देऊन कळविले की, 'तुमही जर विद्रोही सैनिकांना शासन करीत नसाल, तर ते काम आम्हांला करावे लागेल.' तेव्हा सआदत खाँ आणि सर्व साथीदार इंदूरमधून पसार झाले परंतु त्याचा राग इंग्रजांनी इतर सैनिकांवर व नागरिकांवर काढला. त्यांनी ११ विद्रोही सैनिकांना बंदुकीच्या गोळ्यांनी ठार केले. २१ सैनिकांना व नागरिकांना जन्मठेपेच्या शिक्षा दिल्या. ३१ लोकांना नोकरीतून काढून टाकले आणि ६१ सैनिकांना व नागरिकांना कमी-जास्त वर्षांच्या सक्त मजुरीच्या शिक्षा दिल्या.

सआदत खाँ भूमिगत होऊन गरीबीत दिवस काढू लागले. लुटलेल्या खजिन्यातील एका पैशालाही त्यांनी हात लावला नाही. ते झालवाडमध्ये नोकरी करीत होते. त्यांना इतका कमी पगार मिळत होता की, जेमतेम तो पोट भरण्या इतकाच होता. त्यांना

पकडण्यासाठी इंग्रज सरकारने मोठे बक्षीस जाहीर केले होते. त्या बक्षीसाच्या लोभाने त्यांच्याच एका नातेवाईकाने त्यांना पकडून दिले. त्यांना इंदूरला आणून त्यांच्यावर राजद्रोहाचा व विद्रोहाचा आरोप ठेवून खटला दाखल करण्यात आला. सुनावणीत त्यांनी न्यायालयात बाणेदारपणे सांगितले, 'खुदा के बाद मैं केवल महाराजा होळकर के प्रति वफादार हूँ। उनका नमक मैंने खाया है।' शेवटी या क्रांतिकारकाला देहदंड देण्यात आला आणि त्यांना फाशी देण्यात आले. हा इमानदार, स्वातंत्र्य प्रिय देशभक्त आपल्या मातृभूमीच्या मातीत मिसळून गेला.



# ८४. फाजिल मुहम्मद खाँ, आदिल मुहम्मद खाँ

१८५७ च्या स्वातंत्र्य युद्धात भोपाळ संस्थानची संस्थानिक नबाब सिंकदर बेगम हिने इंग्रज सरकारला मदत दिली. परंतु संस्थानातील आमजनता, जहागीरदार, मौलवी, पंडित, कर्मचारी मात्र स्वातंत्र्य युद्धात सक्रिय भाग घेण्याच्या विचारात होती. मेरठ, दिल्ली, कानपूर, लखनौमध्ये कंपनी सरकारच्या देशी पलटणीतील शिपायांनी इंग्रज सरकारविरूद्ध उठाव केल्याची बातमी समजताच गढी अंबापाणीचे जहागीरदार फाजिल मुहम्मद खाँ व त्याचे बंधू आदिल मुहम्मद खाँ यांनी सैनिकांची भरती केली व जुलै १८५७ मध्ये इंग्रज सरकार विरूद्ध त्यांनी उठाव केला. हे दोघे बंधू नबाब सिकंदर बेगमचे नातेवाईक होते व त्यांची जहागीर बेगमच्या संस्थानात होती. त्यांनी भोपाळ संस्थानातच नव्हे, तर विदिशा, सागर, होशंगाबादपर्यंत उठावाचे लोण पसरविले. त्यांचा पराक्रम आणि आम जनतेचे त्यांना मिळणारे समर्थन पाहून भोपाळच्या व इंग्रजांच्या सैन्याला धडकीच भरली.

आदिल मुहम्द खाँला वाटत होते की, आपल्या मध्य भारतातून इंग्रजांना हाकून देऊन आपला हा प्रदेश स्वतंत्र करावा. म्हणून त्याने रेवा, नागौद दतिया, चरखारी, छतरपूर, बिजावर, नागपूर, झाशी ठिकाणच्या १५ संस्थानिकांना तशी पत्रे लिहिली व सर्वांनी संघटित होऊन इंग्रजांशी लढा द्यावा, असे त्यांना सुचविले. भोपाळच्या नबाब सिकंदर बेगम हिला त्यांनी पत्र देऊन कळविले की, 'माझ्या कार्याला रोखणे हे खुदा व पैगंबरांच्या हुकुमाविरूद्ध आहे. भोपाळ संस्थानात अराजक माजविण्याचा माझा हेतू नाही. माझा हेतू इंग्रजांना आपल्या प्रदेशातून हाकून लावणे वढाच आहे.' परंतु भोपाळच्या बेगमने आपले इंग्रजांना मदत करण्याचे धोरण सोडले नाही.

दोन्ही भावांनी पठारी रियासतवर २८ सप्टेंबर १८५७ रोजी हल्ला केला. पठारी चे नबाब हैदर मुहम्मद खाँ यांच्याशी त्यांचा सामना झाला. दोन्ही बाजूचे काही सैनिक मारले गेले. नबाबचे सैनिक घाबरून पळून गेले. फाजिल मुहम्मद खाँ ने पठारीवर ताबा मिळविला आणि हैदर मुहम्मद खाँला कैद केले, परंतु नबाब हैदर खाँ ने सुटून जाऊन सैन्य जमविले व पठारीची गढी आपल्या ताब्यात घेतली, जे धनिक उठावासाठी आर्थिक मदत देत नव्हते, त्या सर्वांना फाजिल मुहम्मद खाँ ने लुटले. गावागावांतून इंग्रजांविरूद्ध विद्रोहाची आग भडकावली. जुलै १८५७ ते नोव्हेंबर १८५७ पर्यंतच्या काळात या दोन्ही बंधूंनी भोपाळ, विदिशा, सागर, होशंगाबाद या भागात आपला धाक जमविला. भोपाळच्या बेगमेपुढे मोठे संकट उभे राहिले. तिने आपले निवडक सैन्य गोहतगंज येथे पाठवून मोर्चा

उभारला. दुसरा मोर्चा बेगम गंजला व तिसरा मोर्चा बाम्होरीला उभारला. तिन्ही मोर्चांवर घोडेस्वार, पायदळ ठेवले आणि तोफा सुद्धा सज्ज ठेवल्या. या प्रकारे फाजिल मुहम्मद खाँच्या अंबापाणी गढीला तिने घेरले.

७ ऑक्टोबर १८५७ रोजी बाम्होरी जवळ राजगढी येथे दोन्ही सैन्यांची गाठ पडली. निकाराचे युद्ध झाले. त्यात फाजिल मुहम्मद खाँचा जमादार भीकमसिंह यांच्यासह त्याचे २७ सैनिक मारले गेले. त्याचे सामानही लुटले गेले. त्यानंतर भोपाळच्या बेगमेने तिच्या सैन्याचा कमांडर मुरव्वत मुहम्मद खाँ याला सिहोरहून बोलावून घेऊन निवडक सैन्यासह मोर्चावर पाठवून तो मोर्चा मजबूत केला.

फाजिल मुहम्मद खाँला कामदार खाँ, सजात खाँ पेंढारी, ठाकुर छत्रसाल आणि आपल्या दोन्ही भावांसह फत्तेपूरचा गोंडराजा येऊन मिळाले होते. आता ते होशंगाबाद, बेगमगंज आणि गैरतगंज वर आक्रमण करण्याची योजना आखीत होते. हे समजल्यावर बेगमने इंग्रजांच्या साहाय्यासाठी मोठे सैन्य पाठविले. ते सैन्य येत आहे असे पाहून फाजिल मुहम्मद खाँ १७ ऑक्टोबर १८५७ रोजी गढी अंबापाणी मधून निघून गेला. गढीवर इंग्रजांनी तोफांचा मारा केला, तेव्हा गढीतील स्त्रियांनी आपल्या मुलांसह गढी भोपाळच्या सैन्याच्या ताब्यात देऊन टाकली. इंग्रजांनी विद्रोही सैनिकांना तुरूंगात टाकले.

गढी अंबापाणीहून निघाल्यानंतर फाजिल मुहम्मद खाँ आपल्या भावासह राहतगडला गेला व तो किल्ला त्यांनी ताब्यात घेतला तेथले सारे इंग्रज गड सोडून पळून गेले. सिहोर छावणीमधील भोपाळ सैन्याच्या एक हजार सैनिकांनी बंड पुकारले. इंग्रजांची कार्यालये ताब्यात घेतली. जुलै १८५७ ते नोव्हेंबर १८५७ पर्यंत सिहोर छावणी स्वतंत्र झाली होती. सर ह्यू रोज मोठे सैन्य घेऊन ६ जानेवारी १८५८ रोजी महू मधून सिहोरच्या मार्गाने २४ जानेवारी १८५८ रोजी राहतगडला पोचला. हेमिल्टनही आपल्या पलटणीसह त्याला येऊन मिळाला. भोपाळच्या बेगमेने आपला सेनापती मुरव्वत खाँ याला सैन्यासह ह्यू रोजच्या मदतीला पाठविले. राहतगडवर त्यांनी चढाई केली. बीजा नदीच्या किनाऱ्यावर फाजिल मुहम्मद खाँच्या सैन्याने त्यांच्याशी निकराचा लढा दिला. इंग्रज सैन्य ज्या जंगलात होते ते जंगल विद्रोही सैनिकांनी चहुबाजूंनी पेटवून दिले. जंगलात आग वेगाने पसरली; वरून कडक ऊन आणि सभोवताली आगीची धग यामुळे इंग्रज सैन्य जणू भाजूनच निघाले. बाकीच्या इंग्रज सैन्याने राहतगड शहर जिंकून घेतले. किल्ल्यावर आणि किल्ल्यातील इमारतीवर इंग्रजांचा तोफगोळ्यांचा मारा चालूच होता तेव्हा इंग्रज सैन्यावर बानपूरचा राजा मर्दनसिंह याने जबरदस्त आक्रमण केले. परंतु इंग्रजांच्या आधुनिक शस्त्रांपुढे त्यांचा टिकाव लागला नाही. म्हणून मर्दनसिंह आपल्या

सैन्यासह निघून गेला. २८ जानेवारी १८५८ च्या रात्री किल्ल्याच्या दुर्गम भागातून फाजिल मुहम्मद खाँ आपल्या विद्रोही सैन्यासह किल्ल्यातून निघून गेला. २९ जानेवारी इंग्रज सैन्याने त्यांचा पाठलाग करून १०० विद्रोही सैनिकांना पकडले. फाजिल मुहम्मद खाँ जंगलात लपला होता. त्याला सुद्धा गिरफ्तार केले. इंग्रजांनी पकडलेल्या विद्रोही सैनिकांचा क्रूरपणे छळ केला. फाजिल मुहम्मद खाँ याला राहतगडच्या मुख्य दरवाजावर फांशी देण्यात आली. कामदार खाँ यालाही तेथेच फांशी दिली.

आदिल मुहम्मद खाँ मात्र निसटला आणि १ एप्रिल १८५८ रोजी आपल्या सैन्यासह तात्या टोपे याला जाऊन मिळाला. झांशीच्या राणीला ही त्याने मदत केली. अखेर त्यालाही त्यांच्याबरोबर प्राणार्पण करावे लागले. अशा रीतीने या मुस्लिम बंधूंनी आपल्या देशाच्या स्वातंत्र्यासाठी आपले बलिदान केले व ते अमर झाले.



# ८५. नारायण सिंह

मेरठला व दिल्लीला इंग्रजांच्या देशी सेनेने मे १८५७ मध्ये इंग्रजी सत्तेविरूद्ध युद्धाचे रणशिग फुंकले. त्याचे पडसाद जून १८५७ मध्ये नर्मदेच्या खोऱ्यात उमटले. मध्यप्रदेशात सागर, भोपाळ, दमोह, होशंगाबाद, मंडवा, जबलपूर, सोनाखा इ. भागातील देशी सैन्य इंग्रजांविरूद्ध बंड करून उठले. त्या सैन्याने मध्यप्रदेशाचा हा विशाल प्रदेश आपल्या ताब्यात घेतला. या उठावात देशी सैन्याला त्या भागातील सामंतांनी व जमीनदारांनीच नव्हे, तर आमजनतेनेही त्या सैन्याला साथ दिली. इंग्रजांचे होश उडविले. रायपूर भागातील जनताही इंग्रजांच्या जुलमी प्रशासनाविरूद्ध उठाव करण्याच्या तयारीत होती. छत्तीसगढ सुद्धा धुमसत होते. ते पाहून नागपूरच्या कमिशनरने मेजर जनरल विटलॉक याला पत्राने कळविले की, "जर रायपूर भागात विद्रोह सुरू झाला, तर तो ओरिसा पर्यंत पसरेल. तसेच पश्चिमेकडे नागपूर, चंद्रपूर पर्यंत फैलावल्याशिवाय राहणार नाही. ..... एवढ्या मोठ्या प्रदेशातील सैनिकांचा व जनतेचा विद्रोह दडपून टाकण्यासाठी आपल्याला फार मोठ्या सैन्याची आवश्यकता भासेल व त्यात हजारो सैनिकांची आहुती द्यावी लागेल." या प्रदेशातील देशी सैनिक त्यांच्या वरिष्ठ इंग्रज अधिकाऱ्यांच्या हुकुमाची अवहेलना करायला लागले होते. कॅप्टन इलियट याने देशी सैन्यातील असंतोष दडपून टाकण्याचा प्रयत्न केला, पण त्यात त्याला म्हणावे असे यश मिळाले नाही.

त्या काळात छत्तीसगड भागात दुष्काळ पडला होता. आम जनता अन्नविना तडफडून मोठ्या संख्येने मरत होती. परंतु नफेबाज आणि शोषक व्यापारी वर्ग आपल्या धान्याची गोदामे बंद करून बसले होते. त्यांना भुकेने मरणाऱ्या जनतेची पर्वा नव्हती.

सोनाखानच्या जमीनदारांना रयतेची दया आली. नारायणसिंह हे सर्वात मोठे जमिनदार होते. त्यांनी लहान-मोठ्या जमीनदारांकडून धान्य गोळा करून गोरगरीबांना वाटण्यास सुरूवात केली. ते धान्य किती दिवस पुरणार ? गोळा केलेले धान्य संपल्यावर पुढे काय करायचे, असा प्रश्न त्यांना पडला. ते सहृदय व प्रजावत्सल होते. त्यांच्या जमीनदारीतील एका गावामधल्या माखनलाल नावाच्या बनियाचे फार मोठे धान्यगोदाम होते. तो ते धान्य देत नव्हता, म्हणून नारायणसिंहांनी त्याच्या गोदामाची कुलुपे तोडली व त्या गोदामातील धान्य भुके कंगाल जनतेत वाटून टाकले व जनतेला जगविले. नारायणसिंह प्रामाणिक, सच्चरित्र व इमानदार होते. त्यांनी गोदाम उघडून रयतेला वाटून टाकल्याचे स्वतःहून लगेच रायपूरचा कमिशनर याला कळवून टाकले.

माखनलालने त्या कमिशनरकडे नारायणसिंहाविरूद्ध तक्रार नोंदविली. त्या इंग्रज कमिशनरला भुकेने मरणाऱ्या जनतेची दया आली नाही. आपण भुकेने मरणाऱ्या जनतेसाठी काहीतरी उपाय योजना केली पाहिजे, ते आपले कर्तव्य आहे, असे त्याच्या मनात सुद्धा आले नाही. माखनलालच्या तक्रारीची दखल घेऊन त्याने रायपूरचा डेप्युटी कमिशनर याला नारायणसिंहाला कैद करण्याचा आदेश दिला. कैद करण्याचे वॉरंट घेऊन इलियटने घोडेस्वारांची तुकडी घेऊन सोनाखानला जाऊन २४ ऑक्टोबर १८५६ रोजी नारायणसिंहाना कैद केले व रायपूरला आणले.

नारायणसिंहांना कैद केल्याने आम जनता खवळून उठली. देशातले धान्य दुष्काळपीडित जनतेला देण्याऐवजी इंग्रज सरकार इतर देशात धान्य निर्यात करीत होते. त्याची जनतेला चीड आली. नफेबाज व साठेबाज व्यापाऱ्यांना पाठीशी घालून जनतेला दुष्काळात वाचविणाऱ्या नारायणसिंहाला इंग्रज सरकार अपराधी म्हणून कैद करते, हे जनतेला असह्य झाले. इंग्रज सरकारविरूद्ध जनतेच्या मनात तीव्र असंतोष भडकू लागला. नारायण सिंहांना कैदेतून कसे सोडवावे, याचा विचार गावोगावचे प्रमुख करू लागले.

रायपूरच्या इंग्रजांच्या छावणीतील देशी पलटणीतील सैनिकांना माहित झाले होते की, नारायणसिंहांना कोणत्या कारणावरून इंग्रज अधिकाऱ्यांनी पकडले आहे. त्यामुळे त्या पलटणीमधील सगळे सैनिक इंग्रज अधिकाऱ्यांवर खूप चिडले होते. सन १८५७ मध्ये मेरठ-दिल्ली मध्ये देशी पलटणींनी इंग्रज सरकारविरूद्ध बंड पुकारून दिल्ली ताब्यात घेतल्याच्या आणि बहादुरशाह जफर याला तख्तनशीने केल्याच्या बातम्या रायपूरला येऊन थडकल्या. तेव्हा रायपूरच्या सैनिकांनी नारायणसिंहांना तुरूंगातून सोडवून त्यांना आपला नेता बनविण्याचा निर्णय घेतला. नारायणसिंहांना कसे सोडवावे, याची योजना त्यांनी आखली. त्याप्रमाणे २७ ऑगस्ट १८५७ रोजी नारायणसिंह तुरूंग फोडून निसटले व सोनाखानला जाऊन पोचले. इंग्रज शिपायांनी त्यांचा पाठलाग केला. पण त्यांना हात हलवीत परत यावे लागले. सोनाखानला पोहचल्यावर नारायणसिंहांनी लगेच ५०० सशस्त्र सैनिकांची फौज तयार केली. सर्व सैनिकांना बंदुका दिल्या. सोनाखानकडे येणाऱ्या सर्व मार्गांवर मोर्चेबंदी केली त्यामुळे इंग्रज अधिकारी घाबरून गेले.

कमिशनरने गव्हर्नर जनरलला कळविले की, "मद्रासकडून येणाऱ्या फौजेची एक तुकडी नागपूर येथे ठेवावी. मोठ्या प्रमाणात इकडे विद्रोह झाला, तर त्या तुकडीच्या साहाय्याने तो दडपून टाकता येईल," रायपूरचा डेप्युटी कमिशनर इलियट याने लेप्टनंट स्मिथ याला आदेश दिला, "सोनाखान येथे जाऊन नारायणसिंहाला अटक करावी."

स्मिथ सैन्यासह सोनाखानकडे निघाला. काय या देशाचे दुर्दैव ! मटगाव, देवरी व बिलाईगड येथील जमीनदारांनी आपापले बंदुकधारी सैनिक स्मिथच्या मदतीला दिले. नारायणसिंहाने केलेले कार्य योग्य होते, याचा विचारही त्यांनी केला नाही. एका घोडेस्वाराने नारायणसिंहाचे एक पत्र स्मिथला दिले. त्यात नारायणसिंहाने लिहिले होते की, "तुम्ही करावयास पाहिजे होते, तेच कार्य मी केले आहे. त्यात मी दोषी कसा ?" घोडेस्वाराने असेही सांगितले की, सोनाखानला तुमचा प्रतिकार करण्यासाठी नारायणसिंहांचे सैन्य तयार आहे.

स्मिथने जेव्हा आपल्या सैनिकांना चढाई करण्याचा आदेश दिला, तेव्हा त्याच्या सैन्यातील तीस देशी शिपायांनी आपल्याच बांधवांवर हल्ला करण्यास साफ नकार दिला. स्मिथचे सैन्य जेव्हा सोनाखानजवळ आले, तेव्हा जवळच्या ओढ्यातून नारायणसिंहाच्या सैन्याने त्याच्यावर जबरदस्त हल्ला करून त्या सैन्याचा पराभव केला. पण दुसऱ्या बाजूने स्मिथच्या सैन्याच्या एका तुकडीने सोनाखान मध्ये प्रवेश करण्यात यश मिळविले. ते सैन्य आलेले पाहून गावातील लोक शेजारच्या डोंगरावर निघून गेले. त्यांनी डोंगरावरून स्मिथच्या सैन्यावर गोळीबार सुरू केला. पण त्याचा विशेष असा उपयोग झाला नाही. स्मिथच्या त्या सैन्याने सोनाखानमधली घरे लुटली व त्यांना आगी लावून दिल्या, त्यामुळे नारायणसिंहांच्या काही साथीदारांनी माघार घेतली. हताश होऊन नारायणसिंहांनी स्मिथपुढे शरणागती पत्करली. त्यांना अटक करून स्मिथने आपल्या सैन्यासह रायपूरला आणले आणि डेप्युटीकमिशनर इलियटच्या हवाली केले. तेथे नारायणसिंहावर राजद्रोह व विद्रोह केल्याचे आरोप करून खटला दाखल करण्यात आला. त्याचा झटपट निकाल देऊन नारायणसिंहांना देहान्ताची शिक्षा देण्यात आली.

छत्तीसगडच्या या स्वातंत्र्यप्रेमी, उदार, न्यायी देशभक्ताला इंग्रजांनी १० सप्टेंबर १८५७ रोजी फांसावर लटकावले. तुरूंगातील कैद्यांनी व आम जनतेने तो शोकदिन पाळला. इंग्रजांविरूद्ध सर्वसामान्य जनता दात-ओठ खाऊन हात चोळीत बसण्याशिवाय काय करू शकणार होती ? नारायणसिंहांची उदारता, देशभक्ती, शौर्य, आत्मसन्मान व त्यांचे बलिदान अजूनही छत्तीसगडच्या जनतेच्या मनात घर करून राहिली आहे. आजही ते लोक गातात –

वीर नारायण तुम्हारी वीरता बलिदान से !
आग के शोले निकलते अब भी सोनाखान से ॥



# ८६. राजा उमराव सिंह

छोटा नागपूर भागातील ओरमांझीचे राजा उमराव सिंह ओरमांझीच्या आसपासच्या बारा गावांचे जमीनदार होते. ओरमांझीपासून वायव्येकडे १६ मैलावर असलेल्या गंगापातर गावात त्यांचा जन्म झाला होता. रांची जिल्ह्यात त्यांचीही जमीनदारी होती. सन १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धात छोटा नागपूरमध्ये त्यांच्या जमीनदारीतील चुलूपालू घाटीत सर्वप्रथम झाला. हजारीबागकडे जाणाऱ्या डोरंडा छावणीतील देशी सैन्याने ३१ जुलै १८५७ रोजी जमादार माधवसिंह यांच्या नेतृत्त्वाखाली चुलूपालू घाटीत छोटानागपूर पठारावर स्वातंत्र्ययुद्धाचा बिगुल मेजर ग्राहमच्या विरूद्ध वाजविला होता. दोन तोफा डागून त्यांनी मेजर ग्राहमला त्या भागातून पळवून लावले होते. स्वातंत्र्यप्रिय राजा उमरावसिंह यांनी त्या सैन्याला सक्रिय पाठिंबा दिला होता. त्यांच्या बरोबर त्यांचा दिवाण व खजिनदार शेख भिखारी यानेही त्यांना उत्साहाने मदत केली होती. यांच्या मदतीमुळेच त्या विद्रोही सेनेने २ ऑगस्ट १८५७ रोजी रांची शहर ताब्यात घेऊन छोटा नागपूरचा कमिशनर डाल्टन व त्याच्या सहकारी इंग्रज अधिकाऱ्यांना रांचीतून पळून जाण्यास भाग पाडले होते. छोटा नागपूर इंग्रजांच्या ताब्यातून मुक्त झाले व त्यांनी बडका गडचा राजा विश्वनाथ शाहदेव याला छोटा नागपूरचा सुभेदार बनविले. विश्वनाथ शाहदेव संपूर्ण छोटा नागपूरचा राज्यकारभार पाहू लागले. इंग्रजांचे सैन्य पुन्हा छोटा नागपूरमध्ये येऊ नये म्हणून त्या सैनिकांनी चुलूपालू घाटी आणि चारू घाटीचा १० मैलांचा रस्ता खोदून टाकून रहदारीस अयोग्य बनविला. या कार्यात त्या भागातील जनतेने मोठ्या उत्साहाने त्या सैनिकांना मदत केली.

राजा उमराव सिंहाच्या सर्व पुरूषांनी या स्वातंत्र्ययुद्धात भाग घेतला. रामगड आणि बंदगाव घाटींचे घाटवाल, लाला लोकनाथसिंह, उमराव सिंहाचा लहान भाऊ घासी सिंह, शेख भिरवारी हे या युद्धात अग्रभागी होते. कमिशनर डाल्टन बगोदर येथे होता. त्याला जेव्हा कळले की, चुलूपालू घाटीचा व चारू घाटीचा हे दोन्ही रस्ते उमरावसिंहाच्या लोकांनी व विद्रोही सैनिकांनी खोदून नष्ट केले आहेत, तेव्हा तो संतापाने लालेलाल झाला. राजा विश्वनाथ शाहने रामगड घाटीत दोन तोफा गोलंदाजांसह लावून ठेवल्या. या घटनेने रामगडचा राजा शंभूनाथ सिंह भयभीत झाला व त्याने आपल्या राजमहालाचे सर्व दरवाजे बंद करून प्रत्येक दरवाजावर सशस्त्र शिपायांचा पहारा बसविला, आणि तो रात्रभर देवपूजा करीत बसला.

शंभूनाथ सिंह इंग्रजांना आपला रक्षणकर्ता समजत होता. त्याने सारी परिस्थिती जाणून घेण्यासाठी लतीफ खाँ या आपल्या अधिकाऱ्याला ओरमांझी येथे राजा उमराव

सिंहाकडे पाठविले. त्याच वेळी रांचीहून राजा उमराव सिंहाचा एक कर्मचारी तेथे आला आणि त्याने सांगितले की, ''डोरंडाच्या सैन्याने पुन्हा रांची शहर लुटले. राजा शंभूनाथ सिंह इंग्रज सैन्याला आपले रक्षण करण्यासाठी त्याच्या राज्यात आणण्याच्या प्रयत्नात आहे. म्हणून राजा विश्वनाथ शाहदेव शंभूनाथ सिंहाची राजधानी इचाकवर आक्रमण करण्याच्या विचारात आहे.'' हे सारे लतीफ खाँ याने ऐकले. रामगडला परत जाऊन लतीफ खाँ ने राजा शंभूनाथसिंह याला सारे काही सांगितले. ते ऐकल्यावर शंभूनाथ सिंह फार घाबरून गेला. बगोदर येथे जाऊन त्याने कमिशनर डाल्टनची भेट घेऊन सारी परिस्थिती त्याला सांगितली व त्याला इचाकला येण्यासाठी फार आग्रह केला. रामगडला येऊन त्याने तीन वेळा गव्हर्नर जनरल कॅनिंगला तारा करून साहाय्य मागितले. कॅनिंगने त्याला तारेने कळविले की, ''तुमच्या रक्षणासाठी युरोपियन सैन्य पाठविण्यात येत आहे.'' तेव्हा कोठे त्याच्या जिवात जीव आला.

कमिशनर डाल्टन याने राजा उमराव सिंहाला पत्राने कळविले की, ''बगोदरला येऊन मला भेटावे.'' परंतु राजा उमराव सिंहाने त्याच्या पत्राचे उत्तरही दिले नाही की त्याला जाऊन भेटलाही नाही. उमरावसिंह न आल्याने डाल्टन भयंकर संतापला व त्याने राजा उमरावसिंहाला पत्राने धमकी दिली. ''चुलूपालू घाटीचा रस्ता नष्ट करण्यास तूच जबाबदार आहेस. ओरमांझीचा तू राजा असल्याने त्या मार्गाची जबाबदारी तूच घ्यायला हवी होती. त्या मार्गाची नासधूस करण्याच्या गुन्ह्यामुळे तुला फांसी दिले जाईल." त्याने बंगालचा गव्हर्नर हेलीडे याला कळविले की, ''उमराव सिंहाला मी भेटीसाठी बोलाविले, तरी तो आला नाही. छोटा नागपूर पुन्हा ताब्यात घेतल्यावर उमराव सिंहाला फांशीच द्यावी लागेल.''

स्वतंत्र झालेल्या छोटा नागपूरचा राज्यकारभार विश्वनाथ शाहदेव चांगल्या रीतीने करीत होते. त्याच काळात त्यांना कुँवरसिंहाचे पत्र आले की, डोरंडा सैन्य घेऊन रोहतासगडला यावे. ११ सप्टेंबर १८५७ रोजी डोरंडाची सेना तिकडे निघून गेली. २ ऑक्टोबर १८५७ विश्वनाथ शाहदेव यांना तो विचार घातक वाटला आणि डोरंडा सेनेला तिकडे जाण्यास त्यांनी विरोध केला. म्हणून विश्वनाथ शाहदेवला गिरफ्तार करून सेनेने त्यांना आपल्या बरोबर घेतले.

२ ऑक्टोबर १८५७ रोजी चतरा गावाजवळ त्या सैन्याची इंग्रज सैन्याशी लढाई झाली व ते सैन्य पराभूत झाले. त्या युद्धात इंग्रज सैन्याने जयमंगल पांडे आणि नादिरअली या दोघांना पकडले आणि त्यांना फाशी दिले. लॉर्ड कॅनिंगने पाठविलेल्या युरोपिअन सैन्याने राजा जगन्नाथ शाहदेवच्या दहा हजार मजुरांच्या मदतीने रामगड

घाटीचा मार्ग ८ तासात तयार केला. रांची मध्ये सैन्यच नव्हते. म्हणून २३ सप्टेंबर रोजी इंग्रज सैन्याने रांची शहर सहज आपल्या ताब्यात घेतले. त्या सैन्याला जगन्नाथ शाहदेव याने व पिठोरियाचा राजा जगतपाल सिंह याने भरपूर मदत केली. मद्रासची सेनाही इंग्रजांनी या भागात आणली होती. डाल्टनने त्या सेनेचा मेजर मॅक्डोनल्ड याला राजा उमराव सिंह व शेख भिखारी यांना अटक करण्यासाठी पाठविले. त्याने त्या दोघांना कैद करुन रांचीला आणले. जज्ञ ओक्सने कसलीही चौकशी न करता, त्यांच्यावर खटला न भरता त्यांना फांशी देण्यासाठी मॅक्डोनल्डला आदेश दिला की, या दोघांना चुटूपालू घाटीत आम जनतेसमोर झाडांना लटकावून फांशी द्यावी. मॅक्डोनल्डने त्या दोघांना मोरहाबादी जवळील टागोर हिल्स जवळील एका मोठ्या झाडाच्या दोन फांद्यांवर फांशी दिले. त्यावेळी त्यांच्या कुटुंबियांच्या व आम जनतेच्या आक्रोशाने आकाश भरून गेले. त्या स्थानाला तेव्हापासून 'टुंगरी फांशी' असे सारे लोक म्हणू लागले. त्या स्वातंत्र्यवीरांनी धैर्याने बलिदान केले.



# ८७. शेख भिखारी

छोटा नागपूरमधील ओरमांझी खटंगाचे राजा उमरावसिंह यांचे दिवाण शेख भिखारी यांची बहादुरी शौर्य व कुशल प्रशासनाची क्षमता पाहून उमरावसिंहाने त्यांना दिवाणपदावर नेमले होते. तसेच आपल्या राज्याचे खजिनदार म्हणूनही त्यांना नियुक्त केले होते. शेख भिखारीचा जन्म छोटा नागपूरमधील ओरमांझी गावापासून ६ मैलावरील अनगडा ठाण्याच्या अंतर्गत असलेल्या खुदिया-लोटवा या गावी झाला होता. शेख भिखारीचे पूर्वज शेख बुलंदू यांचे शौर्य व धाडस पाहून औरागडच्या राणीने त्यांची नेमणूक रामगड-सिकदरी घाटीच्या रक्षणासाठी काही शिपाई त्यांच्या मदतीला देऊन केली होती. त्याबद्दल राणीने शेख बुलंदू यांना खुदिया-लोटवा गावाची जमीनदारी व आसपासची बारा गावे इनाम म्हणून दिली होती. ही जमीनदारी व इनामाची गावे पूर्व परंपरागत शेख भिखारीकडे आलेली होती. ते स्वातंत्र्य प्रिय आणि अत्यंत अभिमानी होते. तसेच नम्रही होते.

दिल्लीला १८५७ मध्ये स्वातंत्र्य युद्ध सुरू झाल्याच्या बातम्या छोटा नागपूर भागात आल्या तेव्हा ३१ जुलै १८५७ रोजी जमादार माधवसिंह आणि सुभेदार नादिर अली यांच्या नेतृत्त्वाखाली चुटूपलू घाटीत त्यांनी स्वातंत्र्य युद्धाचा बिगुल वाजविला. चुटूपालू घाटी राजा उमरावसिंह यांच्या राज्यातच होती. शेख भिखारीने विद्रोही नेता माधवसिंह आणि नादिर अलीला हर प्रकारे सहायता देण्याचे वचन दिले व हत्ती, घोडे, हमालही त्यांना पुरविले. चुटूपालू घाटीचा व चारू घाटीचा मार्ग त्यांनी इंग्रज सैन्य येऊ नये म्हणून खोदून काढून नष्ट करून टाकला. विद्रोही सैनिकांनी दोन तोफा घेऊन रांचीकडे कूच केले आणि २ ऑगस्ट १८५७ रोजी रांची शहर आपल्या ताब्यात घेतले. तेव्हा रांचीहून छोटा नागपूरचा कमिशनर जल्टन, कलेक्टर डेव्हीस, जज्ज ओक्स आणि पोलिस प्रमुख बर्च पिठौरिया मार्गाने पळून गेले.

डोरंडाच्या देशी सेनेचे प्रमुख गणपत राय व बडकागडचे राजा विश्वनाथ शाह यांच्यात दिल्लीला जाण्यासंबंधाने मतभेद निर्माण झाला. इंग्रजांना साह्य करणारी शीख सेना २ सप्टेंबरपासून हजारीबाग येथे पडाव टाकून थांबली होती. विद्रोही सैनिकांनी विश्वनाथ शाहदेव याला छोटा नागपूरचा सुभेदार बनविले होते. विश्वनाथ शाहदेवचे पत्र घेऊन शेख भिखारी गुप्तपणे शीख सेनेचा मेजर बिनशसिंह याला भेटला आणि त्याने बिशनसिंहाला छोटा नागपूरच्या स्वतंत्र सरकारला साह्य देण्यासाठी राजी केले. शेख भिखारीने त्याला आश्वासन दिले की, छोटा नापूरचे स्वतंत्र सरकार शीख सैनिकांना

उच्च पदे देऊन त्यांचा सन्मान करील. बिशनसिंहाने आपल्या शीख सैनिकांना सांगितले. 'पंजाबमध्ये पुन्हा खालसा राज्य स्थापन झाले आहे. आता इंग्रजांच्यावतीने लढणे मूर्खपणाचे आहे. सर्व भागांतून इंग्रजांचा पराभव होतो आहे. छोटा नागपूरच्या स्वतंत्र सरकारकडून आपणास चांगले वेतन मिळेल.' त्या काळात मेजर डाल्टन रांचीवर हल्ला करण्याची तयारी करीत होता. शीख सैन्य मात्र रांचीला जाऊ शकले नाही.

विद्रोही सैनिकांनी रांचीचा तुरूंग फोडून ३०० संथाल बंडखोरांना मुक्त केले होते. संथाल परगण्यातील संथाल नेते सिदो व कान्हू सन १८५५ पासून इंग्रज सरकार विरूद्ध लढत होते. सुरेंद्र शाहने ३० जुलै १८५७ रोजी हजारीबाग येथला तुरुंग फोडून तेथल्या विद्रोही संथालांनासुद्धा मुक्त केले होते. शेख भिखारीने संथाल वीरांना इंग्रज सरकारविरूद्ध लढण्यास उत्तेजन दिले व त्यांना आपल्याकडे वळवून घेतले.

संथाल नेते रिपू मांझी, फागू मांझी, रिवजा मांझी, डबर गंझू व अर्जुन मांझी यांनी १८५७ मध्ये आपल्या संथाल वीरांच्या सहाय्याने हजारीबाग आपल्या ताब्यात घेतले होते. त्यांनी गावागावांतून परंपरागत पंचायती व्यवस्था पुन्हा सुरू करून कर-वसुलीही सुरू केली होती. हजारीबागचा कलेक्टर सिंपसन त्यावेळी पळून जाऊन बढाई येथे रांहत होता. बंगालचा गव्हर्नर हेली डे याने त्याच्याकडे जादा कुमक पाठवून हजारीबागवर हल्ला करून विद्रोहींना पळवून लावण्यास सांगितले. त्याने हजारीबागवर हल्ला करून ते शहर ताब्यात घेतले. त्या हल्ल्यात कित्येक संथाल ठार झाले व २०० संथालांना रस्त्यावरील झाडांवर फाशी देण्यात आले. संथालांची अनेक गावे इंग्रज सैन्याने जाळून टाकली. इंग्रज सैन्याच्या दहशतीमुळे संथाल लोक छोटा नागपूर प्रदेशातून उत्तर बंगालमध्ये निघून गेले.

गणपत रायच्या नेतृत्वाखाली विद्रोही सैन्य दिल्लीकडे चालले होते. रांचीला सैन्य उरलेच नव्हते. त्याचा फायदा घेऊन इंग्रज सैन्याने २३ सप्टेंबरला १८५७ रोजी रांची शहर पुन्हा ताब्यात घेतले. बिहारमध्ये आता इंग्रजांचा प्रभाव वाढू लागला. विश्वनाथ शाहदेव व गणपत राय गनिमी काव्याने इंग्रजांशी लढतच होते. अशा परिस्थितीत इंग्रज अधिकाऱ्यांनी शेख भिखारी, राजा उमरावसिंह व त्याचा भाऊ घासीसिंह यांना ओरमांझी येथे गिरफ्तार केले व त्यांना कडेकोट बंदोबस्तात रांचीला आणले.

रांची येथील इंग्रज अधिकारी सूडाच्या भावनेने पेटले होते. त्यांनी अपराधी निरपराधी याचा विचार न करता सर्रासपणे जे हाती सापडतील त्या लोकांना फासावर चढविण्याचे सत्र सुरू केले होते. त्यांच्या नृशंसतेची ती कमाल होती. जज्ञ ओक्सने मद्रास पलटणीचा मेजर मॅक्डोनल्ड याला तोंडी आदेश दिला की, शेख भिखारी व राजा

उमरावसिंह यांना चुटूपालू घाटीत आम जनतेसमोर झाडांना टांगून फाशी देण्यात यावे. त्या आदेशानुसार मेजर मॅक्डोनल्ड त्या दोघांना चुटूपालू घाटीत घेऊन गेला. त्यांच्या मागोमाग त्यांचे कुटुंबीय आक्रोश करीत प्रचंड जनसमुदायासह त्या घाटीत आले. ८ जानेवारी १८५८ रोजी त्या दुःखित जनतेसमोर रांची-ओरमांझी मार्गावरील त्या घाटीतील मोरहाबाद टागोर टेकडीजवळील एका मोठ्या वृक्षाच्या दोन फांद्यावर शेख भिखारी व राजा उमराव सिंह यांना त्याने फाशी दिली. त्या फाशीच्या जागेला तेव्हापासून टुगरी-फासी हे नाव पडले. त्यानंतर त्या दोघा स्वातंत्र्यवीरांची सर्व संपत्ती जप्त करण्यात आली. आजही त्यांचे वंशज दारिद्र्यात जीवन कंठत आहेत.



# ८८. गणपत राय

छोटा नागपूरमधील पोठिया गावचे जमीनदार गणपत राय कुशल प्रशासक, साहसी वीर व बहाद्दूर स्वतंत्रता-सेनानी होते. त्यांचे पोठिया गाव रांची जिल्ह्यातील कोकडा परगण्यात आहे. ते जातीने कायस्थ होते. ते वर्णाने सावळे, सामान्य उंचीचे, मध्यम शरीरयष्टीचे पण काटक होते. बालपणापासूनच त्यांची बुद्धी कुशाग्र होती. तरूणपणीच त्यांचे व्यावहारिक चातुर्य व प्रशासन करण्याची योग्यता पाहून छोटा नागपूरचे राजा जगन्नाथ शाह यांनी गणपतरायची नेमणूक आपल्या दरबारात दिवाणपदी केली होती. गणपत राय चांगल्या रीतीने राज्यकारभार चालावा म्हणून झटत होते. परंतु राजा जगन्नाथ शाह विलासप्रिय, अकार्यक्षम आणि निष्क्रीय असल्याने गणपत राय यांची राज्याचा कारभार करण्यात कुचंबना होत असे, त्यामुळे राजा व गणपत राय यांच्यात मतभेद उत्पन्न झाला. शेवटी दिवाण पदाचा त्याग करून गणपत राय आपल्या गावी येऊन आपली जमीनदारी सांभाळू लागले तसेच धर्मग्रंथांचे पठण करीत कालक्रमणा करू लागले.

सन १८५७ च्या स्वातंत्र्य-युद्धाच्या बातम्या छोटा नागपूर भागात येऊ लागल्या. त्या ऐकून गणपत राय बैचेन झाले व आपणही या स्वातंत्र्य-युद्धात काहीतरी केलेच पाहिजे असा निर्णय त्यांनी घेतला. ३१ जुलै १८५७ रोजी डोरंडा छावणीतील देशी सैनिकांनी जमादार माधवसिंह व नादिरअली यांच्या नेतृत्वाखाली इंग्रज सरकारविरूद्ध बंड पुकारले. २ ऑगस्ट रोजी या सैनिकांनी रांची शहरावर तोफा डागून ते शहर ताब्यात घेतले. राचींचा कमिशनर डाल्टन, कलेक्टर डेव्हिस, न्यायाधीश ओक्स, पोलिस प्रमुख बर्च यांचेसह सगळे इंग्रज तेथून पळून गेले. तुरूंग फोडून ३०० संथाल कैद्यांना मुक्त केले. कमिशनर डाल्टन; कलेक्टर डेव्हिस, जज्ज ओक्स आदि इंग्रज अधिकाऱ्यांची घरे लुटून जाळून टाकली. माधवसिंह, नादिरअली व जयमंगल सिंह यांच्या नेतृत्वाखाली ते सैन्य बडकागडचे राजा विश्वनाथ शाहदेव यांना जाऊन मिळाले. विश्वनाथ शाहदेव १८५३ पासूनच इंग्रजाविरूद्ध लढण्यासाठी तयारी करीत होते. सर्वांनी विश्वनाथ शाहदेव यांना छोटा नागपूरच्या सुभेदार पदी नियुक्त केले. विश्वनाथ शाहदेव छोटा नागपूरचा राज्यकारभार पाहू लागले.

गणपतरायला जेव्हा ही बातमी समजली तेव्हा त्यांना अत्यानंद झाला. ऑगस्ट १८५७ च्या शेवटच्या आठवड्यात ते डोरंडा येथे येऊन या क्रांतिकारी नेत्यांना येऊन मिळाले. दिल्लीला बादशहा बहादुरशाह जफर यांना हिंदुस्थानचा सम्राट घोषित केल्याची

बातमी जेव्हा या क्रांतिकारी नेत्यांना समजली, तेव्हा आपणही बादशहाला मदत करावी, आपला सर्व देश स्वतंत्र करण्यासाठी दिल्लीला जावे, त्याचकाळात जगदीशपूरचे कुँवरसिंह यांनी त्यांना मदतीसाठी रोहतासगडला बोलावले. कुँवरसिंहा समवेत दिल्लीला जाण्याचा निर्णय त्यांनी घेतला. दिल्लीला जाऊन सम्राट बहादूरशाह जफर यांच्याकडून छोटा नागपूरच्या प्रशासनाची सनदही प्राप्त करता येईल, असा त्यांचा विचार होता. छोटा नागपूरच्या विलासी राजाला पदच्युत करून आपण चांगल्या रीतीने छोटा नागपूरचा राज्यकारभार करू असा आत्मविश्वास गणपत रायला होता. त्यांनी सर्व नेत्यांना दिल्लीला जाण्यासाठी प्रवृत्त केले. तसेच यासाठी दहा हजार सैनिक, हत्ती, घोडे, बैलगाड्या यांच्यासाठी रसद पुरविण्याचे वचन ही गणपतरायने त्या नेत्यांना दिले. सर्व नेत्यांनी गणपतरायला आपला सेनाप्रमुख केले. परंतु राजा विश्वनाथ शाहदेव यांना या सर्व नेत्यांचा दिल्लीला जाण्याचा विचार अव्यावहारिक व घातक वाटला म्हणून त्यांनी दिल्लीला जाण्यास विरोध केला त्यामुळे मतभेद निर्माण झाला. तो दूर करण्यासाठी जयमंगल पांडेने सर्व नेत्यांची बैठक घेतली पण मतभेद दूर न होता वाढला.

दिल्लीला जाण्याचे निश्चित झाले. गणपत रायला रसद मिळवून देण्याचे सांगण्यात आले पण त्याला रसद मिळविता आली नाही. तेव्हा जयमंगल पांडेने विश्वनाथ शाहदेव, गणपतराय आदि सहा नेत्यांना नजरकैदेत ठेवण्यासाठी व आपल्याबरोबर त्यांना नेण्यासाठी पकडून आणण्यास सैनिकांना सांगितले. सैनिकांनी त्यांना आणले तेव्हा सर्वांनी दिल्लीकडे कूच केले. २०० घोडेस्वार, ६०० सैनिक, चार तोफा व ४६ बैलगाड्यांतून रसद घेऊन ते निघाले. बरियात वस्तीत त्यांचा पडाव पडला असतांना विश्वनाथ शाहदेव व गणपत राय यांच्यासह चार नेत्यांना मुक्त करण्यात आले.

२ ऑक्टोबर १८५७ रोजी या सैन्याची गाठ इंग्रज सैन्याशी पडली. तुंबळ युद्ध झाले. इंग्रज सैन्याने त्यांना पराभूत केले. ऑक्टोबर १८५७ पासून मार्च १८५८ पर्यंत गणपत रायने विश्वनाथ शाहदेवसह सहा महिने इंग्रजांशी लढा दिला. २० सप्टेंबर १८५७ लाच इंग्रजांनी दिल्ली ताब्यात घेतली होती. २३ सप्टेंबर रोजी इंग्रजांनी रांचीवर ताबा मिळविला होता. छोटा नागपूरचा राजा जगन्नाथ शाह गणपत रायला अटक करण्यासाठी इंग्रज कॅप्टन नेशन व कॅप्टन ओक यांना मदत करू लागला. अखेर नवागड भागातील करसारच्या युद्धात विश्वनाथ शाहदेवसह गणपतरायला इंग्रजांनी कैद केले. मेजर ओक्सच्या न्यायालयात खटला दाखल करून विश्वनाथ शाहदेव आणि गणपत राय यांना फाशीच्या शिक्षा सुनावण्यात आल्या. २१ ऑक्टोबर १८५८ रोजी रांची जिल्हा स्कूलच्या गेट जवळील कदंब वृक्षावर गणपतरायला फाशी देण्यात आली. स्वातंत्र्यासाठी

तळमळीने अथक प्रयत्न करणारा हा स्वातंत्र्यवीर हे जग सोडून गेला. छोटा नागपूरची जनता असहाय झाली. आता तळमळत जगण्याशिवाय त्या जनतेला कोणताही पर्याय उरला नाही. तेव्हापासून स्वातंत्र्यप्राप्तीपर्यंत छोटा नागपूरची जनता इंग्रज अधिकाऱ्यांच्या अत्याचारांखाली भरडतच राहिली. या नेत्यांना फाशी देण्यात आल्याने छोटा नागपूरच्या जनतेने पुन्हा उठाव करू नये म्हणून डाल्टनने जेल-बाजारासमोर दोन तोफा इंग्रज गोलंदाजासह कायमच्या ठेवून दिल्या होत्या. अशा रीतीने छोटा नागपूरचा स्वातंत्र्यलढा इंग्रजांनी दडपून टाकला.



# ८९. विश्वनाथ शाहदेव

१८५७ च्या स्वातंत्र्य युद्धात छोटा नागपूरची जनता, त्या भागातील सामंत आणि त्यांचे सैनिक यांचा महत्त्वपूर्ण भाग होता. डोंगरदऱ्या, पठारे, नद्या व जंगलांनी व्यापलेल्या या प्रदेशात त्यांनी इंग्रज सरकारचा पायाच हादरवून सोडला होता. रांची, लोहरदगा आणि हजारीबाग यामधील प्रदेश यांची समरभूमी होती. सध्याच्या रांची जिल्ह्यातील बडकागडचा राजा विश्वनाथ शाहदेव याने त्या भागातील युद्धाचे नेतृत्त्व केले होते.

सन १८३४ मध्येच विश्वनाथ शाहदेवाच्या परिवाराचा इंग्रज अधिकाऱ्यांशी संघर्ष सुरू झाला होता. रांची जिल्ह्यातील अधिकांश जमीन या परिवाराच्या मालकीची होती. इंग्रजांची प्रसारवादी नीती आणि कारभारातील त्यांचा हस्तक्षेप यामुळे विश्वनाथ शाहदेव इंग्रजांचे विरोधक बनले व त्यांनी १८५३ मध्येच इंग्रज सरकार विरूद्ध बंड उभारले होते.

१८५७ चे स्वातंत्र्ययुद्ध सुरू झाल्याच्या बातम्या छोटा नागपूर भागात येऊ लागल्या. डोरंडा येथील इंग्रजांच्या छावणीतील देशी पलटणीचा जमादार माधवसिंह याने अपल्या सैन्यासह हजारीबागला जातांना मेजर ग्राहमविरूद्ध छोटा नागपूरच्या पठारावर युद्धसुरू केले. २ ऑगस्ट १८५७ रोजी विश्वनाथ शाहदेवच्या नेतृत्त्वाखाली चुलुपाटी घाटीचा राजा उमरासिंह व शेख भिखारी यांच्यासह रांचीवर तोफा डागून ते शहर ताब्यात घेतले. छोटा नागपूरच्या प्रदेशातून इंग्रजांना हाकून लावून छोटा नागपूरचा प्रदेश स्वतंत्र केला. त्या सर्वांनी विश्वनाथ शाहदेवला छोटा नागपूरचा सुभेदार बनविले. त्या प्रदेशाचा कमिशनर डाल्टन, रांचीचा कलेक्टर डेव्हीस, न्यायाधीश ओक्स व पोलिस प्रमुख बर्च आपला जीव वाचविण्यासाटी बगोदर येथे पळून गेले. पिठौरियाचा राजा जगतपालसिंह कमिशनर डाल्टन याला मदत करीत होता. विश्वनाथ शाहदेव व त्याच्या साथीदारांच्या हालचाली डॉल्टनला कळवीत होता. विश्वनाथ शाहदेव व त्याच्या साथीदारांनी पिठौरियावर हल्ला करून जगतपाल सिंहाचा राजवाडा लुटून जमीनदोस्त केला. चुलुपाटी घाटीचा रस्ता उध्वस्त करून पिठौरिया घाटीत तोफा ठेवून जगतपाल सिंहाला इंग्रजांशी संबंध ठेवण्याचा मार्ग बंद केला.

राजा विश्वनाथ शाहदेव डोरंडाच्या देशी बंडखोर सैन्याच्या साह्याने छोटा नागपूरचा कारभार पाहू लागला. जगदीशपूरहून बाबू कुँवरसिंहाने एक पत्र पाठवून डोरंडाच्या सैन्याला जगदीशपूरला येण्याचे आमंत्रण दिले. माधवसिंह, जयमंगल पांडे व नादीर अली यांना वाटत होते की, आपण सैन्यासह कुँवरसिंहाच्या मदतील जावे.

पोठियाचा विद्रोही नेता गणपत राय याला सुद्धा कुँवरसिंहाला सैन्यासह मदत करावी आणि रोहतासगड मार्गे दिल्लीला बहादुर शाहच्या मदतीला जावे असे वाटत होते. परंतु विश्वनाथ शाहदेवचे मत असे होते की, डोरंडचे सैन्य आपल्या भागातून तिकडे नेणे घातक ठरेल. छोटा नागपूरचे रक्षण आपण सर्वांनी एकजुटीने करावे, इंग्रजांना आपल्या प्रदेशात पुन्हा परत येऊ देऊ नये आणि आपल्या विरूद्ध असणाऱ्या ईसाई व शंभूनाथ सिंह यांचे दमन करावे, यासाठी हे सैन्य येथे राहणे आवश्यक आहे, असे विश्वनाथ शाहदेवने त्यांना सांगितले. पण त्यांनी ऐकले नाही. त्यांनी गणपत रायला डोरंडा सेनेचा प्रमुख म्हणून नियुक्त केले. विश्वनाथ शाहदेवचा विचार योग्य होता. पण त्या नेत्यांना न पटल्याने त्यांच्यात फूट पडली. जयमंगल पांडे याने मध्यस्थी करून सर्वांनी एकत्र बसून विचार करावा असा प्रस्ताव त्यांच्यापुढे ठेवला. त्याप्रमाणे सर्वांची बैठक झाली. तीत विश्वनाथ शाहदेवाने त्यांना सांगितले, 'मी दिल्लीला जाण्याच्या विरोधात नाही. पण ही वेळ त्यासाठी योग्य नाही. पावसाळा संपू द्या. विजया दशमीनंतर आपण दिल्लीकडे कुँवरसिंहासह प्रस्थान करू.' परंतु मतभेद मिटले नाहीत. तेव्हा जयमंगल पांडे याने सैनिकांना आदेश दिला की, 'विश्वनाथ शाहदेव, गोपाल शाह, खुदा शाह, जगन्नाथ शाह, गणपत राय आदी सहा राजांना गिरफ्तार करा.'

सर्व राजांना गिरफ्तार करून डोरंडाचे सैन्य ११ सप्टेंबर १८५७ रोजी दिल्लीकडे निघाले. त्यात २०० घोडेस्वार, ६०० सैनिक, ४ तोफा आणि रसदीच्या ४६ गाड्या होत्या. हे सैन्य बरियातू वस्तीत पडाव टाकून राहिले असतांना जयमंगल पांडे याने विश्वनाथ शाहदेवसह ४ राजांना मुक्त केले. नंतर पुढे जाताना गणपत राय यालाही सोडून दिले. या सैन्याला इंग्रज सैन्याला इंग्रज सैन्याने चतरा येथे गाठले. तेथे अटीतटीचे युद्ध होऊन विद्रोही सैन्याचा त्यात पराभव झाला. विश्वनाथ शाहदेव आणि गणपत राय मागे फिरले. त्यांनी ऑक्टोबर १८५७ ते मार्च १८५८ पर्यंत छोटा नागपूर भागात स्वातंत्र्याची लढाई चालूच ठेवली. या दोन्ही नेत्यांनी पलामूचा खडवार नेते पीतांबर शाह व नीलांबर शाह, संबळपूरचा सुरेंद्र शाह, सिंहभूमचा राजा अर्जुन सिंह आदी अनेक नेत्यांना आपल्या लढाईत सामील करून घेतले. पालकोट, पलामू, गुमला व नवागड राज्यात या स्वातंत्र्यप्रेमी नेत्यांनी गनिमी काव्याने इंग्रजांना बेजार करून सोडले.

इंग्रजांनी बोलावलेली मद्रास येथील मोठी सेना या प्रदेशात आल्यावर त्यांनी २३ सप्टेंबर १८५७ रोजी रांची शहर ताब्यात घेतले. पिठौरियाचा राजा जगतपाल सिंह याची मदत घेऊन इंग्रजांनी नवागडाकडे आपला मोर्चा वळविला. करसारजवळ विश्वनाथ शाहदेवाने त्यांच्याशी जबरदस्त टक्कर दिली. परंतु दुर्दैवाने विश्वनाथ शाहदेव

इंग्रजांच्या हाती लागला. गणपत रायसुद्धा पकडला गेला. त्यांना १८ दिवस रांचीच्या तुरुंगात ठेवले. ओक्सच्या न्यायालयात विश्वानथ शाहदेववर राजद्रोहाचा खटला दाखल करण्यात आला. पिठौरियाचा राजा जगतपाल सिंह याने विश्वानथ शाहदेव याच्याविरूद्ध साक्षीदार न्यायालयात हजर केले. न्यायाचे नाटक संपले आणि विश्वनाथ शाहदेव याला फाशीची शिक्षा सुनावण्यात आली. विश्वानथ शाहदेव याने क्रुद्ध नजरेने जगतपाल सिंहाकडे पाहत भविष्यवाणी केली, 'तुझ्या वंशाचे नावनिशाण सुद्धा राहणार नाही.' आणि खरोखरच पुढच्या काळात जगतपाल सिंहाचे घराणे निर्वंश झाले.

ओक्स याने विश्वनाथ शाहदेवाच्या राज्यातील सर्व ११३ गावे, त्याची स्वतःची शेकडो एकर जमीन, त्याच्या खजिन्याली रोख रक्कम, जडजवाहिर वगैरे सारे काही जप्त केले. त्याच्या बडकागड किल्ल्यावर मद्रासी सैन्याकडून तोफा डागून तो किल्ला जमीनदोस्त करून टाकला. १६ एप्रिल १८५८ रोजी विश्वनाथ शाहदेव या स्वातंत्र्य योद्धयाला सध्याच्या रांची येथील जिल्हा स्कूल गेटवर फाशी देण्यात आले.



# ९०. राजा शंकर शाह

गोंडवनच्या गढमंडला साम्राज्यात राणी दुर्गावतीच्या कारकिर्दीत २३ हजार गावे होती. गोंड राजांनी गोंडवनात सन ३२८ पासून सन १८१८ पर्यंत सलग १,४९० वर्षे राज्य केले होते. मध्यंतरी १७८१ मध्ये पेशव्यांनी या राज्यातून चौथाई वसूल करण्यास सुरूवात केली होती. इतकेच सन १८१८ मध्ये गढमंडलाचे राज्य इंग्रजांनी ताब्यात घेतले व तेथल्या राजाला लहानसा जहागीरदार बनवून त्याला पेन्शन देणे सुरू केले. सन १८५७ च्या क्रांतियुद्धाच्या काळात तेथला राजा शंकरशाह फक्त ३ गावांचा जहागीरदार होता. तो आपला मुलगा रघुनाथशाह याच्यासह जबलपूर जवळील पुरवा या गावात राहात होता. आता ते गाव जबलपूरचे उपनगर आहे.

पहिले क्रांती युद्ध १० मे १८५७ रोजी सुरू झाले. ऑगस्ट १८५७ मध्ये त्या युद्धाचे पडसाद जबलपूरच्या इंग्रज छावणीत उमटू लागले. त्या छावणीतील ५२ व्या देशी पलटणीने विद्रोह सुरू केला. त्याचे नेतृत्व विद्रोही सैनिकांनी वृद्ध राजा शंकरशाह याच्याकडे सोपविले. पलटणीचे सुभेदार व शंकरशाह यांनी ठरविले की, आपल्या प्रदेशातील जमीनदार व ठाकूर यांनाही आपल्या कारवाईत सामिल करून घेऊन जबलपूरच्या छावणीवर आक्रमण करायचे. याची कुणकुण जबलपूरच्या डेप्युटी कमिशनरला लागली व सत्य काय ते जाणून घेण्यासाठी त्याने आपल्या एका विश्वासू व चलाख चपराशाला फकिराच्या वेशात शंकरशाह याच्या घरी पाठविले. त्याने त्यांच्याशी अघळपघळ गप्पा मारीत त्यांच्याकडून त्यांच्या विद्रोहाची सर्व माहिती काढून घेतली व छावणीत जाऊन डेप्युटी कमिशनरला ती माहिती सांगितली. डेप्युटी कमिशनरने लेफ्टनंट क्लार्क याला निवडक २० शस्त्रधारी सैनिक व मोठे पोलिसदल घेऊन पुरवाला पाठविले व तो सुद्धा काही सशस्त्र सैनिकांसह पुरवाकडे निघाला. पुरवा जेव्हा एक मैलावर होते, तेव्हा तो डेप्युटी कमिशनर आपल्या सैनिकांसह वेगाने घोडदौड करीत पुरवाला पोचला. त्याने पुरवा गावाला आपल्या सैनिकांनी वेढले. लेफ्टनंट क्लार्क आपल्या फौजफाट्यासह पुरवा येथे येऊन दाखल झाला. तेव्हा डेप्युटी कमिशनर आपल्या सैनिकांसह शंकरशाहच्या महालात शिरला आणि त्याने शंकरशाह व त्याचा पुत्र रघुनाथ शाह यांच्यासह तेरा जणांना तेथे अटक केली. त्या सर्वांना जबलपूरच्या तुरूंगात पाठवून दिले.

डेप्युटी कमिशनरने नंतर शंकरशाहच्या महालाची झडती घेतली. तेव्हा त्याच्या हाती काही कागदपत्र आले. त्यात कागदाच्या एका तुकड्यावर शंकरशाहने आपली

आराध्य देवी हिला प्रार्थना लिहिलेली होती, ती अशी "हे माते, तू आमच्या देशातून इंग्रजांचे राज्य नष्ट करून टाकण्यासाठी आम्हांला शक्ती देऊन मदत कर." त्या बरोबरच एका कागदावर रघुनाथ शाहने लिहिलेली एक कविताही त्याला सापडली. तिचा आशय असा -

"हे माते तू दुष्ट शत्रुंचा संहार करणारी आहेस. तू आमच्या देशातल्या इंग्रजांना त्रासवून सोड आणि त्या सर्वांना ठार कर, एकही इंग्रज या देशात शिल्लक राहू देऊ नकोस. हे प्रलयंकारिणी, तू या दुष्टांपासून आम्हां तुझ्या दासांना वाचव. हे प्राणपालिके, कालिका माते, या तुझ्या दासाची आर्त हाक ऐकून घेत या म्लेंच्छांना तू आपल्या कराल दाढांनी खाऊन टाक."

दोन्ही बापलेकांच्या या प्रार्थनांचा अर्थ जाणून घेऊन तो इंग्रज डेप्युटी कमिशनर संतापाने लाल झाला. तिकडे विद्रोही लोकांच्या एका तुकडीने जबलपूरच्या किल्ल्यावर हल्ला करून शंकरशाह, रघुनाथशाह यांच्यासह तुरूंगात टाकलेल्या आपल्या नेत्यांची सुटका करण्याचा प्रयत्न केला. त्यांनी तुरूंगाजवळच्या एका सरकारी इमारतीला आग लावून दिली. पण त्या विद्रोही लोकांनाही पकडण्यात आले व त्यांना तुरूंगवासाच्या शिक्षा ठोठावण्यात आल्या. शंकर शाह व रघुनाथ शाह यांच्यावर राजद्रोहाचा दावा दाखल करून त्यांना तोफांच्या तोंडी देण्याची शिक्षा सुनावण्यात आली.

शंकरशाह व रघुनाथ शाह यांचा गुन्हा काय होता ? त्यांनी तर उठाव केलाच नव्हता. बंडखोर सैनिकांच्या आग्रहावरून नुकतेच त्यांचे नेतृत्व स्विकारले होते. त्यांनी आपल्या आराध्यदेवतेची करूणा भाकली होती व इंग्रजांचा या देशातून नायनाट कर अशी तिला प्रार्थना केली होती. एवढेच काय ते ! हे त्यांचे गुन्हे जरी मानले, तरी ते गुन्हे त्यांना मृत्युदंड देण्याच्या पात्रतेचे होते का ? जगातला कोणताही विचारी मनुष्य वा कायदे तज्ज्ञ, न्यायाधीश हे केव्हाही मान्य करणार नाही. पण इंग्रजांचा या देशात 'हम करे सो कायदा' हाच महत्त्वाचा न्याय होता. या देशातील जनतेला असंस्कृत मानणाऱ्या सुसंस्कृत (!) इंग्रज अधिकाऱ्यांचा तो सुसंस्कृत न्याय होता. हीच त्यांची महान (!) संस्कृती होती. म्हणूनच ते या देशातील लोकांना 'काला निगर' या तुच्छतादर्शक शब्दांनी संबोधित होते.

शंकर शाह व रघुनाथ शाह यांना १८ सप्टेंबर १८५७ रोजी तोफांच्या तोंडी देण्याचे निकालात म्हटले होते. त्या दिवशी जबलपुरात दवंडी देऊन सर्व लोकांना तुरूंगासमोरच्या भल्या मोठ्या पटांगणात हजर होण्यास सांगण्यात आले होते. शंकर शाह तर म्हातारे होते. त्यांचा पुत्र रघुनाथशाह ४० वर्षाचा होता. त्यांना जेव्हा हातपाय

बांधून तोफेच्या तोंडी बांधले जात होते, तेव्हा त्यांच्या मुखावर शांती व गंभीरता दिसत होती . ते अगदी अनासक्त व निःस्पृह दिसत होते. मात्र त्यांच्या मुखावर प्रार्थनेचे हेच भाव दिसत होते की, 'हे कालिकामाते, तू आमच्या मुलांचे रक्षण कर व सर्व इंग्रजांना भस्म करून टाक.''

तोफांना बत्ती दिली गेली. प्रचंड आवाज झाला व त्या दोघा बापलेकांची मुंडकी उडत जाऊन सुमारे १५० फुटांवर पडली. त्या मुंडक्यांच्या मुखांवर अजूनही तेच भाव विलसत होते. इंग्रजांनी गरीब जहागीरदार करून सोडलेल्या एका महान राज्याच्या मालकांची ती मुंडकी जबलपूरच्या तुरूंगासमोरील मैदानात धुळीने माखून पडली होती. आपल्या देशाच्या स्वातंत्र्यासाठी अहोरात्र तळमळणारे ते जीव आपल्या स्वातंत्र्याच्या आकांक्षा आपल्या मनातच ठेवून या जगातून असहायपणे निघून गेले.



# ९१. तंट्या भिल्ल

इंग्रज सरकारला व त्या सरकारचे दलाल असणाऱ्या जमीनदार, सावकार, वतनदार, पाटील इत्यादिकांना सलग अकरा वर्षे दाद न देणारा तंट्या भिल्ल हा एकोणवीसाव्या शतकातला गरीबांचा वाली होता. आदिवासी जनतेत त्याने राष्ट्रीयत्वाची भावना जागविली होती. त्याच्या शोधावर असलेल्या एका इंग्रज अधिकाऱ्याने असे लिहून ठेवले आहे. "नर्मदा व तापी या दोन नद्यांमधील सुमारे दोनशे मैलांच्या प्रदेशात त्या काळात जणू त्याचेच राज्य होते. अत्याचारी जमीनदार, सावकार, पाटील, वतनदार त्याला चळचळा कापायचे. त्यांना लुटून तो गोरगरीबांना, अडलेल्या भागलेल्यांना मदत करायचा. स्वतःसाठी तो काहीच ठेवायचा नाही. आपल्या साथीदारांनाही मुक्त हस्ते मदत करायचा त्यामुळे जनतेचा त्याला जबरदस्त पाठिंबा होता. तो खरा जननायक होता. आदिवासींच्या स्वातंत्र्य लढ्यातील तो एक सोनेरी पान होता. म्हणूनच मध्य प्रदेशातील पाताळपाणी स्टेशन जवळ असलेल्या त्याच्या स्मारकाजवळ या काळातही दरसाल हजारो आदिसासींचा प्रचंड मेळावा भरत असतो. असे भाग्य क्वचितच एखाद्या क्रांतीकारकाला लाभत असते." एका हिंदी कवीने म्हटले आहे.

शहींदोंकी चिताओंपर जुडेंगे हर बरस मेले ।
वतनपर मिटनेवालोंका यहीं बाकी निशाँ होगा ।

तंट्या भिल्लाच्या संबंधात किती सार्थ आहेत या ओळी.

मध्य प्रदेशातील सातपुड्यातल्या नेमाड जिल्ह्यातील बिरडा या लहानशा खेड्यात तंट्या उर्फ तात्याचा जन्म १८४२ साली झाला. त्याच्या वडिलांचे नाव भावसिंग व आईचे नाव जिवणी बालपणापासूनच तो चपळ आणि निडर होता. वयात आल्यावर त्याची उंची साडेपाच फूट, रंग गोरा, भुरकट केस, घारे डोळे, लांबट चेहरा, जाड ओठ, डोळे बारीक व नजर भेदक होती. तो सडपातळ पण बलवान आणि दृढनिश्चयी होता. तसाच त्याचा स्वभाव साधा सरळ व कनवाळू होता. मनाने तो उदार होता.

भावसिंगाच्या बापाची थोडीशी जमीन जवळच्या पोखर गावी होती. त्याने पोखरच्या शिवा पाटलाकडून थोडेसे कर्ज घेतल्याने ती जमीन त्याच्याकडे गहाण होती. शिवा पाटलाने ती जमीन हडप केल्याने बिरडा या गावी येऊन तो व त्याची बायको तेथल्या पाटलाची जमीन खंडाने कसत होते. खंडाचे धान्य पाटलाला दिल्यानंतर फक्त काही महिने पुरेल, एवढेच धान्य भावसिंगाकडे उरायचे. मग जंगलातील कंदमुळे, फळे यांच्यावर त्यांची भिस्त असायची. बिरडा येथे तात्या वाढला. बांबूच्या कपचीच्या धनुष्य

बाणाने शिकार करण्यात तरबेज झाला. दुष्काळामुळे त्यांचे खाण्यापिण्यावाचून हाल होऊ लागले. त्यातच तात्याची आई वारली. भावसिंग खचला. तात्याने ती खंडाची जमीन कसायला सुरूवात केली. पुढे भावसिंगही वारला. मरतांना त्याने आपली जमीन पोखरला आहे व ती शिवा पाटलाकडे गहाण आहे असे सांगितले होते. लहानपणीच तात्याचे लग्न भिकी या मुलीशी झालेले होते. आता तो व भिकी हे दोनच जीव त्या कुटुंबात उरले. भिकी ही पोखरचीच होती. शिवा पाटलाची मुलगी यशोदा तिची मैत्रीण होती. बालपणात त्या दोघी एकत्र खेळत असत. दुर्दैवाने यशोदा बाल विधवा झाली व पोखरला बापाकडेच राहू लागली.

पोखरची आपली जमीन आपण कसावी, म्हणून तात्या पोखरला रहायला आला. शिवा पाटलाकडे त्याने आपली जमीन कसायची इच्छा व्यक्त केली. पण तात्याच्या लक्षात आले की, पाटलाने आपली जमीन त्याच्या नावे करून घेतली आहे. काय करावे हे त्याला समजेना. पोखरला नहाल हा त्याच्या मित्र होता. तो थोडाफार शिकलेला होता. त्याने तात्याला सल्ला दिला की, खांडव्याला जाऊन तुझ्या जमिनीबद्दल शिवा पाटला विरूद्ध कोर्टात तक्रार नोंदवू. त्याप्रमाणे तात्याने कोर्टात तक्रार नोंदविली. खटला सुरु झाला. निकाल तात्या विरूद्ध लागला. कारण शिवा पाटील व त्याच्या नाते संबंधातला भुईफळाचा जमीनदार हिंमत पाटील यांचे सर्व अधिकाऱ्यांशी चांगले संबंध होते. हिंमत पाटलामुळेच निकाल तात्या विरूद्ध लागला, हे नहाल व तात्याच्या लक्षात आले होते.

यशोदेला समजून चुकले की, आपला बाप गरीब बिचाऱ्या तात्याला फसवितो आहे. तिने तसे तात्याला सांगितले. ते दोघे बोलत असता गावातील काही तरूणांनी पाहिले व त्यांनी गावात कंडी उठविली की, 'तात्याचे व यशोदेचे संबंध आहेत' गाव पंचायतीची बैठक झाली. शिवा पाटलाला जाती बाहेर टाकण्यात आले. त्याला १०० रूपये दंड केला. पाटलाने तो दंड भरला. गावच्या त्या तरूणांनी तात्याला चोप द्यायचे ठरविले. ते यशोदेने तात्याला सांगितले. तो खवळला व त्या तरूणांच्या घरांसमोर जाऊन सज्जड दम भरला. 'तुमची सर्वांची घरे पेटवून देईन' अशी धमकी दिली. ते तरूण नरमले.

एके दिवशी दंडुका घेऊन तात्या आपल्या शेतावर गेला. शेतात पाटलाचा गडी काम करीत होता. तात्याने त्याला चांगला चोप दिला व त्याला आपल्या शेतातून हाकून दिले. शिवा पाटलाने हिंमत पाटलाच्या सल्ल्याने तात्यावर दावा लावला. पण तो फसला. मग त्यांनी तात्यावर वाईट वर्तणूक व चोरीचे आरोप ठेवून तात्यावर दुसरा दावा लावला. पोलिस अधिकारी हिंमत पाटलाचे मित्रच होते. खोटे साक्षीदार कोर्टात उभे केले. तात्यावर गुन्हा सिद्ध झाला. त्याला एक वर्षाची सश्रम कारावासाची शिक्षा झाली.

शिक्षा भोगून तात्या परत आला. त्याला आता पोखरला राहणे कटकटीचे वाटू लागले. ते गांव इंग्रज सरकारच्या हद्दीत होते. तात्याने आपले बिऱ्हाड होळकर सरकारच्या हद्दीतील हिरापूर गांवात हलविले. तेथे तो व त्याची बायको मोलमजुरी करू लागले. तेथे त्याला एक चांगला मित्र मिळाला. शेजारच्या खजुरी गावचा बिजनिया होता तो. काळा, धिप्पाड व बेडर होता तो.

हिरापूर जवळच्या बारी गावात चोरी झाली. पोलिसांनां तात्या व बिजनियाचा संशय आला व त्यांना पोलिसांनी पकडले. बिजनिया चिडला व त्याने पोलिसांना मारले. खांडव्याला त्यांच्यावर कोर्टात केस दाखल केली. चोरीचा आरोप सिद्ध झाला नाही. पोलिसांना मारल्याबद्दल दोघांना तीन तीन महिन्यांच्या कारावासाच्या शिक्षा झाल्या.

शिक्षा भोगून आल्यावर तात्या होळकर हद्दीतील सिओर गावी राहण्यास आला. त्याला चारचौघांसारखे जीवन जगायचे होते व शिवा पाटील आणि हिंमत पाटील यांच्यापासून दूर रहायचे होते. पोखरीजवळच्या एका गावी चोरी झाली. पोलिसांनी जेलीम नावाच्या भिल्लाला ती चोरी केल्याबद्दल पकडले. हिंमत पाटील जेलीमला भेटला व चोरीच्या वस्तू तात्याने मला दिल्या असे तू कोर्टात सांग, असे त्याला सांगितले. जेलीमने कोर्टात तसे सांगितले तात्या पकडला गेला. त्याच सुमारास बिजनिया व दौल्या हे त्याचे दोन्ही मित्र दुसऱ्या गुन्ह्याबद्दल पकडले गेले. हिंमत पाटील हा पाताळयंत्री माणूस होता. त्याने खोटे साक्षीपुरावे उभे केले. त्या तिघांना खांडवा जेलमध्ये ठेवण्यात आले. ते रात्री तुरूंग फोडून पसार झाले.

तात्या व त्याच्या साथीदारांनी भुईफळ येथे हिंमत पाटलाच्या घरावर धाड घातली. हिंमत पाटलाला व त्याचा मुलगा गोविंद याला त्यांनी भरपूर चोप दिला. हिंमत पाटील पळून जाऊ लागला, तेव्हा बिजनियाने त्याच्यावर गोळी झाडली, त्यातच तो दुसऱ्या दिवशी मेला. तात्याचा आता तंट्या झाला होता. तो व त्याचे सहकारी फरार झाले होते. तंट्याने आता उग्र रूप धारण केले. गावोगावच्या सावकारांना, जमीनदारांना लुटू लागला. लुटलेला पैसा आपल्या साथीदारांना आणि अडलेल्या नडलेल्या गोरगरीबांना, शेतकऱ्यांना वाटून देऊ लागला. एका वर्षात तंट्याचे नांव गावागावात दुमदुमू लागले. रयतेला गांजणाऱ्या, रयतेच्या कष्टावर श्रीमंत झालेल्या, रयतेची पिळवणूक करणाऱ्या जमीनदार सावकारांच्या घरांवर तो दरोडे घालू लागला. दरोडे इंग्रज सरकारच्या हद्दीत घालायचे व होळकर सरकारच्या हद्दीत पसार व्हायचे हे त्याचे आता नेहमीचे तंत्र झाले. त्याचे सर्वसाथीदार त्याच्याशी एकनिष्ठ होते. मात्र दरोडे घालतांना बायकोपोरांना कोणीही हात लावायचा नाही, अशी त्याची आपल्या सर्व साथीदारांना सक्त ताकीद होती. साथीदारांचे तंट्यावर जिवापाड प्रेम होते.

तंट्या जनतेला सतत लुटणाऱ्या जमीनदार, सावकारांना त्यांच्या घरांवर धाड घालून धडा शिकवितो आणि लुटीची रक्कम गरजू गरीब लोकांना देऊन टाकतो, हे साऱ्या नर्मदा खोऱ्यातील लोकांना माहित झाले. जनतेला त्याच्या बद्दल आदर वाटू लागला. मात्र इंग्रज सरकारच्या पोलिस अधिकाऱ्यांची तो डोकेदुखी होऊन बसला. जमीनदाराने, सावकाराने छळ केला की, ती त्रस्त माणसे तंट्याकडे यायची. आपले गाऱ्हाणे त्याला सांगायची तंट्या आपल्या टोळीसह त्या जमीनदार-सावकारांना लुटून दम भरायचा.

तंट्याचा मुक्काम नर्मदा - तापीच्या खोऱ्यातील डोंगर-दऱ्यांत, घनदाट अरण्यात असायचा. तो वारंवार आपला मुक्काम बदलायचा. त्यामुळे सारे पोलिस खाते हैराण झाले होते. त्याने अनेक देशी व इंग्रज अधिकाऱ्यांनाही धडा शिकविला होता. तो बहुरूपी होता. निरनिराळी सोंगे आणून तो त्या अधिकाऱ्यांना 'तंट्याचा अड्डा दाखवून देतो' म्हणून झुलवायचा. त्यांना अवघड जागी नेऊन त्यांची फजिती करायचा. तेव्हा ते धूम ठोकून पळून जायचे.

इंग्रज सरकारची अब्रू त्याने वेशीवर टांगली होती. कोणाही अधिकाऱ्याला तो दिसत नव्हता. मात्र जमीनदार सावकरांच्या घरांवर धाडी घालीतच राहायचा. बिजनिया एका डोंगरावरील जाळीत लपलेला आहे, असे एका खबऱ्याने पोलिसांना सांगितले. तेथे तो व त्याचा एक साथीदार दोघेच होते. पोलिस मोठ्या संख्येने आले. त्या जाळीला वेढा घालून बिजानियाला साथीदारासह पकडले. हिंमत पाटलाचा खून केल्याचा आरोप ठेवून त्याला फाशी देण्यात आले. तो तंट्याचा उजवा हात होता. तो गेल्याने तंट्याला अत्यंत दुःख झाले. तो त्याचा बहादुर साथी होता.

देशी पोलिस अधिकारी तंट्याच्या शोधाचे काम योग्यरित्या करीत नाहीत, म्हणून त्यांच्या जागी मुंबईहून खास इंग्रज पोलिस इनस्पेक्टरांना नर्मदा खोऱ्यात नेमणूका दिल्या पण त्यांनाही त्या कामी यश आले नाही.

दुष्काळ पडला. व्यापारी, सावकार रयतेला लुटू लागले. तंट्याने लोकांना बिनव्याजी पैसा दिला. त्यामुळे सावकार हबकले. धावत्या आगगाडीत चढून तंट्या व त्याच्या साथीदारांनी सरकारच्या व व्यापाऱ्यांच्या धान्याची शेकडो पोती आगगाडीच्या डब्यातून खाली फेकली व ते धान्य भुकेने तडफडणाऱ्या जनतेला वाटून टाकले. त्यामुळे जनता त्याला आपला तारणहार मानू लागली. गोरगरीब स्त्रियांना तो आपला भाऊ व रक्षणकर्ता वाटू लागला. नंतरच्या काळात चांगले पीक आले. सावकार कमी किंमतीत शेतकऱ्यांचे धान्य दरवर्षी विकत घेण्यास लालचावले होते. तंट्याने आपल्या साथीदारांना लुटीचा पैसा देऊन गावोगावच्या शेतकऱ्यांकडून जादा भावाने धान्य विकत घेतले. ते गरजू गरीब लोकांना वाटून टाकले. त्यामुळे सावकार हबकून गेले.

सरकारने स्पेशल कमिशनर तंट्या ऑपरेशन हे नवे पद निर्माण करून कर्नल वॉर्डची नेमणूक त्या पदावर केली. त्याने खांडवा, बैतूल, होशंगाबाद या तिन्ही जिल्ह्यातील प्रत्येक गावात तंबू उभारून पोलिस चौक्या स्थापन केल्या. तरीही त्यांचा काही उपयोग झाला नाही. प्रत्येक गावातला कोणताही माणूस तंट्याची माहिती पोलिसांना देत नव्हता.

सर लेफेल ग्रिफिन गव्ह. जनरल तर्फे त्या भागात आले. त्यांनी 'तंट्या पोलिस' नावाचे सैन्यदल उभारले. रिसालदार मेजर ईश्वरी प्रसादांकडे तंट्याला पकडण्याच्या मोहिमेची जबाबदारी सोपविली. होळकर सरकार, घाटाखेडी, मकडाई व अचलपूरचे संस्थानिक तंट्याला पकडण्याच्या कामी सरकारला मदत न करता तंट्याला संरक्षण देतात; असा आरोप पोलिस अधिकाऱ्यांनी केला. गव्ह. जनरलने पत्रे देऊन त्यांना तंबी दिली. त्यांनीही तंट्याला पकडण्यासाठी पोलिस अधिकाऱ्यांच्या नेमणूका केल्या; पण ते मन लावून काम करीत नव्हते. त्यांनीही तंट्याबद्दल सहानुभूती वाटत होती.

इंग्रज सरकारने तंट्याला पकडून देण्याऱ्यास नंदगाव व चारखेडा या गावांच्या शिवारातली २५०० एकरांची जमीनदारी बक्षीस म्हणून देण्याचे जाहीर केले. होळकर सरकारलाही त्यासाठी बक्षीस जाहीर करण्यास भाग पाडले. पण बक्षीसाच्या लोभाने त्या दोनशे चौरस मैलातील एकही माणूस या कामासाठी पुढे आला नाही. कारण तंट्याचे कार्य व त्यामुळे त्याची वाढलेली लोकप्रियता कोणत्याही गावात तो गेला, तर त्या गावाचे लोक त्याला राजासारखा मान देत असत. तो तर नर्मदा-तापी खोऱ्यातल्या दोनशे चौरस मैलांच्या प्रदेशातील जनतेचा अनभिषिक्त राजाच होता.

एक अशिक्षित व निडर आदिवासीने इंग्रजांच्या बलाढ्य सत्तेपुढे त्या प्रदेशात आव्हान उभे केले होते. काय करावे हे इंग्रज अधिकाऱ्यांना सुचत नव्हते. अखेर इंग्रज सरकारने तंट्याविरूद्ध एक जाहिरनामा गावोगाव जाहीर केला. तो असा – 'तंट्या हा सरकारचा गुन्हेगार आहे. त्याला मदत करणे, म्हणजे गुन्हेगारास मदत करणे होय. त्याला मदत करणारास कडक शिक्षा दिली जाईल. उलट तंट्याला पकडण्यासाठी मदत करणारास मोठे बक्षीस दिले जाईल.'

तंट्या अडाणी होता. पण उत्तम संघटक होता, हुशार होता, धाडसी होता. नेतृत्त्वाचे सगळे गुण त्यांच्यात होते. गनिमी काव्याने शत्रूला नामोहरण करण्यात तो फार तरबेज होता. इंग्रजांनी भिल्ल ही जमात गुन्हेगार म्हणून जाहीर केली होती. पण त्याचा जातीतून हा सर्व जातींचा लोकतनायक म्हणून प्रसिद्ध झालेला होता, हे विशेष होय. त्याला तीन मोठे शत्रू होते. एक इंग्रज सरकार दुसरे व तिसरे गरीब जनतेला

लुटणारे सावकार व जमीनदार. ते तर इंग्रज अधिकाऱ्यांचे दलालच होते. तंट्याची लोकप्रियता त्यांच्या मनात सलत होती. हे दलाल आपल्याच देशातील जनतेची पिळवणूक करीत होते, जनतेला लुटत होते. वर्षानुवर्ष या मूठभर लोकांची समाजावर पकड होती. त्या पकडीतून जनतेला सोडविण्यासाठी तंट्यासारखा आदिवासी मनुष्य दोन्ही दोन्ही दंड थोपटून उभा राहिला. ही घटना क्रांतिकारकच होती. इंग्रज सत्ताधाऱ्यांपुढे त्याने मोठे आव्हान उभे केले होते. तो नेमाडचा वीर होता.

तंट्याला पकडण्यासाठी इंग्रज सरकारने गेल्या दहा वर्षात निर्माण केलेल्या पोलिस यंत्रणा कुचकामी ठरल्या होत्या. भिल्ल, कोरकू आदिवासी जनता तंट्याच्या पराक्रमाने धीट बनली होती. तिला आता पहिल्यासारखे पोलिसांचे भय वाटत नव्हते. हे घडले केवळ तंट्यामुळे. त्याची गुप्तहेर यंत्रणा तर इंग्रज सरकारच्या गुप्तहेर खात्यापेक्षाही श्रेष्ठ होती. तंट्या सर्वसमान्य जनतेचा मुक्तिदाता ठरला होता. म्हणूनच आजपर्यंत इंग्रज सरकारला दाद दिली नव्हती.

अखेर चीफ कमिशनरने गव्ह. जनरलच्या एजंटला पत्र लिहिले. 'आतापर्यंतचा आमचा अनुभव आहे की, तंट्याला सरळ सरळ पकडणे अशक्य आहे. आता एकच मार्ग उरला आहे. तंट्याच्या जवळच्या माणसाचा शोध घ्यावा. त्या माणसाला बक्षीसाच्या लालचीने आपलेसे करावे. त्याच्या मदतीने तंट्याला फसवून धोका देऊन पकडता येऊ शकेल.' ह्या योजनेला सरकारचा होकार मिळाला.

तंट्या आता ४६ वर्षांचा झाला होता. गेली सोळा वर्षे वणवण करीत होता. त्याचे गुडघेही दुखु लागले होते. शरीर थकत चालले होते. वयाच्या मानाने ते साथ देत नव्हते. शरीरावर व मनावर अनेक ताण होते. पूर्वीची उमेद आता कमी होऊ लागली होती. उरलेले आयुष्य एका ठिकाणी राहून बायको पोरांसह शांतपणे घालवावे, असे त्याला वाटू लागले. होळकर सरकारने जर माफी देऊन नोकरी दिली, तरच हे शक्य होणार होते. म्हणून होळकर सरकारला शरण जाण्याचे विचार त्याच्या मनात वारंवार येत होते.

खरखोन तालुक्यातील बाणेर गावी त्याचा एक मित्र गणपतसिंह राजपूत हा राहात होता. त्याची बायको तंट्याची मानलेली बहीण होती. दरवर्षी तो श्रावणी पौर्णिमेला तिच्याकडून राखी बांधून घेण्यासाठी नियमितपणे जात असे. अधून मधूनही त्यांच्याकडे तो जाई. गणपतसिंहाजवळ त्याने आपले होळकर सरकारकडे नोकरी करण्याचे विचार बोलून दाखविले. गणपतसिंहाने 'प्रयत्न करतो, माझ्या ओळखीचा एक अधिकारी होळकर सरकारच्या नोकरीत आहे.' ते एकून तंट्याला आशा वाटू लागली.

गणपतसिंह हा महालोभी होता. तंट्याला पकडून देण्यासाठी इंग्रज सरकारने जाहीर केलेले भले मोठे इनाम त्याच्या नजरे समोर नाचू लागले. गणपतसिंह ठाणेदार मनजित भगवंत याला भेटला व त्याला तंट्याचे विचार सांगितले. मनजित भगवंताने आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्याला तसे कळविले. होळकरांना ते समजले. तंट्यामुळे आपल्यालाही इंग्रज सरकारचा रोष पत्करावा लागतो आहे, तेव्हा हे प्रकरण एकदाचे मिटवून टाकावे, या विचाराने मेजर ईश्वरीसिंह यांना बोलावून घेतले. ते १५ मे १८८९ रोजी खरगोन येथे आले. खरगोनच्या छावणीत २९ जून १८८९ रोजी गणपतसिंहाने मेजर ईश्वरी प्रसादची भेट घेतली. गणपतसिंहाला होळकर सरकारने नुकतीच नोकरी दिली होती. तंट्या माझ्या घरी दरवर्षी दरवर्षी श्रावणी पौर्णिमेला माझ्या बायकोकडून राखी बांधण्यास येतो. या श्रावणी पौर्णिमेलाही तो येईल. तेव्हा त्याला पकडता येईल असे त्याने ईश्वरीप्रसादला सांगितले. त्यांनी तंट्याला कसे पकडायचे याची योजना ठरविली.

राखी पौर्णिमेच्या आदल्या दिवशी पोलिसदल बाणेरला आले. गणपतसिंहाच्या घराजवळच्या झोपडीत दबा धरून बसले. तंट्या गणपतसिंहाच्या घरी आला. संभ्या भिल्ल हा गणपतसिंहाचा साथीदार होता. त्याने तंट्यावर झडप घातली. तंट्याचा साथीदार नानकू याने संभ्यावर गोळी झाडली. त्या आवाजाने ईश्वरीसिंहाचे पोलिस झोपडीबाहेर धावून आले व सर्वांनी तंट्याला दोरखंडाने बांधून जेरबंद केले. रातोरात त्याला खरगोनला आणले. गणपतसिंहाने बेइमानी करून इनामाच्या लोभाने तंट्याला पकडून दिले. खरगोनहून तंट्याला इंदूरला आणण्यात आले.

१६ ऑगस्ट १८८९ रोजी तंट्याला न्यायाधीशासमोर उभे करण्यात आले. त्याला ओळखणारे आधीच तेथे बोलावून घेतले होते. तंट्याची ओळख परेड झाली. इंदूरच्या दरबार जेलमध्ये तंट्याला ठेवण्यात आले. दुसऱ्या दिवशी त्याला शिवाजीराव महाराज होळकरांच्या पुढे उभे करण्यात आले. महाराजांसमोर आता धर्मसंकट उभे राहिले. पण ते आता काहीही करू शकत नव्हते. तंट्याचा न्यायाधीशांसमोर जबाब नोंदविण्यात आला. साक्षीपुरावे झाले. त्याला गव्हर्नर जनरलच्या एजंटाच्या ताब्यात देण्यात आले. रेसिडेंट जेलमध्ये ठेवण्यात आले. चीफ कमिशनरांच्या आदेशानुसार त्याला जबलपुर जेलमध्ये सुरक्षिततेसाठी ठेवण्याचे ठरले. त्याला खांडवामार्गे जबलपूरला नेण्यात आले. तेव्हा त्याला पाहण्यासाठी प्रत्येक स्टेशनवर प्रचंड जनसमूह जमला होता. जबलपूर स्टेशनवर लोकांची प्रचंड गर्दी जमली होती.

पोखर गावावर दरोडा घालणे व गजरीचे नाक कापणे हे दोन आरोप त्याच्यावर ठेवण्यात आले. त्यात त्याला जन्मठेपेची शिक्षा देण्यात आली. त्याने सरकारचे समाधान

झाले नाही. म्हणून त्याच्यावर भुईफळला दरोडा घालणे व हिंमत पाटलाचा खून करणे हे दोन आरोप पुन्हा ठेवण्यात येऊन फाशीची शिक्षा दिली गेली. गेल्या १०/११ वर्षात तंट्याने एकही खून केला नव्हता. हिंमत पाटलाचा खून बिजनियाने केला होता. त्याबद्दल त्याला फांशी दिली होती. हिंमत पाटलाचा खून कर असेही त्याने बिजनियाला सांगितले नव्हते. खून एकाने केला. त्याला फाशी दिले गेले, मग त्या खूनाबद्दल तंट्याला फाशी देणे बेकायदेशीर आहे, असे नामवंतानी एक अर्ज करून वरिष्ठांना कळविले. तो अर्ज फेटाळण्यात आला. फांशीची शिक्षा कायम झाली. तंट्याला ४ डिसेंबर १८८९ रोजी फांशी देण्यात आली. हजारो गोरगरीबांचा हा आदिवासी रक्षणकर्ता क्रांतिकारक या जगातून गेला सगळ्या प्रदेशात सुतकाची छाया पसरली.



# ९२. गुरू रामसिंह कूका

गुरु रामसिंह 'कूका' यांचा जन्म पंजाब मधील लुधियाना जिल्ह्यातील भैणी या गांवी १८१६ साली झाला. तरूण वयात ते महाराजा रणजितसिंह यांच्या सैन्यात दाखल झाले. पण त्यांची वृत्ती ईश्वरोपासनेकडे असल्याने त्यांनी ती नोकरी सोडून दिली व ते आपले जीवन ईश्वरोपासनेत व्यतीत करू लागले. त्यांची ईश्वरभक्ती व त्यागमय जीवन पाहून त्यांची किर्ती पंजाबात सर्वत्र पसरली. समाजातील अनिष्ट प्रवृत्ती नष्ट करून समाजसुधारणा करण्याचे त्यांचे प्रयत्न सुरू झाले. त्यासाठी त्यांनी 'नामधारी संप्रदाय' सुरू केला. दिवसेंदिवस त्यांच्या शिष्यांची संख्या वाढू लागली. गुरू नानकांनी ज्या विचारांनी शीख धर्म स्थापन केला होता, त्या विचारांचा विसर शीखांना पडला होता. नानक साहेबांच्या विचारांचा उपदेश ते आपल्या शिष्यांना करीत असत व त्याप्रमाणे धर्माचरण करण्यास ते आपल्या शिष्यांना प्रवृत्त करीत असत. कूका म्हणजे शुद्ध अंतःकरणातून निघालेला ईश्वरनामाचा दीर्घ ध्वनी. पवित्राचरणाने ईश्वरनामाचा असा जप करणाऱ्या त्यांच्या शिष्यांना व त्यांनाही लोक कूका या नामाने ओळखू लागले. गुरू रामसिंह कूकांचा हा सद्धर्म प्रचार चालू असतांना त्यांना एक महात्मा भेटले. त्यांचे नाव रामदास असे होते. त्यांनी रामसिंह कूकांना सांगितले,

"रामसिंह साहेब ! आपण केवळ स्वतःच्या मुक्तीसाठी ईश्वरोपासना करीत आहांत व आपल्या शिष्यांना सुद्धा त्याच मार्गाने नेत आहात. पण आपल्या देशाच्या मुक्तिविना सामाजिक कल्याण होणार नाही व समाजाच्या कल्याणाशिवाय लोकात धर्मभावना जागृत होणार नाही." महात्मा रामदासांचे विचार गुरू रामसिंहाना पटले व त्यानुसार ते आपल्या भक्तांना राष्ट्र-कल्याणाचा व राष्ट्रासाठी करावयाच्या कर्तव्यांचा उपदेशही आपल्या प्रवचनांतून करू लागले. त्यांच्या प्रवचनांमधून त्यांच्या शिष्यात राष्ट्रीय भावना निर्माण झाली. बाह्य स्वरूपात त्यांच्या प्रचाराचे स्वरूप धार्मिक असले, तरी गुप्त रूपाने ते आपल्या देशाच्या मुक्तीसाठी सैन्यसंगठनही करू लागले.

सर्व प्रथम त्यांनी आपल्या शिष्यांना स्वावलंबी बनविण्याचा प्रयत्न सुरू केला. इंग्रज सरकारने सुरू केलेल्या शाळांचा, दवाखान्यांचा, डाकखान्यांचा व इंग्रजी वस्तूंचा बहिष्कार करून आपल्या संप्रदायाची स्वतंत्र यंत्रणा सुरू केली. शाळा, दवाखाने, स्वतंत्र टपाल व्यवस्था व स्वदेशी वस्तूंचा वापर त्यांनी आपल्या संप्रदायाच्या वतीने सुरू केला. संपूर्ण पंजाब प्रांतात २२ जिल्हे निर्माण केले व प्रत्येक जिल्ह्यास एकेक अध्यक्षाची नेमणूक केली. त्या बरोबरच आपली स्वतंत्र गुप्तहेर संघटना सुद्धा कार्यरत केली.

बहिष्कारामुळे पंजाबातील इंग्रज शासनाने त्यांच्या संघटनेवर अनेक बंधने लादली. म्हणून त्यांनी आपला उद्देश गुप्त ठेवून बाह्य स्वरूपात केवळ धर्मजागरण सुरू केले. सरकारला वाटले, आता त्यांचे शासन-विरोधी कार्य संपले, म्हणून सरकारने त्यांच्या संघटनेवरील बंधने, १८६९ साली काढून टाकली. पण रामसिंहानी दूरदर्शीपणे आपले सैन्य-संघठन गुप्तरूपाने चालूच ठेवले व दिवसेंदिवस ते अधिक बळकट झाले. सारे कूका संप्रदायी देश कार्यासाठी केव्हाही प्राणत्याग करावयास सिद्ध झाले होते.

१८७१ मध्ये काही कूके वीर अमृतसरला जात होते. वाटेत त्यांचे काही कसायांशी भांडण झाले. तेव्हा त्या वीरांनी त्या कसायांना मारून टाकले व ते सरळ भैणी येथे गुरू रामसिंहाकडे निघून गेले. इकडे अमृतसरमध्ये त्या घटनेवरून पोलिसांनी धरपकड सुरू केली. अनेक प्रतिष्ठितही पकडले गेले. त्यांच्यावर पोलिसांनी अत्याचार सुरू केले. ते समजताच गुरू रामसिंहांनी त्या कसायांना मारणाऱ्या आपल्या शिष्यांना पोलिसांकडे जाऊन खरे काय ते सांगण्याचा आदेश दिला. त्यांचा तो आदेश शिरसावंद्य मानून ते सारे कूके पोलिसांकडे गेले व आम्ही त्या कसायांना का मारले, हे सारे स्पष्टपणे सांगितले.

वास्तविक पाहता गुरू रामसिंहानी आपल्या या कृत्याद्वारे सरकारला मदतच केली होती. पण त्यांच्या या अशा प्रभावाने इंग्रज सरकार सतर्क झाले. आणि गुरू रामसिंह कूकांच्या गतिविधीवर आपल्या गुप्तहेरांकरवी बारीक लक्ष ठेवू लागले.

१३ जानेवारी १८७२ रोजी भैणी येथे माघमेळा होता. आसपासच्या गावांतून अनेक कूके त्या मेळाव्यासाठी भैणीकडे निघाले होते. रस्त्यात एका कूकाची गाठ कसायांच्या एका दलाशी पडली; तेव्हा त्या कसायांनी त्या कूकाला खूप मारले व त्याच्या समोरच एक गाय मारून टाकली. तो कूका संतप्त होऊन भैणी येथे आपल्या गुरूकडे गेला व कसायांनी आपल्याला किती मारले व एक गायही कापली, हे तिखटमीठ लावून तावातावाने सांगितले, तेव्हा जमलेले १५४ कूकावीर अतिशय संतापले व त्यांनी त्या कसायांचा बदला घेण्यासाठी ते उद्युक्त झाले. गुरू रामसिंहानी त्यांना धीर धरायला सांगितले व असला उतावीळपणा केला तर आपली योजना सफल होणार नाही. अजून आपली संघटना अपरिपक्व आहे. पूर्ण तयारी झाल्याशिवाय असले कोणतेही कृत्य तुम्ही करू नये, असे त्यांना परोपरीने सांगून पाहिले. पण ते सारे कूकावीर सूडाच्या भावनेने इतके पेटले होते की, त्यांनी आपल्या गुरूचे म्हणने मानले नाही व ते सारे त्या कसायांचा बदला घेण्यासाठी भैणीहून निघून गेले. त्यांनी त्या कसायांवर तर सूड उगवलाच, पण इंग्रज सरकारविरूद्ध विद्रोह करण्याची घोषणा केली. जवळच्या मलौध किल्ल्यातील

लोकांनी त्यांना आधी साथ देण्याचे कबूल केले होते. पण त्यांचा तो उतावीळपणा पाहून मलौघच्या त्या लोकांनी त्यांना साथ देण्याचे नाकारले. तेव्हा संतप्त होऊन त्या १५४ कूकांनी मलौघ किल्ल्यावरच हल्ला केला. त्या किल्ल्यात त्यांच्या हाती जी हत्यारे व घोडे सापडले, ते सारे घेऊन गेले.

दुसऱ्या दिवशी त्यांनी मालेर कोटला शहरावर हल्ला केला. तेथल्या राजवाड्यात शिरले, राजवाड्यातील खजिना लुटायचा प्रयत्न केला पण त्यांना हार पत्करावी लागली. ते पळून जात असता शेजारच्या जंगलात त्यांचा पाठलाग करणाऱ्या सैनिकांशी त्यांची लढाई झाली. लढता लढता ते पतियाला संस्थानच्या हद्दीवरील रढ नामक गावाजवळील जंगलात शिरले. त्यातले ६८ कूका पकडले गेले व बाकीचे मारले गेले. त्याआधीच गुरू रामसिंह कूका यांनी सरकारला दूरदर्शीपणे कळविले होते की, त्या विद्रोही लोकांशी माझा काहीही संबंध नाही. पण सरकारचा त्यावर विश्वास बसला नाही.

लुधियानाचा डेप्युटी कमिशनर मि. कॉवन याने त्या ६८ कूकावीरांपैकी ४९ जणांना मालेरकोटला येथे तोफेच्या तोंडी बांधून ठार मारले व उरलेल्या १८ कूकांना लुधियाना तुरूंगात फांशी देण्यात आले. कूकावीरांना तोफेच्या तोंडी देत असतांना कॉवनने गुरू रामसिंह यांना खूप शिव्या दिल्या. ते पाहून त्यातला एक कूका मुलगा खूप चिडला त्याने माफी मागितली तर त्याला सोडून देण्यात येईल असेही कॉवनने त्या मुलाला सांगितले पण त्या मुलाने ते न मानता कॉवनकडे झेप घेऊन त्याची दाढी पकडली व ती तो जोराने ओढू लागला. कॉवन तडफडू लागला पण त्या मुलाने त्याची दाढी सोडली नाही. अखेर शिपायांनी तलवारीने त्या मुलाचे दोन्ही हात छाटून टाकून त्याच्या शरीराचे तुकडे तुकडे करून टाकले. अशा रीतीने त्या ६८ कूकावीरांनी आपल्या उतावीळपणामुळे आपले प्राण गमावले. या कूका वीरांच्या उठावाला स्वातंत्र्य-लढ्याच्या इतिहासात 'कूका-विद्रोह' म्हटले जाते.

नंतर १८१८ च्या रेग्युलेशन ॲक्ट अन्वये गुरु रामसिंह कूका यांनाही इंग्रज सरकारने अटक केली आणि त्यांना हद्दपारीची शिक्षा देऊन ब्रह्मदेशात नजरबंद केले. हा धर्मपरायण गुरू रामसिंह १८८५ साली वयाच्या ६९ व्या वर्षी ब्रह्मदेशातच मरण पावला. त्यानंतर कूका संप्रदायाचीही वाताहात झाली.



# ९३. वासुदेव बळवंत फडके

सन १८५७ च्या स्वातंत्र्य युद्धानंतर महाराष्ट्रात वासुदेव बळवंत फडके यांनी २१ फेब्रुवारी १८७९ रोजी इंग्रज सरकारविरूद्ध बंड पुकारले. त्या दिवशी त्यांनी पुण्याजवळच्या धामारी गावावर पहिला दरोडा रामोश्यांच्या साह्याने घातला व ते रामोशांसह जंगलात पळून गेले. त्यांनी इंग्रजांविरूद्ध बंड पुकारण्यास तशीच कारणे धाडली होती व इंग्रजांना या देशातून हाकून देण्याचा निर्धार त्यांनी केला होता.

वासुदेव बळवंत फडके हे पहिल्या स्वातंत्र्य युद्धानंतरचे उल्लेखनीय क्रांतिकारक होते. त्यांच्या आईचे नाव सरस्वती. तिचे माहेर कल्याणचे. तिच्या पोटी वासुदेवांचा जन्म त्यांच्या मूळ गावी शिरढोण येथे ४ नोव्हेंबर १८४५ रोजी झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण त्यांच्या आजोळी कल्याण येथे झाले. तेथेच त्यांनी डॉ. विल्सन यांच्या मिशनरी शाळेत इंग्रजी भाषेचे शिक्षण घेतले. त्यानंतर त्यांनी मुंबई येथे नाना शंकरशेट यांनी चालविलेल्या शाळेत ४ महिने अभ्यास केला व नंतर ते पुणे येथल्या पूना हायस्कूलमध्ये प्रवेश परीक्षेच्या वर्गापर्यंत शिकले; पण त्या परीक्षेस ते बसलेच नाहीत. त्या शाळेत त्यांनी इंग्रजी भाषेचा चांगला अभ्यास केला. त्यांचे मराठी व इंग्रजी हस्ताक्षर वळणदार होते. त्याचा उपयोग त्यांना नोकऱ्या मिळण्यासाठी झाला.

पनवेल जवळच्या पाल येथील दाजिबा सोमण यांच्या सई नावाच्या मुलीशी त्यांचे लग्न झाले. नंतर त्यांनी जी.आय.पी. (मध्य) रेल्वेच्या ऑफिसमध्ये ग्रँट मेडिकल कॉलेजच्या ऑफिसमध्ये व कामिसारिएट ऑफिसमध्ये कारकून म्हणून मुंबई येथे नोकऱ्या केल्या. मुंबईच्या कामिसारिएट ऑफिसमधून त्यांची बदली त्याच ऑफिसच्या पुणे येथल्या कार्यालयात झाली. पुण्याला त्यांचा चांगला जन्म बसला.

पुण्याला त्यांनी आध्यात्मिक साधनाही केली. अनेक सत्पुरुषांच्या भेटी घेतल्या. त्यांचे मार्गदर्शन मिळविले. त्यांना व्यायामाचा, तलवारी, भाले, बंदुका चालविण्याचा छंद पुणे येथे जडला. घोड्यावर बसविण्यात ते पटाईत होते. चांगली घोडदौड करीत असत. मुलांना स्वदेश प्रेमाचे शिक्षण मिळाले पाहिजे असे त्यांना वाटत असे. त्यासाठी त्यांनी 'पूना नेटिव्ह इन्स्टिट्यूशन' ही संस्था स्थापन करून मुलांना राष्ट्रीय शिक्षण मिळविण्यासाठी या संस्थेत वर्ग सुरू केले. सध्याचे पुण्याचे भावेस्कूल हे त्याच संस्थेचे रूपांतर आहे.

पुण्यास आल्यावर दोन वर्षांनी त्यांना एक मुलगा झाला; पण तो बालपणीच मरण पावला. नंतर दोन वर्षांनी त्यांना एक मुलगी झाली. ती मथूताई मात्र जगली. सन १८७० मध्ये त्यांची आई अतिशय आजारी आहे, असे त्यांना समजले. आईला भेटण्यासाठी त्यांनी आपल्या वरिष्ठ इंग्रज अधिकाऱ्याकडे रजेचा अर्ज दिला. पण तो अर्ज त्या अधिकाऱ्याने नामंजूर केला. तेव्हा ते रजेविनाच आपल्या आईला भेटण्यासाठी शिरढोणला गेले. तेथे गेल्यावर त्यांना समजले की, आपली आई आधीच आपल्याला सोडून निघून गेली आहे. आईचे अंत्यदर्शनही त्यांना घडू शकले नाही. त्यामुळे रजा न देणाऱ्या त्या वरिष्ठ इंग्रज अधिकाऱ्याविषयी त्यांच्या मनात संताप धुमसू लागला. एक वर्षानंतर आईच्या वर्षश्राद्धासाठी आपल्या गावी जाण्याकरिता त्याच वरिष्ठाकडे रजेचा अर्ज दिला. पण हा अर्जसुद्धा त्या अधिकाऱ्याने नामंजूर केला. त्यामुळे ते इंग्रजांविषयीच्या सूड भावनेने पेटून उठले. इंग्रजांना आपल्या देशातून घालवून दिलेच पाहिजे, या विचाराने त्यांच्या मनात घर केले. त्यांना कसे हाकून द्यायचे, हाच विचार त्यांच्या मनात घोळू लागला.

सन १८७१ मध्ये न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे हे पुण्यास बदलून आले. त्यांची स्वदेशी व्यापाराविषयीची भाषणे ऐकल्यावर वासुदेवांनी स्वदेशीचे व्रत पाळण्याचा निर्धार केला. केवळ कपडेच नव्हेत, तर इतर वस्तूही ते स्वदेशात तयार होणाऱ्याच वापरू लागले. न्या. रानड्यांच्या भाषणांमधून त्यांना कळून चुकले की, इंग्रज सरकार आपल्या देशातील उद्योगधंदे बुडवीत आहे व आपल्या देशाची भयंकर लूट करीत आहे. त्याचाही परिणाम त्यांच्या मनावर इंग्रजांविरूद्ध उठाव करण्यासाठी कारणीभूत ठरला आणि ते तशा प्रयत्नांना लागले.

सन १८७३ मध्ये त्यांची प्रथम पत्नी सईबाई हिचे निधन झाले. त्यांचे दुसरे लग्न काशीनाथ शास्त्री कुंटे यांच्या गोदूताई नावाच्या मुलीशी झाले. सासरचे तिचे नाव गोपिकाबाई असे ठेवण्यात आले. याच 'बाई फडके' होत. त्या शरीराने धडधाकट होत्या. वासुदेवांनी त्यांनाही शस्त्रे चालविण्यात व घोड्यावर बसण्यात तरबेज केले होते.

वासुदेवांनी पुण्यात आळीआळीतून इंग्रजांच्या जुलमी सत्तेविरूद्ध अनेक व्याख्याने दिली. पुण्यातील सुशिक्षित मंडळीही त्यांची भाषणे एकत असे. आपला देश इंग्रजांच्या जोखडातून मुक्त झालाच पाहिजे. त्यासाठी सुशिक्षित-अशिक्षित सर्वांनीच एकजुटीने प्रयत्न करायला पाहिजे. त्यासाठी धनिकांनी पैशांची तरतूद करायला हवी. असे विचार ते आपल्या भाषणांमधून लोकांना पटवून देऊ लागले.

सुशिक्षत लोक त्यांची भाषणे आवडीने ऐकत असत. पण ते जे विचार मांडीत, ते अविचाराचे आहेत, असेच त्यांना वाटत असे. कारण इंग्रजांच्या भारतातील बलाढ्य सत्तेला नाहीसे करणे, हे त्यांना आकाशातले फूल तोडण्या इतके अशक्यप्राय वाटत असे. हा एकटा मनुष्य काय करू शकणार ? असेही त्यांना वाटायचे. वासुदेव बळवंतांचे विचार वेडगळपणाचे आहेत, असेही पुण्यातल्या सुशिक्षितांना वाटायचे. ते म्हणत, 'इंग्रजी राज्य नष्ट झाले पाहिजे, हे खरेच. पण त्यासाठी आमच्याकडून मदतीची किंवा धनाची अपेक्षा करू नका.' अखेर पुण्यातल्या सुशिक्षित वर्गाने त्यांना साथ दिलीच नाही.

सन १८७६-७७ च्या दुष्काळाने महाराष्ट्रात फार मोठा कहर मांडला. त्यात लक्षावधी लोक अन्नान्न दशा होऊन मरण पावले. पण इंग्रज सरकारने त्या तडफडणाऱ्या लोकांसाठी काहीही केले नाही. सरकार आपले कर्तव्य विसरले. याचाही भयंकर संताप वासुदेव बळवंतांना आला. पण त्या भुकेने तडफडणाऱ्या जनतेसाठी ते काहीही करू शकतले नाहीत. त्यांच्यासाठी लोकांना आवाहन करून धान्य किंवा पैसा ते जमवू शकले नाहीत. तेही एवढा पैसा कोठून आणणार?

इंग्रजांविरूद्ध उठाव करायचा, तर त्यांनी ठरविलेच होते. त्यासाठी त्यांनी दीर्घ मुदतीच्या रजेचा अर्ज आपल्या ऑफिसकडे पाठवून दिला. त्यांनी दाढी-मिशा व जटा वाढविल्या. खांद्याला झोळी आडकवून ते महाराष्ट्रभर व मध्यप्रांतात ही हिंडले. आपल्या विचाराचे कोणी भेटले काय, याचा तपास केला. पण त्यात त्यांना यश आले नाही.

महाराष्ट्रातली सह्याद्रीच्या डोंगरदऱ्यात राहणारी रामोशी जमात आपणांस साथ देईल, असे आता त्यांना वाटू लागले. ही जमात बलदंड, धाडशी, बेडर, प्रामाणिक व पराक्रमी म्हणून शिवाजी महाराजांच्या काळापासून प्रसिद्ध होती. दुसऱ्या बाजीरावाने त्यांची वतने काढून घेतली होती व ती वतने खूप प्रयत्न करूनही इंग्रज सरकारने त्यांना परत दिली नाहीत. म्हणून ते सुद्धा इंग्रज सरकारावर चिडलेले होतेच. महाराष्ट्रात त्यांची वस्ती १७ ते १८ हजारावर होती. हे लोक शेळ्या-मेंढ्या पाळीत व दरोडेही आपल्या पोटपाण्यासाठी घालीत असत. वासुदेव बळवंतांनी सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यात व जंगलात हिंडून रामोशांच्या म्होरक्यांच्या गाठी घेतल्या. त्यांच्या साह्याने २०० रामोशी संघटित केले. सुमारे २०० रामोशी लोणी-कारभोरला एकत्र जमविले. त्यांना जेवण दिले व फेटेही बांधले. आपला हेतू त्यांनी आधीच त्यांच्या म्होरक्यांना सांगितलेला होता. ते सारे एकजुटीने वासुदेव बळवंतांच्या पाठीशी उभे राहिले. आत या लोकांच्या व त्यांच्या

कुटुंबियांच्या पोटापाण्याची सोय करण्यासाठी गावोगावच्या धनिकांच्या घरांवर दरोडे घालण्याशिवाय त्यांना तरणोपायच नव्हता. त्यांनी इंग्रज सरकारचे खजिने लुटायचे ठरविले. कारण कोठूनही पैसा मिळणे शक्यच नव्हते. त्यांना पुण्यातले गोपाळराव साठे व विष्णुपंत हे दोनच सुशिक्षित साथीदार मिळाले होते. पण तेही सामान्य कुटुंबातलेच होते. दरोडे घालण्याची सुरूवात करण्याआधी त्यांनी आपली पत्नी गोपिकाबाई हिला तिच्या मामाच्या घरी पोहचविले व ते प्रापंचिक व्यापातून मुक्त झाले.

वासुदेव बळवंतांनी पहिला दरोडा पुण्याजवळच्या धामारी या गावात घातला. त्यामुळे त्यांचा व त्यांच्या रामोशी साथीदारांचा उत्साह वाढला. नंतर त्यांनी मोठ्या धाडसाने पुण्यातल्या भांबुर्डे (सध्याचे शिवाजीनगर) येथील खजिना लुटला. तो खजिना तेथल्या एका भक्कम वाड्यात होता व रक्षकही तेथे मोजकेच होते. हा सरकारी खजिना लुटला गेला, हे पाहून इंग्रज सरकार खळबळून जागे झाले व सरकारने त्याचा तपास लावण्यासाठी मेजर डॅनिअलची नेमणूक केली. वासुदेव बळवंतच या दरोड्याचा म्होरक्या आहे, याचा सुगावा मेजर डॉनियलला लागला व त्याने पोलिसांची एक तुकडी घेऊन त्यांच्या घरावर छापा मारला. त्यांच्या घरातली अनेक शस्त्रे त्याने जप्त केली. मुंबईच्या गव्हर्नरने वासुदेव बळवंताला पकडून देणाऱ्यास चार हजार रुपयांचे इनाम जाहीर केले. कारण वासुदेव बळवंताने पुणे व सातारा जिल्ह्यात दरोडे घालण्याचे सत्रच चालू केले होते. आता त्याच्याकडे ३०० रामोशी व कोळी यांची फौज होती. दौलतराव नाईक हा त्यांचा शूर व धाडसी पुढारी होता. तो वासुदेव बळवंतांचा उजवा हातच बनला. सरकारने वरील इनाम जाहीर केल्यानंतर वासुदेव बळवंतांनीही मुंबईच्या गव्हर्नरचे मुंडके आणून देणाऱ्यास पाच हजार रुपयांचे इनाम जाहीर केले. हे इनाम जाहीर झाल्यावर सारी जनता आश्चर्य चकित व उत्सुकही झाली.

आता पुण्यात व पुण्याभोवतालच्या परिसरात जिकडे तिकडे पोलिसांचा सुळसुळाट झाला होता. म्हणून वासुदेव बळवंतांचे उजवे हात असलेले दौलतराव नाईक आपल्या टोळीसह कोकणात उतरले. १० व ११ मे १८७९ रोजी त्यांनी पळस्पे व चिखली ही दोन गावे लुटली. त्या लुटीत त्यांना दीड लाख रुपये मिळाले. दौलतराव तुळशीच्या खोऱ्यातून घाटमाथ्याकडे निघाले. त्यांना मेजर डॅनिअलने आपल्या शिपायांसह गाठले. चांगली चकमक उडाली तीत दौलतराव मारले गेले. डॅनिअलने ती लूट हस्तगत केली. ते ऐकल्यावर वासुदेव बळवंत अत्यंत निराश झाले व ते निजाम हद्दीतल्या श्रीक्षेत्र मल्लिकार्जुन येथे निघून गेले.

१३ मे १८७९ रोजी पुण्यातल्या बुधवारवाडा आणि विश्रामबागवाडा या दोन्ही मोठ्या पेशव्यांच्या इमारतींना आगी लागल्या. या दोन्ही वाड्यांत इंग्रज सरकारची कार्यालये होती. त्या आगीविषयीही सरकारला वासुदेव बळवंतांचा संशय आला. देशातल्या अँग्लो इंडियन पत्रांनी या दोन्ही घटनांविषयी चांगलेच काहूर उठविले. इंग्लंडच्या पार्लमेंटमध्येही त्या बद्दल चर्चा झाली व वासुदेव बळवंतांचे बंड मोडून काढण्याची मागणी करण्यात आली.

मल्लिकार्जुन येथे वासुदेव बळवंतांच्या अंगात चांगलाच ताप भरला. अशा स्थितीतच ते गाणगापुरास आले. श्रीदत्त हे त्यांचे उपास्य दैवत होते. तेथे त्यांनी उपासना सुरू केली. निजाम हद्दीतील रोहिल्यांची सेना उभारावी असे त्यांचे मनाने घेतले. त्यासाठी त्यांनी काही प्रमुख रोहिल्यांशी संगनमत केले. त्यांना आगाऊ पैसा देण्याची तजवीज वासुदेव बळवंत करू लागले.

वासुदेव बळवंतांचा परिचय असलेली पुण्यातली एक बाई त्या काळात गाणगापुरला गेली होती. तेथे तिने त्यांना पाहिले. पुण्यास परत आल्यावर एका देवळात प्रवचन ऐकतांना त्या बाईने आपल्या शेजारी बसलेल्या आपल्या मैत्रिणीला सांगितले की, "मी वासुदेव बळवंतांना गाणगापुरात पाहिले." हे बोलणे त्यांच्या मागे बसलेल्या एका जमादारणीने ऐकले व घरी जाऊन तिने आपल्या जमादार नवऱ्याला ती बातमी सांगितली. तो लगेच मेजर डॅनियलकडे गेला व वासुदेव बळवंत हे गाणगापूर येथे आहेत, असे त्याला त्या जमादाराने सांगितले. डॅनियल ती बातमी ऐकताच एकदम खुश झाला.

मेजर डॅनियल आपल्या पोलिसांच्या तुकडीसह गाणगापुरास निघाला. वासुदेव बळवंत देवनावडगी येथे एका मंदिरात झोपले आहेत, असे त्याला समजताच तो आपल्या पोलिसांसह रात्रीच देवनावडगीस आला. त्या देवळात झोपलेल्या अवस्थेत त्याने वासुदेव बळवतांना पकडून जेरबंद केले. गाणगापुरास येऊन त्याने वासुदेव बळवंतास भेटलेल्या रोहिल्यांबाबतही चौकशी केली. २३ जुलै १८७९ रोजी वासुदेव बळवंतांना पुण्यास आणले. त्यांच्या १५ सहकाऱ्यांनाही पकडण्यात आले. तुरूंगात त्यांचा खूप छळ करण्यात आला. त्यांच्या विरूद्ध पुरावे जमविण्यात तीन महिने गेले.

२२ ऑक्टोबर १८७९ रोजी पुण्यातल्या कोर्टात न्यायाधीश न्यून हॅम यांच्या समोर त्यांची सुनावणी सुरू झाली. त्यांचे वकीलपत्र घेण्याचे धाडस पुण्यातल्या एकाही वकीलात नव्हते. तेव्हा सार्वजनिक काकांनी त्यांचे वकीलपत्र घेतले. दुसऱ्या

दिवसांपासून साक्षीदारांच्या साक्षी घेण्यास सुरूवात झाली. गाणगापुराकडून आणलेल्या रोहिल्यांच्याही साक्षी झाल्या. सरकारी वकील नानाभाई हरिदास यांनी वासुदेव बळवंतांवरील आरोप वाचून दाखविले, ते असे -

(१) इंग्रज सरकार विरूद्ध युद्ध पुकारणे.

(२) त्यासाठी माणसे व पैसा जमविणे.

(३) पैसा जमविण्यासाठी दरोडे घालणे.

(४) सरकार विरूद्ध जनतेचे मन कलुषित करणे.

पुण्यातील कोर्टातले कामकाज संपल्यावर हा खटला मुंबईच्या वरिष्ठ न्यायालयात वर्ग करण्यात आला वरिष्ठ न्यायालयात मुंबईचे सुप्रसिद्ध वकील महादेव चिमणाजी आपटे यांनी वासुदेव बळवंतांचे वकीलपत्र घेतले. त्यांनी साक्षीदारांची उलटतपासणी केली. त्यानंतर वासुदेव बळवंतांचे वक्तव्य झाले. ''त्यात त्यांनी जनता उपासमारीने इंग्रजांच्या राजवटीत मरते आहे, इंग्रज नोकरांना भरमसाठ पगार व देशी नोकरांना तुटपुंजा पगार दिला जातो दुष्काळात लाखो लोक मरण पावले, तरी सरकारने तिकडे लक्ष दिले नाही. हे माझ्याच्याने पाहवले नाही; म्हणून मी इंग्रज सरकारविरूद्ध बंड केले. त्यात मला यश मिळाले नाही, पण परमेश्वराला माहित आहे की, मी हे माझ्या देशासाठी केले. हिंदुस्थानातील लोक हो! माझ्यामुळे तुम्हांला काही सुद्धा लाभ झाला नाही, याबद्दल तुम्ही मला क्षमा करा.''

अखेर न्यायाधीशाने वासुदेव बळवंतांना काळ्या पाण्याची व इतरांना सक्त मजुरीच्या कमी-अधिक शिक्षा ठोठावण्यात आल्या. जमलेल्या जनसमुदायाने ''वासुदेव बळवंत की जय'' असा त्यांचा जयजयकार केला. त्यांच्या देशभक्तीची प्रशंसा करणारे लेख सर्व देशी वर्तमानपत्रातून छापून आले. वासुदेव बळवंतांना ठाण्याच्या तुरूंगात डांबण्यात आले. त्यांनी पूनर्न्यायाची मागणी केली, तीही फेटाळून लावण्यात आली.

९ जानेवारी १८८० रोजी त्यांना 'तेहरान' या आगबोटीने एडन येथे नेण्यात येऊन तेथल्या तुरूंगात बंदिस्त केले. तेथेही त्यांचे फार हाल करण्यात आले. तेथल्या भयंकर उष्म व रखरखीत वातावरणाचा ही त्यांच्या शरीरावर वाईट परिणाम झाला. तेथल्या हालांना कंटाळून त्यांनी १२ ऑक्टोबर १८८० रोजी एडनच्या तुरूंगातून पलायन केले. ते सलग १२ मैल पळत गेले. शेवटी बिरआबेद येथे त्यांना घोडेस्वार शिपायांनी पकडून

एडनच्या तुरूंगात आणले. त्यांच्यावर कडक पहारा बसविण्यात आला, तसेच खूप छळही करण्यात आला. अखेर त्यांना क्षयरोगाने पछाडले.

१७ फेब्रुवारी १८८३ रोजी सायंकाळी ४.२० वाजता त्यांचे त्या तुरूंगात निधन झाले. आपल्या वैयक्तिक सामर्थ्याची पराकाष्ठा करून गुप्तपणे संघटना उभारणारा, स्वातंत्र्याचा प्रचार बेडरपणे करणारा, आपल्या तुटपुंज्या शस्त्रबळाने मूठभर साथीदारांसह इंग्रजांच्या सत्तेशी लढणारा हा थोर क्रांतिकारक अनंतात विलीन झाला. महाराष्ट्रातील तरूणांना तो स्वातंत्र्य-प्रेमाचा धडा शिकवून गेला. त्यांचा लढा २१ फेब्रुवारी १८७९ ते २० जुलै १८७९ एवढ्या सहासातच महिने सुरू होता, तरी त्याला सशस्त्र स्वातंत्र्य-लढ्यात विशेष महत्व आहे.

''काँग्रसच्या स्थापनेस वासुदेव बळवंतांचा हा हादराच कारणीभूत झाला.'' असे वेडरबर्न यांनी काँग्रेसचे संस्थापक ह्यूम यांच्या चरित्रात म्हटले आहे.



# ९४. गोविंद गुरू

बांसवाडा, डुंगरपूर, सिरोही व दक्षिण मेवाड या प्रदेशातील डोंगराळ भागांत, जंगलात राहणारे भिल्ल, मीणा, गरात्सिया वगैरे आदिवासी जातीचे लोक अत्यंत मागासलेले, कमालीच्या गरीबीत जीवन कंठणारे व परिणातः गुन्हेगारी वृत्तीचे होते. त्यातली मीणा जात तर अट्टल गुन्हेगार होती. नेहमीच जंगलात वास्तव्य, जंगली पशूंचा संपर्क यामुळे या आदिवासी जातीचे लोक धाडसी, काटक व निडर आणि पराक्रमी असायचे. जंगलातील कंदमुळे, फळे, थोडेफार उगवणारे पीक व शिकार हेच त्यांचे अन्न वर मोहाची दारू गरीबी व कष्ट यांचे विस्मरण करण्यासाठी असायची. औषधी वनस्पती, मध, डिंक, सरपण जवळपासच्या गावात कवडी मोल किंमतीने विकून काही जीवनावश्यक वस्तू ते खरेदी करीत. मात्र गावातील लोक या जातीच्या स्त्री-पुरूषांना वचकून असत. तो शे-सव्वाशे वर्षांपूर्वीचा काळ होता. या जातींना कोठला असणार शिक्षणाचा गंध ? धर्माने तर यांना शिक्षणाची द्वारे बंदच केलेली होती. तेव्हा त्यांच्यात सुधारणा तरी कशा होणार ?

सुदैवाने या जातींचा उद्धार करणारा पुरूष त्याच भागातील बंजारा जमातीत २० डिसेंबर १८५८ रोजी जन्माला आला. त्याचे जन्मगाव डुंगरपूर पासून सुमारे ३७/३८ कि.मी. दूरवर वसलेले बासीया हे होते. त्याचे नाव ठेवण्यात आले गोविंद.

गोविंद कुशाग्र बुद्धीचा होता. तसेच त्याच्या आवडी-निवडीही असामान्य होत्या. त्याचे व्यक्तिमत्व कोणालाही आकर्षित करणारे होते. त्याला शिक्षण मिळणे तर दुरापास्त तरीही आपल्या तीव्र बुद्धीने चौकस निरीक्षणाने, मनन-चिंतनाने, आसपासच्या जगातील घटना बघितल्याने तो बहुश्रुत बनला होता. त्याचे सहज ज्ञान अलौकिक होते. त्यावेळच्या राजकीय व सामाजिक परिस्थितीचे त्याला चांगले ज्ञान होते. आदिवासींच्या अधोगतीने त्याला दुःख होत असे. त्याने आपल्या गावच्या पुरोहिताकडून लिहिणे-वाचणे शिकून घेतले. मागास जातीचा असूनही त्याचे राहणीमान ब्राह्मणांसारखे असायचे. पांढरे शुभ्र धोतर, तसाच अंगरखा व फेटा असा त्याचा वेष असायचा. दररोजचे स्नान, देव-पूजा, पोथी-वाचन आणि शुद्ध शाकाहारी भोजन, गळ्यात रूद्राक्षांची माळ. यामुळे सर्व जातींचे आदिवासी त्याला 'गोविंद गुरू' म्हणायचे.

गोविंद गुरूने सर्व आदिवासी जातींची दुर्दशा पाहून आदिवासींना सुधारण्याचे प्रयत्न सुरू केले. आदिवासी लोक काटक आहेत कष्टाळू आहेत, शब्दाचे पक्के आहेत आणि धार्मिक व श्रद्धाळू आहेत, हे गोविंद गुरू जाणून होता. त्यांच्या या सद्गुणांना

नवे वळण देऊन त्यांना चांगले नागरिक बनविले पाहिजे, असे त्याने ठरविले व त्या दिशेने त्याचे प्रयत्न सुरू केले. आदिवासी जन तर त्याला देवपुरूष मानीत होते. त्याचा शब्द प्रमाण मानीत होते. गोविंद गुरूने आदिवासींना मांस-मद्य सेवनापासून परावृत्त केले. चोऱ्या-माऱ्या, लूटमार न करता आपल्या कष्टांच्या कमाईवर जगायला लावले. आदिवासीही इतर शेतकऱ्यांप्रमाणे शेती करू लागले. शेतीच्या उत्पन्नावर, गुराढोरांच्या पालन-पोषणावर जीवन कंठू लागले. आपल्या गुरू प्रमाणे स्वच्छ राहू लागले. त्यांच्या जीवनात गोविंद गुरूने आश्चर्यजनक परिवर्तन घडविले.

सन १८८०-८१ मध्ये गोविंद गुरूने स्वामी दयानंद सरस्वतींची भेट घेतली. त्यांच्या सहवासात काही दिवस राहिला. त्यांच्या विचारांनी तो प्रभावित झाला. आदिवासी जातींच्या समस्यांवर दयानंद सरस्वतींशी चर्चा केली. त्यांच्या प्रेरणेने गोविंद गुरूने आदिवासी जनांवर चांगले संस्कार कसे करायचे ते ठरविले. त्यावेळी गोविंद गुरूचे वय अवघे २३ वर्षांचे होते, हे विशेष होय.

दयानंद सरस्वतींच्या प्रेरणेने गोविंद गुरू नित्य होम-हवन करू लागला. त्यामुळे आदिवासी जनांत त्याच्याविषयी खूप आदर वाढला. त्यानंतर त्याने सामुहिक होमहवन दरवर्षी माघी पौर्णिमेला मानगड पहाडावर करायचे ठरविले. त्यासाठी प्रत्येक आदिवासीने स्नान करुन, स्वच्छ कपडे घालून एकेक नारळ व एकेक कटोरा तूप हवनासाठी आणावे, असे सर्वांना सांगितले. त्यानुसार हजारो आदिवासी सजून-धजून एकेक नारळ व एकेक कटोरा तूप घेऊन मानगड पहाडावर जमले. यज्ञकुंड प्रज्वलीत झाले. सगळ्या आदिवासींनी नारळाची व तुपाची आहुती यज्ञकुंडात दिली व गोविंद गुरूचा जयजयकार केला ! त्यानंतर सभा आयोजित केली गेली. तीमध्ये प्रत्येक गावच्या पंचायत-प्रमुखाने गुरूंच्या उपदेशाप्रमाणे कोणकोणती कार्ये केली, ते सांगितले. गोविंद गुरूने आणखी कोणत्या सुधारणा करायला हव्या, ते सांगितले. तसेच आपल्या मुलांना शिक्षण देण्याचेही सुचविले. नंतर आदिवासींवर कोण कोण कसं कसे जुलूम, अत्याचार करतात याचीही चर्चा झाली. त्या जुलूमांना, अत्याचारांना विरोध कसा करायचा हे सर्वांना गोविंद गुरूने सांगितले आणि 'संमप-सभा' स्थापन केली. 'संमप' या राजस्थानी भाषेतील शब्दाचा अर्थ परस्पर प्रेम, बंधुभाव व त्याद्वारे प्राप्त होणारे वैभव असा आहे.

त्या काळात राजा हा देवाचा अवतार, राजभक्ती हा सर्वश्रेष्ठ गुण मानला जायचा, आदिवासींचे हे संगठन म्हणजे राजाविरूद्ध बंड, असाच अर्थ त्या भागातील राजांनी घेतला. या संगठनामुळे राजांच्या मनात धास्ती उभी राहिली. आता तर गोविंद गुरूच्या अनुयायांची संख्या लाखावर पोचली होती. तेव्हा त्यांची भीती राजे लोकांना वाटणे

साहजिकच होते. गावागावातून एकत्र येऊन आदिवासी होम-हवन करू लागले होते. राजे व त्यांचे जहागिरदार यांच्या विरूद्ध ते संघटीत होऊ लागले. त्यांनी बेगारीवर जाणे बंद केले. आपल्या मुलांसाठी त्यांनी शाळा सुरू केल्या. त्यामुळे ठिकठिकाणचे जहागीरदार, सावकार, जमीनदार त्यांना धमक्या देऊ लागले. त्यांनी कित्येक आदिवासींना चाबकांनी फोडून काढले. कित्येकांना ठार केले. त्यांच्या जुलुमांना ना चौकशी ना न्याय? उलट डुंगरपूर, बांसवाडा, कुशलगड येथील राजांनी गोविंद गुरू विरूद्ध कंपनी सरकारच्या रेसिडेंटकडे तक्रारी केल्या की, 'गोविंद गुरूच्या चिथावणीने सारे आदिवासी संघटित होऊन आपले स्वतंत्र आदिवासी राज्य स्थापन करण्याचा प्रयत्न करीत आहेत. तेव्हा लवकर सैन्य पाठवून त्यांचा बिमोड करणे जरूरीचे आहे.'

त्याचा काळात एक घटना घडली. संतरामपूर जिल्ह्यातील गठरा या गावचा ठाणेदार भयंकर अत्याचारी होता. आदिवासींच्या तरूण मुलींना व सुनांना सतत छेडायचा. त्या गावातील पुंजा भील याने संधी साधून त्या ठाणेदाराला ठार केले. संतरामपूरचा राजासुद्धा आदिवासींच्या संघटनेला घाबरून होता. त्याने गोध्रा, अहमदाबादच्या इंग्रज कमिशनरांना आणि बडोदा, बारिया व देवगडच्या राजांना तारेने कळविले की, 'भिल्ल लोक संघटित होऊन बंड करण्यास सज्ज झाले आहेत.' थोड्याच दिवसात माघी पौर्णिमेला गोविंद गुरूचा मेळा होणार होता. राजाला बहाणा मिळाला. त्याने अफवा उठविली की, 'दीड लाख भिल्ल त्याच्या राज्यावर हल्ला करण्यासाठी मानगड पहाडावर एकत्र जमणार आहेत. म्हणून सरकारने मोठे सैन्य पाठवून त्यांचे पारिपत्य करावे आणि गोविंद गुरूला कैद करावे.' इंग्रजांना निमित्त हवेच होते. इंग्रज रेसिडेंटने खेरवाडा छावणीच्या सेनाधिकाऱ्यांना आदेश दिला, ''७ फेब्रुवारी १९०८ रोजी मानगड येथील मेळ्यावर हल्ला करून गोविंद गुरूला गिरफ्तार करावे.''

७ फेब्रुवारी रोजीच माघी पौर्णिमा होती. कित्येक हजार आदिवासी एका हातात नारळ, दुसऱ्या हातात तुपाचा कटोरा व खांद्यावर धनुष्यं, पाठीशी बाणांचा भाता घेऊन मानगड पहाडावर जमले होते. गोविंद गुरू यज्ञकुंड पेटवीत होते. त्यांचा मंत्र गजर सुरू होता. तो पूर्णपणे धार्मिक उत्सव होता. त्याच उत्सवाला इंग्रज सेनाधिकाऱ्यांनी बंडाची तयारी मानली व मानगड पहाडाला वेढा देऊन फायरिंगचा आदेश दिला. पहाडावर जमलेल्या आदिवासींवर चहुबाजूंनी बंदूकीच्या गोळ्यांचा तुफान वर्षाव अकस्मात होऊ लागला. आदिवासी घायाळ होऊन पटापट जमिनीवर कोसळू लागले. मानगड पहाडावर जिकडे तिकडे आदिवासींच्या प्रेतांचा खच पडला. पहाड आदिवासींच्या रक्ताने लालेलाल झाला. या हत्याकाडांत दीड हजार आदिवासी देवाघरी गेले. कित्येक हजार

जखमी झाले. त्यात पुरूष, स्त्रिया, म्हतारे-कोतारे, मुले-मुली सारेच होते. शेवटी गोविंद गुरू व त्याची पत्नी इंग्रज सोजिरांच्या हाती पडली. त्यांना अहमदाबादच्या सेंट्रल जेलमध्ये नेण्यात आले. त्यांचा विना चौकशी छळ करण्यात आला. त्याने आदिवासींची संघटना मोडून टाकावी, असे त्याला सांगण्यात आले. पण त्याला तो तयार झाला नाही. म्हणून गठरा येथल्या ठाणेदाराच्या हत्येचा आरोप त्याच्यावर ठेवण्यात आला. खोटे साक्षीदार उभे करण्यात आले व गोविंद गुरूला फाशीची शिक्षा दिली गेली. त्याच्या अनुयायांनी प्रीव्ही कौन्सिलकडे अपील केले. तेव्हा फाशी ऐवजी १० वर्षांची सक्त मजुरीची शिक्षा त्याला दिली गेली. दुसऱ्या महायुद्धानंतर इतर आरोपी बरोबर त्याचीही सुटका झाली. त्यानंतर गोविंद गुरू गुजरातमधील कम्बोई गांवी एका झोपडीत पत्नीसह राहून शेती करू लागले. तेथेच ते निजधामास गेले.



# ९५. टिकेंद्रजित सिंह

भारताच्या पूर्व सीमेवर नागालँड व मणिपूर ही दोन पहाडी राज्ये आहे. या दोन्ही राज्यांत दीर्घकालापासून हाडवैर होते. त्यांच्यात सतत लढाया होत असत. कधी नागा विजयी होत असत, तर कधी मणिपूर विजयी व्हायचे. मणिपूरचा राजा गंभीरसिंह हा कंपनी सरकारचा मित्र होता. ब्रम्हदेशाच्या युद्धात त्याने कंपनी सरकारला चांगले साहाय्य केले होते. त्याचे निधन सन १८३४ मध्ये झाले. त्यानंतर त्याचा मोठा मुलगा चंद्रकीर्तिसिंह मणिपूरच्या गादीवर आला. त्याच्या कारकीर्दीत कंपनी सरकारने आपला रेसिडेंट मणिपूरला ठेवला. चंद्रकीर्ति सिंहाने आठ विवाह केले होते. त्याने आपला मोठा मुलगा शूरचंद्र याला आपल्या उतारवयातच मणिपूरच्या गादीवर बसविले होते. तसेच आपल्या बाकीच्या मुलांनाही सन्माननीय पदे दिली होती.

टिकेंद्रजित सिंह हा चंद्रकीर्ति सिंहाच्या तिसऱ्या राणीचा मुलगा. लहानपणापासूनच थोडासा धाडसी व निडर होता. जसजसे त्याचे वय वाढत गेले तसतसे त्याच्या अंगचे गुण प्रकट होऊ लागले. रणविद्येत, घोडेस्वारीत व राजनीतीत तो निपुण झाला. शिकार करणे हा त्याचा आवडता छंद होता. अनेक वाघांना त्याने समोरासमोर तलवारीने वा भाल्याने ठार केले होते व त्या वाघांपासून आपल्या खेडोपाडीच्या जनतेचे रक्षण केले होते. त्यामुळे त्याची कीर्ती साऱ्या मणिपूर राज्यात पसरली होती. मणिपुरी जनतेच्या मनात त्याच्याविषयी फार आदर होता.

कंपनी सरकारला पूर्वेकडून चिनी सैन्याच्या आक्रमणाची भीती वाटत होती. त्यासाठी त्यांना हिंदुस्थानची पूर्वसीमा सुरक्षित करायची होती. कंपनी सरकारला पूर्व सीमेवरील गारो, खाशी, नागा व मणिपूरच्या डोंगराळ प्रदेशातून आपल्या सैन्याच्या दळणवळणासाठी रस्ते बांधायचे होते. त्यासाठी ही पूर्व सीमेवरील राज्ये आणि त्यापलीकडील ब्रम्हदेशही कंपनी सरकारला आपल्या ताब्यात घ्यायचा होता.

कंपनी सरकारने आधी नागा राज्यावर सन १८७८ मध्ये चढाई केली. त्यासाठी मणिपूरच्या राजाने सहाय्य करावे, असे कंपनी सरकारने आपल्या रेसिडेंटमार्फत चंद्रकीर्तिसिंहाला कळविले. तेव्हा टिकेंद्रजित सिंहाने आल्या सैन्यासह त्या लढाईत भाग घेऊन इंग्रजांच्या सैन्याला चांगली मदत केली. त्याने नागा सैन्याची धूळधाण उडवून दिली. इंग्रज सरकारने त्याच्या पराक्रमावर खुश होऊन टिकेन्द्रजित सिंहाला समारंभपूर्वक सुवर्णपदक प्रदान केले आणि त्याच्या सैनिकांनाही बक्षिसे दिली.

सन १८८५ मध्ये कंपनी सरकारने ब्रम्हदेशावर चढाई केली. त्या युद्धातही टिकेंद्रजित सिंहाने इंग्रज सरकारला बहुमोल मदत केली. त्या युद्धात ब्रम्हदेशाचा राजा थिबा याचा पूर्णपणे पराभव झाला. इंग्रज सरकारने त्याला हद्दपारीची शिक्षा देऊन महाराष्ट्रात रत्नागिरी येथे नजर कैदेत ठेवले. त्याला राहण्यासाठी त्याच्या खजिन्यातून पैसा खर्च करून रत्नागिराला एक महाल बांधून दिला. ब्रम्हदेशच्या युद्धात टिकेंद्रजित सिंहाने मोठा पराक्रम गाजविला. त्यात अनेक इंग्रजांचे प्राण वाचविले. टिकेंद्रजित सिंहाच्या मदतीविना इंग्रजांना ब्रम्हदेश जिंकताच आला नसता.

सन १८८६ मध्ये नागा लोकांनी मणिपूरवर हल्ला केला. तेव्हा टिकेन्द्रजित सिंहाने त्या युद्धासाठी इंग्रज सरकारकडे मदत मागितली. पण इंग्रज सरकारने मदत दिली नाही. टिकेंद्रजित सिंहाने आपल्या बाहुबलावरच नागांचा पराभव केला. त्याचे हे शौर्य पाहून राजा शूरचंद्राने त्याला सेनापतीपद दिले.

मणिपूरच्या राज्यात नंतरच्या काळात गृहकलह माजला. राजा शूरचंद्राच्या दोन सावत्र भावांनी त्याच्या महालात एका मध्यरात्री प्रवेश केला. तेव्हा शूरचंद्र खिडकीतून पळाला व त्याने रेसिडेंट ग्रिमउडचा आश्रय घेतला. रेसिडेन्सीत ग्रिमउडने त्याचे सांत्वन करून त्याला संरक्षण दिले. टिकेन्द्रजित सिंहाने मोठ्या कौशल्याने तो गृहकलह मिटविला आणि शस्त्रागार, दारूगोळा व खजिना आपल्या ताब्यात घेतला.

ग्रिमउडने शूरचंद्राच्या मनात भरविले की, या गृहकलहात टिकेंद्रजित सिंहाचाच हात आहे. ते ऐकून शूरचंद्र हताश झाला व आसामचा चीफ कमिशनर क्विंटन याला भेटावयास गेला. पण क्विंटनची व त्याची भेट झाली नाही. शेवटी शूरचंद्र कलकत्त्याला गव्हर्नरला भेटण्यासाठी निघून गेला. गृहकलह सुरू झाल्यानंतर टिकेन्द्रजित सिंहाचा एक सावत्रभाऊ कुलचंद्र हा त्या रात्री मणिपूरपासून चार कोसावरील एका गावी पळून गेला होता. टिकेन्द्रजित सिंहाने त्याला मणिपूरला आणले व शूरचंद्राच्या राजगादीवर बसवले. टिकेन्द्रजित सिंह आणि त्याच्या बाकीच्या भावांनी कुलचंद्राच्या आधीन राहून राज्यकारभार सुरू केला. परंतु आसामचा चीफ कमिशनर क्विंटन याने रेसिडेंट ग्रिमउडला कळविले की, 'कुलचंद्राला मणिपूरचा राजा म्हणून मानण्यासाठी सरकारची परवानगी घेणे अत्यावश्यक आहे.'

इंग्रजांनी आता आपले असली रूप दाखवायला सुरूवात केली. शूरचंद्रापेक्षा कमकुवत मनाचा कुलचंद्र यालाच मणिपूरच्या गादीवर ठेवावे आणि त्याच्याकडून आपल्याला हितावह अशा अटी मान्य करून घ्याव्या, असे व्हाईसराय लॅन्सडाऊन याने आपल्या अधिकाऱ्यांना सांगितले. आसामचा कमिशनर क्विंटनने त्या अटींचा मसुदा

रेसिडेंट ग्रिमवुडकडे पाठविल्या. त्या अटी अशा-

१. महाराज कुलचंद्रांनी इंग्रज सरकारची ३०० सैनिकांची फौज मणिपूरला ठेवावी व तिचा सर्व खर्च त्यांनी द्यावा.

२. महाराज कुलचंद्रांनी आसामचे पोलिटिकल एजंट यांच्या साह्याने राज्यकारभार करावा.

३. महाराज कुलचंद्रांनी टिकेंद्रजित सिंहाला सेनापतीपदावरून काढून टाकून त्याला हद्दपार करावे.

२१ मार्च १८९१ रोजी इंग्रज सरकाने महाराज शूरचंद्रांना कळविले की, 'तुम्हांला मणिपूरची गादी मिळणार नाही. त्या ऐवजी सरकारकडून तुम्हाला पेन्शन मिळेल. शूरचंद्राला त्यावरच समाधान मानावे लागले. इंग्रज सरकारने रेसिडेंट ग्रिमवुड याला गुप्त सूचना दिली की, 'कसेही करून टिकेंद्रजित सिंहाला कैद करावे. ही तर शुद्ध हरामखोरी होती. ज्या शूरचंद्राच्या सल्ल्यानुसार टिकेंद्रजित सिंहाने नागा-युद्धात व ब्रम्हदेशाच्या युद्धात इंग्रज सरकारला बहुमोल साहाय्य करून ते प्रदेश जिंकण्यास मदत केली होती, त्या शूरचंद्राला मणिपूरच्या गादीपासून वंचित ठेवायचे व टिकेंद्र सिंहाकडून सेनापती पद काढून घेऊन निर्वासित करायचे ही हरामखोरी नव्हे का ? इंग्रज सरकारचा अंतस्थ हेतू असा होता की, टिकेंद्रजित सिंहासारखा शूर व पराक्रमी लढवय्या मणिपुरात असला, तर ते राज्य आपणांस मुळीच बळकवता येणार नाही. हे टिकेंद्रजित सिंहाच्या चाणाक्ष नजरेतून सुटणेच शक्य नव्हते. म्हणून टिकेंद्रजित सिंहाला अटक करायचे रेसिडेंट ग्रिमवुडने ठरविले.

पोलिटिकल एजंट क्विंटनने मणिपूरला दरबार भरविला. त्यात टिकेन्द्रजित सिंह आजाराचे कारण दाखवून उपस्थित राहिला नाही. क्विंटनचा हेतू हा दरबार भरविण्यामागे काय आहे, हे तो जाणून होता. नंतर रेसिडेन्सीत नाचगाण्याच्या कार्यक्रमाचे आयोजन करून टिकेंद्रजित सिंहाला आमंत्रण देण्यात आले. तेव्हाही टिकेंद्रजित सिंह आजाराचे कारण दाखवून गेला नाही. नंतर रेसिडेंट ग्रिमवूड टिकेंद्रजितसिंहाला भेटण्यासाठी त्याच्या महालाकडे आला ते कळताच टिकेंद्रजितसिंह पालखीत बसून महालाबाहेर आला. ग्रिमवूड त्याला म्हणाला,

'तुम्हाला मणिपूर सोडून हिंदुस्थानात कोठेही जावे लागेल. सरकार तुम्हाला पेन्शन देईल.' त्यावर टिकेंद्रजित सिंहाने स्पष्टपणे त्याला सांगितले,

'त्याची तुम्हाला काळजी करण्याचे कारण काय? आमच्या या छोट्याशा राज्याच्या कक्षेतील बाबीसाठी आपण एवढा शीण का घेत आहात?

मी जर या राज्यात काही आपराध केला असेल, तर महाराज मला जी काही शिक्षा देतील, ते मी आनंदाने भोगीन. तुमचे सरकार आमच्या मामल्यात हस्तक्षेप करण्यासाठी एवढी उतावीळ का झाले आहे, याचे कारण तुम्ही मला सांगा.'

''सरकार तुम्ही या राज्यातून बाहेर जाण्यातच या राज्याचे कल्याण आहे, असे समजते.''

''तुमचे सरकार एवढा त्रास का घेत आहे? मी कोणता अपराध केलेला आहे, हे आधी मला सांगा.''

''सेनापती, आपण माझे पूर्वीपासूनचे मित्र आहांत. तुम्ही उदार मनाचे आहात. मणिपूर राज्यातली जनता तुम्हांला आदरणीय मानते. तुमच्यावर जनतेची अपार श्रद्धा आहे, हे मला पूर्ण माहीत आहे.''

''अस्सं! म्हणूनच तुम्ही मला या अपराधांसाठी माझ्या राज्यातून बाहेर घालवून देण्यासाठी एवढे उतावीळ झाला आहात ना?''

''तसे नाही. सरकार यासंबंधी जरूर विचार करील.''

''अस्सं! मी सारे जाणून आहे. आणखी आपणांस काही सांगायचे आहे काय?''

''मी आपणांस माझा परम मित्र समजून आपणांस सल्ला देतो की, आपण माझ्या बरोबर रेसिडेन्सीत येऊन क्विंटन साहेबांची भेट घ्यावी.''

''नाही. यावेळी माझी तब्येत ठीक नाही. म्हणून मी येऊ शकत नाही. तब्येत दुरूस्त झाल्यावर मी त्यांना भेटेन.''

ग्रिमवूड निराश होऊन रेसिडेन्सीत निघून गेला.

टिकेंद्रजित सिंहाने सावध होऊन आपल्या महालाच्या व आसपासच्या भागाच्या संरक्षणाची व्यवस्था केली. महालाभोवती व महत्वाच्या ठिकाणी सशस्त्र सैनिक तैनात केले. सैनिकांना पुढच्या संकटाची कल्पना देऊन त्यांना सतर्क राहण्याच्या सूचना दिल्या. तिकडे रेसिडेन्सीतील इंग्रज अधिकाऱ्यांनी ठरविले की ''आजच टिकेंद्रजितसिंहाला कसेही करुन पकडायचेच.''

त्याच दिवशी मध्यरात्रीनंतर क्विंटन, कॅप्टन बूचर आदी काही इंग्रज अधिकारी आपले सैन्य घेऊन टिकेन्द्रजितसिंहाच्या महालावर चालून आले. बूचर महालाच्या

भिंतीला शिड्या लावून काही सैनिकांसह महालाच्या आवारात उतरला. महालाच्या सगळ्या खोल्यांत त्याने टिकेंद्रजितसिंहाचा शोध घेतला. पण महालात कोणीही नव्हते. टिकेंद्रजितसिंह अंधार पडल्यावर सहकुटुंब सुरक्षित ठिकाणी निघून गेला होता. इंग्रजांचे सैन्य चालून आलेले पाहून मणिपूरी सैन्याने त्याच्यावर हल्ला केला. मणिपूरी जनताही आपापली शस्त्रे घेऊन धावून आली. घनघोर युद्ध झाले. त्यात कित्येक इंग्रज सैनिकांचे मुडदे पडले. टिकेंद्रजितसिंहाला कैद करण्यासाठी जे इंग्रज आले होते, त्यांनाच आता आपला जीव कसा वाचवावा याची काळजी वाटू लागली.

रेसिडेन्सीवरही मणिपुरी सैन्याने व जनतेने हल्ला केला. चहुबाजूंनी गोळीबार होत होता. टेलिग्राफचे तार त्यांनी तोडून टाकले. इंग्रज अधिकारी आता विचार करू लागले की, ''सगळी भानगड तर आपणच निर्माण केली आहे. तेव्हा ही लढाई बंद करणेच आपल्याला हितावह होईल.'' म्हणून त्यांनी युद्धबंदीचा बिगुल वाजविला. तो आवाज ऐकल्यावर टिकेंद्रजितसिंहाने आपल्या सैनिकांना युद्ध बंद करण्याचा आदेश पाठविला. लढाई बंद झाली. मणिपूरवाल्यांच्या या व्यवहाराची प्रशंसा इंग्रजांच्या सैन्यातील गुरखे सैनिक उघडपणे करू लागले.

क्विंटनने महाराज कुलचंद्र यांना एकपत्र पाठविले. ''तुम्ही कोणत्या अटीवर आमच्या रेसिडेन्सीवर होणारा गोळीबार बंद करू शकाल ?'' तो, ग्रिमवूड, कर्नल स्कीन यापुढे काय करायचे याचा विचार करीत बसले असतांना कुलचंद्रांचे पत्र घेऊन एक शिपाई रेसिडेन्सीत आला. कुलचंद्राने लिहिले होते की, ''तुमच्याशी लढाई, झगडा करण्याची आमची किंचितही इच्छा नाही. तुम्हीच आधी आमच्यावर आक्रमण केले. तुम्ही जर पूर्णपणे शस्त्र-त्याग केला, तरच आम्ही संधी करण्यास तयार असू.''

क्विंटनने त्या शिपायाला विचारले, ''या वेळी सेनापती टिकेंद्रजितसिंह भेटू शकतील?'' शिपाई उत्तरला, ''हो, जरूर भेटू शकतील.'' त्याच्या उत्तराने क्विंटनच्या आशा पल्लवित झाल्या. रात्री साडे आठ वाजता क्विंटन, ग्रिमवूड, कर्नल स्कीन, सिम्पसन, कझिन्स व एक बिगुलची राजाकडे आले. टिकेंद्रजितसिंह ही तेथेच होता. तो म्हणाला, ''तुमच्या व्यवहाराने आम्ही भ्यालो आहोत. तुम्ही जर तुमच्या शस्त्रांचा पूर्णपणे त्याग केला नाही, तर तुमच्या बोलण्यावर आम्ही मुळीच विश्वास ठेवणार नाही.'' टिकेंद्रजितसिंहाची ही अट त्या इंग्रज अधिकाऱ्यांना अपमानास्पद वाटली व ते दरबारातून बाहेर पडले. ''यांना बाहेर पोचवून या.'' असे टिकेंद्रजितसिंहाने आपला भाऊ अंगेय भिंगवोला सांगितले व तो आपल्या महालात निघून गेला.

इंग्रज अधिकारी दरबारातून बाहेर आले, तेव्हा अचानक अनेक सशस्त्र मणिपुरी सैनिक व जनताही आपली शस्त्रे घेऊन गर्दी करून उभी होती. इंग्रजांवर संतापलेल्या एका मणिपुरी शिपायाने आपली तलवार उपसून लेफ्टनंट सिम्पसनवर वार केला. एका शिपायाने ग्रिमवूडला लक्ष्य करून त्याच्या अंगावर असा भाला मारला की, तो भाला त्याची छाती छेदून गेला. ग्रिमवूड तात्काळ कोसळून मरण पावला. जनताही भयंकर खवळून उठली. तेव्हा एका मणिपुरी जमादाराने उरलेल्या पाच इंग्रज अधिकाऱ्यांना सुरक्षितपणे एका खोलीत बंद केले ही आरडाओरड ऐकताच टिकेंद्रजितसिंह लगेच तेथे आले व त्यांनी अंगेय मंगतो याला त्या अधिकाऱ्यांचे संरक्षण करण्यास सांगून ते निघून गेले.

मणिपूरचे माजी सेनापती त्यानंतर तेथे आले. इंग्रजांच्या कारवायांमुळे ते आधीच संतप्त झाले होते. त्यांनी त्या खोलीचे रक्षण करणाऱ्या आपल्या शिपायांना आज्ञा केली की, "त्या पाचही हरामखोरांना बाहेर काढा व त्यांची कत्तल करा." त्या शिपायांनी पोलिटिकल एजंट क्विंटनसह सर्व इंग्रज अधिकाऱ्यांची मुंडकी उडविली व त्यांना एका खड्ड्यात गाडून टाकले.

रात्री एक वाजला, तरी आपले अधिकारी दरबारातून रेसिडेन्सीत परत आले नाहीत, हे पाहून रेसिडेन्सीतले सारे इंग्रज स्त्री-पुरूष घाबरले. उन्मत्त जनतेचा आरडाओरडा ऐकल्यावर त्यांना आपल्या प्राणांची भिती वाटू लागली व ती सगळी इंग्रज मंडळी गुरखा शिपायांसह रात्रीच त्या डोंगराळ जंगलातून मणिपूर राज्यातून बाहेर जाण्यासाठी निघाली. काही दिवस अन्नावाचून त्या जंगलातून चालत होते. वाटेतच अनेक इंग्रज स्त्री-पुरूष व मुले आणि गुरखे तहान-भुकेने मरण पावले. पुढे गेल्यानंतर इंग्रज सैन्य येतांना दिसले व त्यांच्या जीवत जीव आला. इंग्रज सरकारला मणिपूरची हकीकत समजल्यानंतर तीन बाजूंनी मोठमोठे सैन्य मणिपूरवर हल्ला करण्यासाठी पाठविण्यात आले. याची कल्पना टिकेंद्रजितसिंहला होतीच. म्हणून तो, राजा कुलचंद्र व थंगाल हे सारे आपल्या कुटुंबासह एका सुरक्षित गावी निघून गेले होते. इंग्रज सैन्याने मणिपुरात प्रवेश केला, तेव्हा त्या नगरीत फक्त १०/१५ लोकच होते. सगळे महाल मोकळे होते. त्या महालात इंग्रज सेनाधिकारी राहू लागले. त्यांनी टिकेंद्रजित सिंह, कुलचंद्र व थंगाल यांचा तपास चालविला. त्या तिघांना पकडून देणाऱ्यास हजारो रूपये बक्षीस म्हणून दिले जातील, असे जाहीर केले.

आपल्या देशात पैशाचे लोभी फितुर व सत्ता लोभी निमक-हराम यांची कमी नाही. आपल्या इतिहासात अनेक प्रसंगी असे दिसून आले आहे. मणिपूर राज्यातील काही फितुरांनी टिकेंद्रजित सिंह, कुलचंद्र व थंगाल हे तिघे कोणत्या गावात आहेत, हे त्या

इंग्रज अधिकाऱ्यांना सांगितले. त्यांनी मोठे सैन्य त्या गावी पाठवून टिकेंद्रजित सिंह, कुलचंद्र व थंगाल यांना अटक केली. सन १८९१ मध्ये त्यांच्यावर दावा लावला. त्या तिघांना फांशीची शिक्षा देण्यात आली. अंगेय मंगतो याला मणिपूरमधून निर्वासित केले. त्याबरोबर मणिपुरी जनता गुलामीत अडकली, ती कायमचीच. इंग्रजांचा हेतू पूर्ण झाला. राजा कुलचंद्र, टिकेंद्रजित सिंह व माजी सेनापती थंगाल यांना फांशी देण्यात आले. मणिपूरचे उदाहरण हे इंग्रजांच्या कुटिल कारवायांचे व गुंडगिरीचे एक दुर्दैवी दर्शन आहे, यात शंकाच नाही. टिकेंद्रजित सिंहाची विधवा पत्नी कशी तरी मथुरा-वृंदावनला पोचली व दारिद्र्यात आपले उर्वरित आयुष्य व्यथित मनाने घालवू लागली. उतारवयात ती आंधळी झाली. तेव्हा तिचे किती हाल झाले असतील व तिचा अंत कसा झाला असेल, हे सांगता येत नाही. या देशातला एकही सतीचा लाल तिच्या मदतीसाठी पुढे आला नाही, हे आपल्या देशास लांच्छनास्पद नव्हे काय ?



# ९६. जोरिया भगत

गुजरात राज्यातील रेवाकाठा व पंचमहाल जिल्ह्यातील डोंगरदऱ्यांत आणि घनदाट जंगलांत नायकदास नावाच्या आदिवासींची संख्या मोठ्या प्रमाणात आहे. त्यांचे जीवन जंगलावरच अवलंबून असते. या भागातील जम्बुगोडा गावाजवळील बडेक गावातील नायकदास जातीत जोरियाचा जन्म झाला होता. बालपणापासूनच जोरियाचा ओढा ईश्वरभक्तीकडे होता. ईश्वर-भजनातच त्याचा अधिकाधिक वेळ जायचा. त्याच्या जातीच्या लोकांना वाटू लागले की, जोरियात ईश्वराचा अंश आहे. म्हणून ते जोरियासह ईश्वरभक्ती करू लागले. जोरियाचे नाव त्या प्रदेशात प्रसिद्ध झाले. त्याचे सात्विक राहणीमान पाहून त्याच्या अनुयायांची संख्या झपाट्याने वाढू लागली. नायकदास जातीचे लोक जोरियाचा आशीर्वाद मिळाल्यावर स्वतःला धन्य मानू लागले. त्याच्या अनुयायांची संख्या कित्येक हजारांपर्यंत पोचली. त्याचे अनुयायी त्याला 'जोरिया भगत' असे आदराने संबोधू लागले.

संघटनेची शक्ती जबरदस्त असते. हे जोरिया भगताला जाणवू लागले. एवढे लोक आपल्या पाठीशी असूनही आपल्यावर विदेशी इंग्रज राज्य करतात, याची खंत त्याला सतत वाटत होती. अशा मनस्थितीत असतांना रूपा नायकदास हा तरूण त्याच्या संपर्कात आला. त्याचा अनन्य भक्त बनला. रूपाला सुद्धा इंग्रजांच्या जाचक राजवटी-विषयी अतिशय घृणा वाटत होती. जोरिया भगत आणि रूपा यांनी इंग्रजांच्या अत्याचारी राजवटीतून आपल्या मातृभूमीला मुक्त करण्याचा संकल्प सोडला. आदिवासी जमातीचे लोक काटक, धाडसी व बलदंड असतात. हजारोंच्या संख्येने असलेले जोरिया भगताचे अनुयायी इंग्रजांना पुरून उरतील, असे रूपाला वाटत होते. त्याने आपले नायकदास जमातीचे हजारो लोक इंग्रजांशी दोन दोन हात करण्यासाठी संघटित केले.

इंग्रज अधिकाऱ्यांना जोरिया भगताच्या हालचालींच्या बातम्या कळतच होत्या. जोरियाने उठविलेल्या या वादळाला दडपून टाकण्यासाठी कारवाई इंग्रज अधिकाऱ्यांनी सुरू केली. जोरियाच्या नेतृत्वाखाली हजारो नायकदास वीर राजगड ठाण्याकडे निघाले. तेथे इंग्रजांचे शिपाई मोठ्या संख्येने उपस्थित होते. त्यांच्या प्रमुखाने विचारले, "जोरियात अशी कोणती मोठी शक्ती आहे की, तुम्ही सारे त्याच्या भजनी लागला आहांत." हे ऐकताच जोरियाच्या तरूण मुलाने - गलसियाने - तात्काळ तलवार उपसून त्या इंग्रज अधिकाऱ्याचे शिर आपल्या तलवारीने उडवत उत्तर दिले, "त्यांच्या हातात मौत आहे, म्हणून." आपल्या प्रमुखाची ही अशी गत झालेली पाहताच इंग्रजांचे सैन्य घाबरले व पळून गेले, राजगड जोरिया भगतच्या ताब्यात आला.

आता जोरिया भगताने आपला मोर्चा जम्बुगोडा या नगराकडे वळविला. तेथेही त्यांनी इंग्रजांच्या सैन्यावर विजय मिळविला. ही बातमी ऐकताच गुजरातमधील इंग्रज अधिकारी संतप्त झाले आणि जोरिया भगताचा विद्रोह दडपून टाकण्यासाठी जम्बुगोडाकडे मोठे सैन्य त्यांनी पाठविले. जम्बुगोडा येथे नायकदास वीरांची आणि इंग्रज सेनेचे तुंबळ युद्ध झाले. परंतु इंग्रजांच्या बंदुकांपुढे नायकदासांचे धनुष्यबाण, तलवारी, भाले, बरच्या टिकू शकल्या नाहीत. जोरिया भगताला समजून चुकले की, इंग्रजांच्या बंदुकांनी आपले वीर नाहक मरतील. म्हणून त्याने आपल्या वीरांना बडेक गावाकडे माघार घ्यायचा हुकूम दिला. त्यांनी माघार घेतली, तेव्हा इंग्रज सैन्याला चेव आला. त्याने नायकदासांचा पाठलाग सुरू केला. मध्येच पुराने दुथडी भरून वाहणारी नदी असल्याने नाईलाजास्तव नायकदास वीरांना थांबावे लागले. इंग्रजांच्या सैन्याने चहुबाजूंनी त्यांना घेरले व बंदुकांच्या गोळ्यांनी त्यांच्यावर भयंकर मारा केला. अनेक नायकदास वीर पळून गेले. जोरिया भगत, त्याचा मुलगा गलसिया व रूपा हे सुद्धा पसार झाले.

जोपर्यंत जोरिया, गलसिया व रूपा जिवंत आहेत, तो पर्यंत त्यांचे बंड शमणार नाही, या विचाराने इंग्रजांनी त्यांचा कसून शोध घेतला. रेवाकाठा पंचमहाल जिल्ह्यातील डोंगरदऱ्या पिंजून काढल्या आणि या तिघांना पकडले. त्यांना विनाचौकशी फासावर लटकावले. स्वातंत्र्याच्या बलिवेदीवर या तिघा वीरांनी सन १८९६ मध्ये आपली आत्माहुती दिली. अजूनही या तिघां वीरांच्या कथा त्या प्रदेशात गाण्यांमधून गायिल्या जातात. प्रस्थापितांना मात्र त्यांचे स्मरण राहीले नाही, हे या भूमीचे दुर्दैवच म्हणावे लागेल.



# ९७. चाफेकर बंधू

सन १८७९ मध्ये वासुदेव बळवंत फडके यांनी १८५७ च्या स्वातंत्र्य संग्रामानंतर महाराष्ट्रात पहिला उठाव इंग्रज सरकारविरूद्ध केला. त्यांना इंग्रज सरकारने आजन्म कारावासाची शिक्षा दिली. तुरुंगात त्यांचे फार हाल झाले व अखेर त्यांना क्षयरोग होऊन १८८३ साली त्यांचे निधन एडनच्या तुरुंगात झाले. याचा परिणाम पुण्यातील सुशिक्षित तरुणांवर झाला आणि त्यांच्या मनांत इंग्रज सरकारविरूद्ध क्रोध धुमसू लागला. अशा तरुणांत दमोदर हरी चाफेकर व त्यांचे बंधू यांचा उल्लेख प्रामुख्याने करावा लागेल.

कीर्तनकार हरिपंत चाफेकर यांचे जेष्ठ पुत्र दामोदरपंत होते. बाळकृष्ण व वासुदेव हे त्यांचे कनिष्ठ बंधू होते. दामोदरपंतांचा जन्म २५ जून १८६९ रोजी पुण्याजवळच्या चिंचवड गांवी झाला. त्यांचे शिक्षण तेथेच झाले. हरिपंत नंतर पुण्यास येऊन राहिले. त्यांना दामोदरपंत व त्यांचे बंधू कीर्तनात साथ देत असत. दामोदरपंतांचा कल लष्करी शिक्षणाकडे होता. त्यांनी लोकमान्य टिळकांच्या साह्याने लष्करी शिक्षण कोठेतरी व्हावे, म्हणून प्रयत्न केला. पण त्यात त्यांना यश आले नाही. त्यांनी आपला कीर्तनकाराचा पिढीजात व्यवसाय पुढे चालू ठेवला. पण त्यांचे तरूण रक्त त्या व्यवसायात रमेना. म्हणून त्यांनी अनेक तरूण संघटित करून 'आर्यधर्म प्रतिबंध निवारक मंडळी' ही गुप्त संघटना स्थापन केली. त्यांना व्यायामाचा, भाले, तलवारी चालविण्याचा छंद होता. ती शस्त्रेही त्यांनी जमविली होती. त्यांचे बंधू व अन्य काही तरुणही या छंदास लागले. पुढे त्यांनी पिस्तुले मिळवून नेमबाजी करण्यात प्रावीण्य मिळविले. इंग्रज सरकार विषयी त्यांच्या मनात भयंकर असंतोष खदखदत होता. एकदा त्यांनी मुंबईतील व्हिक्टोरिया राणीच्या पुतळ्यावर डांबर ओतले व त्या पुतळ्याच्या गळ्यात फाटक्या जोड्यांची माळ घातली. पण मुंबईच्या पोलिसांना हे कृत्य करणाराचा तपास कधीच लागला नाही.

महाराष्ट्रात १८९६ साली प्लेगची साथ सुरू झाली. पुण्यात तर ती वेगाने पसरली. अशा वेळी आपले घर रिकामे करून जवळपासच्या माळावर झोपड्या बांधून रहायचे असते. सरकारने प्लेगच्या साथीला आळा घालण्याचे योग्य उपाय केले नाहीत. फक्त पुण्यातील लोकांनी घरे रिकामे करून पुण्याबाहेर साथ संपेपर्यंत रहावे असा आदेश काढला. लोकांना या रोगाचे ज्ञानच नव्हते. सरकारने रँड नावाच्या जुलमी अधिकाऱ्याला प्लेग निवारण कार्यासाठी साताऱ्याहून पुण्याला पाठविले. त्याला सरकारने अमर्यादित अधिकार दिलेले होते. तो जुलमी व उन्मत्त अधिकारी आहे, हे सातारच्या लोकांनी पुण्यातल्या काही लोकांना आधीच सांगितले होते. त्याच्याबरोबर गोऱ्या शिपायांची मोठी तुकडी होती. त्या शिपायांनी रँडच्या सांगण्यावर पुण्यातली घरे 'साफ' करण्याचा सपाटा

लावला. ते बुटांसह घरात शिरत. पुरुषांना अपमानित करून घरातले समान रस्त्यावर फेकून देत. त्या घरातले देव्हाऱ्यातले देवही रस्त्यावर पडत. घरातले सोनेनाणे लुटून स्त्रियांची अब्रूही घेत असत. रँड हा पुण्यातल्या जनतेला प्लेगपेक्षाही घातक ठरला. रँडच्या या अत्याचारांविरूद्ध लोकमान्य टिळकांनी आपल्या केसरी व मराठा वृत्तपत्रांतून टीकेची झोड उठविली. रँडशाहीच्या या जुलमी कृत्यांचा दामोदरपंत चाफेकरांना भयंकर राग आला. रँडला संपविण्याशिवाय आता दुसरा इलाज नाही, असे त्यांनी ठरविले. आगरकरांनीही आपल्या 'सुधारक' पत्रात रँडशाहीवर टीका केली. त्याचा साथीदार आयहर्स्ट हा सुद्धा त्याच्या सारखाच होता. 'इतके दिवस हे गोरे शिपाई प्लेग निवारणाच्या नावाखाली घराघरातून चोऱ्या करीत होते. आता तर बायकांच्या अंगावर हात टाकण्यापर्यंत त्यांची मजल गेली. खरोखर आमच्या लोकांसारखे नामर्द लोक पृथ्वीच्या पाठीवर नसतील! अरे, भागुबाईसारखे रडता काय? या आडदांडांना कायदा शिकवा... या खोंडांनी तुम्हाला डिवचले, तुमच्या आयाबहिणी, लग्नाच्या बायका यांची विटंबना केली. तरी तुम्ही संथ ते संथच! धिक्कार असो अशा समाजाला!'

चाफेकरांच्या आर्यधर्म प्रतिबंध निवारक मंडळीचे तरुण सभासद दररोज तालमीत बलोपासनेस जात असत. तेथे त्यांची रँडच्या जुलमासंबंधी चर्चा होत असे. त्यांचे बाहू सूड घेण्यास फुरफुरत असत. एकदा दामोदरपंत या संबंधात लोकमान्य टिळांना भेटले. तेव्हा टिळक म्हणाले, ''या शिपायांना शिक्षा देऊन काय होणार? ते फक्त त्यांच्या अधिकाऱ्याची आज्ञा पाळतात. त्यांचे मुख्य अधिकारी हे या प्रकरणी दोषी आहेत.'' टिळकांच्या बोलण्यावरून दामोदरपंतानी रँडला उडविण्याचा निश्चय केला.

दामोदरपंत, त्यांचे भाऊ व त्यांच्या सहकाऱ्यांनी रँड, आयहर्स्ट यांना पाहिलेच होते. त्यांचे चेहरे या मंडळीच्या ओळखीचे झाले होते. दामोदरपंतांनी पिस्तुले मिळविली. त्यांनी व त्यांच्या भावांनी अचूक नेम साधून पिस्तुलातून गोळ्या झाडण्याचा सांगला सराव केला. आता प्रत्यक्ष कृती केव्हा व कशी करायची. हाच प्रश्न होता. त्यांचा तो प्रश्न लवकरच सुटला.

२२ जून १८९७ रोजी व्हिक्टोरिया राणीच्या राज्यरोहणाचा हीरक महोत्सव होता. पुण्याच्या गणेशखिंडीतील गव्हर्नरच्या निवासस्थानी त्या महोत्सवाची तयारी आधीच चालू होती. हे वर्तमानपत्रांतून जनतेला समजत होते. गणेश खिंडीत रोषणाई करण्यात आली होती. दारूकामही होणार होते. पुण्या भोवतालच्या टेकड्यांवर होळ्या पेटविण्यात आल्या होत्या. मेजवानीचाही उत्कृष्ट थाट करण्यात आला होता. दामोदरपंतांनी आपला लहान भाऊ बाळकृष्ण याला बरोबर घेतले. दोघांजवळ भरलेली पिस्तुले होती.

दामोदरपंतांनी आपल्या उपरण्यात तलवारही लपवून नेली. त्यांचे एक सहकारी भिडे हे आधीच समारंभाच्या ठिकाणी गेले होते. भिडे यांचे काम रँड समारंभातून केव्हा परतेल, याची बातमी चाफेकरांना देण्याचे होते. दोघे चाफेकर बंधू गणेशखिंडीच्या रस्त्याच्या कडेच्या झाडीत लपून उभे होते. परवलीचा शब्द 'गोंद्या आला रे' असा ठरला होता. मध्यरात्रीचा सुमार होता. दामोदरपंतांनी आपली तलवार शेजारच्या मोरीत लपवून ठेवली होती. मध्यरात्रीचा सुमार होता. 'गोंद्या आला रेऽऽ' हा परवलीचा शब्द चाफेकर बंधूंच्या कानी पडला. ते रस्त्यावर अंधारात उभे राहिले. रँडची घोडागाडी जवळ येताच दामोदरपंतांनी त्यां गाडीच्या मागच्या पाट्यावर उडी घेतली व रँडच्या पाठीवर पिस्तुलाने गोळी झाडली. रँड ठार झाला. पुन्हा 'गोंद्या आला रेऽऽ' अशी आरोळी एकू आली आणि दुसरी घोडागाडीजवळ येताच बाळकृष्णपंतांनी तिच्या मागच्या पाट्यावर उडी घेवून गाडीतील पुरुषाच्या पाठीत गोळ्या झाडल्या. दारूकाम चालू असल्याने फटाक्यांचे आवाज वरचेवर होत होते. त्यांत पिस्तुलांच्या गोळीबारांचे आवाज सामावून गेले. रँड व आयहर्स्ट ठार झाले, हे कोणाच्याही लक्षात लवकर आले नाही. दोघे चाफेकर बंधू व भिडे पसार झाले. ते घरी परतले व त्यांनी आपली पिस्तुले एका विहिरीत टाकून दिली. दामोदरपंत मुंबईस येऊन आपला कीर्तनाचा व्यवसाय करू लागले. खुन्यांचा तपास लावून देणारास सरकारने वीस हजारांचे बक्षीस जाहीर केले. त्यानंतर बाळकृष्णपंत फरार झाले.

पुण्यात अधिक पोलिस आणण्यात आले. त्यांचा खर्च सरकारने पुणेकरांवर लादला. जिकडे तिकडे पोलिसांचा बंदोबस्त सुरू झाला. खुनी कोण, याचा तपास सुरू झाला. मुंबईहून पोलिस सुपरिंटेंडेंट ब्रुईन चार पोलिस प्रमुखांसह पुण्यात आला. तो उत्तम मराठी बोलणारा व मोठा बुद्धिमान होता. पोलिस तपासात गणेशखिंडीच्या रस्त्यावरील मोरीत एक तलवार पोलिसंच्या हाती आली. तिला उपरण्याची एक चिंधी चिकटलेली होती.

पुण्यातील गणेश शंकर द्रविडचा लहान भाऊ नीलकंठ द्रवीड हा चाफेकरांच्या संघटनेचा सदस्य होता. गणेश द्रवीडला चोरीच्या अपराधाबद्दल तीन वर्षे सश्रम कारावासाची शिक्षा झाली होती. ब्रुईन साहेबाने त्याला गाठले. माझी कैदेतून सुटका सरकार करीत असेल, तर मी खून करणाऱ्यांचा शोध लावून देईन, असे गणेशने ब्रुईन साहेबाला सांगितले व त्याला पुण्याला आणले. गुप्तहेर त्यांच्या पातळीवर होतेच. खुनी माणसाचे नाव सांगितले व ते खरे ठरले, तर त्याला त्याची पूर्वीची नोकरी देण्याचेही ब्रुईन साहेबाने मान्य केले होते.

गणेश द्रविडने दामोदरपंतांचे नाव ब्रुईन साहेबांना सांगितले. लगेच संशयित आरोपी म्हणून दामोदरपंतांना पकडण्यात आले. मुंबईहून त्यांना पुण्यास आणण्यात आले. ब्रूईन साहेबाने दामोदरपंताशी प्रेमाने वागून, त्याच्या खाण्या-पिण्याची, राहण्याची उत्तम व्यवस्था ठेवून, त्याला आश्वासने देऊन युक्तीने या प्रकरणाची सर्व माहिती त्यांच्याकडून लेखी स्वरुपात काढून घेतली. त्यावरून दामोदरपंत यांच्यावर गुन्हा नोंदविला. बाळकृष्णपंतांना फरार म्हणून घोषित करण्यात आले. कोर्टात दामोदरपंतांनी स्पष्टपणे सांगितले की, "मीच रँडचा खून केला व माझा भाऊ बाळकृष्ण याने आयहर्स्टचा खून केला."साक्षीदार म्हणून नीळकंठ द्रविड याची साक्ष महत्त्वाची ठरली. दामोदरपंतांना फाशीची शिक्षा देण्यात आली. ते समजताच त्यांची आई बेशुद्ध होऊन मरण पावली. बाळकृष्ण व वासुदेव हे दोघे चाफेकर बंधू सव्वा वर्ष अज्ञातवासात राहिले. अज्ञातवासास कंटाळून वासुदेवराव मुंबईत प्रकट झाले. त्यांना पुण्यात आणून नजर कैदेत ठेवले व त्यांच्याकडून बाळकृष्णपंतांचा पत्ता काढून घेण्यासाठी पोलिसांचे प्रयत्न सुरू झाले. या प्रकरणी पुण्यात कित्येक तरुणांना अटकेत ठेवण्यात आले होते. ते बाळकृष्णपंतांच्या मनाला बोचत होते. म्हणून ते स्वतःहून स्टीफनसन साहेबांच्या बंगल्यात जाऊन प्रकट झाले. त्यांना लगेच अटक झाली. त्यांच्यावरही गुन्हा नोंदविला. त्यांचा खटला चालू झाला. वासुदेवराव आता मुक्त झाले होते.

गणेश व नीलकंठ या दोन्ही द्रविड बंधूंनी आपल्या बंधूंची नावे पोलिसात सांगितल्यावरून त्यांना अटक झाली व त्यांच्यावर कार्टात दावा लावला गेला. दामोदरपंतांना फाशीची शिक्षा याच द्रविड बंधूमुळे झाली. म्हणून वासुदेवराव चाफेकर व महादेव रानडे यांनी त्यां दोन्ही बंधूंना यमसदनास पाठविण्याची प्रतिज्ञा केली. सदाशिव पेठेतील मुरलीधर मंदिराच्या गल्लीत द्रविड कुटुंब राहात होते. रात्रीच्या अंधारात वेषांतर करून वासुदेव व महादेव यांनी द्रविड बंधूंना बाहेर बोलावले व तुम्हांला ब्रुईनसाहेबांनी ताबडतोब बोलावले, असे त्यांना सांगितले. ते दोघे बंधू त्यांच्या बरोबर चालू लागताच वासुदेवाने व महादेवाने पिस्तुलातून गोळ्या झाडून त्यांना ठार केले. व ते पसार झाले. हे पोलिसांना समजल्याबरोबर पोलिस अधिकाऱ्यांनी पुणे शहराची नाकेबंदी केली. या प्रकरणी कडक तपासणी सुरू झाली. अखेर वासुदेव व महादेव यांनाही पकडण्यात आले. वासुदेवरावांनी कोर्टात सांगितले की, "द्रविड बंधूंची हत्त्या करून आम्ही माझ्या भावांच्या विश्वासघाताचा सूड घेतला." बाळकृष्णपंतांना फाशीची शिक्षा झालीच होती. आता वासुदेव चाफेकर व महादेव रानडे यांनाही फाशीची शिक्षा देण्यात आली. त्यांचा साथीदार साठे याला १० वर्षाची सश्रम कारावासाची

शिक्षा देण्यात आली. ८ मे १८९९ रोजी दामोदरपंत, बाळकृष्णपंत व वासुदेवराव चाफेकर या तिघां बंधूंना येरवडा तुरुंगात फासावर लटकविण्यात आले. १० मे १८९९ रोजी महादेव रानडे याला त्याच तुरुंगात फाशी देण्यात आले. खंडेराव साठे याचेकडून १८९९ ते १९०४ पर्यंत दररोज ३५ पौंड धान्य दळण्याचे काम देण्यात आले होते. चाफेकरांचे वडील हरिपंत हे तिघा मुलांच्या अशा मृत्यूच्या धक्क्याने १९०० साली मरण पावले. या पाचही क्रांतिकारकांच्या कार्याने सारे पुणे शहर हादरले. इंग्रज अधिकारीही सावधगिरीने वागू लागले. त्यांच्या नंतर अनेक वर्षांनी गोगटे या तरुणाने हॉटसन या इंग्रज अधिकाऱ्याला मारण्याचा प्रयत्न केला. बाकी पुणे तसे शांतच राहिले. बेचाळीसच्या चलेजाव चळवळीत नारायण दाभाडे हा १७ वर्षांचा मुलगा काँग्रेस भवनावर तिरंगी झेंडा फडकवितांना पोलिस अधिकाऱ्याच्या गोळीला बळी पडला.



# ९८. बिरसा मुंडा

सन १७८९ मध्ये कंपनी सरकाने १२५०० चौ. मैल क्षेत्राचा छोटा नागपूर विभाग आपल्या आधिपत्याखाली आणला. हा सारा डोंगराळ प्रदेश. त्यातले प्रमुख रहिवासी कोल जमातीचे आदिवासी. ते सारे शेती करीत व जंगलावर निर्भर राहात. त्यांच्या प्रत्येक गावच्या प्रमुखाला मुंडा असे म्हणत असत. या भागातील शेतीवरील व इतर करांच्या वसुलीसाठी इंग्रजांनी परप्रांतातील ठेकेदार आणले होते आणि मोगली सत्तेच्या करांच्या दुपटी-तिपटीने या लोकांवर कर लादले होते. हे ठेकेदार मनमानीपणे जादा कर वसूल करीत व ज्यांना कर भरता येत नसत, त्यांच्या जमिनी बळकावीत. त्यामुळे ते बडे जमीनदार बनले होते. त्यामुळे हजारो आदिवासी भूमिहीन बनले व नगण्य मजुरीवर त्या जमिनदारांच्या जमिनीत मजुरी करू लागले. त्यामुळे ते अन्नाला मोताद झाले. शिवाय जमीनदारांना पालखीतून वाहून नेणे, त्यांची सर्वतोपरी विनामूल्य सेवा करणे, त्यांचे चैनबाजीचे सर्व प्रकारचे खर्च भागविणे या आदिवासींना सक्तीचे होऊन बसले. त्यांच्या पूर्वापार न्यायपंचायतीची व्यवस्था इंग्रजांनी मोडून काढली व आपली न्यायदान-पद्धती सुरू केली. त्यासाठी वकील आले. मुकादम्यांचा खर्च लोकांना पेलवेनासा झाला. त्यामुळे हे लोक संत्रस्त झाले व कंगाल बनले. तशात या भागात खिस्ती मिशनरी आले. त्यांनी प्रलोभने दाखवून या लोकांना खिस्ती बनविण्याचा सपाटा सुरू केला. जो कोणी खिस्ती होई, त्याला करात सूट मिळे व त्याची जमीनही जप्त होत नसे. त्यामुळे हे हजारो आदिवासी खिस्ती बनले. त्यांचा मूळचा धर्म बुडाला. परिणामतः अनेक आदिवासी बंडखोर बनले व त्यांनी इंग्रज अधिकाऱ्यांशी, ठेकेदारांशी नव्या जमीनदारांशी, खिस्ती मिशनऱ्यांशी अनेक वेळा लढे दिले; पण ते इंग्रजांच्या आधुनिक शस्त्रबळामुळे निष्प्रभ ठरले. हे लढे एकोणवीसाव्या शतकाच्या अखेरपर्यंत चालूच राहिले. शेवटचा सर्वात मोठा लढा दिला बिरसा मुंडाने.

बिरसा मुंडाचा जन्म तमार ठाण्याअंतर्गत चालकाड या गावी १५ नोव्हेंबर १८७५ रोजी झाला. त्याच्या बापाचे नाव सुगना मुंडा. त्यालाही आपल्या सगळ्या कुटुंबियांसह खिस्ती धर्माचा स्वीकार करावा लागला होता. त्यामुळेच बिरसाचे प्राथमिक शिक्षण बुर्जू येथील जर्मन मिशनच्या शाळेत सुरू झाले. त्यानंतर तो पुढील शिक्षणासाठी चाईबासा येथील लूथरन मिशनच्या शाळेत दाखल झाला. तेथेच त्याला खिस्ती मिशनऱ्यांच्या कारवाया समजून आल्या. त्यामुळे त्याच्या मनात इंग्रज सरकारविषयी अत्यंत तिरस्कार निर्माण झाला. नंतर त्याने आपल्या सर्व कुटुंबियांसह त्या अन्यायी लोकांच्या खिस्ती धर्माचा त्याग केला. पुढे तो तोडन ठाण्याअंतर्गत गोडबेडा येथील आनंद पांडे या गुरुंच्या

संपर्कात आला. त्यांनी त्याला रामायण-महाभारतातील कथा शिकविल्या व आयुर्वेदाचेही ज्ञान दिले. त्यांच्यासमोर त्याने आपल्या धरतीला इंग्रजांच्या जुलमी शासनाच्या जाचातून मुक्त करण्याची घोर प्रतिज्ञा केली. गुरु आनंद पांडे यांनीही त्याला आशीर्वाद दिला. बिरसाच्या मनावर हिंदू धर्मातील आदर्श तत्त्वांचा प्रभाव पडला व तो वैष्णव बनला. त्याने शिकार करणे सोडून दिले. आपल्या लोकांच्या मनात नैतिक गुण विकसित करण्यासाठी त्याने गावोगावी दौरे सुरू केले.

बिरसाचे व्यक्तिमत्व अत्यंत प्रभावी होते. गोरापान अत्यंत तेजस्वी, उंच तगडा, प्रसन्नमुख, कपाळावर चंदनाचा टिळा, गळ्यात जानवे, डोक्याला फेटा, पायात खडावा असे त्याचे रुप सर्वांनाच आकर्षित करून घ्यायचे. त्यामुळे त्याच्या समाजाचे लोक भराभर त्याचे अनुयायी बनले. त्यांना तर तो 'धरतीचा देवच' वाटायचा. तो सुद्धा लोकांना सांगायचा, "देवपुरूष सिंगबोसाने मला स्वप्नात दर्शन देऊन दिव्य शक्ती दिली आहे. त्या शक्तीच्या बळावर मी आपल्या धरतीला या इंग्रजांच्या व जमीनदारांच्या जुलमी शासनातून मुक्त करणार आहे.." तेव्हा लोकांचा त्याच्यावर दृढ विश्वास बसला. बिरसालाही वाटायचे, "मी माझ्या समाजाचा उद्धारकर्ता म्हणून जन्मास आलो आहे." त्याचे अनुयायी हजारोंच्या संख्येने वाढू लागले. त्यांच्यामधून त्याने शेकडो चांगले लढवय्ये निवडून आपले सैन्य सज्ज केले. गया मुंडा या आपल्या जिवलग मित्राला त्याने आपला सेनापती म्हणून नियुक्त केले.

सर्वांनी आपल्या समाजावर इंग्रज अधिकाऱ्यांकडून, खिस्ती मिशनऱ्यांकडून, जमीनदारांकडून व ठेकेदारांकडून होत असलेल्या अन्यायांविरूद्ध मरेपर्यंत लढा देण्याची प्रतिज्ञा केली व स्वराज्य स्थापन करण्याचे ठरविले. इंग्रज सरकारला त्यांच्या हालचालींचा सुगावा लागलाच होता. २४ ऑगस्ट १८९५ रोजी रांची जिल्ह्याच्या इंग्रज पोलिस इनस्पेक्टरने अनेक शिपयांसह रात्री बिरसाच्या घरावर छापा टाकून झोपेत असतानाच त्याला आणि त्याच्या काही साथीदारांना अटक केली. बिरसाला दोन वर्षांची सक्तमजुरीची शिक्षा व ५० रू. दंड केला व त्याच्या साथीदारांना प्रत्येकी २० / २० रु दंड केला.

कैदेतून सुटून आल्यानंतर बिरसाने नव्या जोमाने संघर्ष सुरू केला. इंग्रजांच्या अनेक ठाण्यांवर त्याने हल्ले केले. पराक्रमाची शर्थ केली. पण इंग्रजांच्या बंदुकांपुढे त्यांची परंपरागत हत्यारे निष्प्रभ ठरली. शेकडो कोल जवान मृत्युमुखी पडले. एका लढाईत सेनापती गया मुंडा ठार झाला. बिरसाचा मुक्काम घनदाट जंगलातील टेकड्यांवर गुप्त ठिकाणी असे. त्यामुळे तो इंग्रजांच्या हाती लागणे अशक्यप्राय होते.

परंतु घरभेद्यांकडून इंग्रजांना त्याचा सुगावा लागताच त्याला घेरून पकडण्यात आले. त्याच्याबरोबर त्याचे ८० अनुयायीसुद्धा जेरबंद झाले. तेव्हा रांचीच्या इंग्रज जिल्हाधिकाऱ्याने बिरसाला जमीनदारी देण्याची लालूच दाखवून त्याने आपला उद्योग सोडून द्यावा, असे सांगितले; पण बिरसाने ते धुडकावले. अखेर तुरुंगात त्याचे फार हाल करण्यात आले आणि विष देऊन मारण्यात आले. बिरसा पटकीमुळे मेला, असे इंग्रज सरकारने खोटेच जाहीर केले. त्याच्या अनुयायांनाही जबर शिक्षा ठोठवण्यात आल्या व बिरसाने छोटा नागपूरमध्ये स्वातंत्र्यासाठी आरंभिलेला लढा चिरडून टाकण्यात आला. अशारीतीने कोल समाजाचा हा 'धरतीचा देव' बिरसा मुंडा जानेवारी १९०० मध्ये त्या धरतीच्या कुशीतच विसावला.



